दाते सूचि मंडळ-समिती

प्रा. रा. श्री. जोग (अध्यक्ष)
प्रा. अ. का. प्रियोळकर
प्रा. ग. बा. सरदार
डॉ. मु. ग. पानसे
श्रीमती दुर्गाबाई भागवत
श्री. कृ. शं. हिंगवे
श्री. रा. प्र. कानिटकर
श्री. सु. श. दाते
श्री. वा. वि. भट
श्री. दि. वि. काळे } (कार्यवाह)
श्री. शं. ना. बर्वे }

या प्रकाशनाच्या कामी सर्व तऱ्हेचे सहकार्य केल्याबद्दल मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय सूचि-मंडळ समितीचे आभारी आहे. —प्रकाशक.

प्रकाशक : वासुदेव विष्णु भट, प्रमुख कार्यवाह, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, १७२ नायगाव क्रॉस रोड, दादर, मुंबई १४



प्रथमावृत्ती १९६९

मूल्य पंचवीस रुपये

पृष्ठे [४] + ४८ + ८ फो-चित्रे + ६२८

मुद्रक : पद्माकर गोपाळ जोशी, आनंद मुद्रणालय, १५२३ सदाशिव, पुणे २

# प्रास्ताविक

सूचिकार शंकर गणेश दाते यांच्या आकस्मिक निधनामुळे अपुरे राहून गेलेले त्यांचे ‘ मराठी नियतकालिकांच्या सूची’चे काम त्यांच्याचकडून स्फूर्ति स्वीकारून ‘ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया’ने अंगावर घेतले, त्याच कार्यासाठी ‘ श्री. शं. ग. दाते सूचिमंडळ ’ अशी खास शाखा स्थापन केली आणि तिच्या द्वारा त्यांनी आयोजित केल्याप्रमाणे त्यांचा हा दुसरा महत्त्वाचा सूचिग्रंथ संपादून मराठी वाचकांपुढे मांडण्याचा ‘ संकल्प ’ सुमारे तीन वर्षांपूर्वी ( डिसेंबर १९६५ ) सोडला, ही गोष्ट मशहूर आहे त्यांच्या तृतीय श्राद्धदिनी त्या संकल्पाची परिपूर्ती होऊन एका महिन्याच्या आत हा संपूर्ण वर्णनग्रंथ लोकांच्या हाती देता येत आहे, याचे सूचिमंडळाला अर्थात समाधान वाटते.

इ. स. १९३६ पासून सतत पंचवीस वर्षे खपून श्री. शंकर गणेश दाते यांनी इ. स. १८०० ते १९५० या कालमर्यादेत प्रकाशित झालेल्यापैकी २२,९९२ लहान मोठी पुस्तके प्रत्यक्ष पाहून त्यांच्या वर्णनात्मक ‘ मराठी-ग्रंथ सूची ’चा पहिला खंड १९४४ त व दुसरा १९६१ त असे संदर्भकोशाचे प्रसिद्ध केले. ह्या प्रचंड कामगिरीमुळे मराठी वाङ्मयेतिहासक्षेत्रात त्यांना साहजिकच अढळ आणि आदरणीय स्थान प्राप्त झाले आहे.

“ ‘ ग्रंथसूची ’चे कार्य येथेच समाप्त होत आहे. यापुढे दीडशे वर्षांतील मराठी मासिके व मासिकांतील अभ्यसनीय लेख यांची सूची हाती घ्यावयाची आहे. तरी नवीन कार्यकर्त्यांनी पुढे येऊन सूचिकार्याचा हा दीप यापुढे असाच अखंड तेवत ठेवावा एवढी विनंती करून ही प्रस्तावना संपवितो, ” हे त्यांच्या ‘ मराठी-ग्रंथ सूची’च्या दुसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेतील प्रेरणा देणारे सूचक शब्द आहेत.

‘ मराठी-ग्रंथ-सूची’चे दोन प्रचंड खंड व ‘ साहित्य अकादमी ’च्या ‘ नॅशनल बिब्लिऑग्रफी ’-पैकी मराठी विभाग यांच्या संपादनाचा अनुभव पदरी साठविलेले श्री. दाते आपला संकल्प पुरा करण्यास महाराष्ट्राला लाभले असते तर आपल्या सर्वांच्या भाग्याला पारावार नव्हता. आता त्यांच्या अभावी त्यांच्या १०-१५ वर्षांच्या परिश्रमामुळे जेवढी सामग्री सिद्ध झाली होती ती संपादून व तीत यथाशक्ती भर घालून ती जनतेपुढे मांडीत आहोत. जनतेकडून अपेक्षित प्रतिसाद मिळाल्यास – आणि तो मिळेल अशी आशा आहे – यापुढील सूचिकार्य संपादण्यास अर्थात हुरूप येईल.

श्री. दाते यांनी आपल्या प्रस्तावनेत सुचविल्याप्रमाणे ' सूचि-कार्याचा हा दीप यापुढे असाच अखंड तेवत ठेवण्या 'चे कार्य ' मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया 'ने अंगावर घेतले आहे आणि या कामी सुबुद्ध मराठी जनतेकडून संग्रहालयाच्या साहजिकच काही अपेक्षा आहेत. या अपेक्षा पुऱ्या होण्यासाठी जाणकार जनतेने मंडळाला साह्य करावयाचे तर तिला या कार्याचे स्वरूप शक्य तितके तपशीलवार माहीत करून देणे अवश्य होते. मराठी-ग्रंथसूचीमुळे मराठी-ग्रंथासंबंधी जशी आस्था उद्भवली व जिज्ञासा शमन झाली तसाच प्रकार नियतकालिकाच्या बाबतीत या नियतकालिकांच्या सूचीने झाल्याशिवाय राहणार नाही. आणि ही दोन कार्ये साकल्याने व मूर्तस्वरूपात अभ्यासू जनतेपुढे आता आल्यामुळे या दोहोंच्या यापुढील म्हणजे १९५० सालाच्या पुढील कालखंडातील ग्रंथाच्या व नियतकालिकांच्या सूच्या रचण्याच्या कामी जागरूक जनतेचे व विद्याप्रेमी शासनाचे अनाहूत साह्य मिळाल्याशिवाय राहणार नाही. आणि त्याच आधारावर मराठीने कोश सूच्यादी कार्यात मिळविलेली आघाडी तिला टिकवून धरता येणार आहे.

ह्या दोन सिद्धसूच्यांच्या कालानुक्रमाने पुढील कालांतील रचनेच्या म्हणजे अनुकार्याच्या अगोदर कै. दात्यांच्या आणखी एका संकल्पाच्या पूर्ततेचा उपक्रम हाती घ्यावयाची घोषणा नियतकालिकाच्या सूचीच्या संकल्पाच्या बरोबरच सूचिमंडळाने केलेली आहे — आणि ती म्हणजे नियतकालिकांच्या सूचीच्या पाठोपाठ नियतकालिकांतील ज्ञानवाहक लेखांची संशोधनोपयोगी वर्गीकृत सूची प्रकाशित करण्याची. या कामाची जुळवाजुळव चालू आहे आणि तेही कार्य परमेश्वरकृपेने, सर्वांच्या सहानुभूतीने आणि विद्याभिमानी जनता आणि शासन यांच्या भरीव द्रव्यसाह्याने सूचि मंडळाला यशस्वी करून दाखविता येईल असा विश्वास वाटतो.

सूचि-कार्याचे महत्त्व मोठे, रचनेतील अडचणी असामान्य, तसेच त्याच्या सहज गौरवाच्या मानाने ग्राहकाकडून होणाऱ्या द्रव्यलाभाचे प्रमाण व्यस्त, आणि खर्चाचे प्रमाण बेसुमार, यामुळे अशी कार्ये समर्थांच्या सढळ द्रव्य साहाय्याशिवाय यशस्वी होणे कठीण असते. केवळ मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या एकट्याच्या बळावर हे कार्य रेटून नेणे दुरापास्त होते. अशा परिस्थितीत महाराष्ट्र-राज्य ' साहित्य आणि संस्कृती मंडळा 'ने सूचिमंडळाच्या योजिलेल्या कार्याची पारख करून प्रस्तुत नियतकालिकाच्या सूचीच्या प्रकाशनाला आणि आगामी नियतकालिकातील लेखसूचीच्या तयारीला व प्रकाशनाला यथावसर उदार अनुदान देऊन कार्य उभे राहण्यास व चालू ठेवण्यास मदत केली, ही गोष्ट प्रामुख्याने नमूद करण्यास आम्हाला विशेष आनंद व समाधान वाटत आहे.

प्रस्तुत ग्रंथाची पूर्तता होण्यापूर्वीच निर्घृण काळाने ग्रंथ-निर्मात्यावर वज्रप्रहार केल्यामुळे सूचिकाराचे संकल्पित कार्य दीर्घकाळ पडून राहणे अपरिहार्य झाले. तथापि योग्य समय प्राप्त होताच कै. दाते यांनी साक्षेप-सायासाने जमविलेली साधनसामग्री श्रीमती मंदाकिनीबाई दाते, श्री. राजाभाऊ दाते व श्री. तात्यासाहेब कुंटे यांनी आत्मीयतेने व विश्वासपूर्वक ' मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया'चे स्वाधीन केली; अशा रीतीने कै. शंकररावांचे अपुरे कार्य सिद्धीस नेण्याची सुसंधी मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयास कृपया दिल्याबद्दल आम्ही या सर्वांचे शतशः ऋणी आहोत. महाराष्ट्र-राज्य ' साहित्य आणि संस्कृती मंडळा ' ने आमच्या नियोजित ग्रंथ-निर्मितीला भरघोस आर्थिक पाठिंबा दिला या घटनेचाही कृतज्ञतापूर्वक पुनरुच्चार करून मंडळाच्या सर्व सभासदांच्या सक्रिय सहानुभूतीबद्दल त्यांना हार्दिक धन्यवाद देतो. साहित्य-संस्कृती-मंडळाने नियुक्त केलेल्या डॉ. रा. ना. दांडेकर व प्रा. वा. ल. कुलकर्णी या ' निरीक्षण समिती 'च्या सदस्यांचे बहुमोल साह्य आमच्या ' सूचिमंडळा 'स लाभले यांचाही सादर उल्लेख करणे अगत्याचे आहे; सूचिग्रंथाचे कार्य योग्य मार्गावर नेण्याचे दृष्टीने आवश्यक ते मौलिक मार्गदर्शन केल्याबद्दल या उभय विद्वद्वर्यांना अंतःकरणपूर्वक धन्यवाद देत आहो.

' केसरी-मराठा-संस्थे 'चे माननीय विश्वस्त दासदार श्री. जयंतराव टिळक यांनी प्रथमपासूनच विविध प्रकारे अमोल साह्य-सहकार्य दिल्याबद्दल आम्ही त्यांचे निरतिशय ऋणी आहो. आमच्या स्वतःच्या

ग्रंथालयाव्यतिरिक्त पुण्यातील केसरी मराठा ग्रंथशाला, जयकर ग्रंथालय ( पुणें विद्यापीठ ), डेक्कन कॉलेजचे ग्रंथालय, पुणे मराठी ग्रंथालय, न्यू. म. वि. प्रशाला-ग्रंथालय, बाई जेरबाई वाडिया लायब्ररी ( फर्ग्युसन कॉलेज ), महाराष्ट्र प्रादेशिक मुक्तद्वार ग्रंथालय, स. प. महाविद्यालयाचें ग्रंथालय इ. नामवंत ग्रंथालयांचे चालक व ग्रंथपाल यांनी दिलेल्या निरपेक्ष साह्याबद्दलही आम्ही कृतज्ञ आहों. या सर्वांसमवेतच महाराष्ट्रातील–किंबहुना बृहन्महाराष्ट्रातीलही–अनेक व्यक्ति संस्थांनी कार्याचे महत्त्व ओळखून व त्याविषयी नितांत ममत्व बाळगून दिलेल्या सहकार्याबद्दल सर्वांचे मनःपूर्वक आभार मानतो.

'आनंद मुद्रणालया'चे उत्साही व कर्तव्यदक्ष संचालक श्री. दादासाहेब व श्री. माधवराव या जोशी बंधुद्वयाने व त्यांच्या सहकाऱ्यांनी परिश्रमपूर्वक सुबक मुद्रण केल्याबद्दल, तसेच श्री. मो. रा. वाळंबे यांनी मुद्रित शोधनाबाबत साह्य केलें याबद्दल आम्ही सर्वांचे अत्यंत आभारी आहों. उपरोक्त व्यक्ति-संस्थांनी विशेष हातभार लावून आम्हांस उपकृत केले आहे, आणि म्हणून त्या सर्वांचे आभार मानून मुक्त होण्यापेक्षा त्यांच्या आपुलकीच्या साह्याचा ऋणभार मस्तकी सदैव धारण करण्यातच आम्हांस संतोष व धन्यता वाटत आहे. यच्चयावत संबंधित हितचिंतकांचा कृपालोभ, सुहृद्भाव व सहकारवृत्ती यावरच भावी कार्याची यशस्विता अवलंबून आहे, याची पूर्ण जाणीव ठेवून व ते सर्व आम्हांस आमच्या प्रदीर्घ प्रवासांत पूर्ववत साथ करतील अशी दृढ श्रद्धा बाळगून हे आभार-प्रदर्शन पुरे करतो.

द्रव्याशिवाय काही घडविता येत नाही, ही गोष्ट खरी असली तरी द्रव्यसमृद्धीही जेथे थिटी पडते असे हे मुद्रित शोधाचे कार्य आहे. तेव्हा 'यशस्वी सूची ही समृद्ध संग्रहाशिवाय अशक्य आहे', हे सूत्र ध्यानात घेऊन जेणेकरून अज्ञात ग्रंथ आणि अनुपलब्ध नियतकालिके मध्यवर्ती संग्रहालयात येऊन अभ्यासकांना उपयोगी पडतील असा निरलस उद्योग प्रत्येक हितचिंतकाने आवर्जून करावयास हवा, हे उघड आहे. म्हणूनच ज्या कोणाला शक्य होईल त्याने व ज्याप्रमाणे साधेल त्या प्रमाणात उपलब्ध सामग्रीची माहिती पुरवून मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाला आपला ग्रंथांचा व नियतकालिकांचा केंद्र-संग्रह यावच्छक्य संपूर्ण व यशस्वी करण्यास कोणत्याही प्रकारे वा स्वरूपात ( देणगी वा विक्री ) मदत करावी अशी आग्रहाची विनंती हरघडी करीत आलों आहों, कारण या राष्ट्रीय कार्याला प्रत्येकानेच हातभार लावावा असेच त्याचे महत्त्व आहे.

— प्रकाशक

# दाते-जीवन-दर्शन

" ग्रंथ हेच अखेरीस माझे गुरु झाले, ग्रंथांमधूनच मला कार्यस्फूर्ति मिळाली, ग्रंथांनीच माझे जीवन व्यापून वेढून टाकले–" असे तळमळीचे उद्गार वारंवार काढून ग्रंथाबद्दल नितांत श्रद्धा व आत्मीयता बाळगणारे सूचिकार श्री. दाते यांनी, मराठीतील सुमारे २३ हजार पुस्तके एकहाती चाळून ' मराठी ग्रंथ सूची ' हा अपूर्व, अभिनव, बहुउपयुक्त व अमोलिक असा द्विखंडात्मक ग्रंथराज ( खं. १ : १८०० ते १९३७–प्र० १९४४; खं. २ : १९३८ ते १९५०–प्र० १९६१ ) केवळ एकाकी प्रयत्नाने, दुर्दम्य जिद्दीने व जीवितकार्य मानून निर्माण केला आणि वाङ्मयक्षेत्रात आपले नांव अजरामर करून ठेवले. सूचिकार श्री. शंकर गणेश दाते यांचा जन्म दि. १७ ऑगस्ट १९०५ रोजी रत्नागिरी येथे झाला. त्याचे मूळ गाव कोंकणातील अडिवरे ( ता. राजापूर, जि. रत्नागिरी ) हे होय. पहिली ६–७ वर्षे मुंबई-आडिवऱ्यांत गेली, पण त्यानंतरचे त्यांचे सारे वास्तव्य केवळ मुंबई पुण्यातच घडले आणि तीच त्यांची कर्मभूमी व कीर्तिभूमीही ठरली.

श्री. शंकरराव दाते यांचे वडील मुंबईस सरकारी नोकरीत होते, त्यामुळे श्री. शंकररावांचे प्रारंभीचे शिक्षण मुंबईस व शेवटी काही काल पुण्यास झाले. कोंकणच्या वातावरणाचा व वडिलांच्या प्रशंसनीय कर्तबगारीचा ठसा श्री. शंकरराव यांच्यावर उमटला असला तरी त्यांच्या जीवनाला सुयोग्य आकार प्राप्त होण्यापूर्वीच बालपणी ( वयाच्या अवघ्या ९ व्या वर्षीच ) शंकरराव पितृ प्रेम-वात्सल्याला मुकले, हा दैवदुर्विलासच होय. १९१४ साली वडील निवर्तले व पुढे लवकरच शंकररावांचे ज्येष्ठ बंधूही कालवश झाले. या दोघा वडीलधाऱ्या कुटुंबियांच्या निधनाने शंकररावांचा आधार सर्वस्वी तुटला, मार्गदर्शन संपले, शंकरराव उघडे पडले व त्यांच्यावर आपत्तींची परंपरा कोसळली; आणि अशा दुःस्थितीतच त्यांच्या तेजस्वी कर्तृत्वाचे बीजारोपण होऊन त्यांचे अंगीकृत कार्य चांगलेच बहरले. विपत्तींना निर्धाराने तोंड देऊन, प्रतिकूल परिस्थितीशी झुंजून त्यांनी आपला उत्कर्ष केवळ स्वत:च्या बुद्धीने व हिमतीवर साधला. अंधारातून मोठ्या कष्टाने वाट काढीत काढीत स्वत:चे जीवन त्यांनी उजळून टाकले.

शालेय जीवनातच ( मुंबई : जानेवारी १९२२ ) श्री. शंकररावांनी ' निर्झर ' या नावाचे एक वाङ्मयीन कालिक ( २० पृष्ठांचे व २५ दिवसांनी निघणारे ) सुरू करण्याच्या दृष्टीने प्रयत्न करून पाहिला; हस्तलिखिताच्या स्वरूपात २–३ अंक काढले. परंतु " हा उपक्रम स्वागतार्ह असला, तरी व्यावहारिक दृष्टीने त्याचा वेळीच पूर्ण विचार करा, " असा पोक्त सल्ला अनुभवी संपादक कै. वा. गो. आपटे यांनी दिला; दात्यांनी तो मानला आणि ' निर्झरा 'चा नाद सोडून दिला. विद्यार्थिदशेतच चिपळूणकरांवर लिहिलेल्या निबंधाबद्दल व ' मौज ' पुरस्कृत समस्यापूर्तीच्या स्पर्धेतील सुयशाबद्दल श्री. दाते यांनी पारितोषिके मिळवली; त्याचप्रमाणे महाविद्यालयीन क्षेत्रात ( इंटरला असताना ) संस्कृतची शिष्यवृत्तीही पटकावून त्यांनी आपल्या बुद्धिमत्तेची चांगलीच चमक दाखवली.

श्री. दाते याना लहानपणापासूनच वाचनाची अतिशय ओढ, ग्रंथांचे अपरंपार वेड; इतके की हाताशी येईल ते पुस्तक ते वाचून काढीत. शिवाय कुशाग्र बुद्धीच्या व तीव्र स्मरण शक्तीच्या जोरावर पुस्तकाचा आशय व विषय त्यांच्या स्मृतिपटलावर वज्रलेप होऊन जाई; आणि स्वाभाविकपणेच बालवयात उदित झालेले पुस्तकाचे, साहित्याचे व संशोधनाचे आकर्षण वाढीस लागून मराठी मायेची सेवा करण्याच्या कल्पना वयाच्या १४ - १५ व्या वर्षापासूनच त्यांच्या मनात तरंगू लागल्या. शेवटी त्या विधायक कल्पना-योजनांनी प्रभावी मूर्तस्वरूप धारण केले. ग्रंथपाल म्हणून मिळणारी सरकारी नोकरी तर राहोच, पण ' राष्ट्रीय ग्रंथसूची 'चे विलोभनीय संपादकपद सहजसाध्य असूनही शंकररावांनी ते स्वीकारले नाही. काही कौटुंबिक वा व्यावहारिक अडचणींमुळे त्यांनी या जागा पत्करण्यास नकार दिला असेल असे सहृदयांनी बोलला वाटेल; परंतु केवळ निशिष्ट ध्येयाने प्रेरित झाल्यामुळेच निर्लेप राहणेच त्यांना श्रेयस्कर वाटले, हे स्वाभाविकच होते. या विविध व्यामोहापासून शंकरराव निर्धाराने अलिप्त राहिले यातच त्यांची निस्पृहता व अंगीकृत कार्याविषयीची नितांत निष्ठाच प्रत्ययास येते. नियोजित सूचि-ग्रंथाची परवड होऊ नये, हीच यामागची उदात्त उत्कट भूमिका व दुर्दम्य इच्छा-आकांक्षा होती यात संदेह नाही. अर्थात सरकारी नोकरी करावयाची नाही हा प्रथमपासूनचा निर्धार व प्रसंग राष्ट्रीय धाण:, स्वतःचा विकास साधताना, त्यांनी कटाक्षाने पाळला हे स्पष्ट होय.

श्री. दाते यांनी केलेल्या वाङ्मयसेवेचा ( पर्यायाने लोकसेवेचाही ) प्रारंभ लोक साहित्याचा संग्रह करण्याने झाला. अत्यंत परिश्रमपूर्वक व साक्षेपाने संग्रहीत केलेल्या ह्या लोकवाङ्मयाचा काही भाग ' लोककथा ' ( १९२९, १९३० ) या पुस्तकाच्या रूपाने दोन भागात त्यांनी जनताजनार्दनचरणी सादर केला; नुकतीच (१९६८) या दोन विभागाची मिळून पुनरावृत्ती निघाली आहे. तरीपण अद्याप बरेच उर्वरित साहित्य अप्रकाशित स्वरूपात पडून आहे. सूचितंत्र, ग्रंथालयशास्त्र यासारख्या रुक्ष विषयात रस घेऊन सदैव त्यातच रममाण झालेले श्री. शंकरराव तितकेच रसिकहि होते, हे संगीतप्रेमी दात्यांच्या सतार-वादनाभिरुचीमुळे व " मणिमाळ " या काव्यकूजनाने प्रत्ययास येण्यासारखे आहे. दाते यांची ' शरलेखा ' या नामाभिधानाने नटलेली कविताची एक वही " मणिमाळे "त समाविष्ट झालेली नाही; ती ' कांचनमाला ' या नावाने कोणा प्रकाशकाने प्रसिद्ध केल्यास सहजच ' मणिकांचन '-योग साधेल व दात्यांच्या काव्यप्रांगणातील वाङ्मयविलास रसिकांच्या दृष्टिपथात येऊन त्यांना त्याचा आस्वाद घेता येईल. उगमस्थानच्या या दोन वाङ्मयकृति-प्रवाहाने यथाक्रम यथावकाश जे विशाल जलौघाचे रूप धारण केले ते म्हणजे ' मराठी ग्रंथसूची " हा सर्वमान्य व अलौकिक ग्रंथ होय. या प्रचंड ग्रंथाच्या निर्मितीची प्रेरणा श्री. दाते याना त्यांच्या एका शिक्षकाच्या भगतिक्तेतून झाली.

" टागोरांच्या गीतांजलीचे मराठी भाषांतर " हे गुरुजींना ग्रंथसंग्रहात सहजासहजी न आढळलेले पुस्तक श्री. दाते यांनी प्रयासाने ' मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया'तल्या विशिष्ट सूचिविभागात शोधून आपल्या असहाय गुरुवर्यांपुढे ठेवले. याच नवलपूर्ण घटनेमुळे " व्यापक शास्त्रीय तत्त्वानुसार रचना करून कोशप्रथाप्रमाणे ' मराठी ग्रंथसूची ' तयार करण्याचा प्रयत्न करावा " असा संकल्प श्री. दाते यांनी सोडला व अविश्रांत परिश्रम करण्याची झुंजारवृत्ती, चिकाटी, स्वार्थत्याग, निःस्पृहता, दीर्घोद्योग इ. गुणामुळे तो सिद्धीसही नेला. ' नाहष्टं लिख्यते किंचित् ' या प्रतिज्ञेचे कटाक्षाने परिपालन करून या प्रथाच्या सिद्धतेसाठी त्यांनी जिवापाड मेहनत घेतली, तिच्या पायी सर्वस्वाचा होम केला. ग्रंथालयमहर्षी पद्मश्री डॉ. रंगनाथनही श्री. शंकरराव यांच्या ज्या अभिनव योजकतेने स्तिमित व संतोषित झाले ती पुस्तकरूपाने ( द्विबिंदुवर्गीकरणपद्धतीतील रोमी व अरबी वर्णांक-चिन्हांचे जागी बालबोध चिन्हे : १९४६ ) प्रकट झालेली योजना हे सूचिशास्त्राच्या निदिध्यासाचे व ग्रंथालय-शास्त्राच्या व्यासंगपूर्ण सखोल अभ्यासाचेच द्योतक होय. निगर्वी वृत्ती व रेखीव कार्यपद्धती, प्रसिद्धि-विन्मुखता, चतुरस्रपणा, व पराकोटीची कर्तव्यनिष्ठा, साधी व नीटनेटकी राहणी आणि उच्च विचार-सरणी, प्रदीर्घ वाचनाभ्यास लालसा व चौकस-चिकित्सकपणा हे श्री. दाते यांचे प्रमुख स्वभावविशेष होते.

वरवर पाहणाराला श्री. शंकरराव कदाचित काहीसे एककल्ली, हेकेखोर, शीघ्रकोपी, विक्षिप्त, तुसडे वाटले असतील परंतु वस्तुत: ते तसे नसल्याने त्यांच्या या तथाकथित दोष-दुर्गुणांत अंती हितकर, सुपरिणामी असा विशेष अर्थ भरलेला होता, असेच म्हणावे लागेल. केवळ प्रदर्शनप्रिय, स्वार्थी, औदार्याचा गैरफायदा घेणाऱ्या वाचिवीरावर व तत्सम अधम मनोवृत्तींवर श्री. दाते संतापत, प्रसंगी तोंड टाकीत. अंगीकृत कार्याबद्दल पराकोटीची चोखंदळ तळमळ व वक्तशीरपणा असल्याने स्वत:च्या विशिष्ट व अपेक्षित साच्यांत न बसणाऱ्या व्यक्तींबद्दल त्यांना संबंधित कामापुरतीच चीड येई, तथापि तीत आकस असा केव्हाहि नसे. अत्यंत मनोभावे, तळमळीने कार्य करणाऱ्या अभ्यासक संशोधकाला ते स्वेच्छेने मुक्तहस्ते साह्य-सहकार्य देत. टापटीप, सुव्यवस्था व शिस्त याचे मोकळे व स्पष्टवक्ते, वेळ व शब्द कसोशीने पाळणारे आणि आळस-दिरंगाई शत्रुवत मानणारे श्री. दाते सकृद्दर्शनी नारळाप्रमाणे खडबडीत वाटले तरी त्यांच्या अंतर्यामी वात्सल्य स्नेहभाव, सात्त्विक सेवाभाव व निर्मळ प्रेमभाव यांचे जिवंत व जातिवंत पाझर वसत होते, वाहात होते, हेही श्री. दाते यांच्या व्यक्तिमत्त्वाचे सत्य चित्रण वा प्रांजळ मूल्यमापन करणाऱ्याने लक्षात घेतलेच पाहिजे.

सूचि ग्रंथाच्या द्वितीयखंडाच्या अनुषंगाने 'महाराष्ट्र साहित्य परिषद' व 'महाराष्ट्र ग्रंथालय संघ' या संस्थांचे वतीने पुण्यात श्री. दाते यांचे दोन सत्कार-समारंभ [ (१) ग्रंथप्रकाशनाचे निमित्ताने : दि० ३।७।१९६१ अध्यक्ष नामदार श्री. यशवंतराव चव्हाण; (२) दि० २५।६।१९६१ अध्यक्ष न्यायमूर्ती श्री. प्र. बा. गजेंद्रगडकर ] साजरे करण्यात आले. या सन्मानप्रसंगीहि न कचरता, न डगमगता श्री. शंकरराव यांनी निर्भीड नि:संकोचपणे सूचिकार्याबाबतची आपली भूमिका व मनोव्यथा व्यक्त करून वस्तुस्थितीवर विदारक प्रकाश टाकला. अर्थात त्यांच्या त्या मनोगतातून याचनेचा वा लाचारीचा लवमात्रही सूर नव्हता; कारण तसा त्यांचा स्थायीभावच नव्हता. आणि म्हणूनच सरकारी कृपा वर्षावाला ते पूर्णपणे सत्पात्र असूनही क्वचित-किंचित शिडकावच त्यांच्या वाट्याला आला.

श्री. दाते यांना मूल्यवान दुर्मिळ ग्रंथ जमविण्याचा व जतन करण्याचा विलक्षण हव्यास असे. या हौसेपोटी व चिकित्सक-चौकस दूरदृष्टीने त्यांनी विपुल ग्रंथसंग्रह स्वत:साठी सिद्ध केला; तथापि कष्टसाध्य अशा या ठेव्याला केवळ अगतिकतेने, त्यांना लौकरच मुकावे लागले. वारस-विभागणीतून वाट्याला आलेला वडिलोपार्जित धनांश 'ग्रंथसूची 'प्रीत्यर्थ खर्च झाल्याने अनिच्छेनेच ग्रंथ विकणे व त्या द्रव्यातूनच घराची खरेदी करणे त्यांना भाग पडले. दु:खात सुख इतकेच की हा ग्रंथसंग्रह इतस्तत: कोठेही न जाता त्या मौलिक साहित्याने नामवंत ग्रंथालयेच समृद्ध केली. दात्यांचा ग्रंथ खरेदीचा हा लोकविलक्षण पण तितकाच अत्यंत लोकोपकारक छंद म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या प्रोत्साहनाने शतगुणित झाला, तद्वतच त्यांच्या इतिहास-व्यासंगी वृत्तीला संशोधनाची जोड लाभली तीही प्रा. दादासाहेब पोतदार यांच्याच प्रेरणेमुळे. सरकारी ग्रंथालय-योजना कार्यान्वित होण्यात व तदनुसार पुण्याच्या 'प्रादेशिक ग्रंथालय'-स्थापनेत श्री. दाते यांचा फार मोठा वाटा आहे; किंबहुना त्याच ग्रंथालयात ग्रंथपाल या नात्यानेही त्यांचा तंत्रकुशल समर्थ हात काही काळ वावरलेला आहे. खडतर जीवन-संग्रामाचा परिणाम म्हणा या स्वतंत्र स्वावलंबी जीवनाचा प्रभाव म्हणा पण त्यांचे मन या तांबेदारीत फार काळ रमेना आणि स्वाभाविकपणेच ते अल्पावधीत बंधनमुक्त झाले.

'साहित्य अकादमी' प्रणीत "राष्ट्रीय ग्रंथसूचि" या महत्त्वाच्या प्रकाशनासाठीही श्री. दाते यांचे संशोधनकार्य कारणीभूत झालेले आहे. 'निर्झर' काढण्याची कल्पना सोडावी लागली तरी "टीकापत्रक" नावाचे मासिक व "भूगोल-स्थळ" (महाराष्ट्राचा स्थल-कोश), "अभिनव शब्दकोश" (संस्कृत-मराठी), "१८०० ते १९५० या दीडशे वर्षांच्या कालखंडातील मराठी नियतकालिके व त्यातील लेखांची सूचि", "भारतविषयक संदर्भ-साहित्याची समग्र सूचि" यासारखे बहुमोल संदर्भ ग्रंथ निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून त्या दृष्टीने प्रयत्नशील असतानाच हा कलंदर कर्मयोगी कठोर काळाच्या भक्ष्यस्थानी पडल्याने मराठी भाषेची व अभ्यासकांची अपरिमित हानी झाली आहे हे निर्विवाद होय. श्री. दाते यांच्या अकाली निधनाने ( पुणे—गुरुवार दि. १० डिसेंबर १९६४ : मार्गशीर्ष

शु० ६ शके १८८६ : सायकाळी ४॥ वाजता ) श्री. शंकररावांचे, अनेक महत्त्वाची कामे पार पाडण्याचे, सकल त्यांच्याबरोबरच नष्टप्राय झाल्यासारखे वाटले तरी त्यांपैकी, श्री. शंकररावांच्या मोत्यासारख्या हस्ताक्षरातील नियतकालिक-सूचीसाठी तयार असलेली, काही साधनसामग्री हाती घेऊन ' मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालया 'ने " श्री. शं. ग. दाते सूचिमंडळा "च्या द्वारा त्यांचा नियोजित निर्देशात्मक ग्रंथ (मराठी नियतकालिकांची सूचि : १८०० ते १९५० ) प्रकाशित करण्याचे योजिले, त्या संकल्पाचाच एक भाग म्हणून प्रस्तुत प्रथम खंड प्रसिद्ध होत आहे. यथावकाश उर्वरित भाग प्रकाशित होणारच आहेत. तसेच नियोजित संपूर्ण ग्रंथाच्या प्रसिद्धीनंतरही हे कार्य सातत्याने चालू ठेवण्याचे धोरणही संस्थेने अंगीकारले आहे. अर्थात हे श्री. दाते यांचे चिरस्थायी स्वरूपाचे, लोकादरास पात्र होणारे व अत्यंत लोकोपयुक्त असे स्मारकच होय; सर्वांच्या सदिच्छा सहकार्यानेच संस्थेचा हा संकल्प सिद्धीस जाणार हे उघडच आहे. हाच आदर्श दृष्टीपुढे ठेवून न जाणो उद्या अशीच एखादी व्यक्ति संस्था स्फूर्ती घेऊन उठेल आणि श्री. शंकरराव दाते यांच्या उर्वरित संकल्पांपैकी एखाद्या योजनेची सूत्रे वा साधने उपलब्ध झाल्यास ती हाती धरून शून्यातून विश्व उभारीलही.

## श्री. शं. ग. दाते यांचे लेखनकार्य

| | |
|---|---|
| १ ) लोककथा पुस्तक १ | पुणे १९२९ |
| २ ) ,, ,, २ | पुणे १९३० |
| ३ ) ,, ,, ( दोन्ही भागांचे एकत्र पुनर्मुद्रण ) | पुणे १९६८ |
| ४ ) मणिमाळ-' केशर ' ( दाते यांचे टोपण नांव ) व ' उदास ' यांच्या काही कविता | पुणे १९३० |
| ५ ) ग्रंथसूचिशास्त्र | पुणे १९४३ |
| ६ ) दशांश वर्गीकरण पद्धति | पुणे १९४३ |
| ७ ) द्विबिंदु वर्गीकरण पद्धतीतील रोमी व अरबी वर्णांकचिन्हांचे जागी बालबोध चिन्हांची योजना | पुणे १९४६ |
| ८ ) पंचारती : मराठी ग्रंथालयांची सद्य:स्थिति व ती आदर्श करण्याचे मार्ग | मुंबई १९४६ |
| ९ ) मराठी ग्रंथ सूचि ( १८०० – १९३७ ) | पुणे १९४४ |
| १० ) मराठी ग्रंथ-सूचि ( १९३८ – १९५० ) | पुणे १९६१ |
| ११ ) महाराष्ट्र-जीवन : खंड २ प्रकरण ९ : संदर्भ-साहित्य सूचि | पुणे १९६० |
| १२ ) **The National Bibliography of Indian Literature, 1901–1913 : Marathi Section** | ( to be published ) |

# विषयानुक्रम


| विषय | | | पृष्ठ |
|---|---|---|---|
| प्रास्ताविक | ... | ... | १ |
| दाते–जीवन–दर्शन | ... | ... | ४ |
| विषयानुक्रम | ... | ... | ८ |
| प्रास्ताविक सूचना | ... | ... | ९ |
| काही लक्ष्य अशुद्धे | ... | ... | १२ |
| ग्रंथ–प्रवेश | ... | ... | १३ |
| काही आधीचे प्रयत्न | ... | ... | ४३ |
| उपलब्धिस्थले–संक्षेपाचा खुलासा | ... | ... | ४५ |
| उतारे | ... | ... | ४८ |
| निवडक नियतकालिकांची मुखपृष्ठे | ... | ... | ४८ चे समोर |
| वर्णन–विभाग | ... | ... | १ |
| वर्णन–विभागाची पुरवणी | ... | ... | ४१५ |
| संदर्भ–विभाग – ( मराठी नियतकालिकांच्या याद्या ) | | ... | ४६५ |
| १ कालानुक्रमाने | ... | ... | ४६७ |
| २ स्थलानुक्रमाने | ... | ... | ४८७ |
| ३ जीवनमानानुक्रमाने | ... | ... | ५०८ |
| ४ विषयानुक्रमाने | ... | ... | ५१४ |
| परिशिष्ट–विभाग – ( संपादकांचे परिचय ) ... | | ... | ५[illegible] |
| १ प्राक्कथन ( भूमिका, मार्गदर्शन ) ... | | ... | ५[illegible] |
| २ संपादकांचे परिचय | ... | ... | ५[illegible] |
| ३ परिचय–पुरवणी | ... | ... | ६[illegible] |
| ४ काही निधनकाल | ... | ... | ६[illegible] |
| ५ काही लक्ष्य अशुद्धे | ... | ... | ६[illegible] |

# प्रास्ताविक सूचना

'मराठी नियतकालिकांची सूचि' म्हणजे मुद्रित मराठी नियतकालिकांचा वर्णनात्मक कोश. आद्य सूचिकार शंकर गणेश दाते यांनी आपल्या 'मराठी-ग्रंथ-सूची'त विवेचिलेल्या ग्रंथसूचि-शास्त्राच्या व प्रगट केलेल्या विचारांच्या व संकल्पांच्या अनुरोधाने प्रस्तुत सूचि किंवा कोश ग्रंथरूपाने अभ्यासकांना उपलब्ध होत आहे. या कोशाचे सुलभतेसाठी 'वर्णन-विभाग', 'संदर्भ-विभाग' आणि 'परिशिष्ट-विभाग' असे तीन भाग केले आहेत. तीनही विभागांत नियतकालिकांचा वा चरित्रादी अन्य सामग्रीचा अनुक्रम वर्णनिष्ठ पद्धतीने दिलेला आहे. संदर्भ विभागात व परिशिष्ट-विभागात त्या त्या ठिकाणी अंशोपयोगी सूचना दिल्याच आहेत. येथे मुख्यतः वर्णन-विभागासंबंधी व इतर सर्वसाधारण खुलासे करण्यात येत आहेत.

प्रस्तुत सूचीमध्ये इ. स. १८३२ पासून स्थूल मानाने ३१ डिसेंबर १९५० अखेर पावेतो छापलेल्यांपैकी उपलब्ध झालेल्या 'पाक्षिकापासून वार्षिकापर्यंत' च्या नियतकालिकांची नोंद केली आहे. सामान्यतः मराठीत थोडा तरी अंश प्रसिद्ध करणाऱ्या नियतकालिकांचा यांत समावेश केला आहे; परंतु शालेय किंवा महाविद्यालयीन कालिके बहुधा वगळली आहेत. वर्णन-विभागातील बहुतेक नियतकालिकांची माहिती कै. दाते यांनी दहा-पंधरा वर्षे आटोकाट प्रयत्न करून, नियतकालिके प्रत्यक्ष पाहून, सुवाच्य व शक्य तो सविस्तर लिहून ठेविली होती. जमेल तेथे पडताळा घेऊन, जी नवी मिळाली त्या माहितीची भर घालून, पण मुख्यतः सुगमतेसाठी परिच्छेद पाडून व विशिष्ट चिन्हयोजना करून मुद्रणप्रत सिद्ध करण्यापलीकडे तिच्यात फारसा फरक केलेला नाही. परिशिष्टातील सर्वच माहिती (चरित्रे) अगदी नवी परिश्रमपूर्वक संपादून सादर केलेली आहे. त्यावरून संपादनाच्याबद्दल व त्याच्या आधारावर पात्रतेबद्दल किंचित तरी उपोद्बलक ज्ञान हस्तगत होईल.

वर्णन-विभागात नियतकालिकांचा क्रम अनुवर्ण पद्धतीने लावताना, एकाच नावाची अनेक असतील तेथे ती कालानुक्रमाने लावून, प्रत्येकाची मिळालेली माहिती सहा परिच्छेदांत विभागून दिली आहे :– १ –(बहिरंग), २ –( अंतरंग ) उद्देश – [ स्वरूप ], ३ - ब्रीदवाक्य(मुळाबरहुकूम), ४ - विशेष माहिती, ५ - [ उपलब्धि स्थल ] आणि ६ - (प्रकाशित अंक). जी माहिती मिळाली नाही, तिचा सबंध परिच्छेद रद्द करून वा तेवढ्या अंशाचे संक्षेपचिन्ह वगळून तो अभाव व्यक्तविला आहे. क्रमांक दोन, तीन व चार या परिच्छेदांना वर जाड ठशात छापलेलीच नावे दिली आहेत. पाचव्या परिच्छेदातील माहिती चौकटी कंसातच छापली आहे. त्यातील संक्षेपांचा खुलासा निराळा दिला आहे. पाचव्या व सहाव्या परिच्छेदांना निराळे मथळे छापले नाहीत. पहिल्या परिच्छेदाची सुरवात जाड ठशात नियतकालिकाचा प्रकार छापून केली आहे.

यांपैकी काही परिच्छेदांची रचना जरा तपशीलवार उघड करून दाखविली पाहिजे :–

बहिरंग परिच्छेदात १ - नियतकालिकाचा प्रकार ( जाड ठसा ), २ - संपादक, सहसंपादक, ३ - प्रकाशक ( व्यक्ति, संस्था, स्थल ), ४ - मुद्रक ( मुद्रणालय ), ५ - वार्षिक वर्गणी ( वा. व. ), ६ - फुटकळ अंकाची किंमत ( फु.अं. ), ७ - अंकात पृष्ठे, ८ - आकार ( लांबी इंच × रुंदी इंच ), ९ - प्रथमांक ( दिनांक, महिना, साल ), १० - शेवटचा अंक ( दिनांक, महिना, साल ), ११ - गणनापद्धती ( वर्षवार, अंकवार इ. ) आणि १२ - विशिष्ट संज्ञा, आजच्याप्रमाणे वर्ष-अंक असे न म्हणता, ( हौशीखातर पुस्तक अंक, माला-पुष्प, भेट, किरण, रज असे काव्यात्म पर्याय वापरतात ते ), असा बारा प्रकारचा तपशील याच क्रमाने उपलब्ध करून दिलेला आहे. सहज कळण्यासारख्या संज्ञा व संक्षेपचिन्हे वापरली आहेत. प्रत्येक तपशील पूर्णविराम-

रिझाने पुरा झालेला आहे शक्य तो प्रथमांकाची, नियत प्रकाशनाची, माहिती दिली आहे. तशी देता येत नाही असा तापी झाली तेव्हा 'विशेष माहिती' या सदरात त्याबद्दल उल्लेख केलेला आढळेल १९५० च्या पुढच्या जीवनाचा लागलेला अंदाज केवळ शतायुषीक म्हणून नोंदून ठेविला आहे

उद्देश — [स्वरूप] परिच्छेदात शक्य तेथे संपादकांनी वापरलेले उमेदीचे उद्गार व विशेष माहितीवर वरील याचे दर्शन घडविले आहे. अशी स्पष्ट विधाने आढळली नाहीत तेथे उपयुक्त वाटले ते संबंधी समाज, वर्ग, धर्म, संस्था, संचालकमंडळ इत्यादि सूचक अल्पाक्षरी निर्देश उतरले आहेत उद्देश सांगणे जमले नाही तेथे स्वरूप असा भिन्न मथळा देऊन भावावर वस्तुनिष्ठ अशी पूरक माहिती नोंदिली आहे

विशेष माहिती हा परिच्छेद त्या मानाने सर्वसंग्राहक असा कल्पिलेला आहे. वरील बहिरंग विषयक व अंतरंगविषयक वर्णनात भर घालणारी अशी विविध स्वरूपाची कुतूहलजनक अशी जी व जेवढी माहिती हाताशी आली ती बहुतेक सर्व वाचकांच्या तशी जिज्ञासा पुरविण्याचा या सदराचा उद्देश आहे. यामध्ये नियतकालिकात झालेल्या विशिष्ट प्रकाशनाच्या स्वरूपाचा काही त्रोटक लक्ष्य वरील आवर्जून दिलेला आढळेल.

प्रकाशित अंक ह्या संकलित परिच्छेदात १ — नियतकालिकाच्या जीवनातील वर्षक्रमांक, २ — त्या त्या धारा महिन्याच्या वर्षातील पाहावयास मिळालेले अंक-क्रमांक आणि ३ — त्या वर्षाची वा मुख्या अंकाची महिना-साल स्वरूपात काल मर्यादा, इतकी किमान माहिती बहुधा प्रत्येकाची नोंदविली आहे

याशिवाय काही अधिक गोष्टी दाखवाव्या लागल्या आहेत. त्या अशा : — जागा वाचविण्यासाठी अनेक वर्षे एकत्र दिली तर ती वर्षसंख्या कंसात दिली आहे (पाहा 'लोकमित्र', सूचि—पृ. २७२ - २७३). त्या त्या वर्षातील विशेषांक तेथेच दर्शविले आहेत (तेथेच पाहा) काही ठिकाणी वर्षातील पृष्ठसंख्या देता आली (पाहा 'लोकशिक्षण' पुणे १९२८, पृ. २७४ - २७५), आणि इतर काही कालसापेक्ष महत्त्वाचा तपशील (उदाहरणार्थ — 'लोकशिक्षणा'ची 'लघुग्रंथमाला', पृ. २७५) देता आला तर तो आवर्जून दिला आहे. कित्येक वेळा विशेषांकाची संख्या बरीच मोठी वाटल्यामुळे त्याची सलग यादी सोयीसाठी 'विशेष माहिती'त एकत्र दिली आहे (पाहा 'चिन्मयजगत्' पृ. ८९).

मासिकाची गणना तशी सरळ होते; परंतु द्वैमासिके व त्रैमासिके असतील तर त्याच्या प्रकाशनाचे योग्य महिने कोणते, याची जागच्या जागी त्वरित सदर्भासाठी दखल घेतलेली आढळेल (पाहा 'भंडारी', पृ १८८).

नियतकालिकावरील कालनिर्देश मुळात असतील त्याप्रमाणे विक्रमसंवत, शालिवाहन, फसली, इसवी अशा शक-सनात दिले आहेत. संदर्भविभागात मात्र त्याचे रूपांतर इसवी गणनेत दिले आहे.

प्रकाशित अंकाची ही माहिती संकलित करताना व सूचिग्रंथाच्या अन्य रचनेत कमीत कमी अपरिचित चिन्हे वापरलेली आहेत. अंक वेगळे दाखविण्यासाठी फक्त स्वल्पविराम वापरला असून, एकाच अंकाबद्दलची देण्यासारखी सर्व माहिती दोन स्वल्पविरामामध्ये सलग दिली आहे. ती देताना विशिष्ट व्यवस्था राखल्याचे थोडयाशा परिशीलनाने ध्यानात येईल व बोध होईल उदाहरणार्थ — १ — सलग पण सुट्या अंकाची माला दोन अंकक्रमांकांमध्ये 'ते' वापरून दर्शविली आहे. २ — जोड अंक असतील तर त्याचे क्रमांक दोहोमध्ये छोटे संयोगचिन्ह घालून ते कंसात (३ - ४) किंवा (३ - ६) असे दाखविले आहेत. ३ — अनुपलब्ध अंक...अशा टिंबानी दर्शविले आहेत. ४ — अनियमितपणा दर्शविण्यासाठी अंकक्रमांकाबरोबर महिना व शक-सन द्यावा लागला आहे (पाहा 'बालबोध (२)', पृ १७६). कित्येक वेळा निर्दिष्ट काल व प्रकाशनकाल यातील फरक दर्शविण्याची तजवीज केली आहे (पाहा 'निबंधमाला', पृ. १४४) ५ — काही अनुमित काल (पाहा 'विश्वब्राह्मण समाजोन्नति', पृ. ३०४) व इतर केवळ अनुमानाची माहिती निराळी दाखविण्यासाठी सर्वमान्य असलेले ( ) कंसचिन्ह

वापरलेले चाणाक्षाना ओळखणे कठीण जाणार नाही. संशयदर्शक प्रश्नचिन्ह अनेक ठिकाणी वापरावे लागले आहे. आणि वाजवीपेक्षा अधिक काल मध्ये गेल्याचे दर्शविण्यासाठी + या चिन्हाचा या विशिष्ट अर्थाने वापर केला आहे.

सर्व नियतकालिकाची माहिती संपूर्णतया एकविध दर्शविण्याइतकी समरूप व समृद्ध नाही. विविध, विषम आणि क्वचित तपशील कमीत कमी विस्ताराने दाखविण्याच्या आवश्यकतेमुळे व परिचित चिन्हापलीकडे जाणे असुरक्षित वाटल्यामुळे अगदी काटेकोर एकरूपतेचा क्वचित् भंग झालेला मासेल; तथापि येथे एकंदर माहिती सुबोध करण्याचा यत्न केलेला आढळेल. काही चुका आढळतील त्या छपाईच्या आहेत. त्या दुरुस्त करण्याला उपयोगी तपशील बहुधा अन्य संदर्भात निःसंदिग्ध स्वरूपाचा जवळपासच आढळेल. अगदी थोड्या महत्वाच्या वाटल्या अशा चुका वेगळ्या दाखविलेल्या आहेत ( पृष्ठ १२ पाहा ).

कालनिर्देश – शक संवत इत्यादि व्यवच्छेदक शब्द मागेपुढे नसेल तेथे तो इसवी सन समजावा. महिन्यांची नावे कारणपरत्वे संपूर्ण किंवा आद्याक्षररूपात दर्शविली आहेत. या अयापुरती त्या नावाची विशिष्ट रूपे उपयोजिली आहेत ती ( त्यांचे संक्षेप कंसात ) अशी – ( १ ) – देशी गणना – चैत्र ( चै ), वैशाख ( वै ), ज्येष्ठ ( ज्ये ), आषाढ ( आ ), श्रावण ( श्रा ), भाद्रपद ( भा ), अश्विन ( अ ), कार्तिक ( का ), मार्गशीर्ष ( मा ), पौष ( पौ ), माघ ( माघ ), फाल्गुन ( फा ). ( २ ) – इसवी गणना – जानेवारी ( जा ), फेब्रुवारी ( फे ), मार्च ( मा ), एप्रिल ( ए ), मे ( मे ), जून ( जू ), जुलै, जुलई ( जु ), आगस्ट ( आ ), सप्टेंबर ( स ), अक्टोबर ( अ ), नवंबर ( न ), डिसेंबर ( डि ).

नियतकालिकाच्या नावांची विल्हेवारी– औपचारिक श्रीकारादि वगळूनच नावांचा वर्णानुक्रम लाविला आहे. तसेच 'सार्थ श्रीचरकसंहिता,' 'व्यवहारोपयोगी हुन्नरसंग्रह,' ' उपयुक्त धंदेशिक्षण ' इत्यादींतील प्रथम विशेषणाचा फक्त क्रमसंदर्भ दर्शवून ती प्रमुख वाटणाऱ्या स्मरणानुकूल पुढच्या शब्दाच्या जागीव स्थानापन्न केलेली आढळतील. 'साईनाथप्रभा अथवा धर्मरहस्य' असे दुबाजवी नाव असेल तेथे पहिलेच नाव सदर्भानुकूल वाटेल असे गृहीत धरून क्रम साधला आहे. दुसरे नाव विशेष माहितीत दाखल केले आहे. महत्त्वाच्या ठिकाणी जोडसंदर्भ दिले आहेत.

परिमाणे – सूचीच्या कालमर्यादित रुपया, आणा, पै आणि इंच हीच परिमाणे वापरात होती. त्यांचे आधुनिकीकरण केले नाही. मूल्यासाठी अळीवर आणे-पै आणि आकारासाठी इंच व इंचाचे दशांश × अशा गुणिले चिन्हाच्या आश्रयाने वापरले आहेत.

नियतकालिकांचेप्रकार – प्रस्तुत प्रकारच्या ह्या पहिल्याच सूचीत समावेश केलेल्या नियतकालिकांच्या प्रकारांच्या अंतरंगसापेक्ष व्याख्या करून त्या काटेकोर पाळण्याचा उपक्रम अनेक कारणामुळे न करता केै. दाते यानी सङ्कलित करून ठेवलेली सर्वच्या सर्व सामग्री, तत्सदृश भर जमविता आली तितकी घालून, जिज्ञासूंपुढे मांडण्याचे धोरण अनुसरल्यामुळे या सूचीत वानगीसाठी एखादे साप्ताहिक (' विद्यार्थ्यांच्या कल्याणार्थ अनेकविषयसंग्रह ', पृ. २९३ ), दाप्ताहिक (' मान्येश विजय ', पृ. १९१ ) व त्रिसाप्ताहिक (' जातक संग्रह ', पृ. २४२) देखील संग्रहित झालेले आढळेल. एकदोन ' शालेय 'नियतकालिकांचा गौरवार्थ अपवाद (' बालिकादर्श ', पृ. १८०) झालेला नाही असे नाही. यापुढील प्रयत्नाच्या वेळी यात इष्ट सुधारणा अर्थात अपेक्षितच आहे.

## कांही चिन्हांची संकलित ओळख

चिन्ह – उदाहरण – अर्थ
ते – अंक १ ते १२ – सुट्या अंकांची अखंड माला.
– – अंक (१ - ३), – तीन अंकाचा जोड अंक.
(१-२-३)
( ) – ( डि ते न ) – कोणतीही खुलासेवजा अनुमानित वा गृहीत माहिती.
—. मार्गशीर्ष – पुढील अंकाबद्दल
१८३४ —. माहिती नाही.
( सरकारी नोंद ) – सरकारी यादी – १८६७ च्या रजिस्ट्रेशन कायद्याप्रमाणे मुबई प्रांत वा महाराष्ट्र राज्य यांनी

प्रसिद्ध केलेल्या त्रैमासिक यांतील नोंद.

रजिस्ट्रार रिपोर्ट – 'ॲन्युअल रिपोर्ट ऑन दि प्रेस कंपाइल्ड बाय दी रजिस्ट्रार ऑफ् न्यूजपेपर्स फॉर इंडिया अंडर दि पीआरबी ॲक्ट' – याचा वर्णन - विभाग.

( विशेष माहिती ) – इतर वाङ्मयातून मिळालेले संदर्भ 'विशेष माहिती'च्या खाली निराळा परिच्छेद करून 'उल्लेख', 'जाहिरात', 'पोच व अभिप्राय' इत्यादि स्वरूपात दाखविले आहेत. हा मार्ग 'पुरवणी'त स्वीकारिला आहे.

† – कथाकल्पतरु † – † चिन्हांकित नियतकालिकाचे वर्णन 'पुरवणी'त ( पृ. ४१५ ते ४६४ ) आले आहे.

( १ ), ( २ ) – ब्राह्मण ( २ ) – ह्या नावाची अनेक नियतकालिके आहेत, त्यांपैकी दुसरे. ( अधिक खुलासा पृ. ४६६ वर ).

'लोकशिक्षण' तळेगाव दाभाडे १९१४ – जरूर तेथे नियतकालिकाचा निर्देश ओळखीसाठी त्याचे अवतरण चिन्हांकित नाव, पुढे प्रकाशन-स्थल व प्रकाशनवर्ष अशा स्वरूपात केला आहे.

* * *

## काही लक्ष्य अशुद्धे

| पृष्ठ | नियतकालिक | स्थल-निर्देश | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ३५ | 'इस्लाम विजय' | प्रकाशित अंक, पहिली ओळ | वर्ष २ | वर्ष १ |
| ४९ | 'कलादर्श' | पहिला परिच्छेद, तिसरी ओळ | चागुले | चौगुले |
| १६७ | 'प्रभु मासिक' | प्रकाशित अंक, दुसरी ओळ | सप्टेंबर १९१९ | सप्टेंबर १९२० |
| १७१ | 'प्रेमदर्शिका' | विशेष माहिती, दुसरी ओळ | वाय्. एम्.सी.ए. | वाय्. डब्ल्यू. सी. ए. |
| २५१ | 'मुंबई पत्र' | शेवटची ओळ | ( मुद्र ) | 'मुद्र' शब्द गाळावा |
| २९० | 'विदर्भ शिक्षक' | ब्रीदवाक्य, दहावी ओळ | बा. ग. खापर्डे | ब. ग. खापर्डे |
| ३५३ | 'समाजसेवक', मुंबई १९२०. | पहिला परिच्छेद, आठवी व नववी ओळ | ओळी ८, ९ | ओळींचा क्रम बदलून वाचावे |

# ग्रंथ-प्रवेश

## १

. कार्यविचार – ' नियतकालिक ' या शब्दाची कोणतीही काटेकोर व्याख्या करण्याच्या भरीस न पडता, सर्वसाधारण वाचक मानतो तीच व्याख्या गृहीत धरून प्रस्तुत सूचीमध्ये पाक्षिकापासून वार्षिकापर्यंत प्रकाराच्या उपलब्ध झालेल्या नियतकालिकांचा समावेश करण्यात आलेला आहे. उघड कारणाकरिताच यामध्ये नियतकालिक वर्गात पडणारी पण वृत्तपत्रात गणली जाणारी दैनिके व एखादा दुसरा अपवाद (' विद्यार्थ्यांच्या कल्याणार्थ अनेकविषयसंग्रह, ' सद्विचार ' † ) सोडून साप्ताहिके घेतलेली नाहीत. वानगीसाठी एक विशत्याह्निक ( 'जातक संग्रह' ) व तीन दाशाहिके (प्रगती आणि जिनविजय ' (२) †, 'विचारी' †, ' सेवक ' ( ३ ) † ) समाविष्ट झाली आहेत – [ एक मासिक व एक पाक्षिक (' भाग्येशविजय ', ' कुंडली विज्ञान' ) यातील एकेक स्थिरयतर दाशा-, ह्रिकाचे नोंदावे लागले आहे. ] – ती अपवादात्मक समजावी किंवा पाक्षिकप्राय मानावी. म्हणजे मग " ' वृत्तपत्रे ' प्रश्नाला चालना देतात, ' नियतकालिके ' त्याचा तपशीलवार पाठपुरावा करतात आणि ' पुस्तके ' त्याची साधकबाधक विचक्षणा करतात " ( ' मॅन्युअल ऑफ सीरिअल वर्क ' – जे हॅरिस गेबल, १९३७, पृ. १५ ), ह्या ढोबळ विधानात व्यक्त केलेले नियतकालिकाचे कार्य अंशतः तरी अजमाविण्याचे एक साधन म्हणून प्रस्तुत सूचीचे स्वागत करण्याचा चोखंदळ वाचकांचा मार्ग मोकळा होईल. नियतकालिके कालसापेक्ष असल्यामुळे त्याच्या निरीक्षणातून समकालीन समाजाच्या उत्क्रान्तीचा विविधांगी अभ्यास सुलभ होतो असे मानतात. अशा अभ्यासाच्या अनेक शाखांपैकी साहित्यशास्त्रीय वाङ्मयेतिहासाची बरीच प्रगती झालेली आहे आणि ती बहुतांशी अंतरंगनिरीक्षणावर आधारावी लागते. बऱ्हंशी बहिरंगदर्शन घडविणारी ही सूची तशा स्वरूपाचे सुसूत्र ज्ञान पुरविणे कठीण. तिच्या पुढील द्विखंडात्मक ज्ञानवाहक लेखसूचीवरून ते कार्य बरेच सुसाध्य होईल. प्रस्तुत वर्णन-सूचीमध्ये आणि संदर्भविभाग व परिशिष्टविभाग यातून इतकी विविध प्रकारची माहिती एकत्र करून दिली आहे की, अनेकांना त्या त्या प्रकारच्या सामग्रीचे निरीक्षण करून आपल्याकडील नियतकालिकविश्वावर अनेक निबंध-प्रबंध तयार करता येतील. तेव्हा विस्तार न करता, येथे थोडक्यातच तशा प्रकारच्या सामग्रीकडे लक्ष वेधण्यासाठी मर्यादित प्रपंच करण्याचे योजिले आहे. प्रथम संख्याविचार :–

## २

संख्याविचार – प्रस्तुत सूचीमध्ये एकूण १३७० नियतकालिकांचा समावेश झाला आहे.

सूचीतील कालिके

| प्रकार | वर्णन विभाग | पुरवणी विभाग | एकूण |
|---|---|---|---|
| १ साप्ताहिक | १ | | २ |
| २ दाशाहिक | ० | ३ | ३ |
| ३ पाक्षिक | २९ | ९५ | १२४ |
| ४ वीस दिवसाचे | १ | ० | १ |
| ५ पुष्पे ( माला ) | १ | १ | २ |
| ६ मासिक | ८८१ | २२४ | ११०५ |
| ७ द्वैमासिक | २६ | ३ | २९ |
| द्विमासिक | १ | १ | २ |
| ८ त्रैमासिक (चातुर्मासिक*) | ८५ | ११ | ९६ |
| ९ षाण्मासिक | ४ | ० | ४ |
| १० वार्षिक | १ | १ | २ |
| एकूण | १०३० | ३४० | १३७० |

* ' मानुसघ ' ( त्रै. ) पुणे १९२२ हे त्रैमासिक वर्ष १७ ते २० ( १९४१ ते १९४४ ) ' मातृसंघवृत्त ' या नावाखाली चातुर्मासिक म्हणून चालू होते.

ह्या सूचीच्या पुरवणीच्या ( म्हणजे अर्थात विस्तारक्षम ) स्वरूपावरून पाहता ही यादी कोणत्याही प्रकारे अगदी बिनचूक किंवा संपूर्ण झाली आहे असे म्हणता येत नाही हे खरे असले तरी, आजपर्यंत प्रसिद्ध झालेल्या याद्यापेक्षा ही सर्वात मोठी, सविस्तर आणि सुव्यवस्थित माहिती पुरविणारी झाली आहे, याबद्दल दुमत होऊ नये. अशा प्रकारचे प्रयत्न यापुढेही अखंड चालू ठेवावे लागतील यात नशी शंका नाही, त्याचप्रमाणे यापूर्वी झालेल्या अशा स्वरूपाच्या प्रयत्नाची जाणीव ठेवून त्याची नोंद करून ठेवणे अवश्य आहे, यातही शंका नाही

प्रस्तुत सूचीमध्ये विशिष्ट कालमर्यादेतील एकूण एक नियतकालिकाची नोंद करण्यावर कटाक्ष आहे, तसा कारणपरत्वे संकलित केलेल्या प्रासंगिक परिगणनेमध्ये असण्याचे कारण नाही. उदाहरणार्थ, मुंबई विद्यापीठात मराठीचा प्रवेश व्हावा म्हणून मराठीची मलामण करण्यासाठी न्या. मू. रानड्यानी मराठी वाङ्मयाच्या विकासासंबंधी इ. स. १८९८ मध्ये जे विस्तृत वृत्त सादर केले ते महत्त्वाचे आहे. त्यात नियतकालिके व वृत्तपत्रे यावर ओझरता दृष्टिक्षेप करताना अस्तित्वात असलेल्या फक्त समकालीन १५ नियतकालिकांचा आकडा सांगून त्यातील ' विविधज्ञानविस्तार ', ' ग्रंथमाला ' ( विजापूरकर ), ' भाषांतर ' ( राजवाडे ), ' भारतवर्ष ' ( आपटे, पारसनीस ), ' ऐतिहासिक लेखसंग्रह ' ( खरे ), ' केरळकोकिळ ' व ' बालबोध ' या ' उत्कृष्ट ' चाललेल्या सानांचा नामनिर्देश केला आहे. तीस वर्षांपूर्वीपेक्षा प्रगति बरी आहे असा अभिप्राय देऊन, ' तरी देखील बरीच नियतकालिके छापखान्याला काम पुरविण्यासाठीच ' निघतात; अर्थात त्याचे संपादक अपुऱ्या शिक्षणाचे व कमी वेतनाचेच असतात, असे आपले मत रानड्यांनी उघडपणे व्यक्तविले आहे.

अशा प्रकारचेच समकाली विद्यमान नियतकालिकांचे परिगणन करण्याचे वैयक्तिक प्रयत्न ' विविधज्ञानविस्तारा' च्या शेचाळिसाव्या वर्षी (१९१५) श्री. ना. गो. चापेकर[1] (संख्या ४४) व श्री. अनंत नारायण पंडित[2] ( संख्या ५६ ) यांनी परीक्षणाच्या उद्देशाने केले; परंतु संख्यात निर्दिष्ट केलेल्या भिन्न सख्याच त्या परिगणनेचे वैयक्तिक आणि विषम स्वरूप उघड करतात. परंतु याहून अधिक काळजीपूर्वक आणि संपूर्णतेच्या आकांक्षेने केलेली इ. स. १८९० तील एक यादी ' *विविधज्ञानविस्तारा* 'च्या ( ' *एकवीस वर्षे संपून* ' *लागलेल्या* ) बाविसाव्या वर्षाच्या आरंभी ( अंक १–२, जाने-फेब्रु १८९०, पृ. ४ ते ६) संपादकीय समालोचनात आलेली आहे. " आजपर्यंत जितकी मराठी मासिक पुस्तके ' विविधज्ञानविस्तारा 'नंतर निघाली तितक्याची सनवार नावनिशी ( चालू व बंद पडलेली अशी सर्व ) " देताना " जर कोणी मराठी भाषेचा इतिहास लिहू इच्छील तर त्याला ही माहिती उपयोगाची होईल " ही कल्पना स्पष्ट व्यक्तविलेली असल्यामुळे या यादीला इतिहासाच्या दृष्टीने महत्त्व आहे. या वेळी सरकारमार्फत त्रैमासिक याद्या प्रसिद्ध होत होत्या; परंतु त्या याद्या त्यातील पुस्तकाच्या माहितीच्या तुलनेने नियतकालिकांच्या माहितीच्या बाबतीत पुष्कळच अविश्वसनीय ठरतात, असा प्रस्तुत लेखकाचा व इतर अभ्यासकांचा रास्त समज आहे आणि त्या याद्यांचा उल्लेखही लेखकाने केलेला नाही.[3] यामुळे ही यादी स्वतःच्या एकट्याच्या

---

१ – ' मराठी मासिके, त्यांचे स्वरूप व सुधारणेची दिशा ', – ' विविधज्ञानविस्तार ', आगस्ट १९१५, पृ. ३१३.

२. – ' सध्याची मासिक पुस्तके, त्याचे स्वरूप व सुधारणेची दिशा ', – ' विविधज्ञानविस्तार ', अक्टोबर १९१५, पृ. ३९९.

३. – ' विविधज्ञानविस्तारा ' पूर्वी एकच मासिक पुस्तक निघत होते असे लेखकाने म्हटले आहे; पण ' सर्वसंग्रह ', ' सत्यदीपिका ' आणि ' ज्ञानपत्रक ' अशी तीन नावे उपलब्ध होतात.

प्रयत्नानी जमविलेली म्हणावी लागते. आणि तशाच विश्वासाने तिचा ' मराठी नियतकालिकांचा इतिहास 'कार कानडे यानी आपल्या पुस्तकात (पृ. १४–१५) उपयोग केलेला आहे. मात्र श्री. कानडे यानी हा संदर्भ कोठेच स्पष्ट केला नाही, काही दहापाच नियतकालिकांचे आरंभ-सन त्यांच्या उताऱ्यात बदलून छापले गेले ते चुकलेले आहेत, आणि विशेष म्हणजे ' वाल्मीकिराम-कथा महोदय ' याचे ' वाल्मिकी-रामायणकथामहोदय ' आणि ' विद्यामाला ' याचे ' विद्योदयमाला ' असे विनाकारण शुद्धीकरण केले आहे, शिवाय ' कौमुदी-महोत्सवः ' याबद्दल ' कौमुदीमहोत्सव ' असे चुकीचे नाव दोघानीही एकसारखे छापले आहे. या यादीतील इतर आणखी पाच चुका श्री. कानडे यानी दुरुस्त केलेल्या नाहीत ! या यादीचा अशा प्रकारे पडताळा पाहता, त्या यादीचे लेखक व तिचा उपयोग करणारे श्री. कानडे या दोघाना उपलब्ध झालेल्या संपादनोपयोगी साधनसामग्रीचा अपुरेपणा ध्यानात येतो. अर्थात अजूनही तो अजी नाहीसा झालेला नाही. आपल्या निवेदनात (पृ. २ व ३) श्री. कानडे यानी उल्लेखिलेल्या ऋणनिर्देशात शासन-प्रकाशित त्रैमासिक नामावलींचा ओझरताही निर्देश नाही. ही त्यांच्या आवातर माहितीच्या संबंधातील व अन्यत्र दिलेल्या ससंदर्भ या संदर्भहीन याद्यांच्या बाबतीतील ध्यानात घेण्यासारखी मर्यादा दिसते. हे विधान श्री. कानडे यानी इतरत्र आपल्या पुस्तकात (पृ. ९, पृ. १९-२० व पृ. २२-२५) दिलेल्या याद्या व केलेले विवेचन त्यांच्या समान्य आधारांशी पडताळून पाहूनच केलेले आहे. उदाहरणार्थ, त्यांची पृ. ९ वरील " 'विविधज्ञानविस्तार' व 'निबंधमाला' या दोन प्रमुख नियतकालिकांपूर्वी अनेक नियतकालिके निघाली, त्यांतैकी महत्त्वाच्या नियतकालिकांची ' म्हणून दिलेली यादी पाहावी. ही ' महाराष्ट्रीय वाङ्मयसूची ' तून उतरून घेतलेली आहे; परंतु तीबद्दलचे परिगणन (पृ. १०) हे ' विविधज्ञानविस्तारा ' तून उद्धृत केल्यामुळे विसंगत झाले आहे. ते काहीही असले तरी श्री. कानडे यांचा ' अर्वाचीन मराठी साहित्य [ १८७५-१९३५ ] ' या पुस्तकातील संपादकानी ' बरीच छाटाछाट केलेला ' लेख आणि त्यांचे ' मराठी नियतकालिकांचा इतिहास [ १८३२ ते १९३७ ] ' हे त्यानंतर (१९३८) प्रसिद्ध झालेले सविस्तर पुस्तक, हीच दोन मराठी नियतकालिकांबद्दल सहज उपलब्ध व हजरजबाबी व कष्टाने जमविलेली माहिती एकत्र देणारी विद्यमान साधने आहेत. म्हणून त्यांची शलाकापरीक्षा अवश्य ठरते.

श्री. कानडे यानी सर्व प्रकारची प्रत्यक्ष गणना केलेली (काही निवडक !) नियतकालिके (१९३७ पर्यंतची) एकूण ४५३ आहेत; तर प्रस्तुत सूचीमध्ये तेवढ्याच काळातील एकूण ११४२ नावे दिलेली आढळतात. हा फरक मोठा आहे. याच्या उलट श्री. दाते देशमुख यांच्या ' महाराष्ट्रीय वाङ्मयसूची 'त सर्व ठिकाणाहून एकत्र केलेली १९१७ पर्यंतची एकूण ५५० नावे आली आहेत; तर प्रस्तुत सूचीत तेवढ्याच कालमर्यादेतील एकूण ५९२ नावे दिलेली आहेत. हा फरक तसा मोठा नाही. हे पाहता ' महाराष्ट्रीय वाङ्मयसूची 'च्या प्रयत्नाची व वापरलेल्या साधनाची शास्त्रीयता व विश्वसनीयता सिद्ध होते. हे श्रेय महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळातील संपादकाचे आहे, तसेच ते त्या संपादकानी संदर्भासाठी वापरलेल्या व स्पष्ट निर्देशाने ऋण मान्य केलेल्या तीन मुख्य प्राथमिक प्रयत्नांचेही आहे. त्या तीनामध्ये " मुंबई सरकारच्या गॅझेटवरून डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीने इ. स. १९१४ अखेरपर्यंत तयार केलेली मासिकांची यादी " आहे, तशीच " रा. विनायक लक्ष्मण भावे, ठाणे, यानी पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मंडळास नजर केलेली मासिकांची यादीही आहे. " इतर तिसऱ्या संदर्भामध्ये ' विविधज्ञानविस्तार ' मासिकात इ. स. १८९०

१. ' विविधज्ञानविस्तार ' वर्ष ५७ अंक ५ मे १९२६ – ' विविधज्ञानविस्तार आणि मराठी नियतकालिके ' – नी. ब. भवाळकर, पृ. १८१ ते २१३ व 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि ' - य. रा. दाते व रा. त्र्य. देशमुख, १९१९.

व इ. स. १९१५ त छापलेल्या प्रासंगिक याद्यांचा समावेश आहे. यापैकी ' विविधज्ञान विस्तारा 'च्या १८९० च्या यादीत दिलेली संख्या १०५ आहे, तर प्रस्तुत सूचीत त्याच मुदतीतील संख्या २३३ नोंदलेली आहे. विस्ताराच्या १९१५ तील यादीचे (पृ. ४००) व प्रस्तुत सूचीचे हेच आकडे अनुक्रमे १२३ व ५४८ आहेत. मागे निर्देश केल्याप्रमाणे विस्तारातील पहिली यादी केवळ वैयक्तिक प्रयत्नांनी सिद्ध झालेली आहे; तर दुसरीबद्दल लेखकाने स्पष्टच " इंग्रजी अमल सुरू झाल्यापासून आजपर्यंत निघालेल्या मासिकांचे वर्गवार केलेले स्थूल टिपण साधनांच्या अभावी स्मरणशक्तीने केलेले आहे ", असा निर्वाळा दिला आहे. प्रस्तुत सूचीचे पूर्वज म्हणता येतील असे हे व त्यांच्यासारखे इतर सारे प्रयत्न आजच्या कार्याला आपआपल्या विशिष्ट सीमेपर्यंत उपकारक झाले असल्यामुळे त्यांचे ऋण मान्य करतानाच त्यांच्यावर पडलेल्या परिस्थितिसापेक्ष मर्यादांचाही हा परामर्श वस्तुनिष्ठतेसाठी थोडासा घ्यावा लागला.

## ३

कालविचार — अशाच प्रकारे संदर्भ विभागातील पहिल्या यादीवरून मराठीतील उपलब्ध नियतकालिकांचे कालानुक्रमाने विविध प्रकारे परिगणन करता येण्यासारखे आहे. यादीचा अपुरेतेपणा ध्यानात घेता आणि या यादीतून अधिक संवेदनाक्षम साप्ताहिकादि वृत्तपत्रे वगळली आहेत याची दखल घेतली तर, साहजिकच १८५७ (विद्यापीठाची स्थापना व स्वातंत्र्ययुद्ध), १८७४ ('निबंधमाले'चा अवतार), १८८५ (काँग्रेसची स्थापना), १९०५ (बंगालची फाळणी), १९२० (सत्याग्रहयुद्ध) आणि १९४७ (भारताचे विमोचन) अशा प्रत्येक उल्लेखनीय घटनेचे प्रतिबिंब या आकड्यांत निर्विवाद मिळण्याची अपेक्षा करता येणार नाही. किंवा अंतरंगपरीक्षणानेच प्रत्ययास येणारा प्राथमिक कालातील रंजनबोधनदृष्टीवरील भर, नंतरचा कलावाद (१९२०) व त्यानंतरचे दोन महायुद्धांमधील (१९२० – १९४५) पाश्चात्त्यांकडून उचलून घेतलेल्या वादांचे रणांगण बनलेल्या वाङ्मयक्षेत्रातील आवर्त, यांचे चढउतार प्रस्फुट करणारी प्रत्ययकारिता या केवळ यादीवरून अर्थात अनुभवास येणार नाही. आणि तरी प्रस्तुत यादीवरून देखील काही विवक्षित तरतमता दिसते, सिद्ध होते आणि काही अनुक्रमाचा सूर लागतो, आणि त्यावरून यादीची मर्यादित प्रमाणाने का होईना, विश्वसनीयता मान्य करावी लागते.

### दशकवार संख्या

| कालखंड | प्रातिनिधिक नि.का. वा घटना | संख्या |
|---|---|---|
| १८३२-१८४० | 'दिग्दर्शन' | ५ |
| १८४१-१८५० | 'मराठी ज्ञानप्रसारक' | ५ |
| १८५१-१८६० | 'विचारलहरी' | १५ |
| १८६१-१८७० | विद्यापीठोत्तर काळ | २४ |
| १८७१-१८८० | 'निबंधमाला' | ५६ |
| | एकूण | १०५ |
| | (सरासरी २१) | |
| १८८१-१८९० | 'केसरी' | १२८ |
| १८९१-१९०० | लोकजागृती | १०८ |
| १९०१-१९१० | स्वातंत्र्यचळवळ | १४९ |
| १९११-१९२० | पहिले महायुद्ध | १६४ |
| | एकूण | ५४९ |
| | (सरासरी १३७) | |
| १९२१–१९३० | सत्याग्रह चळवळ | २३० |
| १९३१–१९४० | वाङ्मयीन वाद व स्वातंत्र्यसमर | २१३ |
| १९४१–१९५० | स्वातंत्र्य चळवळ | २६४ |
| | एकूण | ७०७ |
| | (सरासरी २३६) | |

इ. स. १८८० पर्यंतच्या पहिल्या पाच दशकांत मिळून फक्त १०५ नियतकालिके आढळली व दशकाची सरासरी २१ पडली; तर पुढच्या ४ दशकांत त्यांची एकूण संख्या ५४९ व दशकाची सरासरी १३७ झाली आणि तिसऱ्या तीन दशकांच्या खंडात एकूण ७०७ प्रसिद्ध झाली व दशकाची सरासरी २३६ इतकी पडली.

वरील कोष्टकाप्रमाणे ही सख्यावाद विशिष्ट प्रातिनिधिक कालखडाशी जोडून माडता आली, तथापि ती कालमापेक्ष यात्रिक प्रगती, हीशी धदेवाइकाची वाढ आणि सर्वसाधारण साक्षरतेतील वाढ, याच्याव्यतिरिक्त अन्य विशेष प्रकारच्या म्हणजे वाचनाभिरुचीसारख्या आतरिक कारणाशी सर्वांमिना समन्वयात समजणे धोक्याचे वाटते. जरा बारकाईने वर्णनविभागातील नियतकालिके बद पडल्याची सख्या व ती बद पडल्याची कारणे ध्यानात घेतली तर बहुसख्याक मासिके वगैरे वर्गणीदाराच्या अभावी बद पडल्याची ग्वाही अनेकानी दिलेली आढळेल. काहीनी तशी तक्रार उघड केली, तर इतरानी मुग्धता स्वीकारली असेल. आजकालचा, विशिष्ट प्रकारच्या करमणूकप्रधान नियतकालिकाशिवाय इतराचा, अनुभव या बाबतीत काही निराळा नाही हे सागावयास नको. परतु ही बाब केवळ अनुमानावर अवलबून ठेवण्याचे कारण नाही, असे नियतकालिकांच्या खपाच्या आकड्यावरून सिद्ध होईल.

प्रस्तुत सूचीमध्ये नियतकालिकाच्या प्रसाराचे आकडे देता आले नाहीत, तरी काहींचे खपाचे आकडे शासनप्रकाशित त्रैमासिक याद्यावरून सकलित करून पाहता, वरील कोष्टकाच्या पहिल्या कालखडात ( १८३२–८० ) सरासरी ५००, दुसऱ्यात (१८८१–१९२०) सरासरी ८०० व तिसऱ्यात (१९२१–५०) सरासरी १००० असे खपाचे आकडे आढळले. तथापि अकाली मृत्यूचा हिशेब गणतीत घेतला तर वाचनाभिरुचीचे प्रमाण पुष्कळच कमी धरावे लागेल हे उघड आहे. काहींनी आपला खप कळविलेला नाही यामुळे ती नावे आली नाहीत. आकडे मोठ्या खपाचे असते तर ते कळविल्याशिवाय कोणी राहणार नाही, म्हणून ते आकडे बहुधा कमीच असावे. प्रत्येक कालखडातील काही प्रातिनिधिक नियतकालिकाचे आकडे येथे देतो. परतु ह्यावरून त्या त्या नियतकालिकाचे हे खप निर्भेळ वाङ्मयीन गुणवत्तेपेक्षा बहुतेक बाबतीत आवातर वा अपवादात्मक अगर काही विशिष्ट कारणावर अवलंबून असल्याचेच आढळेल याचे प्रत्यतर म्हणजे 'विविधज्ञानविस्तार' या नामाकित मासिकाचा खप तीनही कालखडावर विभागलेल्या त्याच्या आयुष्यक्रमात ५०० व ६०० याच्या दरम्यान घोटाळत राहून, जेव्हा 'महाराष्ट्रसाहित्यपत्रिके' चा त्याच्यात समावेश झाला तेव्हाच तो बहुधा परिषदेच्या सभासदाच्या आश्रयामुळे ९०० पर्यंत गेला, पण 'मराठी शालापत्रक' आपल्या दीर्घकालीन जीवनात आरभीच १५०० व नतर ३३०० वर आले आणि 'बालबोध' प्रथम १००० व शेवटी ३००० वर्गणीदाराची नोंद करू शकला, याचे कारण त्याची शिक्षक व बालक या सुरक्षित वर्गातील लोकप्रियता. दुसऱ्या कालखडातील 'केरळकोकिळ' २०००, 'मासिक मनोरजन' ३००० ते ८००० व रजक 'चित्रमयजगत्' ६००० हे लक्ष्य आकडे आहेत. 'मराठी शिक्षक' ३७०० हे व्यावसायिक मासिक मोठा खप मिळवू शकले. पण 'काव्यसग्रह' १०००, 'वामनी ग्रथ' १,००० 'चरकसहिता' १०००, 'सताचे बोल' ४००० (आकडा खरा असल्यास), किंवा 'ब्रह्मविद्याग्रथरत्नमाला' १००० हा खप्यापैकी खप शुद्ध वाङ्मयीन वाचनाभिरुचीचा द्योतक समजणे अव्यवहार्य ठरेल. प्राचीन वाङ्मयावरील श्रद्धाच या उदाहरणात प्रभावी झालेली आहे असे म्हणावे लागेल. तिसऱ्या कालखडाचे काही मानकरी 'आनद' ३३००, 'शेतकी आणि शेतकरी' ३३००, 'प्राथमिक शिक्षण' ३०००, 'सह्याद्रि' ४००० हे होत. या प्रत्येकाचे स्वतत्र कारण समजते. 'वाङ्मयशोभा' १००० ते १२०० वर बराच काळ स्थिर होती. पण 'सुविज्ञान' ३०० च्या आसपासच राहिले आणि गाजलेले 'समाजस्वास्थ्य' देखील १६०० वरून चार वर्षात निम्म्यावर उतरले. नाही म्हणायला 'यशवत' २८०० पासून त्याच मुदतीत ५३०० वर चढला. मराठी वाचकाची दृष्टी अजूनही करमणूकप्रधानच आहे. उच्चभ्रू वाङ्मयीन वादविवाद काही अल्पसंख्य चिकित्सक काही विशिष्ट अल्पसख्य नियतकालिकातूनच चालवितात आणि ते भयनिविष्ट होऊन ग्रथालयातील काचेच्या कपाटात आणि पुढे प्रतिष्ठित वाङ्मयेतिहासात सामील होतात. एकदरीत विशिष्ट

विषयाना वाहिलेली लोकप्रिय होण्यासारखी नियतकालिके आपल्याकडे वाढत नाहीत. संदर्भ विभागातील विषयवारीकडे आणि एकंदरीत नियत कालिकांच्या संमिश्र स्वरूपाकडे पाहिले असता आपल्या नियतकालिकांची समाजपरिवर्तनाला प्रेरणा देण्याची असमर्थता व घडत चाललेल्या समाज-परिवर्तनाची दखल घेण्याची अपात्रता यांचे स्वरूप ध्यानात येईल.

## ४

ग्रंथ आणि नियतकालिके—असे असले तरी कै. दाते यांच्या 'मराठीग्रंथसूची'त नोंद झालेली इ. स. १८०० ते १९५० पर्यंतच्या कालखंडातील मराठीतील ग्रंथसंख्या आणि प्रस्तुत सूचीत समाविष्ट झालेली बहुतांश त्याच कालखंडातील नियतकालिकांची उपलब्ध झालेली संख्या यांची तुलना करणे आणि या दोहोंमुळे मराठीभाषिकांच्या वाङ्मयधनात पडलेली भर यांचा अंदाज घेणे उद्बोधक ठरणार आहे. अभ्यासविषय झालेल्या कालखंडातील श्री. दाते यांनी स्वीकारलेल्या ड्यूए वर्गीकरणपद्धतीप्रमाणे त्यांनी परिगणित केलेली दीडशे वर्षांतील ग्रंथसंख्या आणि प्रस्तुत सूचीतील तेवढ्याच कालातील नियतकालिकांची संख्या यांचे टक्केवारीसह कोष्टक यापुढे दिले आहे.—

**१८००–१९५० कालातील मराठीतील ग्रंथ व नियतकालिके यांची वर्गवारी**

| विषय | एकूण ग्रंथसंख्या | ग्रंथांची शेकडेवारी | नियतकालिकांची उल्लेख संख्या | नि. का. ची शेकडेवारी |
|---|---|---|---|---|
| ० संकीर्ण | २९६ | १·२९ | २८० | १४ ४६ |
| १ तत्त्वज्ञान | ११४६ | ४ ९८ | ५७ | २ ९४ |
| २ धर्म | २६२८ | ११·४३ | १७८ | ९·१९ |
| ३ समाजशास्त्र | २०५८ | ८·९६ | ७७१ | ३९·८२ |
| ४ भाषाशास्त्र | ५४४ | २ ३७ | — | — |
| ५ विज्ञान | ५२० | २·२६ | ६ | ३० |
| ६ उपयुक्तकला | १५३७ | ६·६८ | १५४ | ७·९५ |
| ७ ललितकला | ४७३ | २·०६ | ७५ | ३·८७ |
| ८ ललित वाङ्मय | १०५२५ | ४५·७८ | ३२१ | १६·८० |
| ९ इतिहास | ३२६५ | १४·२० | ९४ | ४ ८५ |
| एकूण | २२९९२ | १०० ०१ | १९३६ | १०० १८ |

वरील कोष्टकामध्ये ग्रंथांची संख्या प्रत्यक्ष ग्रंथनामांची दिली आहे; परंतु नियतकालिकांची मात्र [illegible] विषयवार उल्लेखांचीच दिली आहे. नियतकालिके ग्रंथांपेक्षा अधिक संकीर्ण स्वरूपाची असल्याने विषय विभागणी यामुळे अधिक प्रमाणशीर होण्यास [illegible] मदत होईल. १९५० पर्यंत मराठीग्रंथांची [illegible] २७० [illegible] [illegible] एक [illegible] ८५ [illegible] असे पडते, तर त्याच [illegible] नियतकालिकांचे प्रमाण एक [illegible] फक्त २६ (ग्रंथांच्या तृतीयांशाहून कमी) इतके पडते! दोहोंचेही हे प्रमाण स्वयं इतके क्षुद्र आहे की अन्य कोणा प्रगत देशाच्या आकडेवारीशी ताडून पाहून मग टीका करण्याची गरजच नाही. ८५ आणि २६ या दोन आकड्यांतील ही तफावत कदाचित प्रत्यक्षात इतक्या प्रमाणात मोठी असू नये, नसावी, नसेलही, असे प्रतिपादन करणे शक्य आहे. या संदर्भात ग्रंथांची [illegible] आणि त्यांचे संरक्षण करण्याबद्दलची [illegible] अभ्यास आणि तद्विषयक ग्रंथांची (ग्रंथसूच्या इ.) [illegible] प्रगती, आणि एकूण दोन्ही विचार सहज सुचतो. [illegible]

या सर्वच गोष्टींत नियतकालिकांबद्दल दिसून येणारी अक्षमता, अनास्था आणि दुर्लक्ष याची ग्रंथ-परिस्थितीशी तुलना करता ते खरेही ठरेल, परंतु त्यामुळे या प्रमाणाच्या क्षुद्रतेबद्दल अन्य काही म्हणता येणार नाही याच कोष्टकावरून मराठी भाषेतील ग्रंथसंपत्तीतील आणि नियतकालिकसंपत्तीतील कोणती दालने विशेष समृद्ध आहेत आणि कोणती दरिद्री म्हणजे अल्पविकसित आहेत यावर प्रकाश पडणार आहे या संदर्भात ग्रंथाच्या विषयवार शेकडेवारीबद्दल विशेष काही लिहिणे बहुतांशी द्विरुक्त ठरणार आहे तेव्हा फक्त नियतकालिकांच्या शेकडेवारीबद्दल म्हणजे त्यांच्या विशिष्ट स्वरूपामुळे ग्रंथाच्या शेकडेवारीशी त्यांच्या शेकडेवारीच्या काही प्रमाणातील विसंगतीबद्दल एक दोन गोष्टी नजरेस आणल्या म्हणजे पुरे

ग्रंथाच्यापेक्षा नियतकालिके अधिक संकीर्ण स्वरूपाची असतात हे सर्वमान्य आहे सूच्या, कोश, संग्रह, संकीर्ण निबंध, या स्वरूपाचे संकीर्ण ग्रंथ स्वाभाविकच संख्येने व प्रमाणाने कमी असतात शिवाय नियतकालिकांच्या आरंभाच्या कालात मुद्रणकलेची हाती आलेली सिद्धी प्रकाशकांनी सकलनाथ, संग्रहार्थ आणि समीक्षज्ञान प्रसारार्थ वापरली याचे प्रत्यंतर आम्ही योजिलेल्या तक्त्यातील वर्गक्रमांक २२, २३ व २५ यावरून येईल समग्र ग्रंथापेक्षा अंशग्रंथपरंपरेदीच ग्राहकांना आर्थिक दृष्ट्या परवडेल अशा उद्देशाने ग्रंथाचा मार्ग सोडून नियतकालिकांची वाट धरणाऱ्यांच्या धोरणामुळे, या 'संकीर्ण' नियतकालिकांच्या वर्गाला बाळसे आलेले दिसते अशाच प्रकारे 'ललित वाङ्मय' या वर्गाला होतो म्हणजे ग्रंथ निव्वळ ललित वाङ्मयाला वाहून घेऊ शकतात, पण प्रत्येक नियतकालिकात तो भाग अवश्य संभाळला जाव असला, तरी संपादक अन्य गोष्टींचे प्राधान्य दाखवून नियतकालिकाचा मोहरा अन्यत्र वळविलेला असा राहू शकतात नियतकालिकांची धर्मवादी स्वरूपाची शक्य आणि अन्यविषयक होऊ शकते यामुळे ललितवाङ्मयविभागातील ग्रंथांचे मोठे प्रमाण नियतकालिकांना नितक मिळालेले नाही ही शक्यता नियतकालिकांच्या समकालीन म्हणजे विशेषत समाजशास्त्र संस्थांना स्पश करण्याच्या पात्रतेमुळे येते त्यामुळे त्यांना सामाजिक प्रश्नांचा परामर्श घेणाऱ्या दुय्यम, तिय्यम दर्जाच्या का होईना, पण समाजशास्त्र विषयक व्यापक वाङ्मयाच्या कक्षेमध्ये (शेकडा ३९८२ टक्के) स्थान देणे अपरिहार्य ठरते अंतरंगपरीक्षणमध्ये हे त्यांचे सख्याप्रमाणाचे स्थान गुणवत्तेत फसवे ठरण्याचा अर्थात संभव राहतोच

इतिहासाची वाट पायाशुद्ध झाली असती तर संशोधन आणि ग्रंथारूढ इतिहास यांच्या मधील एक आवश्यक पायरी म्हणून ऐतिहासिक निबंधचर्चेला ग्रंथाच्या बरोबरीने नियतकालिकांनी हातभार लावणे अवश्य झालेच असते. परंतु येथे विद्वत्त्वाच काय, पण विद्यालयीन, महाविद्यालयीन आणि प्रशालकीय अशा सर्वच क्षेत्रातील मराठीची आबाळ नियतकालिकवाङ्मयाच्याही संवर्धनाच्या आड आली हीच गोष्ट इतर ज्ञान क्षेत्राची वाढ या वाङ्मयाच्या करमणुकीसाठी मराठी ललित वाङ्मय आपला सवार त्याच्याच पुरस्काराने थाट शकते, परंतु अन्य अनेक विशेषत ज्ञानवाहक क्षेत्रात परभाषेच्या रावटाव आणि परधार्जिणेपणाच्या दडपणाखाली नियतकालिकाचासुद्धा अंकुर करपून जातो धर्म ही बाब नियतकालिकांच्या वाहनापेक्षा ग्रंथवाहनालाच अनुकूल ठरण्याचे कारण आपल्या इकडे धर्म हा चर्चेपेक्षाही आचाराचा वा मननाचाच भाग अधिक समजला जातो, असे म्हणावे लागते ललित वाङ्मय, इतिहास आणि धर्म या तीन विषयातील शेकडेवारी कमी आणि समाजशास्त्र या विषयातील शेकडेवारी बहुमार जास्त दिसण्याची कारणे ही अशी आहेत याच संदर्भात ज्याश अगर प्राधान्याने देखील मातृभाषेला वाहिलेले या कालात एकही नियतकालिक नसाव आणि विज्ञानाला फक्त नावापुरता अवसर असावा हे शल्य लक्षात आल्याशिवाय राहत नाही ही बाब मराठी भाषेतील वाङ्मयाला शुद्ध ज्ञानाच्या उपासनेबद्दल कवडा मोल कटाळा वा अनु अत्र रूप आहे याचे पुन एकदा प्रत्यंतर आणून देते राष्ट्रनेती वाहणाऱ्या एखाद्या नियंत्रणाने फक्त सहकारी भूमिकेवरून काही नियोजन करण्यात यश मिळविले तरच अशा प्रश्नांची तड लागणार

याच ठिकाणी संदर्भविभागाच्या चौथ्या (विषयानुक्रमे) यादीतील विषयानुक्रमणिकेच्या द्विविध स्वरूपाच्या आवश्यकतेकडे लक्ष वेधले पाहिजे. मराठी काय किंवा अन्य कोणतीहि न्यून-विकसित भाषा काय, सर्व जागतिक ज्ञानविषयाचे समावेशक किंवा प्रातिनिधिक वाङ्मय निर्माण करू शकत नाही—सर्व विषयवर्गांक सापल्याने वापरू शकत नाही. तिच्या क्षेत्रातील तिचे मूल्य पारखून घेण्यासाठी तिचे वैशिष्ट्य उठून दिसेल असे विशिष्ट वर्गीकरणच आवश्यक असते व पुरे पडते. म्हणून केवळ एकरूपतेसाठी कोठलेही महत्त्वाकांक्षी दूरान्वयदूषित वर्गीकरण दडपणाखाली पत्करणे बरे नाही. याच कारणासाठी भारताच्या शासनाने 'प्रेस इन इंडिया' या आपल्या वार्षिक इतिवृत्तात आम्ही योजिलेल्या स्वरूपाचेच भारतीय प्रवृत्तीचे सरळ आणि सहजगम्य सुमारे २५ वर्गांचे विभाजन पत्करलेले आढळते. आम्ही जरा अधिक फोड करून ३५ मोठे आणि त्याचे ७६ लहान असे पोटवर्ग कल्पिलेले आहेत. या ग्रंथाच्या अभ्यासाला ते वैशिष्ट्याने उपयोगी पडावे यासाठीच त्याची योजना आहे. मान दाते याच्या 'मराठी ग्रंथसूची'त वापरलेल्या ड्यूए दशांशपद्धतीशीही त्याचा मेळ बसावा म्हणून या वर्गांकाबरोबर ड्यूए पद्धतीचेही वर्गांक दाते सूचीच्याच अनुसंधाने दिलेले आहेत. वर्गीकरणाच्या पद्धतीत नव्या सुधारणा होऊन जुन्या मागे पडत आहेत. ड्यूए दशांश पद्धती ही इ. स १८७६ मध्ये इंग्रजी वाङ्मय, ख्रिस्ती धर्म व प्रामुख्याने 'युरोपीय भाषा व युरोपीय ज्ञान यांना प्राधान्य देणारी असल्याने होणारी कुचंबणा टाळण्यासाठीच केवळ नव्हे, तर त्या दशांशपद्धतीची मांडणी तर्कशुद्ध नाही व तीत ठराविक मर्यादेपलीकडे सूक्ष्मवर्गीकरण करता येत नाही म्हणून (म्हणजे शास्त्रशुद्धतेसाठीच) डॉ. रंगनाथन यांची द्विबिंदुपद्धती निघाली. शिवाय दाते यांनी सुधारून स्वीकारलेल्या ड्यूए दशांश पद्धतीतच आणखी फरक परस्पर होतच आहेत. त्या दृष्टीने विचार केला तर दाते सूचीतील 'फलज्योतिष' या विषयाला दिलेल्या १५९.. ९६१५२ या क्रमांकापेक्षा ड्यूएनेच भविष्य-कथनाला (प्रेडिक्शन) दिलेला १३३'३ किंवा फलज्योतिषाला (ॲस्ट्रॉलॉजि) दिलेला १३३'५ हे क्रम अधिक बरे वाटतात, अशा एका वर्गीकरण-तज्ज्ञाचा विवेचनपूर्वक दिलेला अभिप्राय अधिक स्वीकारार्ह ठरेल असे वाटते; पण त्याबद्दल येथे आणखी विवेचन न करता येथे केलेल्या समन्वया-कडे लक्ष वेधून पुढे प्रसिद्ध होणाऱ्या लेखसूचीच्या वेळी अधिक विचार करणे तो करावा लागेल एवढे सूचित करून ठेऊ.

## ५

स्थलविचार — संदर्भ विभागातील दुसरी यादी स्थलानुक्रमे दिलेली असून तिजवरून मुंबई हीच आपल्या कालमर्यादेत तरी मराठी नियतकालिकांची फार मोठी उतारपेठ असल्याचे निदर्शनास येते. मुंबईला ४३७ (एक तृतीयांश) व पुण्याला २९० (२१ टक्के) नियतकालिके प्रसिद्ध करण्याचा मान मिळतो. अर्थात तेथे प्रसिद्ध झालेली नियत-कालिके गुणवत्तेतही श्रेष्ठ स्थान पटकावितात. संख्याक्रमाने आणि गुणवत्तेतही त्यानंतर एकदम फार मोठे अंतर सोडून नागपूर (४८), कोल्हापूर (३०), आणि बडोदे (१५) ही मागोमाग येतात. मुंबई पुण्याचे हे अग्रस्थान तेथील असाधारण मुद्रणसौकर्यामुळे प्राप्त झालेले आहे. बाहेर शहरी प्रकाशित होणारी बरीच नियतकालिके मुद्रणार्थ या कालात पुण्या मुंबईचाच आश्रय करीत, हे सूचीवरून उघड होणारे आहे. 'केरळकोकिळा'-मुळे कोचीन, 'काव्यरत्नावली'मुळे जळगाव, 'लोकमित्र'चे सातारा, थोडक्याच पण कसदार प्रकाशनामुळे वाई, ठाणे व धुळे आणि 'पुरुषार्थ'-मुळे औंध स्मरणात राहणारी आहेत. वाऱ्या 'प्रेस इन इंडिया' या शासकीय प्रकाशनावरून पाहता अलीकडे बहुतांश मराठी नियतकालिके (१९६४ त ४३८ पैकी ४१६) महाराष्ट्रातच साहजिक प्रसिद्ध होत असली तरी काही—प्रत्येकी पाच दहा गोवा व म्हैसूर मध्ये, चार गुजरातेत व प्रत्येकी एकेक असी मध्यप्रदेश, मद्रास, आंध्र, पश्चिमबंगाल. दिल्ली व पाँदेचरी येथूनही प्रकाशित होत असतात. हे मराठीच्या प्राचीन वैभवाला व

परंपरेला धरूनच आहे ही गोष्ट सदर यादीत काशी ग्वाल्हेर, इंदूर, उज्जयिनी, कलकत्ता, लाहोर ही नावे, पाहून पटेल.

प्रस्तुत स्थलयादीचा बारकाईने अभ्यास करणाराला बाजूच्या वाटणाऱ्या आणखी अशाच निरनिराळ्या स्थलाची मराठी भाषेची सेवा ध्यानात आल्याशिवाय राहणार नाही उदाहरणार्थ, मुंबईजवळचे म्हणून कदाचित पुढारलेले असेल, परंतु इ. स. १८७६ पासून अलीबाग, तेथील सेवासदन छापखाना आणि मालक श्री रावजी हरि आठवले हे कामाला लागलेले दिसतात (पाहा 'अबलामित्र' १८७६) अलीबागेला प्रसिद्ध झालेली ११ नियतकालिके आहेत. इंदूरचे 'सत्यबोधिनी' (१८८५), काशीचे 'आर्यधर्मदीपक' (१८९८), रत्नागिरीचे 'सुमार्ग दर्शक' (१८६८), विजापूरचे 'शेतकी सुधारणा' (१८८८), हुबळीचे 'ज्योतिष विद्याप्रसारक' (१८८७), एवढेच काय पण दूर सौराष्ट्रातील भावनगरचे 'जैनधर्मप्रकाश' (१८८६) — ही मराठीची सेवा त्या दृष्टीने विस्तारित प्रदेशातील अगदी अनपेक्षित वाटणाऱ्या पूर्वकालातील म्हणून विशेष लक्ष्य आहे. मराठीतील नियतकालिके सुमारे सव्वाशे वर्षात एकूण १६६ स्थलातून प्रकाशित झाली ही गोष्ट इतर काही नाही तरी महाराष्ट्रातील विखुरलेल्या देवस्थानादी संस्थांचा आणि प्रकाशनहौशी व्यक्तींचा, साहित्यिकांचा व विशेष समाजहित चिंतकांचा ठावठिकाणा लावण्यास उपयोगी पडेल

## ६

जीवनमानविचार—संदर्भ विभागातील तिसऱ्या अर्थात जीवनमानानुक्रम यादीतील अग्रमान म्हणजे (मॅरॉथॉन शर्यतीतील सारा, परंतु) यदृच्छेने प्राप्त झालेला दिसाऊ वेलपत्तीचा मुकुट वाङ्मयीन या ऐतिहासिक बाजारात तो टिकून राहील किंवा केवळ तेवढ्यावरून त्याला अग्रतम मानाचा मुजरा मिळेलच असे नाही. दीर्घायुष्य हे वाङ्मयीन जगात मानवी जगताप्रमाणेच श्रेष्ठ मानार्हतेचे लक्षण अर्थात नाही.

एक तर हाती आलेली माहिती विपुल नाही आणि आहे तीही सर्वसंग्राहक किंवा निर्विवाद स्पर्शीही नाही, परंतु तेवढ्यावरून देखील नजर फिरविल्यास नियतकालिकांतील बालमृत्यूचे प्रमाण केवढे मोठे आहे, याचे प्रत्यंतर येईल. १ ते ३ वर्षांचा आयुर्दाय दर्शविणारी ६७८ नियतकालिके गाळली तर ४ ते १९ या कुमार वयाच्या खालच्या मजल्यावरून (उरलेल्या ३६० पैकी) तीनशे (२९९)चा पत्ता मिळतो त्यावरच्या २० ते ३३ वयाच्या दुसऱ्या म्हणजे तरुणाच्या मजल्यावर फक्त ४१ आढळतात तर ३४ ते ७४ या वयस्कांसाठी मुकर झालेल्या तिसऱ्या मजल्यावर फक्त एकूण अठरा भाग्यवानाची वर्णा लागते त्या अठरापैकी ७ इ स. १९५० अखेर पुढे चालू होती (कंसात आकडे जीवनमानाचे) ती— 'मराठी शालापत्रक' (६१), 'जैन बोधक' (६३), 'चित्रविलास' (४९), 'आनंद' (४५), 'चित्रमयजगत्' (४१), 'शेतकी आणि शेतकरी' (४१) आणि 'व्यायाम' (३६) ही होत आणखी ७ अपूर्ण कालखंडाची होती ती—'बालबोध मेवा' (५७), 'न्यायाथय' (५३), 'स्त्रियाची मैत्रीण' (५३), 'लोकमित्र' (४९), 'सच्छास्त्रप्रदीपक' (४४), 'काव्यरत्नावली' (४२) आणि 'नामदेव' (३९) ही होत आणि आपले त्या मुदतीत शेवटचे अंक काढून आयुष्य पूर्ण करून जी निमाली ती 'वऱ्हाड - शाळा - पत्रक' (७४), 'विविधज्ञान विस्तार' (६८), 'बालबोध' (४२), 'मासिक मनोरंजन' (४०) हीच चार होत यापैकी प्रत्येकाचा, फार काय इतर खालच्या खालच्या मजल्यावरील सर्वच नियतकालिकांचा, काल सापेक्ष, साहित्यसापेक्ष आणि विषयसापेक्ष विचार करण्यासारखा आहे असा विचार बहुधा महाराष्ट्रातील नियतकालिके दीर्घकाळ टिकविण्याचे श्रेय संचालक, प्रकाशक, संपादक व वाचक यापैकी सारे कोणाच्या पदरात बांधता येईल आणि कोणत्या प्रकारची नियतकालिके विशेषतः दीर्घजीवी ठरतात, याचा अंदाज बांधण्यास बराच उपयोगी ठरेल वरील अठरा नियतकालिकांची यादी पाहिली तर केवळ 'विविधज्ञान विस्तार', 'मासिक मनोरंजन',

'चित्रमयजगत्', 'काव्यरत्नावली' आणि 'लोकमित्र' ही पाच टिकविण्याचे श्रेय काही अशी व्यापक साहित्याबद्दल प्रेम बाळगणाऱ्यांचे पदरात बांधता येईल. म्हणजे यातील विषय चिकित्सक वाङ्मयदृष्टीला आकर्षक वाटण्याइतके व्यापक ठेवण्याची जबाबदारी, सतत विशिष्ट पातळीवर राखण्याची योग्यता आणि त्यासाठी आटोकाट प्रयत्न करण्याची जिद्द बाळगल्याबद्दलचे श्रेय त्या त्या नियतकालिकाच्या चालकांनाच अखेरीस द्यावे लागेल. या कालखंडात इतके परिश्रम करूनही विपुल वर्गणीदार मिळत होते असे म्हणता येत नाही, हे या यशस्वी वाटणाऱ्या नियतकालिकाचे सधार बारकाईने अभ्यासिले तर सहज पटेल. वाचकवर्ग होता तो नुकताच उदयावर येत होता आणि त्याची अभिरुची संकुचित गल्वारीने प्रगट होत होती. संपादकांना आर्थिक स्वास्थ्यासाठी सरकारचा आश्रय आणि संस्थामंडळे निर्माण करून त्यांचा आधार शोधावा लागत होता. वरील अठरा पैकी राहिलेल्या तेरांचे आणखी पृथक्करण केल्यास 'वऱ्हाड शाळा-पत्रक' आणि 'मराठी शालापत्रक' शिक्षकप्रिय, 'बालबोधमेवा' 'आनंद' व 'बालबोध' बालकांना प्रिय, 'भिषग्विलास' वैद्यांचे, 'शेतकी आणि शेतकरी' शेतकऱ्यांचे, 'न्यायाश्रय' कायदेपंडितांचे, 'व्यायाम' तालीमशौकिनांचे, 'स्त्रियांची मैत्रीण' आणि 'सच्छास्त्रप्रदीपक' ख्रिस्ती मतवाल्यांची आणि 'जैनबोधक' आणि 'नामदेव' ही ज्ञाति विशिष्ट वाचकांची अशी विभागणी अगदी स्पष्ट होते. मर्यादित क्षेत्रातील निर्मिती देखील अती एकंदर वाङ्मयाच्या प्रगतीस अप्रत्यक्ष कारणीभूत होणार नाही असे म्हणावयाचे नाही. परंतु नियतकालिकांचे लौकिक यश हे त्यांच्या निर्भेळ वाङ्मयसेवेवरच अवलंबून राहत नाही, हे यावरून लक्षात घ्यावयाचे आहे. आपल्या विशिष्ट गटाचा शोध घेऊन तत्संबंधी वाङ्मय पुरविण्याचे चातुर्य या कामी विशेष उपयुक्त ठरते, असा हा आपला वाचक हुडकून काढण्याचा जमाना आहे. मागणी तसा पुरवठा करण्याचे सूत्र म्हणजे हीन अभिरुचीचे रूढ झालेले अलीकडचे वेष्ट तंत्र आणि हे येथे वर्णिलेले बरेचसे समाजाभिमुखतेचे धोरण यात अर्थात मूलतः फरक आहे. या पूर्वकालात अनेकांचे हात नियतकालिकांच्या हौशीपायी आर्थिक व्यवहारात पोळलेले आहेत, इतके सूचित करण्यापेक्षा येथे अधिक प्रपंच करावयास नको. एवढे सांगितले म्हणजे पुरे होईल की, पूर्वीची नियतकालिके चालविण्याचे व टिकविण्याचे कार्य बहुतांशी कल्पक, चतुर आणि जिद्दीच्या निर्मात्यांनीच केलेले आहे. इतर घटकांचा भाग त्या मानाने जरा दुय्यम, अप्रत्यक्ष आणि प्रामुख्याने अक्रिय म्हणावा लागेल.

७

वर्गवारी विचार– मराठी वाङ्मयातील वर्गवारी व पर्यायाने मराठी नियतकालिकांची विषयवारी आणि तदंतर्गत विशिष्ट परंपरागत विषयाबद्दलचा पक्षपात आणि अन्य आधुनिक जीवनयात्रोपयुक्त विषयाकडे होणारे वाङ्मयनिर्मात्यांचे दुर्लक्ष यांबद्दल वारंवार जे काही लिहिलेले आढळते, त्याच्याच जवळपासचा पडताळा प्रस्तुत नियतकालिकाच्या सूचीवरून अभ्यासकास सहज मिळणार आहे. केवळ शास्त्राशी परिचित असलेल्या थोड्याच लोकांशिवाय इतर फार मोठा जो वाचकवर्ग राहतो त्याच्या सोयीसाठी संदर्भविभागात सोपी वर्गीकरणपद्धती अवलंबिलेली आहे, तीवरून आणि या परिच्छेदात त्यातूनच साधे प्रत्येक वर्गाची नियतकालिकसंख्या दर्शविणारे कोष्टक दिले आहे त्यावरून, आपल्या इकडील नियतकालिकविश्वातील आवडीनिवडीचे प्रत्यक्ष गणितागत पद्धतीने दर्शन होणार आहे —

वर्गवार नियतकालिकांची संख्या

(उल्लेखाची गणती)

| क्रम | वर्ग | नियतकालिकांची संख्या |
|---|---|---|
| १ | आरोग्य | ३० |
| २ | इतिहास | २७ |
| ३ | उद्योग व्यापार धंदे | ४३ |
| ४ | कायदा | १९ |
| ५ | काव्य | ७ |
| ६ | गृहविद्या | ४ |

| क्रम | वर्ग | नियतकालिकाची संख्या |
|---|---|---|
| ७ | ग्रथालये | ६ |
| ८ | तत्त्वज्ञान | १ |
| ९ | दलितोद्धार | २९ |
| १० | धर्म | १०३ |
| ११ | प्रदेश ( सेवाक्षेत्र ) | ६७ |
| १२ | फलज्योतिष | २५ |
| १३ | बालसाहित्य | ४१ |
| १४ | मनोरंजन | १२४ |
| १५ | वर्गीय | ६ |
| १६ | वैद्यक | ३१ |
| १७ | व्यवसाय | ३४ |
| १८ | शास्त्रविज्ञान | ६ |
| १९ | शिक्षण | ८२ |
| २० | शेती ( गोरक्षण ग्रामोद्धार ) | ५१ |
| २१ | श्रमिक | २० |
| २२ | संकलन | १० |
| २३ | सकीर्ण ( संमिश्र ) | ३७८ |
| २४ | सगीत-कला विद्या | ९ |
| २५ | संग्रह प्रकाशन | ११७ |
| २६ | सभा-संस्था मंडळ | २३८ |
| २७ | समाजसुधारणा | ६२ |
| २८ | सरकारी प्रकाशने | १४ |
| २९ | सहकार–स्थानिक स्वराज्य | १० |
| ३० | स्त्री | ४८ |
| ३१ | स्मारक-गौरव | ९ |
| ३२ | हिंदितर धर्मबंधु | ६९ |
| ३३ | हुन्नर शिल्प कला | ४० |
| ३४ | ज्ञाति समाज | १८५ |
| ३५ | ( अज्ञात विषयाची | ५७) |
| | | २००२ |

आकड्यावरून मिळणारी माहिती ही साहजिकच प्रवृत्तिदर्शक असते–इकडील नियतकालिकाच्या सकीर्ण स्वरूपावरून पाहता मिळणारी माहिती अगदी काटेकोरपणे घ्यावयाची नसते – इत्यादी पूर्वसूचना ध्यानात घेऊन देखील प्रत्येकी १०० सख्येच्या वरचे ६ वर्ग, प्रत्येकी ३१ ते १०० सख्या दर्शविणारे ११ वर्ग, प्रत्येकी ११ ते ३० पर्यंत सख्येचे ७ वर्ग आणि प्रत्येकी १ ते १० पर्यंत सख्या नमूद केलेले १० वर्ग, असे चार विभाग पडतात आणि कोष्टकात तद्विशिष्ट काही समानरूपता शोधता येते. यामधील उत्तरोत्तर कमी नादलेली सख्या ही त्या त्या विभागाची कमीकमी प्रत्ययाला येणारी लोकप्रियता दर्शविते आणि त्या प्रमाणात एकामागून एक अशा तऱ्हेने नियतकालिकाचे लक्ष त्या त्या विभागाकडे वळत आहे, आणि काल जाईल तसतसे ते परिस्थित्यनुरूप वाढणार आहे, असा काहीसा ढोबळ व कदाचित फाजील आशावादी क्रम कल्पिता येतो. ही विभागणी काही समाजमान्य तत्त्वावर केलेली नाही. पण सख्येच्या तरतम प्रमाणावर केली असताही तीवरून एकदर बहुसख्य वाचकाची पहिली, दुसरी, तिसरी व चौथी आवड याचा काहीसा अदाज बाधता येईल असे वाटते

मोठ्या सख्येच्या पहिल्या आवडीच्या पट्ट्यामध्ये सर्वात मोठा वर्ग (संख्या ३७८) सकीर्ण मासिकाचा साहजिकच आहे. त्यात एखाद्या विषयाला प्राधान्य असून बाकीचे वर्चस्व करमणूकप्रधान वाङ्मयाला मिळते मराठीत सभा सस्था मडळाचे इतके प्राबल्य आहे की सकीर्ण मासिकाच्या खालोखाल (२३८) मासिके सस्थानी चालविलेली आढळली. हे त्या नियतकालिकाच्या योग्यायोग्यतेसंबंधी बरेच पोषक ठरले असले पाहिजे. त्याच्या खालोखाल (१८५) ज्ञातिसमाजाची नियतकालिके चालली. त्यानतर १२४ ही संख्या मनोरंजन ह्या विषयाची आहे. ११७ सग्रह प्रकाशने म्हणजे काही सकलने व बहुतेक सस्कृतादी ग्रथाची पुनर्मुद्रणे ह्याही परपरागत विशेष आढळला. १०३ हा त्यानतरचा आकडा धर्म विषयक नियतकालिकाचा होता. धर्म, सग्रह-प्रकाशने, मनोरंजन, ज्ञातिसंस्था व सार्वजनिक धार्मिक संशोधनाची सस्था मडळे असा हा चढता सख्याक्रम मराठीच्या रूढ संकेतानुसारी ज्ञात वाङ्मयीन अभिरुचीचे वास्तविक चित्र दर्शविता, असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही. ह्या मोठ्या प्रमाणातील अग्रपक्तीनंतरचा भाग म्हणजे आपण सैद्धान्तिक अमूर्त अनुत्पादक कल्पनाकडून ( एक

दोन सहज दिसणारे अपवाद सोडून) उत्पादक व समाजधारक या उपयोगी विषय व व्यवसाय यांच्याकडे वळतो तो दुसरा ऐहिक व्यवधान प्राधान्याचा विभाग. यात शिक्षण (८२), प्रादेशिक अभिमान वा हितसंबंध (६७), समाजसुधारणा व जागृति (६२), शेती ग्रामोद्धार गोरक्षण (५१), स्त्री सुधारणा (४८), उद्योगव्यापारधंदे (४३), पुढच्या पिढीचे म्हणजे बालांचे वाङ्मय (४१), हुन्नरशिल्पकलादी कसब (४०), व्यवसायांतील सुधारणा (३४) आणि वैद्यक (३१) असे बहुतांशी उत्पादनपोषक अकरा वर्ग येतात पण त्याशिवाय आपण ज्यांची फारशी दखल घेतली नाही असे आपले हिंदितर बंधू जे ख्रिस्ती व मुसलमान त्यांनी चालविलेली सुमारे ६९ नियतकालिके याच वर्गात पडतात. मुसल्मानबंधूंचे मराठीकडे लक्ष फार दिसत नाही. त्यांची नियतकालिके तीनच आढळली परंतु ख्रिस्ती बंधूंनी धर्मप्रसाराच्याच केवळ नव्हे तर प्रचलित अर्थाने वाङ्मयाच्या क्षेत्रातही (५७ नियतकालिकांची सरघोस भर घालून) फार मोठी कामगिरी केलेली आहे. इसाएली नियतकालिकांची उपलब्ध संख्या ९ आहे. ही आणखी मोठी असण्याचा संभव वाटतो. या कामगिरीचे योग्य परिशीलन व कौतुक आपण राष्ट्रैक्याच्या दृष्टीने देखील अवश्य केले पाहिजे प्रस्तुत सूचीमध्ये केलेली या प्रकारच्या नियतकालिकांची नोंद ही आजपर्यंत कोठेही केल्या गेलेल्या नोंदापेक्षा संख्येने व तपशिलाने अधिक मोठी व विस्तृत आहे, हा या सूचीचा आणखी एक विशेष म्हणून सांगण्यासारखा आहे

१० ते ३० या अल्पसंख्येच्या तिसऱ्या विभागात फक्त सात वर्ग येतात यात थोडी सरमिसळ आहे. बहुसंख्याक लोकांना महत्त्वाचे असूनही, त्यांच्याबद्दल त्यांना आस्था वाटावी तशी वाटत नाही, असे कलेवरचे विषय यात आढळत आरोग्य (३०), कायदा (१९); त्यांच्याबद्दल पूर्वकाळी फार उत्साह असे परंतु आता स्वतंत्र नियतकालिके चालविण्याचे अनुत्साहक टप्पे लागले आहेत असे इतिहास (२७) व फलज्योतिष (२५), एवढा अवाढव्य खर्च होऊन जी लोकांच्या दृष्टिपथात फारशी येत नाहीत अशी सरकारी प्रकाशने (१४) आणि विशेष म्हणजे अलीकडे महत्त्व पटून लोकप्रिय होऊ पाहणारे, परंतु अजून बहुसंख्य वाचकांचे चित्त आकर्षू न शकणारे दलितोद्धार (२९) व श्रमिकांचे प्रश्न (२०), हे ते वर्ग होत. या एकेकाचे किंवा सर्वांचेही भविष्य वर्तविणे कठीण आहे. आज ही नियतकालिके खरोखर नेमकी कोणती आणि कोणत्या दर्जाची सेवा करीत आहेत याचा विश्वसनीय सामाजिक अंदाज घेणे व प्रत्ययाने तो व्यक्त करणेही शक्य नाही.

यानंतरचा वर्ग म्हणजे प्रत्येकी १ ते १० अशा अत्यल्प संख्येचा चौथा विभाग. तत्त्वज्ञानप्रेमी मराठी भाषी भारतीयांनी म्हणजे एका संस्थेने चालविलेले एकमेव असे 'तत्त्वज्ञान मंदिर' (१९१९-१९५०) हे त्रैमासिक या विभागाचा मोठा अलंकार ठरला, पण ते बंद पडल्यावर त्याची पुनरावृत्ती मात्र झाली नाही. यातच 'संकलनात्मक' (१०) आणि 'सहकार स्थानिक स्वराज्या'त्मक (१०) यांचा समावेश होतो. अशी नियतकालिके मर्यादितच निघणार. लोकमान्य टिळकादी पुढाऱ्यांच्या व इतरांच्या स्मारकार्थ एकंदर ९ निघाल्याचा आकडा मिळतो आणि हा प्रकार अजूनही संपलेला नाही. आणि राहिलेल्या विशिष्ट विषयामध्ये संगीतकला शिक्षण (९), हास्य काव्य (७), ग्रंथालये (६) आणि शास्त्रविज्ञान (७) असे विशिष्टीकरणाचे वर्ग आढळतात यातच जुन्या गूढ विद्येची आणि (४) नव्या वर्गविग्रहादी कम्युनिस्ट कल्पनांचा पुरस्कार करणारी ६ नियतकालिके 'पुरोगामी' विचाराची ध्वजा फडकविण्यास सिद्ध झालेली आहेत. यातील काही वर्ग कदाचित कालबाह्य होतील, पण काही वाढीस लागतील, असा दाट संभव आहे. परंतु वाचनाभिरुचीचा एकंदर ओघ ध्यानात घेतला तर विशिष्ट विषयासाठीच मर्यादित वाचकांच्या आधारावर चालणारी आर्थिक दृष्ट्या न परवडणारी नियतकालिके यापुढे संख्येने कमी व्हावी, आणि समावेशक सर्वांगीण विविधांगी नियतकालिकांचा प्रचार वाढावा, असाच प्रवाह आपल्या इकडे पडत जाईल असे वाटते.

## ८

काही लक्ष विशेष-प्रस्तुत सूचीत दिलेल्या माहितीवरून अभ्यासकालातील नियतकालिक-विश्वाबद्दल किती तरी रंजक आणि उद्बोधक ज्ञान गाठी पडण्यासारखे आहे. वानगी म्हणून त्यातील काही गोष्टींकडे या ठिकाणी लक्ष वेधण्याचा उपक्रम उचित ठरेल :—

नियतकालिकाची निर्मिति हा व्यवसाय जवा हौसीचा तसाच द्रव्योत्पादक म्हणूनच लोक पत्करितात. अर्थात ग्राहक आकर्षित व्हावे म्हणून चित्तवेधक, भव्य किंवा लोकप्रिय उद्देश आणि अनेकविध प्रलोभने दाखवावी लागतात. त्याचे काही नमुने कालानुक्रमाने उद्धृत करतो. त्यात काही कालसापेक्षता अवश्य आहे; मात्र ती प्रातिनिधिक किंवा निर्णायक समजावी असा दावा चालणार नाही. प्रथम काही उद्देश-( १ ) ' काव्येतिहाससंग्रह ' ( पुणे १८७८ ), याचा उद्देश जुन्या हस्तलिखिताचा जीर्णोद्धार हा इतिहासोपयोगी आहे, तर ( २ ) ' खरा प्रकार ' ( मुंबई १८९० ) याने ' आपले तेवढे चाईट, परकीय ते सर्वथा ग्राह्य असे मानण्याची हौस उत्पन्न झाली आहे, तिचे निरसन ' हे आपले परिवर्तन-प्रेरक ध्येय ठरविले आहे. ( ३ ) ' वीरशैवधर्मप्रकाश ' ( बार्शी १९०८ ) याने ' वर्तमानपत्रात लेख आलेले असले तरी ते नीट समजात राहत नाहीत म्हणून ' मासिकाचा संग्रहोपयोगी उपक्रम चालविला, तर ( ४ ) ' ब्रह्मकर्मप्रदीप ' ( पुणे १९१० ) याने तीन शाखांच्या ब्राह्मणांची सर्व नित्य कर्मे व त्यावर विवरण असा नेमका सरघोपट सनातनी आचाराभिमुख उद्योग अंगीकारला आहे. ( ५ ) ' तेलगू समाचार ' ( सोलापूर १९१६ ) याने आपल्या भाषाभाषांच्या चळवळीचा पुरस्कार एवढीच शांति-हिताची मर्यादित कामगिरी पुढे ठेविली, पण ( ६ ) ' कर्मयोगी ' ( धुळे १९२० ) याने नव्या काळाला साजेशी 'राष्ट्रीयत्वाची जिवंत भावना उदित करण्या ' ची ध्येयवादी महत्त्वाकांक्षा धरली. ( ७ ) ' राष्ट्रधर्म ' ( बेळगाव १९२० ) याला मात्र आवाळीमुळे मंदप्रभ होणाऱ्या संस्कृत भाषेतून प्रत्येक अंकात एक लेख प्रसिद्ध करण्याची पुनरुज्जीवनाची आस्था वाटली. ( ८ ) ' आचार्य कुल ' ( पुणे १९३० ) याने सरळ सरळ आपले मासिक आपल्या १९२५ साली स्थापन केलेल्या संस्थेच्या आर्थिक साह्यासाठी सुरू केल्याचे सांगून टाकले. अर्थात आपण देतो ते साहित्य वाचणारे ग्राहक आहेत याबद्दल त्याचा विश्वास उघड होतो. ( ९ ) ' विहंगम ' ( नागपूर १९३३ ) याला भापाभगिनींकडे विशेष लक्ष देण्याची आंतरभारती जबाबदारी अंगावर घ्यावीशी वाटली आणि ( १० ) ' महाराष्ट्र शारदा ' ( मुंबई १९३५ ) याला नव्या लेखक-लेखिकांना वाव देण्याची नवोदित साहित्यिकानुकूल आठवण झाली. पुढे पुढे कल्पनाचे व कार्याचे क्षितिज वाढले आणि अभिनव कल्पना व कार्ये पुढे आली. ( ११ ) ' आत्मोन्नति ' ( नागपूर १९४८ ) या मासिकाचा जन्मच आत्मिक व नैतिक उन्नतीसाठी झाला आणि त्याने " जागतिक रक्तपाताच्या पाशवी, सर्वसंहारक प्रवृत्तींना लगाम घालण्यासाठी आध्यात्मिक शक्तींचीच आवश्यकता आहे", असा मूलगामी सिद्धांत मांडला. ( १२ ) ' जीवनज्योति ' ( अमरावती १९५० ) हे ज्योतिर्मय नाव महारोग्यांच्या विधायक सेवेला वाहिलेले आहे, तर त्याच वर्षातील ( १३ ) 'मस्ती' (पुणे १९५०) फार जणांना अस्वस्थ करणारे मासिक "तरुणतरुणींच्या मुक्या भावनांना वाचा फोडणारे, मुक्त स्त्री, आंधळे नीतिनियम व अन्याय्य कायदे यांचा हिरिरीने प्रतिकार करणारे, नव्या महाराष्ट्राचे पुरोगामी मासिक " अशा शौर्याच्या आवेशाने आपल्या उद्दिष्टांना मदार शब्दरूप देत आहे ! या येथे वेचून उद्धृत केलेल्या नमुनेदार उद्देशांच्या आगेमागे इतर अनेकांचा प्रपंच थाटलेला आहे. हे नुसते शब्द आहेत. त्यांच्याशी कृतीचा मेळ मुळात बसणे आणि बसवून दाखविणे हा प्रचंड संशोधनाचा आणि अभ्यासाचा विषय आहे. या संदर्भात ' समाजस्वास्थ्य ' ( मुंबई १९२७ ) या मासिकाच्या विशेष माहितीकडे ( पृ. ३५५ ) लक्ष वेधविले म्हणजे पुरे.

सतत अनेक वर्षे आणि प्रत्येक नियत काल-

प्रश्नाला एकेक स्वतंत्र अंक न चुकता जनतेला बहाल करण्याची जबाबदारी संपादकाला घ्यावी लागते. ती अंगावर घेताना कोणताही सावध संपादक विविध दर्जांच्या उपलब्ध सामग्रीवर आपण विसंबून राहतो हे विसरत नाही, आणि अशी वेधक आश्वासने देण्याचे धाडस अलीकडे करीत नाही. त्या जुन्या वेळी संपादक होणे हा हौशीचा मामला होता, आणि लेखकांना आजच्यासारखे महत्त्व नव्हते, छापखानेवालाच कोणा हौशी बहुश्रुताच्या वा भाषांतरकाराच्या हुकमी साह्यावर पाचपचवीस पाने छापून ग्राहकाला पुरवू शके! यामुळे चतुर प्रकाशक थेट ग्राहकांना आर्थिक लाभाची प्रलोभने दाखविण्यात विशेष कल्पकता लढवीत : (१) 'कुटुंबकरमणूक' (मुंबई १८८३) याच्या वेळी काल्पनिकार्थी कूटप्रश्न देऊन ते सोडविणारांस बक्षीस देण्याचा प्रकार बराच रूढ होता (२) 'ज्ञानबोधक' (सोलापूर १८८५) आणि 'दूत' (सोलापूर १९१८) यांस गरीब लोकांना शेठजींनी प्रती फुकट वाटण्याचा पर्याय अधिक उपकारक वाटला. तर (३) 'भारतविजय' (मुंबई १८८९) आणि 'कुणबी' (लोणखेडे १९०६) यांनी वर्गणीदारांना विमायोजना किंवा मृत्युफंडयोजनेचे आमिष दाखविले. (४) 'कादंबरी संग्रह' (पुणे १८९३) या मासिकाने वर्गणीदाराचे दोन वर्ग केले. सबब ४० पृष्ठांच्या मासिकाची वार्षिक वर्गणी रु २ तर २० पृष्ठांच्या मासिकाची वार्षिक वर्गणी रु १ ठरविली 'कमी किंमतीची मासिक पुस्तके पाहिजे असणारासाठी ही अजब कल्पना' लढविल्याची दखल 'विविध ज्ञानविस्ताराने' धडधडीत आश्चर्याने घेतलेली आढळते (५) 'महाराष्ट्र कृपावंत' (पुणे १९२२) याने गरिबांना परवडावे म्हणून मासिकाचे द्वैमासिक करून वर्गणी रु ५ ची रु. २॥ केली, हा प्रकार त्यातलाच. त्याशिवाय (६) कायम ग्राहक किंवा तहहयात वर्गणीदारांची ('अभिप्राय संग्राहक' बनेदे १९३४), (७) कमी उत्पन्नाच्या पुस्तकल्पाय वा व्यक्तींस कमी वर्गणीची ('प्रयत्नाचा' कोल्हापूर १८९४) सवलत अनेकांनी देऊ केलेली आढळते. (८) मासिकाच्या आर्थिक स्वास्थ्यासाठी सुदत्तबंद ठेवी स्वीकारण्याचा ('रामकृष्ण निकेतन' रत्नागिरी १९२४), चालू संस्थेवर भार पडू नये म्हणून बुडीत फंड योजनेचा ('महाराष्ट्रकवि' ठाणे १९०३) दूरदर्शी उपक्रम केलेला आढळतो. शिवाय या कारभारात प्रत्यक्ष लेखकाचा परामर्श घेण्याचीही कल्पना काही थोडक्यांच्या मनात आलेली नव्हती असे नाही. तिचा आढळ प्रथम (९) 'लेखाचे विषय बक्षिसे ठेवून निवडून प्रसिद्ध करण्याच्या' 'भारत विजय' (मुंबई १८८९) या मासिकाच्या योजनेत होतो. प्रत्यक्ष लेखकास बक्षीस देण्याचा उपक्रम 'भारत सेवक' (ठाणे १९२७) व 'मतिविकास' (पुणे १९३२) यांनी केला. परंतु यातील पुरस्कार उत्तेजनार्थ बहाल करण्याचा अविर्भाव लेखकाचे स्वतःसिद्ध महत्त्व मान्य करण्याच्या रास्त स्वरूपाचा आणि त्यांना मानाचर दर्शविण्याचा द्योतक समजता येणार नाही.

लेखकाचे महत्त्व ओळखून त्यांना मानाचा मुजराच केवळ नव्हे, तर त्यांच्या बौद्धिक श्रमाचा यथायोग्य मोबदला मिळवून देण्याची न्यायबुद्धी प्रथम 'मासिक मनोरंजना'ने (मुंबई १८९५) —आणि काही अन्य अपवाद वगळून—नंतर मालकी बदललेले 'केरळ कोकिळ' (पुणे १९११) या दोन प्रमुख नियतकालिकांनी दाखविलेली दिसते. या दोन मासिकांनी (जन्मकालानुसार आधी 'केरळकोकिळ' आणि नंतर 'मनोरंजन') जनतेला रोचक आणि आकर्षकतेमुळे वाचावयास भाग पडेल असे वाङ्मय पुरविण्यात जसे यश मिळविले, तसेच आपल्याला लाभलेल्या लोकप्रियतेच्या सत्या निर्माल्याची सादर कबिल कदर बाळगली. 'मासिक मनोरंजना'ने वर्ष ७ पासून (इ. १९०१-१९०२) लेखकांना मोबदला दिला. हा बहुधा पहिला पायंडा असावा. अर्थात ही तो तरी सार्वत्रिक पर्याप्त अगर नियमबद्ध झालेला नाही, हे ध्यानात घेतले म्हणजे 'मासिक मनोरंजना'ची अपूर्वाई आणि त्याचे पुरोगामित्व मनावर ठसते.

'मासिक मनोरंजना'ने आपले वैशिष्ट्य मराठी नियतकालिकाच्या विशेषांकप्रथेचे आद्य प्रवर्तक म्हणून देखील प्रस्थापित केलेले आहे. मासिक मनोरंजनाच्या स्थापनेनी स्फूर्ति पारंपर्य लब्धि

मासिकाकडून मिळालेली होती. तेव्हा 'इंग्रजी मासिकाचे ख्रिस्तमस स्पेशल अंकाचे प्रमाणे दिवाळीच्या खास अंकाची सुरुवात' सन १९०९ मध्ये मासिक मनोरंजनाने केली हे त्याच्या श्रेयाला अनुलक्षूनच झाले. हा मराठीतील पहिला खासअंक असावा.त्यानंतर मनोरंजनाने लागोपाठ दिवाळी अंक, दिल्ली दरबार अंक, वसंत अंक, आगरकर अंक, कर्वे ज्युबिली अंक असे खास अंक काढले. कदाचित सरकारच्या प्रोत्साहनाने असेल,१९११च्या दिल्ली दरबाराच्या निमित्ताने 'चित्रशाळा'ने राजसंपत्ती सुल्यगत विशेषांक काढला आणि 'लोकमित्र-' यांनी दिल्ली दरबार अंक (काहींनी खास सहायक संपादक नेमून) काढले. पैकी लोकमित्राने तर लागोपाठ चार वर्षे डिसेंबरचा 'दिल्ली दरबार स्मरण खास' अंक–अनुक्रम २, ३, ४ व ५ अशी एका विषयाची खास अंकमाला काढण्याचा विक्रम केला! ही खास अंक काढण्याची प्रथा पुढे विशेष लोकप्रिय होत गेली आणि मामुली रटाळ नियतकालिकाचे देखील खास अंक काही वैशिष्ट्याने वाङ्मयात भर घालून गेले. हे खास अंक कोणीही कशाही निमित्ताने काढावे असे झाले. महत्त्वाच्या पावणेदोनशे प्रकारांच्या एकूण दीडदोनशे लक्ष अंकाची नोंद प्रस्तुत सूचीत झालेली आहे. दिवाळी, दसरा, वर्षारंभ, संक्रांत, भाऊबीज अशा सणाना, शिवाय वर्षारंभ, रजत सुवर्ण ज्युबिली अशा नियतकालिकाच्या आयुर्दायसूचक प्रसंगी व विशिष्ट वाङ्मयप्रकाराच्या गौरवार्थ काढलेले खास अंक बहुतांशी करमणूकप्रधान *ललित वाङ्मयाला वाहिलेले असावयाचे*, हे ठरल्यासारखेच झाले आहे. इतर प्रकारच्या अंकातही मग ते विद्यमान वा दिवंगत राजकारणी, पुढारी, साहित्यिक, शास्त्रज्ञ, ऐतिहासिक पुरुष वा घटना यांच्या स्मृत्यर्थ असोत; देवतादि-गौरवार्थ, स्वातंत्र्य, होमरूल, लोकशाही इत्यादींच्या संस्मरणार्थ, समाजवादादी तत्त्वप्रणालींच्या विशदीकरणार्थ असोत; संस्थानाच्या वर्णनार्थ वा विलीनीकरणाच्या प्रशंसेसाठी असोत किंवा अधिकारावरील व्यक्तींच्या आयुष्यातील मंगल घटनांची स्मृती जिवंत राखण्यासाठी असोत; साहित्यसंमेलने व विविध विषयाच्या परिषदांच्या इतिवृत्तार्थ काढलेले असोत; जातिविध्वंसाबाबतल्या तत्त्वज्ञानाच्या मण्डणीसाठी असोत वा साबण मिठाई इत्यादी उत्पादनातील वा व्यायामप्रकारातील डावपेच एकत्र करण्यासाठी असोत; काही पृष्ठे स्त्रीवरलेल्या शिरोभूषणाची (खास विषयाची) सूज राखण्यासाठी खर्ची घालण्याचे पथ्य पाळल्यानंतर बाकीचा थोडाबहुत भाग वादरायण संबंध लावून (लोकाभिमुखत्वासाठी) ललितवाङ्मयानेच शोभिवंत करण्याची जरूरी प्रकाशकांना वाटल्यास नवल नाही. पण त्यावेगळे खास विषयांवरच आवर्जून आविष्कार करणारे 'यशवन्त' मासिक (साहित्य-संमेलने), 'मासिक मनोरञ्जन', (आगरकर, मित्र), 'रत्नाकर' (गंधर्व, महिला), 'सह्याद्रि' (शास्त्रीय, समाजवाद, विशुद्ध प्रेमकथा), 'सूर्यकांत' (मोर) या चोखंदळ मासिकाचे ग्रंथात दाखविलेले असे स्वतंत्र पुस्तकाच्या दर्जाला स्पर्धा करणारेही विशेषांक नाहीत असे नाही. यांहून निराळ्या प्रकारचे प्रासंगिक कार्याला स्थान देणारे 'प्रबोधन' (पुणे १९२५) च्या 'दादर-पुण्याचा गणेशोत्सव' खास अंकासारखेही अंक काही काही वाचकांचे कुतूहल भागवू शकले यात शंका नाही.

लेखकाच्या महत्त्वाबद्दल आणि त्याची स्वत चीच तशी इच्छा नसेल तेवढा अपवाद करून लेखकाचे नाव लेखाबरोबर प्रसिद्ध करण्याच्या मुद्यावर आज कोणाचेच दुमत नाही. परंतु एक काळ लेखकाचे नाव छापण्याची आवश्यकता नाही, त्या नावाला कोणतेही महत्त्व नाही, असे समजण्याचा होता–*आपल्याकडेच केवळ नव्हे तर जेथून आपण* नियतकालिकांची टूम मिळविली त्या पाश्चात्य विश्वात देखील. ह्या संबधात प्रस्तुत सूचीवरून दोन मते प्रगट स्वरूपात मिळतात आणि 'एकता' (पुणे १९४८) चे केवळ 'लेखकाचे नाव किंवा लेखनाबद्दल पैसे दिले जात नाहीत' एवढेच शब्दांकित झालेले नकारात्मक धोरण कळते. या सक्षित सूत्रावरून लेखकांनी ज्ञानसाधना समाजहितबुद्धीने निरपेक्षपणे करावी असा संचालकाचा हेतू अप्रत्यक्षी स्पष्ट दिसतो. 'उपयुक्त निबंध संग्रह' (अलीबाग १८७६) या मासिकावर त्या वेळच्या प्रथेप्रमाणे संपादकाचेही नाव नाही.

त्याचे समर्थन संपादकानी प्रस्तावनेत केले आहे ते असे '– "ग्रथकाराने पुस्तकावर नाव प्रसिद्ध केल्यास पुस्तकाची योग्य किंमत होत नाही व त्यातील विषयाची योग्य चर्चा होत नाही." तर ' विविध-ज्ञानविस्तार ' कारानी सतत ३० वर्षे चालविलेले लेखकाची (संपादकाची देखील) नावे न देण्याचे कडक धोरण मागे टाकून नवी अशी घोषणा केली आहे ( जानेवारी १९०० ) की, " पूर्वी विस्तारात लेखकाची नावे देण्याचा प्रघात नव्हता मानूमापेची निरपेक्ष सेवा हेच ध्येय होते . लेखकाची हरकत नसल्यास चालू सालापासून नावे देण्याचा ठराव केला आहे " म्हणजे लेखकाची देखील नावे छापण्यास हरकत होती असे या घोषणेवरून म्हणता येते. अशा प्रकारच्या अस्मितानिरपेक्ष त्यागबुद्धीची अलीकडे कोणीच कोणाकडून अपेक्षा करीत नाही. उलट ' रोहिणी ' (पुणे १९४७) च्या संपादकीय धोरणात ' विननावाचे किंवा टोपण नावाचे लेख ' याना मासिकात स्थान नाही, असा पुकारा आढळतो हाच निकोप दृष्टिकोण आज सर्व समत झालेला आहे, कारण त्याच्यामुळेच सर्व संबंधिताना—केवळ वाचकाना देखील—योग्य न्याय दिला जातो.

## ९

प्रमाणीकरणविचार – राजकीय इतिहासाला अस्सल पत्राचा व तशा पत्राच्या सुसंगत ज्याचा जो आणि जसा उपयोग असतो तो आणि तसाच उपयोग वाङ्मयाच्या इतिहासाला प्रत्यक्ष नियत कालिकाचा व नियतकालिकादिकाच्या प्रस्तुत सारख्या सूच्याचा असतो राजकीय इतिहासो पयोगी अस्सल पत्रे दप्तरखान्यात पद्धतशीरपणे संग्रहित करतात, तशीच प्रत्यक्ष नियतकालिके समृद्ध ग्रथालयात शास्त्रशुद्ध पद्धतीने हारीने लावून अभ्यासकाना उपलब्ध करून दिली जातात. अशा प्रकारे अभ्यसनीय नियतकालिकाची अतरगपात्रता हा इतिहासकाराच्या संशोधनाचा विषय असला तयापि त्यांची संग्रहार्थ ( कपाटात वगैरे ) व्यवस्थित रचनाक्षमता आणि गृह्यर्थ ( शास्त्रशुद्ध ) ग्रथनक्षमता ह अनुक्रमे ग्रथपालाच्या आणि सूचिकाराच्या विवचनेचे विषय होतात उत्कृष्ट संग्रहक्षमतेसाठी नियतकालिकाच्या आकारादी बाह्यस्वरूपात व वर्ष अकादी क्रमसंगतीत सुसवाद अवश्य आहे आणि या सर्व वैशिष्ट्याचा निर्देश करून प्रत्येक नोंदीला नि संदिग्ध अशा नेमकेपणा आणणे हे सूचीचे प्रधान कार्य असल्यामुळे, तिला सदर्भासाठी त्याशिवाय आणखी सर्व सागळीवजा पुनरुक्त न होणारे असे क्रम वर्षांक, क्रमवर्धन सलग अकाक, अकात पृष्ठक, चित्र असल्यास त्याचे चित्रक्रमाक वगैरे सुस्पष्ट उपलब्ध व्हावयास पाहिजेत. प्रस्तुत वर्णनात ग्रथित केलेले अशा बाबतीतील अराजक चालू वर्णनकोशात खुलासेवार टलगडून दाखविणे एक वार जमले, तथापि पुढील लेखसूचीच्या वेळी सदर्भ स्पष्ट करताना त्यातील गैरव्यवस्था अनेक प्रकारे नडणार आहे यात शका नाही शिवाय नियतकालिकाच्या आरभाच्या काळात अविलबिल्या गेलेल्या चुकीच्या मागळ या अनिष्ट पृष्ठाकपद्धती पुढच्या काळात बदलून त्या उत्तरोत्तर सुधारून घेतल्याचा समाधानकारक प्रकार व्हावा झाला असता, फिरून मागील अराजकाकडे वळण्याची अनिष्ट प्रवृत्ती प्रकाशकामध्ये अगदी अलीकडे दिसू लागली आहे ! एखाद्या नियतकालिकात लेख सूचीत उल्लेख करण्याइतका उपयुक्त ज्ञानवाहक लेख आलेला असल्यास त्याची ससदर्भ नोंद करता येण्यासाठी क्रम वर्ष अक पृष्ठादी निर्देश समल्प व सलग नोंदण्यासाठी मिळाले पाहिजेत परतु तशी पद्धतशीर अनुक्रमणिका पृष्ठाकासह न देण्याची टूम नव्याने निघाल्यामुळे आपले वाङ्मय कोणत्याही सूचीत दाखल होऊन गौरवास्पद ठरू नये अशी प्रकाशकाची जगावेगळी आकांक्षा असावी की काय, अशी शका येते आणि प्रमाणी कृत सदर्भादि निर्देशाचा प्रश्न महत्त्वास चढतो.

वाङ्मयसूचीत दाखल होण्याच्या पाचतेबद्दलच्या दूरच्या गौरवापेक्षा आजच्या जाहिरातदाराच्या समाधानाकडे आधुनिकाचे लक्ष अधिक असल्याचा प्रवाद खरा असो किंवा खोटा असो, आपल्या कालखडातील आढळून आलेल्या व पुढे दर्शवि लेल्या काही अव्यवस्थेच्या पद्धती आणि निदान कोणत्याही विचारपूर्वक ठरविलेल्या धोरणानुसार

अवलंबिलेल्या नव्हत्या. मात्र त्यांतील काही केवळ नाविन्याची आवड दर्शविणाऱ्या व मनोरंजक म्हणून अलक्षणीय ठरल्या, तरी इतर काही पद्धतशीर सूचिग्रथनाला अनुकूल नाहीत हे ध्यानात घेतलेले बरे :–

( १ ) अगदी आरंभी नियतकालिकाच्या स्वतंत्र अस्तित्वाची कल्पना नव्हती. एकदम समग्र पुस्तक घेणे पर्वाचे म्हणून छोटे भाग करून निघत ( पाहा 'भारती भाषेतील शुरव व...' पृ. २१, उद्देश ) व त्या अनुरोधाने आज ज्याला आपण वर्ष अंक म्हणतो त्याचाच पुस्तक-अंक असा पर्याय रूढ झाला होता.* या अंककल्पनेचाच काव्यमय आविष्कार मग रसिकांच्या मनात पुढे रूपदर्शन ( 'नवे मन्वन्तर' ), दर्शन-किरण ( 'नापितोदय' ), कलाप किरण ( 'रामदासी' ), भेट ( 'नारद' ), छटा-पुंज ( 'अरुणमाला' ), प्रबंध-अंक ( 'मराठी श्रुतिबोध' ), किरण कला ( 'शांतिनिकेतन' ) अशा स्वरूपात आणि 'अंक' या गद्य वस्तूसाठी अहेर ('महाराष्ट्रशोधन'), रत्न ('सुवर्णमाला'), बिंदू ( 'संजीवन' ), विलास ( 'शारदा विलास' ) इत्यादी विविध अलंकारिक रूपे धारण करता झाला. त्याची बैठक समरूप केली पाहिजे.

( २ ) अशाच प्रकारे काही सोयीगैरसोयींमुळे अलीकडील काळात 'सह्याद्री'चा व पूर्वी 'निबंधमाले'चा आकार इतर अनेकांप्रमाणे मध्येच बदलल्याचे आढळेल. परंतु १२·५ × १० अशा पोथीच्या आकारावर 'महाभारत' ( पृ. २२५ पाहा ) काही महिने प्रकाशित झाले. तर दुसरे एक, दोन पृष्ठांचे केवळ एकाच बाजूला छापलेले बिननावी [ 'अज्ञात नावाचे' ] ( पृ. ४१५ पाहा ) मासिक उपलब्ध झाले आहे! एकाच नियतकालिकाने असे मधून मधून आकार बदलू नयेत. एवढेच काय पण शक्य तो एकंदर नियतकालिकांनी काही सुव्यवस्थेची बंधने या बाबतीत आपल्यावर घालून घेणे इष्ट होणार आहे. सूचिग्रथनाला ह्याचा अडथळा नाही; तथापि संग्रहव्यवस्थेला तरी हा अभाव मारक होतो या गोष्टीकडे लक्ष वेधले पाहिजे.

( ३ ) लहान मोठे नियतकालिक कोणतेही असो, त्याच्या प्रकाशनातील बेशिस्त ही पद्धतशीर सूचीकरणाला बाधक ठरते. प्रस्तुत सूचीतील अनेक नियतकालिकांच्या प्रकाशित अंकांचे वर्षवार टिपणाचे चित्र नजरेखाली घातले तर ते खंडदर्शक अनेक + अशा चिन्हांनी चिताड झालेले दिसेल. वास्तविक हा नियतकालिकाच्या जीवनचरित्रातील भूषणास्पद व खरा अभ्यसनीय भाग, पण तो मनाला दुःखदायक वाटतो. यामुळे उद्भवणाऱ्या अनवस्था-प्रसंगाची कल्पना येण्यासाठी पुढची पाचसहा उदाहरणे विशेषत्वाने परीक्षावी. 'खानदेश-मित्रा'च्या पहिल्याच वर्षात अंक ३ व ४ यामध्ये ८ महिन्यांचा खंड पडला. त्याचा वर्षारंभ मार्चमध्ये होता. पण या खंडामुळे तो जानेवारीत करण्याचा मोह होऊन १० वा अंक हा त्रैमासिकासारखा तीन महिन्यांचा एकच काढण्यात आला! 'नामदेव' ( पुणे १९०९ ) याचे ३० वे वर्ष डिसेंबर १९४३ त संपले, मग जानेवारी १९४४ च्या अंकावर त्याने ३५ वे वर्ष घातले व तोच क्रम पुढे चालविला–कशासाठी? कोण जाणे! त्याबद्दल त्याचे काही म्हणणे असेलच; पण म्हणून तशी 'मंडूक प्लुती' समर्थनीय ठरेल असे नाही. 'बालबोध मेव्या'ची कहाणी 'बालबोध मेवा' आणि 'ज्ञानोदय' अशा दोन ठिकाणी मुद्दाम नमूद छापली आहे; परंतु तीवरून वर्ष ३८ चे साल आणि वर्ष ३९ चे साल यांच्या दरम्यान १३-१४ वर्षांचा गड खुशाल पडू दिल्याचे कारण स्पष्ट होत नाही. 'ख्रिस्ती नागरिक', ( पुरवणी ) या मासिकाने तर विस्तृत खुलासा करून वर्ष २ वरून एकदम ७ ज्यावर उडी मारल्याचे गणितागत पद्धतीने समर्थन केले आहे! 'स्त्रियांची मैत्रीण' ( पृ. ३८८ ) याने १९२९ सालात फार मौज केलेली आढळेल. आणि 'महाराष्ट्रीय सारस्वत आणि महाराष्ट्र कवि' या लक्ष्य मासिकाच्या जन्मकाळाच्या वेळीच त्याचा

*'हुन्नरसंग्रह' या १२ अंकांच्या बांधीव पुस्तकाचे वर्णन पाहा ( पृ. ४०१ )

श्रीकृष्णाप्रमाणे बाल्यावस्था ओलांडून ११ व्या वर्षाच्या वयात अवतार झालेला आहे या सर्वांची सयुक्तिक कहाणी शक्य त्या तपशिलात जागोजाग टिपलेली आढळेल परंतु हा सारा वेशिस्तीचा गोंधळ शेवटी निर्दोष सूचीकरणाच्या मार्गात अनवश्यक विक्षेप उत्पन्न करतो हे ध्यानात येण्यास अडचण पडू नये

(४) आपसातील सकारण विलीनीकरण आणि तन्मूलक कायमचे नामांतर हा प्रकार गोंधळास कारण झालाच पाहिजे असे अर्थात नाही. हा प्रकार 'शेतकी आणि शेतकरी' किंवा 'कन्या शिक्षक' आणि 'प्राथमिक शिक्षण' यांच्या बाबतीत शिस्तवार झाला आणि पद्धतशीर नोंदला गेला आहे परंतु 'अलंकार' आणि त्यात प्रकाशित झालेल्या 'शिक्षकाचा वैनारी' या 'अज्ञातवासात राहिलेल्या' मासिकाच्या पुरवणीचे अंक हा नोंदीला अडचणीचा भाग झाला आहे 'प्राविण्य' आणि 'भगीरथ' या दोघांचे लहरी संबंध अनिर्बंध (पृ १८८) नोंदलेले पाहून एकाच वर्षात एका मासिकाची नामांतरे हा प्रकार दिसायला लोकविलक्षण आणि व्यवस्थेला अनिष्ट वाटतो.

(५) अन्य रास्त कारणासाठी नामांतरे अगदाच समर्थनीय नसतात असे नाही. 'पुणे पाठशाला पत्रक' चे 'मराठी शालापत्रक,' आणि 'किर्लोस्कर खबर' चे 'किर्लोस्कर' अशी अनेक नामांतरे या कालखंडात झालेली व नोंदलेली आहेत, परंतु 'नामदेवसेवक' (पुणे १९२५) या मासिकाचे 'सहकारी नामदेव' हे नाव फक्त ४ महिने चालले आणि पाचव्या महिन्यापासून त्याला 'नामदेवसेवक' हे नाव घ्यावे लागले आणि ते कायद्याच्या (?) अडचणीमुळे असे नोंदलेले आढळते ही अडचण आरंभीच ध्यानात घेणे अवश्य होते अशी सूचिकाराची रास्त तक्रार नोंदली जाणे अगत्य आहे.

(६) आतापर्यंत काही प्रासंगिक घटनातील प्रासंगिक चुकांचा निर्देश केला परंतु याहून अधिक गंभीर निष्काळजीपणाची अनाकलनीय उदाहरणे ध्यानात आलेली आहेत प्रकाशकाच्या आवडी प्रमाणे त्याने सन, शके, शक किंवा फसली ('न्याय'), माह ('केरळकोकिळ'), शिवशक ('प्रबोधन') द्यावे परंतु एक पद्धती कायम ठेवावी एकदा मराठी व एकदा इंग्रजी महिने सरमिसळ वापरू नये (पाहा 'केरळकोकिळ', 'नाट्यकथार्णव'), आणि लहरीप्रमाणे इंग्रजी कालगणना, मराठी कालगणना आणि मिश्र इंग्रजी गणना असा खेळ करूच नये ('नामदेव') 'बृहन्महाराष्ट्र' ने आपला वर्षारंभ एकदा कार्तिक तर नंतर चैत्र केला आहे तर 'तत्त्व विवेचक' ह्या गूढ प्रवृत्ती मासिकाने (१८८३ ८४) काही इंग्रजी महिन्यांची नावे द्विरुक्त छापून सूचिकाराचे काम अवघड करून ठेवले आहे अन्य नियतकालिकांनी आपले प्रकाशन मासाच्या परिचित गणनेप्रमाणे न करता सणवार, ऋतुवार, सत्रान्तवार करून अथवा मनुमासादी आपनावे शोधून वापरून अडचणीत भर घातली आहे 'ज्योतिर्माला' (मुंबई १९१५) वर्ष ६ पासून कालनिर्देशच करीत नाही त्याच्या अंकांची पृष्ठे सलग नाहीत सदरवार आहेत. 'मिश्रविलास' या लोकमान्य मासिकाच्या वर्षादिगणनेत चुका आहेत. इतर नियतकालिकांनी सप्तवार गणना सोडून अंकवार पत्करलेली आहे आणि काल्पनिक सबबीने हुशारीनेही काम चालविलेले आहे ('यशवन्त') आणि त्यामुळे त्याचा कालसापेक्ष अभ्यास करणे अवघड होऊन बसले आहे अशा किती तरी तक्रार करण्याजोग्या बाबी येथे तपशिलाने द्याव्या म्हटले तर अवकाश नाही. [पण यावरून तक्रार करण्यासारख्याच गोष्टी पुष्कळ आहेत असा समज करून घेऊ नये पुढे एका ठिकाणी अन्य रम्य व अभ्यसनीय गोष्टींचा रोचक नामनिर्देश आवर्जून केलेला आढळेल ]

आतापर्यंत केलेल्या वर्णनावरून सुस्पष्ट क्रम व्यवस्था, सयुक्तिक कालनिर्देश, सलग सूचिक्रम पृष्ठांकादिकांची नोंद इत्यादी अवश्य बाबींकडे दुर्लक्ष झाल्याची अनेक उदाहरणे लक्षात आणून दिली सर्व लोकांच्या विनोदनार्थ आणि आश्चर्यार्थ निर्माण होणाऱ्या ह्या वाङ्मयमाध्यमाने दाखविलेल्या चुकींच्या परिहारार्थ आपणावर प्रमाणीकरणाची काही बंधने घालून घेतली पाहिजेत, याबद्दल मतभेद दुमत होणार नाही प्रारंभिक अवस्थेतील

मानवी समानातील अराजक, समाजाच्या स्वास्थ्या साठीच कालांतराने राज्ययंत्रणा निर्माण करून असे निवारण करावे लागते, तसेच प्रारंभिक अनास्थेच्या काळात प्रकाशकाच्या स्वैर कल्पनाविलासामुळे किंवा अदूरदर्शी अनास्थेमुळे उत्पन्न झालेली गैर-व्यवस्था काही सूत्रीकरणासाठी सुव्यवस्था निर्माण करूनच दूर करावी लागते, हे आपल्याइकडे अजूनही फारसे ध्यानात आलेले दिसत नाही. पाश्चात्य देशात, विशेषतः अमेरिकेमध्ये, ग्रंथालय-शास्त्र आणि सूचिशास्त्र दैनंदिन व उत्पादक व्यव हारात फारमोठ्या कार्यासाठी राबवले जात असल्यामुळे, तिकडे या संबंधात पुष्कळच प्रगती झालेली आहे तिचे स्वरूप या ठिकाणी थोडक्यात नमूद करतो

अमेरिकेमध्ये नियतकालिकाचा पसारा अमर्याद असल्यामुळे तेथील ग्रंथालयानेही भयप्रद शीग गाठली तेव्हा तिकडे प्रमाणीकरणाची चळवळ सुरू झाली प्रमाणीकरणाची ही कल्पना अभ्यास काच्यापूर्वी ग्रंथालयाच्या जगात प्रथम सळवळ उडवू लागली हे ग्रंथपालांना द्याव्या लागणाऱ्या संदर्भसाह्याच्या आवश्यकतेच्या अनुरोधाने ठीकच म्हटले पाहिजे अमेरिकन लायब्ररी असोसिएशनचा तालिकाविभाग, त्याच संघाचा नियतकालिक विभाग ( कारण त्याचीच कुचंबणा जास्त होई ) आणि संशोधन ग्रंथालय संघ (स्पेशल लायब्ररीज असोसिएशन) या तिघांनी मिळून १९३१ मध्ये एक खर्डा तयार केला यापूर्वी १९३२त त्यांनी प्रकाशकाकडे आपले गाऱ्हाणे मांडून पाहिले, परंतु ते बधले नाहीत तेव्हा अमेरिकन प्रमाणीकरण संस्थेशी संपर्क साधून आपल्या मागण्याचा पाठपुरावा करण्यासाठी त्यांनी एक खास समिती निवडली त्यासाठी मग त्या प्रमाणीकरणमंडळाचे सदस्यत्व पत्करून आपली चळवळ या समितीने मंडळाच्या अंतर्गृहात शिरकविली ह्या मोठ्या आणि कार्यप्रवण संस्थेने मग ३०० नियतकालिकाच्या प्रकाशकाकडे प्रश्नपत्रिका पाठविण्याचे व त्यावरून इतिवृत्त तयार करण्याचे सोपस्कार पार पाडले आणि त्या बळावर आपल्या दुरुस्त सूचना २४०० प्रकाशकांना सादर केल्या एवढे होण्यास १९३५ साल उजाडले. आणि त्या वर्षाच्या जूनपर्यंत फक्त १६ टक्के प्रकाशकांनी त्यांच्या शिफारशींना मान्यता दिली— एवढे काम झाले

ह्या पद्धतशीर कामाचे व कार्यपद्धतीचे महत्त्व फार मोठे आहे, तसेच त्या शिफारशी तशा साध्या व सहजमान्य होण्यासारख्या असल्या तरी त्याचे पद्धति संस्थापनाच्या दृष्टीने महत्त्व फार मोठे आहे म्हणून त्यातील काही वानगीदाखल थोडक्यात उतरून घेतो

प्रमाणीकरण-समितीच्या शिफारसी †

१ मलपृष्ठ, मुखपृष्ठ, अनुक्रमणिकेचे पृष्ठ ( अवश्य हवे ) आणि मासिकाचा अंतर्भाग या सर्व ठिकाणी नियतकालिकाचे एकच तेच नाव ठेवावे ( अनवधानाने इथे एक व दुसरीकडे दुसरे असे नसावे )

२ अनुक्रमणिकेचे स्वतंत्र पान असेल तर त्यावर तारीख, क्रम-वर्षांक, अंक क्रमांक सुस्पष्ट छापावे—अनुक्रमणिका नसेल तर मजकूर सुरू होतो त्या पहिल्या पानावर छापावे अंकाला पुरेशी पाठ असली तर त्यावर नाव, तारीख, वर्ष व अंक छापावे ही माहिती वरून खाली वाचता यावी अनुक्रमणिका स्वतंत्र देणे असेल तर ते पान दरवेळी नेमक्याच जागी यावे आकडे साधे स्पष्ट वाचनीय असावे ( ते अलंकारिक नसावे खरे म्हणजे जे जे वाचनीय ते ते अनलंकृत व सहज वाचनीय असावे )

३ एका ठराविक जागी पत्ता, संपादक, प्रकाशक, वर्गणी, फुटकळ अंकाची किंमत, प्रकाशनाचा नियत काल, आवृत्ती (असेल तर) क्रमांक, आणि एखाद्या सूचियोजनेत मासिक सामील असेल तर त्या योजनेचे नाव, छापावे (हा तपशील

† ए एल. ए. बुलेटीन २८, पृ ६४५–६४७, १९३४ 'मॅन्युअल ऑफ सीरिअल्स् वर्क'–जे हॅरिस गब्ल, १९३७, पृ ३२ वरून उतारा

प्रत्येक अंकावर न छुटता पाहावयास मिळालाच पाहिजे ).

४ वर्षं धर्पेमर-निदान एका गंडमर-सत्य पृष्ठांक छापावे. जाहिराती अधून मधून सरमिसळ असतील तर ती पानेही सत्या गणवीत मोजावी. पुरवण्या, खास अंक हे सारे अनुक्रमणिकेत सत्या ममाकावरच स्पष्टपणे नोंदावे. असे भाग स्वतंत्र ठेवल्यास त्यांस निराळा क्रमांक व पृष्ठक्रमांक द्यावा. ( खाराळीत प्रत्येक भाग कोठे ना कोठे तरी सुसून गोवय गेलाच पाहिजे हे ध्यान ठेवावे ).

५ लेखक व सहलेखक यांची शक्य तो संपूर्ण नावे मिळवून छापावी. पुनर्मुद्रण व उतारे छापले असतील त्याचे संपूर्ण संदर्भ द्यावे-ते टीपेत देणे बरे-आणि तेथे स्पष्ट तारीख ( साल ), माला-क्रम व पृष्ठक्रम नमूद करण्यास कसूर करू नये. लेखांकाचे क्रम प्रत्येक भागावर द्यावेच; पण प्रथम आणि प्रत्येक लेखांकावर एकूण लेखांकाची सत्या नोंदावी. 'पुढे चालू' व 'समाप्त' हे निर्देश जेथल्या तेथे काळजीपूर्वक छापावे. सर्व लेखभर समोरासमोरच्या दोन पानांपैकी एका पानावर लेखाचे नाव छापावे.

६ वर्षाची खंडाची सूचि प्रसिद्ध करताना वर्षक्रमांक वर्षाच्या आरंभ शेवटाच्या कालमर्यादा व अंकसंख्या स्पष्ट करावी.

७ सूचीला स्वतंत्र मुखपृष्ठ आणि पृष्ठक पाहिजेत. नाहीतर खंडाला नवे मुखपृष्ठ सर्व माहितीसह निराळे छापून पुरवावे. सूचीची पाने स्वतंत्र असावी. कोठेही पानाच्या पाठीवर संपादकीय वगैरे इतर मजकूर नसावा. ( तसा छापून त्यांचे काटकसर करू नये ).

८ खंडाचे मुखपृष्ठ व वर्षाची सूचि ग्राहकाकडे विनशेमाट रवाना करावी.

९ नाव किंवा आकार बदलणे असेल तर तो वर्षारंभी बदलावा. वर्षाच्या मध्ये नावात बदल केला तर बदलापासून नवे वर्ष सुरू करावे – नवा खंड सुरू करावा.

१० एकात दुसरे मासिक विलीन झाले तर, ज्यात ते विलीन झाले त्याच मासिकाचा वर्षक्रम कायम चालवावा.

ह्या सूचना इतक्या सरळ, सयुक्तिक आणि सर्वमान्य होण्यासारख्या आहेत की, या न पाळता; नियतकालिक चालविण्याचा मोह ज्यादार प्रकाशकांना का पडावा याचे कारण लक्षात येत नाही. नियतकालिके आपल्या निबद्ध विषयाचा अथवा दारीने परामर्श घेतील तर सहजच ग्रंथ शास्त्राच्या अभ्यासक्षेत्रात त्यांचा प्रवेश होऊन त्यांना केवळ्या तरी सूचिक्षेत्र सामील व्हावे लागेल आणि सूचिसमतेसाठी प्रमाणीकरणाचे दंडक पत्करावेच लागतील. हर्तीचे अराजक हे आपल्या अविकसिततेचे एक गमक आहे – न्यूनविकासाचा तो परिणामही आहे.

### नियतकालिक-विभागाचे उद्देश

याच संदर्भात नियतकालिकांच्या अंतर्बाह्य सुधारणेसाठी ग्रंथालय संघांना व प्रकाशकांना मिळून सहकार्याने कोणती विशेष कामगिरी करता येण्यासारखी आहे, हे अमेरिकन लायब्ररी असोसिएशनचेच उदाहरण घेऊन सांगता येईल.* त्या देशात नियतकालिकांसंबंधी प्रश्नाची १९२६ त एक गोलमेज चर्चा झाली आणि भवति न भवति होऊन १९२९ त ' अमेरिकन लायब्ररी असोसिएशन 'चा एक निराळा ' (नियत) कालिक विभाग ' काढण्यात आला व त्याच्या स्वतंत्र सभा भरू लागल्या. अर्थात तेथपासूनच नियतकालिकाच्या स्वतंत्र व सकारण अस्तित्वाला शोभेसे स्वतंत्र स्थान आणि आगळे महत्त्व त्याच्या संबंधातील सर्व प्रकारच्या प्रश्नांना साहजिकच आले. १९३२ त या विभागाचे प्रातिनिधिक उद्देश ठरविण्यात आले ते असे—

( १ ) देशभरच्या नियतकालिकांचे हितसंबंध निगडित करून सुधारणेसाठी अविरत प्रयत्न करणे.

( २ ) प्रमाणीकरण साधणे ( मागचा परिच्छेद पाहा ).

( ३ ) कालिकात येणारे विषय व लेख यावर

---

* ' मॅन्युअल ऑफ सीरिअल्स वर्क '–गेबल, १९३७, पृ. ४३-४४.

नजर ठेवून अश्लीलतेचे निवारण करणे.

(४) निरर्थक नियतकालिकांची निरुद्ध करण्याचे कामी ग्रंथालयांना सल्ला देणे.

(५) कालक्रमानुसार संदर्भोपयोगी संग्रह-तालिका व सूच्या तयार करणे.

(६) उद्योग-धंदेविषयक नियतकालिकांचा अधिक चांगला उपयोग कसा करता येईल याचा अभ्यास करणे.

(७) संपूर्ण सूचीकरणाला उत्तेजन देण्यासाठी सूच्यामध्ये सुधारणा करविणे.

(८) माहितीकेंद्राच्या द्वारा नियतकालिकांविषयी निवडित फरक, सारणीकरण, सूच्या, नावे, तारखा, प्रकाशनदिन इत्यादी सर्व प्रकारच्या घटनांचे ज्ञान फैलावणे.

(९) अमेरिकेतील (संयुक्त संस्थाने) नियतकालिक-व्यवसायाबद्दल सर्वांगीण निरीक्षण करणे.

नियतकालिकांची विकासक्षमता ध्यानात घेऊन त्यांना त्यांचे राष्ट्रीय व्यवहारातील योग्य महत्त्व प्राप्त करून देण्याकरिता आणि असलेले महत्त्व कायम राखून त्याचा राष्ट्रोद्धारात श्रेष्ठ उपयोग करून घेण्यासाठी अशा प्रकारे संघटना व संघटित प्रयत्न यांची किती आवश्यकता आहे हे सुसाम सांगणे नलगे. मागील परिच्छेदात वर्णिलेली प्रमाणीकरणाची योजना प्रस्तुत 'नियतकालिक विभागा'च्या पुरस्कारानेच यशस्वी झाली हे उघड आहे.

## १०

काही लक्षणीय विशेष —— प्रस्तुत सूचीतील थोड्याशा परंपरा आणि काही प्रवृत्ती यांच्याकडे लक्ष वेधण्यासाठी केलेला आतापर्यंतचा प्रबंध नियतकालिकांच्या समग्र इतिहासाच्या किंवा त्याच्या परामर्श समावेशक आराखड्याच्या पासंगाला देखील पुरणार नाही. कारण केवळ वस्तुस्थितिनिदर्शक अशा समग्र इतिहासात आवर्जून दाखल झाल्याच पाहिजेत अशा अनेक बाबी विस्तारभयास्तव वगळण्याशिवाय गत्यंतर नव्हते. त्यातील काहींचा उल्लेख उदाहरणादाखल करतो.—

(१) आपली ग्रंथसंपत्ती आणि नियतकालिकांची संवती यांकडे इंग्रजी शासनव्यवस्थेचे लक्ष वेधण्यासाठी, विशिष्ट आदेशानुसार या अनुकरणाने नियतकालिकाचे नाव इंग्रजी लिपीत किंवा त्याचा मथितार्थ इंग्रजीत भाषांतर करून देण्याची किंवा/आणि त्यात येणाऱ्या विषयांची इंग्रजी वाचकांना कल्पना येण्यासाठी त्या 'राजभाषे'त त्याचे स्वरूप वर्णून सांगण्याची पद्धती आरंभी आरंभी प्रचारात होती (पाहा पृ. १३६, १३७). अशी थोडी थोडकी नावीन-आणखी चांगली पाउणशे उदाहरणे सापडतील. पण याशिवाय सारा मजकूर मराठीत पण नावात मात्र इंग्रजी शब्द असे निदान सोळा नमुने आढळतात आणि त्यांचे एका विवक्षित दृष्टिकोणातून परीक्षणही करता येते. त्यांपैकी तीन ईस्ट इंडियन असोसिएशन (१८६९), महाराष्ट्र चेंबर ऑफ कामर्स (१९३४) व मराठा चेंबर ऑफ् कॉमर्स (१९४५) या संस्थांची मुखपत्रेच आहेत. आणि या संस्थांची ही इंग्रजी नावे गृहीत धरूनच त्यांना आपला प्रबंध थाटावा लागणे अपरिहार्यच होते. परंतु शिल्पविद्या व तांत्रिक शिक्षण या विषयाची 'इंजिनिअरिंग विषयावर (शिल्पविद्येवर) मासिक पुस्तक' (१८७६), 'इंजनिअरिंगचे कामाविषयी' (१८७८) व 'टेक्निकल एज्युकेशन किंवा धंदेशिक्षण'(१८९०) व 'मेकॅनिकल एंजिनिअर' (१९२२) ही चार नावे आपली कक्षा निःसंदिग्ध करण्याचे कामी मराठी पर्याय उपयोगी ठरतील किंवा नाही या त्या काळी समर्थनीय वाटणाऱ्या आशंकेच्या पोटीच स्वीकारली असावी, असे त्यांपैकी दोघांच्या मराठी पर्याय देण्याच्या खबरदारीवरून म्हणता येते. 'महाराष्ट्र रिव्ह्यू'† (१९०७) हे नाव 'रिव्ह्यू' या शब्दाच्या विशेष आकर्षणामुळे व त्याच कारणासाठी देशभक्त संचालकांनी स्वीकारले असण्याचा संभव आहे. अर्थात 'हॉस्पिटल असिस्टंट'† (१९०७) व 'पोस्ट ऑफिस'† (१९२३) व 'बाँबे पोलिस'† (१९४९) या श्रमिकसंघटनासंस्थांच्या बाबतीत ते कारण लागू पडणार नाही. 'लायब्ररी मिसलेनी' (जे. १९१२) व 'टीचर'† (१८९१) अशांनाही ही सवलत मिळणार नाही. मातृभाषाभिमुखता वा तद्विमुखता आणि संस्कृतिमरणता अशा

व्यापक प्रभावी हा प्रवाद किंवा प्रचार सबद्ध आहे आणि त्याचा विचार त्या संदर्भातच स्वतन्त्रपणे करावा लागेल. (२) बरीच नियतकालिके अनियमित होती, याचा इतरत्र उल्लेख केला आहे; परंतु त्याची खंत वाटून, निदान झालेली आगळीक प्रामाणिकपणाने नोंदून ठेवण्याच्या उद्देशाने, क्रमिक अंकगणनेच्या बरोबरीने प्रत्यक्ष प्रकाशनाची तारीखही छापण्याची काहींनी शोधको पयोगी प्रथा अमलात आणली होती ('अभिप्राय संग्राहक', 'निबंधमाला'). (३) काही इंग्रजीमराठी द्विभाषिके आणि इंग्रजी मराठी हिंदी वा इतर भाषायुक्त त्रिभाषिकेही होती! काहींनी तर इंग्रजीतील ब्रीदवाक्ये पत्करल्याची उदाहरणे आहेत ('मित्रोदय', 'षड्दर्शनचिंतनिका'). (४) नियतकालिके बंद पडण्याला वर्गणी-दाराचा तुटवडा हे एकच कारण नसून अक मागासल्यामुळे ('उद्यान'), संपादकाच्या आजारामुळे ('अभिप्राय संग्राहक'), युद्धजन्य कागदाच्या महागाईमुळे ('चैतन्य'), छापखान्याने छापण्यास नकार दिल्यामुळे ('समाजजीवन'), संपादकाच्या निधनामुळे ('बालबोध'), सरकारी निर्णयामुळे ('मराठी शालापत्रक'), सरकारच्या इतराजीमुळे ('स्फूर्ति'), इत्यादी विविध कारणे नमूद केलेली आढळतात. 'निबंधमाला' या प्रथितयश मासिकाच्या शेवटच्या अंकात उपसंहार करताना "'दुराग्रहाचे खंडन करून बरोबर समज करावे' हा जो दुर्मतखंडनात्मक 'मनोरथ होता त्याचे साफल्य झाले' म्हणून 'निबंधमाला' बंद" केल्याचे समाधानाने व कृतकृत्यतेने प्रसिद्ध केले आहे. या भिन्न कारणांचा मागोवा घेतल्यास त्यावरून समकालीन इतिहासाचे सूक्ष्म धागेदोरे, मोल तोलाची व्यक्तिमत्त्वे आणि विविध आणि विचित्र परिस्थितीचे वेढ हाती लागल्याशिवाय राहणार नाहीत. (५) विविध नियतकालिकांच्या प्रवर्तकात, जनकांत आणि पुरस्कर्त्यांमध्ये प्रत्यक्ष संपादका शिवाय इतर संस्था, मंडळे, व्यक्ती आणि हौशी गृहस्थांनी हातभार लावल्याचे आदरपूर्वक नमूद झालेले आढळेल त्यावरून हा व्यवसायाला प्रत्यक्ष धंदेवाईकपणाशिवाय आणखी काही सामाजिक प्रतिष्ठा होती याचे अवचित प्रत्यंतर मिळेल (६) सरकारकडून इष्ट वाटणाऱ्या नियतकालिकांच्या प्रतींची खरेदी होऊन तद्वारा मिळणारा आश्रय ('प्रथमाला', 'दर्पण'), सरकारात नाकलेले वा घोषित केलेले हक्क ('कार्येंदुशेखर', 'यशवन्त'), पोस्टाच्या दराची स्वस्ताई ('सत्यदीपिका'), १८६७ च्या ॲक्ट २५ प्रमाणे रजिस्टर करण्याची खबरदारी ('ज्योति प्रकाश') आणि त्याबरोबरच "वर्गणी दाराची यादी पाठविल्याशिवाय अलीकडे पोस्ट (खाते) मासिक रजिस्टर करीत नाही. आम्हास यादी पाठविणे इष्ट वाटत नाही. म्हणून अक बुकपोस्टाने पाठविणे भाग — त्याल्हणून (त्यामुळे) जास्त पडते", असा राष्ट्रीय विचाराच्या 'राष्ट्रबोध'कारास करावा लागलेला स्वाभिमानी खुलासा, अशा काही सूचक आणि बोचक तपशिलातून समकालीन सरकार आणि हे वाङ्मय-वाहन यांच्या परस्परसंबंधावर प्रकाश पाडण्याचे साधन हस्तगत होते. (७) तर 'पैसापट्टी' आणि 'पैसाफंड' ही एकाच सूर्ति स्थानाचे जनकत्व मिळविणारी मासिके 'स्वदेशी कागदावर' निघण्याचे ब्रीद मिरवितात, त्याचे दुसऱ्या एका प्रकाराचे समाधान वाटते. (८) (श्रीमद्)'भाग्येशविजय' हे निजाम सरकारच्या ज्युबिलीच्या स्मरणार्थ निघालेले मासिक दोन वर्षे मासिक म्हणून चालल्यावर मंदगती झाले. पण त्याने आपली वर्गणी रु. १८१२ अशी एकदा जाहीर करूनही श्रीमंत लोकांच्या उदारपणावर विश्वासून त्यांच्यासाठी म्हणजे श्रीमंत, राजे, संस्थानिक, जहागिरदार यास ती रु. ५ ते १० ठेवून त्या मार्गाने आर्थिक सुस्थिती मिळविण्याची आशा बाळगली! याचाही काही अन्वयार्थ लावणे शक्य आहे. (९) आपल्या अभ्यास काळात नियतकालिके प्रथम शिळामुद्रित असत, तरी सर्वस्वी खिळामुद्रित होण्यापूर्वी शिळा खिळा सरमिसळ मुद्रितही ('प्रगति', 'मराठी ज्ञान प्रसारक') असत याचे रहस्य अलीकडच्या सफाईदार मुद्रणाला सरावलेल्याच्या ध्यानात येणारही नाही. मग नित्येक मासिकाचे ('सर्व संग्रह' मुंबई १८६०) मलपृष्ठ रोजा छापल्या पद्धतीचे असून त्यात मागाहून फक्त पुस्तकनामे

(= वर्षाचा क्रमांक), अंकक्रमांक, महिन्याचे नाव व सनाचा शेवटचा आकडा (हल्ली आपण छापी नोटपेपरवर हाताने लिहितो तसा) तेवढा हाताने लिहून पाठवीत असत हे प्रत्यक्ष नजरेने पाहिल्याशिवाय कोणाचा विश्वास देखील बसणार नाही. पण हे खरे होते. ग्राहकांची अलर्षरचा व कारभाराचा एकदर सरपणा यावद्दल या घटनेवरून आणि कित्येक नियतकालिकांचे अंक हाती कोणा माणसाला पाठवून अमुक अमुक ठिकाणावरून घेऊन जावे अशा गर्भित सूचना असत त्यावरून ध्यानात येण्यास हरकत नसावी. (१०) काही विशिष्ट सामाजिक लेखकांचे विशिष्ट प्रकारचे मान्यता पावलेले लेखन कोणत्या नियतकालिकांत केव्हा झाले याची देखील यथायुक्त आणि यथाप्राप्त दखल घेतलेली आढळेल. या विशेषावर अर्थात फार कटाक्ष ठेवला आलेला नाही, परंतु या तऱ्हेचे निरीक्षणही अभ्यासकाला काही समाधान देऊन जाईल. (११) टोपणनावे हा वाङ्मयिकांच्या खेळकर तशाच गूढात्म प्रवृत्तीचा एक विशेष समजण्यास हरकत नाही. एवढ्या मोठ्या वाङ्मयप्रवाहात त्याचे काही गमतीदार नमुने सहज भेटतात. 'संन्यासी' मासिकाच्या श्रीधर विश्राम नामकानी आपल्या नावाचा पर्याय 'श्री विद्यानंद विश्वविराम' असा दाखल केला आहे, तर 'भारतधर्म' आणि 'आर्यभिषक' मासिकाचे संपादक सुप्रसिद्ध शंकर दाजी शास्त्री पदे यांनी 'मनीषी-मार्गीय मडळ' अशा नावाने आपला निर्देश करण्याचे पत्करले आहे. 'मस्ती'चे 'वामन राधाकृष्ण' आणि 'कुमारी श्यामा' ही अशीच टोपणनावे दिसतात. (१२) 'सजीवन' पाक्षिक (पुणे १९४९) याचा कौतुकास्पद उगम आणि निर्भेळ ध्येयवादाने साधलेली उत्तरोत्तर प्रगती या सूचीत नमूद झालेली आहे. अशी आणखीही उदाहरणे ('विद्यार्थ्यांच्या कल्याणार्थ अनेक विषय संग्रह') त्या दृष्टीने पाहणाऱ्याच्या नजरेस येतील. (१३) ब्रीदवाक्याचे महत्त्व अलीकडे बरेच कमी झालेले दिसते. पूर्वी तशी परिस्थिती नव्हती. ह्या बाबतीतील पुष्कळ तपशील सूचीत आवर्जून दाखविला आहे. सूचक, समर्पक व आव्हानात्मक ब्रीदवाक्यांबरोबरच काही मामुली वर्णने, प्रार्थनादी श्लोक अशांची मलपृष्ठावर काही नियतकालिके, 'लोकहितवादी' देखील, गर्दी करतात. 'सद्धर्मदीपिका' कारांनी तर एका चिनकाव्याचा नमुना ग्राहकांना सादर केलेला सहज नजरेत भरतो. तर अशाच एका कवितेवरून 'सरस्वती' मासिकाचे जन्मस्थळ वर्णनात देता आले आहे, याची मौज वाटते (पृ.३५९) (१४) तांत्रिक व शास्त्रीय विषयांना वाहिलेल्या 'कारागीर' या जुन्या (१८८७) आणि 'सृष्टिज्ञान' (पुणे १९२८) अशा नव्या नियतकालिकांनी परिभाषादी कोश छापून शास्त्रभाषेला खूप हातभार लावल्याचे आढळेल. 'मराठी शिक्षक' चीही या संबंधातील कामगिरी तशी अनपेक्षित नसली तरी लक्ष्य खास आहे. काही इतरांनी स्वतःच्या लेखांच्या सूच्या आवर्जून सहामाहीच्या अगर वर्षाच्या शेवटी किंवा 'विविधज्ञानविस्तारा'प्रमाणे पुन्हा काही विवक्षित कालांतराने छापून अभ्यासकांना मदत करण्याची आपली बुद्धी प्रगट केली आहे. अशा कल्पनांची ही इष्ट दिशेने झालेली प्रगती अजमावून पाहण्यासारखी खास आहे. (१५) काही नियतकालिकांच्या जीवनाची विश्वसनीय माहिती हाती न लागल्यामुळे त्यांच्या संबंधातील कुळाणी ही संशोधकाला आव्हानात्मक ठरली आहे. 'अबला मित्र', 'राजहंस', ही दोन नियतकालिके उदाहरणार्थ दाखविता येतील. (१६) कालिकांची बरीच नावे बहुधा समर्पक निदान सूचक असतात. कित्येक बाबतीत काही अतर्क्य संबंध नजरेस येतात. उदाहरणार्थ 'सुवर्णमाला' (मुंबई १९००) 'हे तारमास्तरांच्या सुप्रसिद्ध सभेचे अंशतःस्मारक आहे' ही माहिती प्रथमदर्शनी वाचकाला स्तिमित करतेच, पण त्या सभेबद्दलच्या अधिक शोधाला प्रवृत्तही करते. (१७) मराठीतील ज्ञाति समाजविषयक नियतकालिकांची बहुतेकांना कल्पना आहे. आणि या तऱ्हेचा एक स्वतंत्र वर्ग देखील या सूचीमध्ये सकलित केलेला आहे. बरीच नावे ज्ञातीजमातीचा स्पष्ट उल्लेख करतात, पण इतर काही ही सूचना मिळणार नाही अशा पद्धतीची 'आदर्श' (कासार), 'उद्धार' (पाठारे क्षत्रिय), 'छत्रपती' (मराठा), 'देवांग' १ (विण )

' प्रगति ' ( तेली ), ' प्रबोध ' † ( शिंपी ), ' शिक्षण प्रकाश ' ( वीरशैव ) अशी नावे स्वीकारताना दिसतात. ह्या प्रकारामागील मानसिक प्रक्रियेचा व प्रतिक्रियेचा शोध घेणे उभयपक्षी उद्बोधक ठरण्याचा संभव आहे.(१८) समाजजागृतीपर कार्यावर भर देणाऱ्या सर्वप्रकारच्या नियतकालिकावर सरकारची अवकृपा होणे हा पारतंत्र्यकाळातील नित्याचा प्रकार होऊन बसतो. हा प्रहार वृत्तपत्रावर विशेष जोराचा बसतो. अशा स्वरूपाची नोंद ' राष्ट्रबोध ', ' विश्ववृत्त ', ' चिन्मयजगत् ', ' स्फूर्ति ', ' यशवंत ' याच्या वर्णनात झालेली आहे. सामाजिक स्वरूपाच्या खटल्याचे उदाहरण ' वाग्विलास ' ( मुंबई १८८३ ) च्या वर्णनात आढळेल. तर ' दांपत्य, जीवन, कला ' यावर १९३८ त अश्लीलतेच्या समाजनिघातक आरोपाखाली एक दोन खटले झाल्याची माहिती ह्या रोगाचे एक जुने उदाहरण नजरेसमोर आणील. ( १९ ) संकीर्ण व्यक्तिविचार असा एक स्वतंत्र वर्ग दाखविण्याइतकी निदान ७ नियतकालिके निघाली. यात आणखी थोडी अप्रत्यक्षनिर्देशाची घालता येतील. त्यांचा ढाळा संग्रहात्मक वाङ्मयाचाच आहे. तथापि त्यात एकव्यक्तिविचारदर्शनासाठी प्राचीन संत ज्ञानेश्वराप्रमाणेच अर्वाचीन मनीषींपैकी रे. नारायण वामन टिळक, पूज्य विनोबाजी भावे (२ कालिके ), महात्मा गांधी ( २ कालिके ) आणि रवींद्रनाथ टागोर याना अग्रमान मिळाला आहे, हे आधुनिक सनमालेचा नवा मंच निर्माण होत आहे याचे, गमक म्हणावे लागेल. अशा सर्व तपशिलांचा साधक बाधक विचार होण्याचे आव्हान या सूचीतील विविध माहितीमध्ये अनुस्यूत आहे, हे एवढ्यावरून ध्यानात आले पाहिजे.

## ११

अग्रेसरमालिका – अनेक वेळा अमुक एका विषयावरील पहिले पुस्तक किंवा पहिले नियतकालिक कोणते आणि ते केव्हा प्रसिद्ध झाले याला असामान्य महत्त्व येते. संमिश्र संकीर्ण विषयाच्या नियतकालिकात कोणत्या विषयाला प्राधान्य असेल हे सांगता येत नाही; तसेच उपलब्ध संख्येत एखादे जुने नियतकालिक सुटून गेले नसेलच अशी खात्री देणे कठीण असते. अशा परिस्थितीत एवढ्या मोठ्या यादीतून प्रत्येकाने घोषित केलेल्या उद्देशानुसार काही सर्वप्रथमाची नोंद यापुढे करून देत आहोत. विषयवर्गवारीत दर्शविलेल्या सर्वच विभागाची प्राथम्यशोधासाठी छाननी केलेली नाही. केवळ काही क्षेत्रापुरतीच केलेली ही यादी तरी देखील बरीच मोठी झालेली आहे. काही जुन्या तर काही नव्या विचाराना प्रथम अगर प्राधान्याने नियतकालिकात स्थान कोणत्या कालात मिळाले, यावरून कल्पनाविकासाबद्दल काही आडाखे बसविता येतील व बऱ्याच अग्रेसराचे जन्मस्थान मुंबईच असल्याचे ध्यानात येईल. अग्रेसराची निवड करताना केवळ कालानुक्रमावरच भिस्त न ठेवता काही सुस्पष्ट वैशिष्ट्याचीही दखल घेणे इष्ट वाटले आहे. त्यामुळे मराठी नियतकालिकविश्वाची नाडी हाताला लागेल अशी आशा आहे. क्वचित सूचीत नोंदलेल्या जीवनमानाची कल्पना आणून दिली आहे.

अग्रेसरमालिका–सालवार काही विषयांतील सर्वप्रथम वा प्रधान नियतकालिके

| आरंभ व जीवन नाव व स्थल | विशेष स्वरूप |
|---|---|
| १८३२ ( ९ अंक ) दर्पण ( पाक्षिक ), मुंबई | ज्ञानप्रसार–विद्यायतेतील विद्येचा अभ्यास |
| १८४० ( ४ वर्षे ) ज्ञानचंद्रोदय, मुंबई | जुन्या मराठी काव्याचे प्रकाशन |
| १८४२ ( चालू ) ज्ञानोदय ( मासिक, पाक्षिक ), अहमदनगर | ख्रिस्ती धर्म |
| १८४४ ( १२ अंक ) उपदेशचंद्रिका, मुंबई | ख्रिस्तमतखंडन |
| १८४९ ( ४ अंक ) बोधसागर, मुंबई | इतिहास–किल्ले, स्थलवर्णने, प्राचीन सनदा-लेख इ. |

| आरंभ व जीवन | नाव व स्थळ | विशेष स्वरूप |
| --- | --- | --- |
| १८५० ( १७ वर्षे ) | मराठी ज्ञानप्रसारक, मुंबई | उपयुक्त ज्ञानप्रसारक सभेचे प्रकाशन–व्याख्याने व निबंध |
| १८५६ ( ६ अंक ) | विद्यार्थ्यांच्या कल्याणार्थ अनेक विषय संग्रह (त्रैमा.), बेळगाव | विद्यार्थी-कल्याण ( पुस्तकालयामार्फत प्रकाशन ) |
| १८५७ ( १२ अंक ) | आरबी भाषेतील सुरस व चमत्कारिक गोष्टी, पुणे. | ग्राहकांस पसंत पडावे म्हणून पुस्तकाचे मासिक खंड |
| १८६० ( १२ अंक ) | विचारदर्पण, मुंबई | मुद्रित ज्ञातिपत्रक ( क्षत्री ) |
| १८६० ( ८ वर्षे ) | सर्वसंग्रह, मुंबई | साहित्य मिळविण्यासाठी द्रव्य वेचणे, जुन्या मराठी काव्याचे शुद्ध पाठ छापणे. |
| १८६१ जाने. ( १० वर्षे ) | सत्यदीपिका, मुंबई | बालसाहित्य ( ख्रिस्ती ) |
| १८६१ ऑगस्ट ( ३ अंक ) | आनंद लहरी, मुंबई | मुले, मुली, विद्यार्थी यासाठी वाङ्मय ( हिंदीधर्मीय ) |
| १८६१ मे ( १५ वर्षे ) | पुणे पाठशालापत्रक, पुणे | ' विद्याविषयावरील विद्यापात्रयातील लोकांचे ' |
| १८६४ ( २ वर्षे ) | स्त्रीभूषण, मुंबई | स्त्रियांचे प्रश्न |
| १८६७ ( ६८ वर्षे ) | विविधज्ञानविस्तार, मुंबई | सर्वांगीण साहित्यचर्चा |
| १८६७ ( ४ अंक ) | वकिलाचा साथी, ठाणे | कायदा |
| १८६८ ( ३ वर्षे ) | विद्याकल्पतरु, बडोदे | मराठी सायक्लोपीडिया |
| १८६९ ( २ वर्षे ) | मनोविहार, ठाणे | भाषान्याने करमणूक |
| १८६९ ( ३ वर्षे ) | ईस्ट इंडिया असोसिएशन-सभेचे मराठी मासिक पुस्तक, मुंबई | राजकीय संस्थेचे प्रकाशन |
| १८७० ( ५ अंक ) | गायनाब्धिसेतु, बडोदे | गायनकला |
| १८७१ ( ६ अंक ) | महाभारत, पुणे | समूळ भाषांतर |
| १८७४ ( ७ वर्षे ) | निबंधमाला, पुणे | एकव्यक्तिनिर्मित उद्बोधनकारक निबंध |
| १८७६ फे ( २ वर्षे ) | इंजिनिअरिंग विषयावर ( शिल्प विद्येवर ) मासिक पुस्तक, पुणे | शिल्पविद्या |
| १८७६ अ ( १ अंक ) | उपयुक्त निबंध संग्रह, अलीबाग | उद्योग-व्यापार-धंदे |
| १८७६ ( ? ) | पुरातन वैद्यक ग्रंथ संग्रह, मुंबई | वैद्यक |
| १८७६ ए ( ५ वर्षे ) | वेदार्थयत्न, मुंबई | ऋग्वेदसंहिता–पदे, व्याख्या, टीपा, भाषांतरे |
| १८७७ | सत्यप्रकाश ( (पाक्षिक), मुंबई | इस्लामी धर्म व समाज |
| १८७८ ( ११ वर्षे ) | काव्येतिहाससंग्रह, पुणे | अस्सल इतिहास साधने |
| १८७८ ( १ अंक ) | सिद्धपदार्थशास्त्र, मुंबई | शास्त्रीय विज्ञान |
| १८७८ ( २ अंक ) | शेतकी विषयी तिमाही पुस्तक ( त्रैमासिक ), पुणे | शेतकी |
| १८८१ ( ३४ वर्षे ) | बालबोध, मुंबई | आबालवृद्धसुलभ सज्जनताबुद्धिकारक सर्वांगीण ज्ञान |

| आरंभ व जीवन | नाव व स्थल | विशेष स्वरूप |
|---|---|---|
| १८८३ ( ३ अंक ) | जादू मंत्र तंत्र भूतपिशाचादी निर्णय, मुंबई | गूढविद्या |
| १८८४ ( ४ वर्षे ) | ज्ञानदीप, मुंबई | एकेश्वरी पंथ व ब्राह्मोधर्म |
| १८८६ ( २६ वर्षे ) | केरळकोकिळ, कोचीन | सर्वांगीण रोचक–वाचनाभिरुचिप्रसारात यशस्वी |
| १८८७ ( ४२ वर्षे ) | काव्यरत्नावली, जळगाव | अर्वाचीन काव्य |
| १८८८ ( ४ वर्षे ) | पथ्यबोध, पणजी, केरी | आरोग्य |
| १८८८ | विटाळविध्वंसक, पुणे | अस्पृश्योद्धार |
| १८९२ ( १२ अंक ) | मासिकवृत्तमाला अथवा विविधविषयसुधा, मुंबई | वृत्तसंकलन |
| १८९४ | मापावर ( ३ वर्षे ) पुणे, 'ग्रंथमाला' ( १२ वर्षे ) कोल्हापूर | परभाषेतील ग्रंथांची भाषांतरे |
| १८९५ ( ४० वर्षे ) | मासिक मनोरंजन, मुंबई | पाश्चात्य ललित मासिकाचा आदर्श – प्रभावी अनुकरण |
| १८९६ ( ३ वर्षे ) | ऐतिहासिक लेख संग्रह, मिरज | एकसंध दप्तरांतील अस्सल कागदपत्रांबरोबरच सुसूत्र इतिहासाची प्रकरणवार जुळणी ( नंतर ग्रंथरूप ) |
| १९०९ ( ६ वर्षे ) | सुवर्णमाला, मुंबई | सांस्कृतिक रंगीत रंजक चित्रयुक्त अनेकभाषी भेट पुस्तके |
| १९१२ ( ६ वर्षे ) | लायब्ररी मिसलेनी ( त्रै मासिक ), बडोदे | ग्रंथ-ग्रंथालय |
| १९१८ (७ अंक) | मराठा गायकमित्र, केपे गोवा | वेश्या सुधारणा |
| १९१९ ( चालू ) | उद्यम, नागपूर | देशाची औद्योगिक उन्नती–अनेक खास अंक |
| १९१९ ( ३१ वर्षे ) | तत्त्वज्ञान मंदिर, अमळनेर | तत्त्वज्ञानाला वाहिलेले |
| १९२० ( १० अंक ) | इस्लामप्रकाश आणि मुस्लिम महाराष्ट्र, सातारा | इस्लामधर्म |
| १९२१ ( १३ वर्षे ) | मुमुक्षु, पुणे, नाशिक | भक्तिरसप्रधान सरस वाङ्मय |
| १९२६ ( ८ वर्षे ) | रत्नाकर, पुणे | साहित्यकलासंस्कृती–कलाभिरुची |
| १९२७ ( २४ वर्षे ) | समाजस्वास्थ्य, मुंबई | आरोग्य, लैंगिक |
| १९२८ ( चालू ) | यशवन्त, पुणे, मुंबई | ललित वाङ्मय – आदर्श 'मॉडर्न रिव्ह्यू'चा नसून 'नॅश' व 'स्ट्रँड' यांचा |
| १९२८ ( चालू ) | सृष्टिज्ञान, पुणे | लोकाभिमुख शास्त्रविज्ञान |
| १९२९ ( चालू ) | बृहन्महाराष्ट्र, कलकत्ता | बृहन्महाराष्ट्राचे हितसंबंध ( 'मायमराठी' नवे स्वरूप ) |
| १९३३ ( १५ वर्षे ) | हंस, सातारा | अस्पृश्योद्धारविरोधक |
| १९३६ ( ९ अंक ) | प्रभात, पुणे | नवमतवाद विरोधक |
| १९४१ ( ३ वर्षे ) | साधना, सातारा | 'सत्प्रवृत्तिवर्धकमंडळा'चे जीवनशुद्धिकारक वाङ्मय |

## १२

पुरवण्यांचा विचार—वस्तुनिष्ठ पद्धतीने नियतकालिकविश्वाचा थोडा फार परामर्श घेताना यापूर्वी प्रकाशित झालेल्या श्री. रामचंद्र गोविंद कानडे यांच्या 'मराठी नियतकालिकांचा इतिहास [१८३२-१९३७]' (१९३८) आणि श्री. रा. के. लेले व श्री. वि. कृ. जोशी यांचे 'वृत्तपत्रांचा इतिहास' खंड १ ला (सन १७८० ते १८८०)' (१९५१) या दोन पुस्तकांचे स्मरण आणि उपयोग देखील झाल्याशिवाय राहत नाही. यापैकी श्री. कानडे यांच्या माहितीचा परामर्श पूर्वी घेतला आहे. श्री. कानडे यांनी आपल्या पुस्तकात आणि आधी तीनच वर्षे 'अर्वाचीन मराठी साहित्य' (१९३५) या सकलन प्रथासाठी लिहिलेल्या निबंधात अशा दोन्ही ठिकाणी मासिकादी नियतकालिके आणि वृत्तपत्रे असे दोन स्पष्ट भाग करून नियतकालिकांचा स्वतंत्र परामर्श घेतलेला आहे. तथापि या विषयावर लिहिणाऱ्या याच काय, पण इतरही ग्रंथकाराचा आणि प्रस्तावनादि-लेखकाचाही भर सप्रगती नियतकालिकापेक्षा अधिक चमकदार व प्रसिद्धीच्या झगमगाटात वावरणाऱ्या त्यांच्या दैनिक-साप्ताहिकादी वारवार निघणाऱ्या भावंडावर म्हणजे वृत्तपत्रावर विशेष दिसून येतो, हे नाकारण्यात अर्थ नाही. नियतकालिकांच्याकडून त्यांचे योग्य कार्य साधून घेण्याच्या अपेक्षेने ही परिस्थिती बदलली पाहिजे आणि बदलेलही. ती बदलण्याचा फक्त एकच मार्ग आहे. आणि तो म्हणजे वृत्तपत्रेतर नियतकालिकांचा सविस्तर, साधार आणि तितकाच रोचक वृत्तांत अभ्यासकांस उपलब्ध करून देणे. वाङ्मयेतिहासाच्या दरबारात नियतकालिकांना मानाची खुर्ची मिळण्याइतपत त्यांचे वैभव नजरेत भरण्यासाठी या ज्ञानाच्याने नष्टप्राय होऊ घातलेल्या परंतु अभ्यसनीय वाङ्मयसततीचे सर्वारंभी संशोधन, सरक्षण व क्रमशः संवर्धन, सूचीकरण आणि पुनर्मुद्रण देखील झाले पाहिजे. प्रस्तुत 'मराठी नियतकालिकांची सूचि' ही या अवाढव्य कार्याचा फक्त प्रारंभ आहे. कधीही खंड पडू न देता नित्यकर्मासारखा सदैव आचरणीय अशा हा चिरंतन चालणारा उपक्रम कार्यक्रम आहे. याचे प्रत्यंतर त्यातील वर्णनविभागाच्या व परिशिष्ट-विभागाच्या पुरवण्यावरून मिळते. कित्येक प्रकरणी चक्षुर्वैसत्यं म्हणून उद्धृत केलेली माहिती देखील पुनर्निरीक्षणात वेगरवशाची ठरते. मग तदभावी अन्य प्रकारे संग्रह केलेली पुरवणीतील माहिती तशी पुढेमागे असत्य या अर्धसत्य ठरणे असंभवनीय नाही. अर्थात उपलब्ध असणाऱ्या पुराव्यावरून त्या त्या वेळी सत्य पारखून घेणे एवढाच आपला उद्देश असतो, हे ध्यानात वागवूनच पुरवणीनोंदींचा वापर करणे योग्य होईल. अशा पुरवण्या प्रथरालमर्यादेपुरत्याच न काढता किंवा ग्रंथप्रकाशनाच्या मुहूर्तावर अवलंबून न ठेवता, हस्तगत झालेली माहिती परीक्षणाकरिता, दुरुस्तीसाठी वा इष्ट तर उपयोगासाठी अभ्यासकांना काही नियमित कालांतराने, ('साहित्यसहकारा'दी) स्वकीय वा अनुकूल अशा नियतकालिकातून उपलब्ध करून देण्याचा संचालकांचा सकल्प याच वेळी लोकांच्या कानावर घालून ठेवलेला बरा.

## १३

वाङ्मयेतिहास आणि सूचि विचार – प्रस्तुत नियतकालिकांची सूचि म्हणजे मराठी वाङ्मयविश्वातील मर्यादी मुद्रित घटकांपैकी 'नियतकालिक' ही विशिष्ट सज्ञा धारण करणाऱ्या गटाची सवर्णन खानेसुमारी होय. सर्व मानवी उपक्रमाप्रमाणेच याही उपक्रमाच्या संपूर्णतेला साहजिक मर्यादा आहेत आणि त्या मर्यादांच्या क्षेत्रात राहूनच या परिश्रमपूर्वक साध्य केलेल्या ज्ञानाचा आपल्या उद्दिष्टाच्या पूर्ततेसाठी उपयोग करावयाचा आहे. मानवी जगतात ज्याप्रमाणे माणसे गटबारीने राहत नाहीत, तशीच नियतकालिके गटबारीने सापडत नाहीत, किंवा आपला सर्व व्यवहार इतर वाङ्मयगटापासून अलग चालू शकत नाहीत. किंबहुना प्रारंभीच स्पष्ट केल्याप्रमाणे सर्व प्रकारच्या आजूबाजूच्या घटनांशी व वाङ्मयाशी सरमिसळ असाच नियतकालिकांचा कारभार चालावा, अशी अपेक्षा असते आणि तसाच तो चालत असतो. या छोट्या सूचीतील एक हजाराच्यावर

सख्या असलेल्या नियतकालिकांची प्रत्येकाचे जन्मापासून अंतापर्यंतचे असे एक विशिष्ट जीवनचरित्र आढळते आणि त्याच्या पृष्ठभूमीचे स्पष्टास्पष्ट प्रतिबिंब त्यात पाहावयास मिळते. त्याचे धागेदोरे साहजिकच इतरत्र गुंतलेले असतात. ह्या सर्व धाग्यादोऱ्यांची स्थलकाल-घटना सापेक्ष संगती लागल्याशिवाय ह्या वाङ्मयकृतींनी मूर्तरूप झालेले सामाजिक मन आणि त्याच्या घडणीसाठी अगर आविष्कारासाठी कारणी लागलेले या कालानुसारी प्रकाशनाचे व्यक्तित्व वेलके होणार नाही— समकालीन वाङ्मयेतिहास स्पष्ट होणार नाही व त्याच्या सहवासाने व साहचर्याने प्रत्ययाला येणारा समाजमनसाचा विकास साकार होणार नाही. त्या दृष्टीने पाहता राजकीय इतिहासातील व्यक्तीचे स्थान आणि वाङ्मयेतिहासातील नियतकालिकाचे स्थान एकच आहे. ग्रंथ ही स्थिरविकसित घटना म्हटली तर नियतकालिक हे एक छोटेमोठे विकासक्षम व्यक्तित्व म्हणावे लागेल. ऐतिहासिक व्यक्तींचे विचार ग्रथित करणारा लिखित पत्रव्यवहार आणि नियतकालिकातील शब्दरूपात प्रकट झालेली लेखसंपदा ही दोन्हीही साधनपुराव्याच्या कामी सारखीच महत्त्वाची ठरतात. आणि या लिखिताच्या पाठीमागे जाऊन त्या त्या घटनांच्या कार्यकारणभावाचा आणि मनुष्याच्या वर्तनोद्देशाचा मागोवा घेण्याने जसा आत्मिक राजकीय इतिहास सिद्ध होतो, तशाच प्रक्रियेने या शब्दरूप सामाजिक मन बुद्धीच्या आविष्कारांची समर्पक मीमांसा करणारा सुसंबद्ध सयुक्तिक वाङ्मयेतिहास निर्माण होतो. राजकीय इतिहासकाराने समाजातील स्थलकाल-व्यक्तींच्या मनाचा मागोवा घेणे हे पुष्कळ प्रमाणात त्याच्या चतुर आणि शास्त्रशुद्ध (क्वचित् साधनशून्य) अनुमानाच्या आधीन असते, तर नियतकालिकांच्या बाबतीत (सर्व काही उपलब्ध होणे शक्य झाले तर) वाङ्मयीन पुराव्याचा अपार आणि केवढा सागर तरून जाण्याची एक निराळीच अडचण वाङ्मयेतिहासकारापुढे उभी राहते. ही अडचण फार मोठी आहे, परंतु प्रस्तुत सूचीकारांच्या उपक्रमांनी वाङ्मयीन संदर्भांचे ठरणारे गुण असलेले, अनेक प्रकारचे, एरवी केवळ एकट्याला अनाकलनीय असे अनंत धागे एकाच समर्थ निरीक्षकाच्या आवाक्यात येतील, त्यांचा एकत्र सुंदर गोफ विणला जाईल आणि मराठीमासिकाच्या वाङ्मयीन परिश्रमाचे द्योतक असे सुबोध, समर्पक आणि सविस्तर इतिहासमंदिर उभारले जाईल—जावे; अशा इच्छेनेच प्रस्तुत साधनरूप प्रयत्नाचा हा अल्प बहिरंग-परिचय जिज्ञासूंना सादर करण्याचे धाडस केले आहे. मिळालेली सर्व माहिती शक्य त्या सक्षेपाने सूचीत शब्दशः कोंबून भाडलेली आढळेल. तिचा काय, किती, आणि किती प्रकारे उपयोग करता येईल, हा उपयोग करणाऱ्याच्या तयारीवर अवलंबून राहणारा प्रश्न आहे. थोडा थोडा वेळ काढून जिज्ञासूनी सूचीशी हितगुज केल्यास ती आपले मनोगत लपवून ठेवणार नाही.

सदर्भविभागातील नियतकालिकांच्या याद्या देताना विविध प्रकारे त्यांची रचना केल्याने अभ्यासकाची पुष्कळच सोय झाली आहे यात शंका नाही. वर्णनविभागाची रचना कोशाप्रमाणे अक्षरविल्हे केली असल्यामुळे प्रत्येक ठिकाणी अन्य सूच्याप्रमाणे पृष्ठसंख्या देण्याची आवश्यकता राहिलेली नाही, हेही उघड आहे. आणि त्या दृष्टीने पाहता एवढ्या विस्तृत आणि काळजीपूर्वक (काही अल्प मुद्रणदोष वगळून) तयार केलेल्या सूचीबद्दल कोणाची काही तक्रार राहू नये अशीच कोणी झाले तरी अपेक्षा करील. आणि तसे पूर्वी ध्यानात आले असते तर, कितीही परिश्रम पडले तरी ते घेऊन सूच्या सर्व प्रकारे उपयुक्त आणि सर्व अपेक्षा पुऱ्या करणाऱ्या अशा बनवून छापण्यास सूचिमंडळाने कमी केले नसते. हे सांगण्याचे कारण असे की, सदर्भविभाग छापण्याचे सर्व काम पुरे झाल्यावर पुढील काम हाती घेण्याचे वेळी ह्या सूच्या अधिक उपयुक्त करण्याची एक कल्पना नव्याने सुचली. ती अशी की, प्रत्येक मासिकाचे व्यक्तित्व तेथल्या तेथे व सूचीच्या निरनिराळ्या सदर्भांत स्पष्ट होण्यासाठी त्याचे प्रकाशनस्थल व प्रकाशनमान जेथे जेथे त्याचा उल्लेख येईल तेथ तेथे छापून ते व्यक्तित्व स्पष्ट, नि:संदिग्ध आणि संदर्भानुकूल बनविणे. सूचिमंडळाने आरंभीच प्रकाशित केलेल्या 'मुख्य' या पुस्तिकेत दहा प्रकारे नियतकालिकांची नावे

हा स्थल कालाचा तपशील जोडून छापलेली आहेत.

## १४

सारविचार – कै वि का. राजवाडे अन्य-संदर्भात म्हणतात त्या सूत्रानुसार नियतकालिकांची सूचि म्हणजे नियतकालिकांचा इतिहास नव्हे ते इतिहासाचे काम इतरांसाठी ठेवून सूचिमंडळाने यथाउपलब्ध वर्णनात्मक सूचिकोश जनतेला प्राप्त करून देण्याचेच पत्करले आहे प्रस्तुत सूचीचा त्या दृष्टीचा परिचय आतापर्यन्त ढोबळ स्वरूपात करून दिल्यानंतर झालेल्या कामाचा थोडक्यात अस्तिनास्तिरूपी काही अंदाज घेणे अनुचित ठरणार नाही आता संशोधकांना साधने थोडी उपलब्ध आहेत इत्यादी वस्तुस्थितीबद्दल सर्वोच्च कल्पना आली असल्यामुळे, कित्येक नियतकालिकांची माहिती त्यांच्या पितृगृहीदेखील मिळाली नाही, इतके सामान्यापेक्षा त्यांची अधिक दखल घेणे नको असा सुप्रसिद्ध असलेल्या 'वसंत', 'सत्यकथा', 'हंस' अशांची जन्मकालीन विशिष्ट परिस्थिती येथेच प्रथम जाहीर रीतीने काही तपशिलाने नोंदता आली आहे. 'निबंधमाला' या अभिजात मासिकाबद्दल आजपर्यंत पुष्कळच मोठे साहित्यनिविष्ट बहुतांत झाल्या असल्याने त्या द्विरुक्त करण्यात स्वारस्य नव्हते परंतु 'ग्रंथमाला', 'मासांतर' आणि 'सुवर्णमाला' (मुंबई १९०९) यांच्यासारख्यांच्याबद्दल अधिक माहिती देता आली नाही, याचे वाईट वाटते आणि याचे एक कारण म्हणजे अन्यत्र प्रमाणीकरणाची आवश्यकता प्रतिपादन करताना नियतकालिकांच्या पृष्ठांक क्रमांकदल वगैरे ज्या वैगुण्यांच्या संबंधात तक्रार नोंदविली आहे, नेमकी त्याच प्रकारची वैगुण्ये या नामांकित कालिकांच्या बाबतीत चालकांनी कायम ठेविली, हे होय ह्या नियतकालिकांचे संपूर्ण संच जसेच्या तसे मिळते तर ह्या वैगुण्यावरही मात करता आली असती याचेच उदाहरण असे की, अनेक ग्रंथालयात मिळून (ठिकठिकाणी विखुरून का होईना) 'विविधज्ञानविस्तारा'चा संपूर्ण संच उपलब्ध झाल्यामुळे त्याच्या आश्रयाने घाटलेल्या 'महाराष्ट्र सारस्वत-पत्रिका' (१) चा त्रिचक्र तपशिलाचा



बाल्यकाल (पृ. २३७ २३८) व्यवस्थित रीतीने दाखविता आला आहे, तो पाहता सूचिमंडळाच्या दृष्टीने 'काव्येतिहाससंग्रह', 'किर्लोस्कर', 'मासिक मनोरंजन', 'चित्रमयजगत्', 'स्फूर्ति', 'विविधज्ञानविस्तार', 'सह्याद्रि', इत्यादी नामांकितांची माहिती साधनसुलभतेमुळे बरी जमविता आली आहे तर 'बालबोधमेवा', 'ख्रिस्ती नागरिक', 'समालोचक', 'यशवंत', 'समाज स्वास्थ्य' अशा काहींचा आरासजा तशी समाधानकारक साधने न मिळता देखील अनपेक्षितपणे कुतूहलजनक तपशिलाची जोड देऊन बराच वास्तव करण्यात यश मिळालेले आहे प्रत्यक्ष दर्शन परीक्षणानेच उलगडणारे कुतूहलजनक अनुमानिक तपशील 'रागिणी' १ आणि 'समीक्षक' यांच्या सारख्यांच्या वर्णनात अभ्यासकासाठी विश्वासाने नोंदता आले ते देण्यात कुचराई केलेली नाही 'वैदिकधर्म'– 'स्वधर्म', आणि 'प्राविण्य'-'मगीरथ' या जोड्यांचे रहस्य आवातर पुराव्याने उलगडले, परंतु 'अबलामित्र' व 'राजहंस' यांच्या संबधातील प्रश्न सोडविण्याचे कोणतेही साधन हाती न आल्यामुळे तेथे मात्र कोणताच तर्क न चालविता माहिती हाताला आली होती तेवढीच, चिकित्सकांनी अधिक तपशील पुरवावा म्हणून, नमूद केलेली आढळेल कवी नारायण वामन टिळक यांच्या बाप्तिस्मापूर्वे 'काव्यकुसुमांजलि' व 'ऋषि' या भिन्न नियतकालिकृतींचा तपास या सूचीत लागल, तर अन्य कोणाला अन्य कोणत्याही महत्त्वाच्या व सामान्य देखील नियतकालिकाबद्दल कुतूहल असेल, त्याने ते ते काढून पाहिल्यास त्याला सूचीच्या प्रतिपन्नवस्तुनिर्वाही कार्यक्षमतेची साक्ष पटेल आणि तरी देखील नियतकालिकांच्या सर्वांगीण आंतरिक परिचयासाठी 'ज्ञानोदयाची पहिली शंभर वर्षे' (प्रकाशन १९४२), 'दर्पण संग्रह' (प्र १९४६) किंवा 'मराठी ज्ञान प्रसारक' (प्र १९६५) अशा सङ्कलनात्मक व चित्रात्मक चरित्रात्मक वर्णन प्रयाची उणीव भासेल आणि ती भरून काढण्यासाठी जाणत्या परिश्रमांची अपेक्षा कायम राहील यात शंका नाही गल्या वीस पंचवीस वर्षांत उत्पन्न झालेल्या अशा प्रकारच्या प्रगतिपर अपेक्षा आणि

त्याच्या पूर्तासाठी होत असलेले साधनपरत्वे तुटक वा विरळ प्रयत्न हे आगामी सूर्योदयाचे अरुणच म्हणावे लागतील

## १५

ऋणनिर्देश — अशा प्रकारचे काम कोणी एक हाती करू म्हणेल तर होणार नाहीच, पण एखाद्या लायक मडळाच्या परिश्रमाना दखील इतर अने काचे साह्य मिळाल्याशिवाय त्याला प्राप्त परि स्थितीत म्हणावी तशी परिपूर्णता लाभणार नाही म्हणून वृत्तपत्रातून सूचीच्या परिपूर्ती साठी माहितीची साधने पुरविण्याबद्दल प्रकट विनती केल्यावर सवसाधारण दृष्टोत्पत्तीस येणाऱ्या उदासीनतेला थारा न देता आपण होऊन आपल्याजवळील सग्रह सूचिकार्याथ उपलब्ध करून देणाऱ्याचा उल्लेख क्रमप्राप्त ठरतो पुण्या तील सुप्रसिद्ध सशोधक श्री रा चि ढेरे आणि सशोधकाना दुर्मिळ जुने ग्रथ मिळवून देणारे सव्य साची विक्रेते श्री पाडुरग रामचद्र ढमढेरे आणि वे काशीनाथ पाडुरग शास्त्री पारखी यानी अनेक वेळा आपण होऊन आपल्याला उपलब्ध झालेले अक व माहिती मुक्त हस्ताने सूचिमण्डळाकडे दिली पण याहून अत्यत अनपेक्षित आणि म्हणून कौतुकास्पद वाटणारे साह्य देणाऱ्या व्यक्ती सपादन कार्यात सुदैवाने सहभागी झाल्या श्री शातीतीर्थ सगय्यास्वामी, बी ए, बी.टी (सक्षेप शासस्वामीचाकूर), हे उस्मानाबाद जिल्ह्यातील चाकूरचे एक शिक्षक स्वत च्या वीरशैवपथीय नियतकालिकाचा छोटासा परतु निवडक सग्रह स्वत च पत्रव्यवहार सुरू करून स्वखर्चाने सूचिमण्डळात उपयोगासाठी दोनदा घेऊन आले श्री भास्कर सदानद साधन, बी ए., हे पुण्याचे रहिवासी ख्रिस्ती विद्वन्मण्डळातील प्रमुख कार्यकर्ते असून त्यानी आपला उत्कृष्ट संग्रहच केवळ नव्हे, तर आपल्या व्यापक संशोधनाने मिळविलेली सूची, व आणखी निरलसपणे मिळवून नवी, अशी किती तरी ख्रिस्ती नियतकालिकाची उपयुक्त माहिती सूचिमडळाला प्राप्त करून दिली केवळ कार्याच्या पसंतीमुळे अपेक्षेबाहेर कष्ट घेणारे आणखी एक स्नेही नागपूरचे श्री गो ग जोशी याच्या निरपेक्ष आत्मीयतेच्या मदतीचे मूल्य अजमावणे कठीण स्वत च्या अभ्यासाचा व सशोधनाचा विषय निराळा असताही त्यानी मुलाखती घेतल्या, सदर्भ, व उतारे पुरविले, एवढेच नव्हे तर प्रदार्घ लेखाच्या सपूर्ण नकला व अशा त्यातील सामग्रीच्या याद्या न कटाळता करून पाठविल्या !

या सर्वांचे विशेष आभार मानणे हे आम्ही आमचे कर्तव्य समजतो

वर्णनविभागातील माहितीला भरीव स्वरूप आणून देणाऱ्या सस्था व व्यक्ती याच्याइतकेच किंबहुना काकणभर अधिक साह्य परिशिष्टविभागा तील सक्षिप्त चरित्रासाठी माहिती पुरविणाऱ्या सज्जनाचे झालेले आहे स्व तवद्दलची चरित्रात्मक माहिती काय, किंवा परिचितसंबधिताबद्दलच्या निवडक घटनाची अचूक माहिती पुरविणे काय, ह्या दोन्ही गोष्टी वाटतात त्यापेक्षा कठीण आहेत येथे दिलेली चरित्र तशी छोटी दिसत असली, तथापि त्यातील सक्षिप्त सुस्वल्प माहिती ही मुळातील परिश्रमपूर्वक जमविलेल्या सविस्तर व अधिकृत चरित्रावरून काळजीपूर्वक केलेला साकृतिक सक्षेप आहे ही माहिती मिळविण्यासाठी खुद्द सबधित व्यक्तींशीच केवळ नव्हे, तर इतर अनेकाशी — एकेकदाच नव्हे तर माहिती मिळेपर्यंत–पुन पुन्हा पत्र व्यवहाराचा पाऊस पाडावा लागला हा सगळा त्रास सहन करून सूचीतील ह्या सपादकाच्या चरित्र सशोधनाच्या दृष्टीने महत्त्वाचा आणि बहुधा अन्यत्र पाहावयास न मिळणारा दुर्मिळ अलंकार घडविण्याचे कामी ज्यानी ज्यानी न कटाळता हातभार लावला त्या सर्वांचे आभार मानण्याची ही संधी घेत आहो अशा हातभार लावणाऱ्या असख्य कर्तव्यदक्ष निरलस व्यक्ती आपल्यामध्ये आहेत हे महाराष्ट्रातील कोणत्याही प्रकारच्या व्यापक सशोधनाचा उपक्रम नव्याने करू चाहणाऱ्या अभ्यासकाला दिलासा देणारे आपले महद्भाग्य आहे.

श्री श ग दाते सूचिमण्डळ,
२४४ सदाशिव पेठ, पुणे ९ — सपादक
१० डिसेंबर १९६८

# काही आधीचे प्रयत्न ( कालानुक्रमाने )

## पुस्तके

भारतनियतकालिकदीपिका : संपादक व प्रकाशक – गणेश रंगनाथ दंडवते; १९१५; पृ. ५३. –अनेक भाषातील वृत्तपत्रे व मासिके याची माहिती.

महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि [ १८१०–१९१७ ] : संपादक – यशवंत रामकृष्ण दाते, साहायक – रामचंद्र त्र्यंबक देशमुख, प्रकाशक– श्रीधर व्यंकटेश केतकर; १९१९; पृ. ५२२ – मासिकांची ( पृ. १–१७ ) व मासिकातील निवडक लेखाची (पृ.१७१– ३५५ ) सुचि.

महाराष्ट्र नियतकालिक दीपिका, सन १९२१ : संपादक व प्रकाशक–गणेश रंगनाथ दंडवते; १९२२; पृ. ४८ – साहित्यसंमेलन प्रसंगी भरविलेल्या ( विद्यमान ) नियत कालिकांच्या प्रदर्शनाची सुचि.

मराठी गद्याचा इंग्रजी अवतार अथवा इंग्रजी अमलातील मराठी गद्य वाङ्मयाचा निबंध-मालेपूर्वीचा इतिहास ( इ. स. १८१०– १८७४ ) : लेखक – दत्तो वामन पोतदार; प्रकाशक – ए. पी. बापट अँड ब्रदर्स; पहिली आवृत्ती १९२२, पृ. २४२; पुनर्मुद्रण १९५७, पृ. २८७ – तत्कालीन वाङ्मयांतील निवडक उतारे.

अर्वाचीन मराठी वाङ्मय, मध्यकाल, पूर्वार्ध ( १८५७ – १८८५ ) : संपादक आणि प्रकाशक – गणेश रंगनाथ दंडवते; १९२४; पृ. ५६. यात परिशिष्ट १ – कालातील प्रमुख मराठी मासिक पुस्तकाची यादी व टोपणनावांचे स्पष्टीकरण.

सन १९२५ सालचे मराठी वाङ्मय : संपादक व प्रकाशक – महादेव काशिनाथ कारखानीस; डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन सोसायटी, पुणे; १९२७; पृ. २०१.

संक्षिप्त अर्वाचीन मराठी वाङ्मय ( १८०५ – १९२७ ) : संपादक – गणेश रंगनाथ दंडवते; श्री सयाजी साहित्यमाला; १९२९; पृ. ३१३. यात परिशिष्टात १८८६ ते १९१७ या कालातील प्रमुख मराठी मासिकांची यादी.

मराठी खिस्ती वाङ्मयाचा इतिहास ( १८१०– १९२७ ) : प्रकाशक – भास्कर कृष्ण उजगरे, महाराष्ट्रीय खिस्ती साहित्य सेवामंडळ; १९३१; पृ. १२३. अनेक लेखकांनी लिहिलेले सहा निबंध.

अर्वाचीन मराठी साहित्य ( सन १८७५ – १९३५ ) : प्रकाशक – विष्णु पांडुरंग नेने; १९३५; पृ. ६२९. यातील १७ वा लेख ' मराठी नियतकालिके '– लेखक रामचंद्र गोविंद कानडे, पृ.५२९- ५७०.

साहित्य समालोचन सन १९३५ : लेखक – गोपाळ गोविंद अधिकारी; प्रकाशक – महाराष्ट्र प्रकाशन संस्था, मुंबई; १९३६; पृ. ९९.

अर्वाचीन मराठी गद्याची पूर्वपीठिका ( इ. स. १८००–१८७४ ) : लेखक व प्रकाशक – गंगाधर बाळकृष्ण सरदार; पहिली आवृत्ती १९३७, पृ. ३७३; पुनर्मुद्रण १९५६, पृ. ३१२.

मराठी साहित्य समालोचन १८१८–१९३४ : लेखक – विनायक सीताराम सरवटे, साहायक – सी. ना. गवारीकर; प्रकाशक – न. शं. रहाळकर; १९३७; पृ.६२७. यात प्रकरण ९ ' नियतकालिके १८१८ –१८८५ '.

मराठी नियतकालिकांचा इतिहास [ १८३२– १९३७ ] : लेखक – रामचंद्र गोविंद कानडे; प्रकाशक – कर्नाटक पब्लिशिंग हाऊस; १९३८; पृ. २१४. ३१ कालिकांची व १४० संपादक - वार्ताहरादिकांची छायाचित्रे ( आर्टपेपरची ५६ पृष्ठे ). ३२ उतारे व १६२ संपादकांची लघुचरित्रे. प्रस्तावना – न. र. फाटक.

ज्ञानोदयाची पहिली शंभर वर्षे १८४२–१९४१ – ग्रंथ पहिला १८४२–१८६१; संपादक – भास्कर पांडुरंग हिवाळे, ज्ञानोदय व्यवस्थापक मंडळ; १९४२; पृ. २१० – वर्गीकृत उतारे.

दर्पण संग्रह : संपादक – विनायक कृष्ण जोशी व श्री. म. सहस्रबुद्धे; प्रकाशक – महाराष्ट्र ग्रंथ भांडार; १९४६; पृ. १८८. ५० उतारे ( १४० पृष्ठे. ).

मराठी शिलामुद्रिते : दुसऱ्या आवृत्तीचे संपादक – मु. श्री. गावस्कर; प्रकाशक – मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय; पहिली आवृत्ती १९४९, पृ. ९६; दुसरी आवृत्ती १९६१, पृ. २११. काही संदर्भ महत्त्वाचे. प्रस्तावना – अ. का. प्रियोळकर.

दलितांची वृत्तपत्रे [ १८८८–१९६२ ]: लेखक – आ. श्री. रणपिसे ( महिमानगडकर ); प्रकाशक – महाराष्ट्र बौद्ध साहित्य परिषद, मुंबई; १९६२; पृ. ५६. पांचव्या परिशिष्टात नियतकालिकांची यादी.

गोमंतकीय नियतकालिके ( गोमंतकीय नियतकालिकांचा इतिहास ) : लेखक व प्रकाशक – नारायण भास्कर नायक; १९६५; पृ. १००.

## लेखक व लेख

संपादक ‘ विविधज्ञान-विस्तार ’ – “ विविधज्ञान विस्तार ” : ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिक, मुंबई, जानेवारी – फेब्रुवारी १८९० मधील संपादकीय लेख, पृ. १–१५. या लेखात पृ. ३ ते ६ च्या प्रदीर्घ टीपेत “ आजपर्यंत ( १८९० ) जितकी मराठी मासिक पुस्तके विविधज्ञान विस्तारानंतर निघाली तितक्याची सनवार नावनिशी ” दिली आहे.

नारायण गोविंद चापेकर – “ मराठी मासिके, त्यांचे स्वरूप व सुधारणेच्या दिशा ” : ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिक, मुंबई, ऑगस्ट १९१५ मधील लेख, पृ. ३१३–३२७.

गोविंद महादेव गिर्डे – “ मराठी मासिके, त्यांची सांप्रतची स्थिती व ती सुधारण्याची दिशा ”:‘महाराष्ट्रसाहित्यपत्रिका’ (विविधज्ञानविस्तार ), सप्टेंबर १९१५ मधील लेख, पृ. १२९–१३५.

अनंत नारायण पंडित – “ सध्याची मासिक पुस्तके, त्यांचे स्वरूप व सुधारणेच्या दिशा ” : ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिक, मुंबई, ऑक्टोबर १९१५ मधील लेख, पृ. ३९९–४०४.

रामचंद्र भिकाजी जोशी – “ मराठीतील मृत मासिक पुस्तके – निबंधचंद्रिका ” : ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिक, मुंबई, फेब्रुवारी १९१८ मधील लेख, पृ. ७१.

विष्णु मोरेश्वर महाजनी – “ मराठीतील मृत मासिक पुस्तके – ज्ञानसंग्रह ” : ‘विविधज्ञानविस्तार’ मासिक, मुंबई, मे १९१८ मधील लेख, पृ. २११.

व्यंकटेश अनंत मैसूरकर – “मराठीतील मृत मासिक पुस्तके – दंभहारक ” : ‘ विविधज्ञानविस्तार ’ मासिक, मुंबई, जून १९१९ मधील लेख, पृ. २४६.

नीळकंठ बळवंत भवाळकर – “ विविधज्ञानविस्तार आणि मराठी नियतकालिके” : ‘विविधज्ञानविस्तार ’ मासिक, मुंबई, मे १९२६ मधील लेख, पृ. १८१–२१२.

बाळकृष्ण दत्तात्रय सातोस्कर – “मराठी मासिकांची *शंभरी ” : ‘ अमृत ’ मासिक, नाशिक,* यात सप्टेंबर १९५८ ते जानेवारी १९६० च्या दरम्यान आलेले १२ लेखांक. यांमध्ये मराठी नियतकालिकांचा धावता इतिहास *व सुमारे ४० महत्त्वाच्या नियतकालिकांचे* बरेच तपशीलवार व सचित्र वर्णन आहे.

आनंदराव जोशी – “ नागपुरातील काही अस्तंगत मासिके ” : ‘ विहंगम ’ मासिक, नागपूर यातील लेख. लेखांक १ – जानेवारी १९३४; लेखांक २ – मार्च १९३४.

# उपलब्धिस्थले—वापरलेल्या संक्षेपांचा खुलासा.

उपलब्धिस्थल म्हणजे प्रकाशित अंक ( काही किंवा सर्व ) कोठे मिळाले हे दर्शविणारा, प्रकाशित अंकाच्या यादीच्या शेवटी आधी दिलेला, नोंदीतील स्थल, ग्रंथालय वा व्यक्ती याचा निर्देश. वर्णन - विभागातील पाचव्या परिच्छेदाचे हे परिगणन आहे. त्यातील काहींचा खुलासा येथे दिला आहे. त्याशिवाय होणे दुर्घट असून काही स्थले तर स्मृतिशेष झाली असावी. यामुळे हे परिगणन बहुतांशी ऋणनिर्देशात्मक, आणि ते पाहून कोणा माहितगाराकडून अधिक शोधाला उपयुक्त असे नवेजुने धागे सापडण्याच्या उपयोगी, अशा स्वरूपाचे समजावे लागेल. मूळ नोंदलेल्या स्वरूपातच नावाची चिरफाडदारी केली आहे. त्यात आपली आडनाव आधी येणे वगैरेसारखे पर्याय वापरले नाहीत. क्वचित एखादे नाव भिन्न भिन्न प्रकारेही दर्शविलेले आढळेल.

अकाप्रि — प्रा. अनंत काकबा प्रियोळकर, सरस्वती बिल्डिंग, केनेडी ब्रिज, मुंबई ४

अवचानी —

आकुटे — आनंदराव कृष्णाजी टेकाडे, नागपूर

आर्वी — लोकमान्य वाचनालय, आर्वी (वर्धा)

इसुपीर्को — सर परशुरामभाऊ महाविद्यालयाचे ग्रंथालय ( भाडारकर संग्रह इ. ), सदाशिव पेठ, टिळक रस्ता, पुणे

औद्योगिक प्रदर्शनालय — लॉर्ड रे इंडस्ट्रिअल म्यूझिअम, (आता) घोले रोड, शिवाजी-नगर, पुणे ५

( मिसेस ) एम्. जे. खिस्ती, भोपाळ —

कचेरी, कार्यालय — नियतकालिकाचे कार्यालय

काकडे कोल्हापूर — श्रीपत हरि काकडे, संपादक ' शिवणकला '

काणेसंग्रह, पुणे —

कार्यालय — कचेरी पाहा

कालिकाप्रसाद छा., पुणे —

कीर्तने — हरि बाळकृष्ण कीर्तने, संपादक ' विमाजगत् '

केनावाळे — मनीषा, कचरेवाडी, पुणे ४

केमग्र — केसरी मराठा ग्रंथशाळा, ५६८ नारायण पेठ, पुणे २

केल्कीजोशी ( के ) — ८१० नारायण पेठ, पुणे २

कोऑइंस्टिअमरावती — कोऑपरेटिव्ह इन्स्टि-ट्यूट, अमरावती

कोलते — प्रा. विष्णु भिकाजी कोलते, उपकुलगुरु, नागपूर विद्यापीठ

कोल्हापूर — करवीर नगरवाचन मंदिर, ५१० सी वार्ड, कोल्हापूर

कोशकचेरी — महाराष्ट्रीय ज्ञानकोश कार्यालय, पुणे ( संपादक - श्री. व्यं. केतकर )

खरेमंदिर मिरज—

खापर्डे संग्रह — ब. ग खापर्डे, अमरावती

गगंजा — गणेश गंगाधर जांभेकर, मोडक वाडा, सदाशिव पेठ, पुणे २

गंबास — प्रा. गंगाधर बाळकृष्ण सरदार, पुणे

गममादुस्कर — संभाजी रोड, पुणे

गंदेसा — गंगाधर देवराव खानोलकर, शिवनेरी, ४१ शिवाजी पार्क, दादर, मुंबई २८

गनामु — सरदार गंगाधर नारायण मुजुमदार, पुणे

गोमजो — गोविंद महादेव जोशी, पुणे

गोरक्षण, गोरक्षण सभा — गोरक्षण सभा, नागपूर

गोराजगदाळे — गोविंद रामचंद्र जगदाळे, ८९ अ कसबा, याज्ञवल्क्यमंदिरासमोर, पुणे

गोहिंअमुबई, गोवाहिंअमुबई — गोवा हिंदु असोसिएशन, मुंबई

गोवितुळपुळे — प्रा. गोपाळ विष्णु तुळपुळे, पुणे

गोवा हिंदू क्लब —

घैसाव —
चयामुलेमुबई — चद्रकात यादव मुळे, लक्ष्मी सदन, १४७ विठ्ठलभाई पटेल रोड, मुंबई ४
चित्रशाळा — चित्रशाळा छापखाना, सदाशिव पेठ, पुणे
चैतन्य कार्यालय — पुणे
छापखाने —
जग्र — जयकर ग्रथालय, पुणे विद्यापीठ, गणेश खिड रोड, पुणे ७
जाधवसंग्रह — भास्कर सदानद जाधव, बी. ए., १ ब स्टेवली रोड, पुणे १
झुणुवाले नागपूर —
टाउनहॉल्नासिक — रानडे मेमोरिअल लायब्ररी, केळकर टाउन हॉल, नाशिक
टिमवि, टिळक विद्यापीठ — टिळक महाराष्ट्र विद्यापीठ ग्रथालय, पुणे
ठामग्र — मराठी ग्रथसग्रहालय, ठाणे
डी. एम वळीवडेकर —
डे. कमिशनरचे ऑफिस, अमरावती —
डेकॉ — डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट रिचर्स इन्स्टिट्यूट लायब्ररी, येरवडा, पुणे ६
डेव्हट्रॅसो — डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटी, पुणे
दमडेरे — पाडुरग रामचद्र दमडेरे, दुर्मिळ पुस्तकाचे विक्रेते, पुणे
ढेरेसंग्रह, ढेरे, राचिंढेरे — रामचद्र चिंतामण ढेरे, ७७ शनिवार, पुणे
तु. ना काटकर —
तोडवळकर —
त्वकासस — त्वष्टाकासार समजोन्नति संस्था, पुणे
थिऑकॉ — युनायटेड थिऑलॉजिकल कॉलेज, पुणे १
थिऑडे — थिऑसॉफिकल लॉज, डेक्कन जिमखाना, पुणे ४
दवेग्रा —
दनावर्तक, वर्तक — वर्तक पाहा
दवाजो — दत्तात्रय वासुदेव जोग, उपनिषत्तीर्थ, सदाशिव पेठ, मावेस्कूलसमोर, पुणे २
दवापो — दत्तो वामन पोतदार (महामहोपाध्याय), दातेवाडा, ४९८ शनवार पेठ, मेहुणपुरा, पुणे २
दाते — स्पष्ट अन्य निर्देशाच्या अभावी कै. शकर गणेश दाते याच्या टिपणातून घेतलेली माहिती
देनाटिळक — देवदत्त नारायण टिळक, आग्रा रोड, नाशिक
देऋग्राशिक्षणोत्तेजकसस्था मुबई — देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण शिक्षणोत्तेजक संस्था
देशमुखवर्गाल्पुणे — पुष्करणी हौदासमोर, पुणे
नगआपटे — नरहर गगाधर आपटे, पुणे
नगरवाचनमदिरकोल्हापूर, नवाम कोल्हापूर — नगर वाचन मदिर, कोल्हापूर
नवामअमरावती — नगर वाचन मदिर, अमरावती
नागपूरयुनिल — नागपूर युनिव्हर्सिटि लायब्ररी, नागपूर
नॉर्मल स्कूल फॉर मेल्स, अमरावती —
नूमवि — ग्रथालय, नूतन मराठी विद्यालय हायस्कूल, पुणे २
नूलकर पुणे —
नेर्लेकर बुक डेपो, पुणे —
पणजी —
पाटसकर सग्रह —
पारखीशास्त्री — वे स काशीनाथ पाडुरगशास्त्री पारखी, दुर्मिळ पुस्तकाचे विक्रेते, ४७८ अ शनिवार पेठ, पुणे २
पुमग्र — पुणे मराठी ग्रथालय, ४३७ ब नारायण पेठ पुणे २.
प्रकाशवाचनालयनासिक — प्रकाश वाचन मदिर, नाशिक
प्रियोळकर, प्राप्रियोळकर, अकाप्रि — पाहा 'अकाप्रि'
फकॉ — बाई जेरबाई वाडिया लायब्ररी, फर्ग्युसन कॉलेज, डेक्कन जिमखाना, पुणे ४.
बारामोडक — बाळकृष्ण रामचद्र मोडक, नागपूर
बीटीकॉपुणे — टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशन, ग्रथालय, सदाशिव पेठ, पुणे
मवाळकरसग्रह, नागपूर —
माइसम — भारत इतिहास सशोधक मडळ ग्रथालय, पुणे

भारतगायनसमाज — पुणे
भाडारकरसग्रहएसबीकॉ — एसबीकॉ पाहा
भालबहिरट —भालचद्र पदरीनाथ बहिरट, बी ए., काळ्यामारुतीनजीक, पढरपूर ( सोलापूर )
भावेस्कूल, पुणे —
भास्करराव जाधव वाचनालय, कोल्हापूर —
मग्र — महाराष्ट्र प्रादेशिक ग्रथालय, महाराष्ट्र राज्यातील मराठीभाषेचे प्रादेशिक ग्रथालय, ७९६ सदाशिव पेठ, विश्रामबागवाडा, पुणे २
मग्रसवाई — लो टिळक ग्रथसग्रहालय ( पूर्वी मराठी ग्रथसग्रहालय ), वाई ( सातारा )
मडगाव — म्युनिसिपल लायब्ररी, मडगाव, गोवा
मडलिकफर्गो — फर्ग्युसन कॉलेज, वाडिया लायब्ररीमधील मडलिक सेक्शन
मराठवाडा विद्यापीठ — औरगाबाद
मसमडळ, मुबई — मराठी सशोधन मडळ सग्रह, मुबई मराठी ग्रथसग्रहालय, मुबई १४
मसाप — महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, या सस्थेचे कै वा गो आपटे सदर्भग्रथालय, टिळकरस्ता, पुणे २
महानुभावमठ —
महाराष्ट्र कार्यालय — ‘ महाराष्ट्र ’ मासिकाचे कार्यालय, पुणे
मापुजो— डॉ माधव पुरुषोत्तम जोशी, लक्ष्मी रोड, पुणे २
मालवण — नगरवाचनमदिर, मालवण (रत्नागिरी)
मुग्रम — मुबई मराठी ग्रथसग्रहालय, १७२ नायगाव क्रॉसरोड, दादर, मुबई १४
यदिपेंदरकर — कवी यशवंत ऊर्फ यशवत दिनकर पेंढरकर, १९६।३४ सदाशिव पेठ, पुणे २
रमाकात ग्रदर्श, रमासुरतकर — डॉ. रमाकात माधव सुरतकर ( रमाकात ग्रदर्श ), ४८० शनिवार पेठ, पुणे २
रविकावळी — रघुनाथ विष्णु कावळी, १८ मिरिमिला बिल्डिंग, रानडे रोड, दादर, मुबई २८
ऊतसग्रह —
राहर्षे — मित्रमडळ कॉलनी, पुणे ९
राचिढेरे — ढेरे पाहा
राजवाडेसम, राजवाडेसमडळधुळे — [ इतिहासाचार्य वि. का ] राजवाडे सशोधन मदिर ग्रथालय, गल्ली नं १, धुळे
राजारामग्रनागपूर — राजाराम सीताराम दीक्षित वाचनालय, सीताबर्डी नागपूर
राजाराम लायब्ररी कोल्हापूर —
राठोड, अकोला —
रामकानिटकर — राजाराम मल्हार कानिटकर ( सपादक, ‘ चित्रमय जगत् ’ ), ४५५ सदाशिव, पुणे
लिआम — लिहून आलेला मजकूर
लोकमान्य छापखाना मिरज —
वर्तक, वर्तक सग्रह, वर्तक पुणे, दनावर्तक — द ना तथा दादासाहेब वर्तक, शनवार पेठ, पुणे २
वादेशमाळे, वारजा —
विगताम्हणकर — विश्वनाथ गणेश ताम्हणकर, पुणे
विदर्भ छा. अमरावती —
विप्रलिमये — आचार्य वि प्र लिमये, लक्ष्मीरोड, पुणे २
वेंगुर्ले —
वैद्य — श्रीराम बाळकृष्ण वैद्य
शकराचार्यमठ कोल्हापूर —
शमाउरुणकरपुणे — शकर मारुती उरुणकर, १३०२ शिवाजीनगर, पुणे ५
शासस्वामीचाकूर — शातीतीर्थ सगय्यास्वामी, शिक्षक, मु पो चाकूर ( सी आर ), ता अहमदपूर, जि. उस्मानाबाद, मराठवाडा
शिखरे — दामोदर नरहर शिखरे, पुणे
शिशुविहारनातूबाग —पुणे
शेतकी आणि शेतकरी कचेरी —
श्रीविआवेडकर — श्रीधर विष्णु आवेडकर, ५६३ बुधवार, पुणे
श्रीअरविंदाश्रम पाडेचरी —
( डॉ ) श्रीखडे कोल्हापूर — डॉ रामचद्र चिंतामण श्रीखडे, कोल्हापूर
श्रीगुरुदेवप्रशासनमडळ अमरावती —
श्रीनारदमदिर पुणे —

श्रीमहालक्ष्मीप्रा.हिंदुवाननमंदिर — श्रीमहालक्ष्मी प्रासादिक ( हिंदू ) वाचन मंदिर, पणजी ( गोवा )

सकाळकचेरी — सकाळ दैनिक ग्रंथसंग्रह, पुणे २

श्रीसमर्थ गोरक्षण वाचनालय, नागपूर —

संपादक, प्रकाशक — त्या त्या नियतकालिकाचे संपादक व प्रकाशक. केव्हा केव्हा संपादक –प्रकाशकाचे नाव दिले आहे, ते पहिल्या वर्णनात आलेले ओळखता येईलच.

सरस्वतीमंदिरपणजी — श्री सरस्वती वाचन मंदिर, पणजी

सरस्वतीवाचनालयशहापूर — ? सार्वजनिक वाचनालय, शहापूर ( ठाणे )

सारस्व, सारस्वसमाजमडगाव —गोमंत विद्यानिकेतन ( पूर्वीचे नाव– सारस्वत ब्राह्मण समाज ), मडगाव ( गोवे )

( डॉ. ) सामंत, मुंबई — डॉ. वासुदेव जगन्नाथ सामंत, ३६ लक्ष्मी निकेतन, डी. एल्. वैद्य रोड, दादर, मुंबई २८

सार्वजनिक वाचनालय ( अमरावती ) — अमरावती नगरवाचनालय, अमरावती

सावंतवाडी – श्रीरामवाचनमंदिर आणि क्रीडाभुवन, सावंतवाडी ( रत्नागिरी )

सेंलावडोदे — सेंट्रल लायब्ररी बडोदे

स्वस्तिकग्रंथभाडार पुणे —

ज्ञानेश्वर छा. पुणे —ज्ञानेश्वर छापखाना, ७७० शुक्रवार, भूतकर हौदाजवळ, पुणे २

उतारे —

## १ वाङ्मय-विभागाबद्दल यदृच्छावस्था

" या मासिक पुस्तकातील ( ' भारत वर्ष ', पुणे १८९६ ) इतिहासात्मक भागाच्या संबधाने साधनांची काय काय सामग्री आमचेजवळ आहे, हे असे ( सुमारे दोन पृष्ठे ) बरोबर सांगता आले, तसे ' वाङ्मयात्मक ' भागाच्या परिपूर्ततेसाठी उपलब्ध झालेल्या साधनासंबंधाने सांगता येणे कठीण आहे. तथापि इतके सांगण्यास काहीच हरकत नाही, की आमच्या प्राचीन व आधुनिक वाङ्मयासंबंधाने व मीमांसेसंबधाने त्याचप्रमाणे इतर भाषातील वाङ्मयासंबंधाने जे जे ज्या ज्या विद्वान गृहस्थाला लिहिण्यासारखे वाटेल त्याचा त्याचा यथावकाश संग्रह केला जाईल ... "—पहिल्या अंकातील उद्देशविषयक लेख, पृ. ५.

### २ वर्गणी चुकविणारांस कौल ( तीन नमुने )

#### ( १ ) ' दोन्हीकडून पंचाईत ! '

( वर्गणीबद्दल ) बोलावे तर राग येतो; म्हणून उगेच राहावे तर तोटा होतो–' दंभहारक ', वर्ष ४ अंक ६, जून १८७५.

#### ( २ ) ' तेलावाचून दिवा '

( वर्गणीदारानी वर्गणी दिली नाही तर ) तेलावाचून दिवा तेवेल तरी कसा ?—' सद्दिज्ञान ', पुस्तक १ अंक ५, मे १८८५.

#### ( ३ ) ' अहो ! जरा इकडे पहा ! '

आपण ' सद्दिज्ञाना 'चे वर्गणीदार आहा, नव्हे काय ? हा आठवा अंक ! ! १८८५ साल संपत आले ! ! ! त्याची आगाऊ वर्गणी आपण भरली नसल्यास ती सत्वर भरा कशी ! पुस्तक नियमाने मिळत असता त्याच्या मोबदल्यास इतराज काय म्हणून !– 'सद्दिज्ञान', पुस्तक १ अंक ८, आगस्ट १८८५.

* * *

## अंकुश

**मासिक** : संपादक – गणेश हेरंबराज बाल-शास्त्री शर्मा. प्रकाशक – संपादक, श्रीक्षेत्र मोरेश्वर ( मोरगाव, जि. पुणे ). मुद्रक – श्रीशिवाजी मुद्रण मंदिर, पुणे. वा. व. आणाऊ रु. ३०६, वर्ष २३ रु. ५. फु. अं. ८६, वर्ष २३ रु. ८८. अंकात प्रकरणवार ३२-४८ पृष्ठे. ८·३ × ५·५. प्रथमांक – माघ श. १८४२. पुढे चालू १९६७. ( वर्षवार व शिवाय सलग अंकक्रमांक )

**उद्देश** – गाणेशोपासनाप्रधान – वैदिक भक्ति-ज्ञानबोधक – गाणेशलीलातत्त्वार्थनिरूपक तथा धर्म-ज्ञानसाधक उपासनामार्गाचे विवेचन. श्रीयोगींद्र-मठ धर्मप्रसाराचे मुख्य साधन. गणेशतत्त्वप्रथांचे उपादन व प्रकाशन. स्वरूप – तीन भागात – ( १ ) उपासनामार्गसाधक भक्तिरसप्रधान काव्य, ( २ ) उपासनासिद्धीच्या प्रत्ययाची निदर्शक अवताराची व महात्म्याची चरित्रे, ( ३ ) कर्मो-पासनाज्ञानस्वरूप धर्मतत्त्वाचे ज्ञान देणारे स्फुट लेख. श्रीयोगींद्राची कविता, स्तोत्रे, पदे, स्मीगीते इ.

**ब्रीदवाक्य** –

(१) अंकुशो भगवान् विष्णु अंकनाद्धर्मपालक. ।
प्राप्तये पुरुषार्थानामंकुशः सर्वकारणम् ॥

(२) येन संहरसि प्रदान् त्वद्भक्तांति गणेश्वर ।
स तु सुहृतिनां पाता दीर्वस्ते अस्तु अंकुश·॥१॥

(३) वर्ष १ अंक २-३ मलपृष्ठ ४

सुविघ्नें नाशार्या सकल सुख व्हावें अनुदिनीं ।
सुबुद्धी लाधावी सतत वन हे इच्छिती मनीं ।
तशा श्रद्धायुक्ता निजभजनरता मुकरा–
सुलाभार्ती द्यावी बुधमुद्द हा अंकुश सदा ॥

(४) श्रीयोगींद्रगुरोराज्ञयो गाणेशजनरंजः ।
स्वयपूर्णः स्थितः स्वांते ' आशाग्निरो ' ऽय-मंकुश. ॥ १ ॥

**विशेष माहिती** – अंक १३२ निघाला नाही. अंक १६९ नंतर ६ महिने ( ६ अंक ) खंड. अंक २०० नंतर ५ महिने खंड पडला, ५ अंक ( वर्ष १८ अंक ३ ते ७ ) मागासले. ते ८ ते १२ या पाच अंकाबरोबर ओळीने काढून भरून दिले. अंक २१० नंतर एक वर्ष खंड. वर्ष २० चे पहिले सहा अंक दुप्पट व पुढील सहा अंक जोड-अंक मिळून एकूण अंक १८ म्हणजे सहा अंक जास्त. वर्ष २१ चे चारी अंक दुप्पट – दरमहा दोन याप्रमाणे – एकूण ८ अंक. अंक २४८ नंतर ६ वर्षे ८ महिन्याचा खंड – अत्यंत अनिश्चित परि-स्थितीचा उल्लेख. *कालगणना* – शकाच्या बरोबर श्रीयोगींद्रशक ( वर्ष १ अंक १- माघ शक १८४२ : श्रीयोगींद्रशक ३४४ ). *विशेषांक* – क्र. ( ६०-६१ ) श्रीयोगींद्र अंक; क्र. ६२ विषयाची पाच वर्षांची सूची; क्र. (६३-६४) कमलाविलास अंक; क्र. (६५-६६) बालगुरु योगींद्र गौरवांक-१; क्र. (६७-६८) बालगुरु योगींद्र गौरवांक २; क्र. (६९-७०) प्रमा प्रसाद अंक, क्र. (७१ ७२) श्रीगुरुगणेश गुह्य स्तोत्रे-२.

[ मुंमग्रं, मग्रं ]

वर्ष १ – अंक १, (२-३), ४, (५ ६), ७ ते ९, (१०-११), १२. माघ १८४२ ते पौष १८४३.

वर्ष २ – अंक (१३-१५), (१६-१७), (१८-१९), (२०-२१), २२, (२३-२४). माघ १८४३ ते पौष १८४४.

वर्ष ३ – अंक (२५-२६), २७, २८, (२९-३०), (३१-३२), (३३-३४). (३५-३६). माघ १८४४ ते पौष १८४५.

वर्ष ४ – अंक (३७-३९), ४०, (४१-४२), ४३, (४४-४५), (४६-४८). माघ १८४५ ते पौष १८४६.

वर्ष ५ – अंक (४९-५०), (५१-५२), (५३-५४), (५५-५६), (५७-५८), ५९. माघ १८४६ ते मार्गशीर्ष १८४७. (११ अंक)
वर्ष ६ – अंक (६०-६१), ६२, (६३-६४), (६५-६६), (६७-६८), (६९-७०), (७१-७२). पौष १८४७ ते पौष १८४८. (१३ अंक)
वर्ष ७ – अंक (७३-७४), ७५, (७६-७७), (७८-७९), (८०-८२), (८३-८४). माघ १८४८ ते पौष १८४९.
वर्ष ८ – अंक (८५-८७), (८८-९०), (९१-९२), (९३-९४), (९५-९६). माघ १८४९ ते पौष १८५०.
वर्ष ९ – अंक (९७-९८), (९९-१००), (१०१-१०३), (१०४-१०६), (१०७-१०८). माघ १८५० ते पौष १८५१.
वर्ष १० – अंक (१०९-११०), (१११-११२), (११३-११४), ११५ ते १२०. माघ १८५१ ते पौष १८५२.
वर्ष ११ – अंक १२१ ते १३१. माघ १८५२ ते मार्गशीर्ष १८५३.
वर्ष १२ – अंक १३३ ते १४०, (१४१-१४२), १४३, १४४. पौष-माघ १८५३ ते पौष १८५४.
वर्ष १३ – अंक १४५ ते १५१, (१५२-१५४), १५५, १५६. माघ १८५४ ते पौष १८५५.
वर्ष १४ – अंक १५७ ते १५९, (१६०-१६१), १६२ ते १६४, (१६५-१६७), १६८. माघ १८५५ ते पौष १८५६.
वर्ष १५ – अंक $\frac{१६९}{१}$ माघ १८५६ + $\frac{(१७०\text{-}१७१)}{८\text{-}९}$, $\frac{१७२}{१०}$, $\frac{(१७३\text{-}१७४)}{११\text{-}१२}$ भाद्रपद ते पौष १८५७. (सहा अंक)
वर्ष १६ – अंक १७५, १७६, (१७७-१७८), १७९ ते १८६. माघ १८५७ ते पौष १८५८.
वर्ष १७ – अंक १८७, (१८८-१९०), (१९१-१९२), (१९३-१९४), १९५ ते १९८. माघ १८५८ ते पौष १८५९.
वर्ष १८ – अंक $\frac{(१९९\text{-}२००)}{१\text{-}२}$ + $\frac{(२०१\text{-}२०२)}{८, ३}$, $\frac{(२०३\text{-}२०४)}{९, ४}$, $\frac{(२०५\text{-}२०६)}{१०, ५}$, $\frac{(२०७\text{-}२०८)}{११, ६}$, $\frac{(२०९\text{-}२१०)}{१२, ७}$. माघ १८५९ ते पौष १८६० +
वर्ष १९ – अंक (२११-२१२), (२१३-२१४), (२१५-२१६), (२१७-२१८), (२१९-२२०), (२२१-२२२). माघ १८६१ ते पौष १८६२.
वर्ष २० – अंक $\frac{(२२३\text{-}२२४)}{१}$, $\frac{(२२५\text{-}२२६)}{२}$, $\frac{(२२७\text{-}२२८)}{३}$, $\frac{(२२९\text{-}२३०)}{४}$, $\frac{(२३१\text{-}२३२)}{५}$, $\frac{(२३३\text{-}२३४)}{६}$ / $\frac{(२३५\text{-}२३६)}{७\text{-}८}$, $\frac{(२३७\text{-}२३८)}{९\text{-}१०}$, $\frac{(२३९\text{-}२४०)}{११\text{-}१२}$. माघ १८६२ ते पौष १८६३. (१८ अंक
वर्ष २१ – अंक $\frac{(२४१\text{-}२४२)}{१}$, $\frac{(२४३\text{-}२४४)}{२}$, $\frac{(२४५\text{-}२४६)}{३}$,

(२४७-२४८) / ४ . माघ १८६३ ते

वैशाख १८६४ + ( आठ अंक )

वर्ष २२ – अंक २४९ ते २६०. माघ १८७० ते पौष १८७१.

वर्ष २३ – अंक २६१/१ माघ १८७१,… २६५/५

आषाढ १८७२, २६६/६ श्रावण १८७२,..

(२६९-७०)/८ अश्विन १८७२.

## अखंड समाधान

**मासिक :** प्रकाशक – व्ही. एव्. प्रयाग, श्रीक्षेत्र वाड ( जि. उत्तर कानडा ). मुद्रक – स्वयंप्रकाश छापखाना. वा. व. रु. १०५. अंकात ५२ पृष्ठे. ६·९ × ४·४. प्रथमांक – १५ मार्च १९०९.

**उद्देश** – श्रीपद्मनाभतीर्थ ( तालीकोट ) याच्या पद्यग्रंथांचे प्रकाशन. स्वरूप – १ स्तोत्रसंग्रह, २ पदसंग्रह, ३ आत्मानुभव, ४ सदद्वैतवेदांत-सिद्धांतोपसिद्धांतसंग्रह, ५ कर्मतत्त्व.

**ब्रीदवाक्य** –

सर्व समाधानासाठीं । समाधाना नाहीं त्रुटी ॥
परि संशय उठती । सतत्त्वं ते तूटती ॥

[ मयं ]

वर्ष १ – अंक १ ते ९. मार्च ते नवंबर १९०९.

## अध्यापक व परीक्षक

**मासिक :** प्रकाशक – गोविंद विष्णु फडके, अहमदनगर. मुद्रक – सुदर्शन छापखाना, नगर. वा. व. रु. १०४. फु. अ. ८२. अंकात १२–२० पृष्ठे. ८×५·२. प्रथमांक कार्तिक शुद्ध १२ श. १८२५.

**उद्देश** – ' धर्म-नीति-व्यवहार-शिक्षणाची राष्ट्रीय पाठशाळा '. संस्कृत भाषा शिकविणे. भारतवर्षाच्या ' मृत ' भाषेस ' संजीवनी ' देणे. स्वरूप –' भारत ' ग्रंथाचे सारभूत श्लोक. परीक्षा घेतली जाईल. शाळांतील परीक्षांचे ( संस्कृत ) प्रश्न. संस्कृत शिक्षण-पद्धतींतील उणिवा.

**ब्रीदवाक्य** –

" स्वाध्यायप्रवचने एवेति नाको मौद्गल्यः । तद्धि तपः तद्धि तपः " ।

**विशेष माहिती** – ' एक अगदी वेगळ्या दिशेने प्रयत्न. प्रो. जिनसीवाले यांच्या लोभाचे योग्य स्मारक '.

[ मुंमसं ]

वर्ष १– अंक १ कार्तिक १८२५ + २ ते ९ पौष १८२५ ते श्रावण १८२६.

## अध्यापन

**मासिक :** संपादकमंडळ – प्रल्हाद केशव अत्रे, भास्कर घोंडो कर्वे. सहसंपादक–वर्ष २ कृष्णाजी गणेश पराजपे. प्रकाशक – वर्ष १ अंक १ ते ६ गो. गो. अधिकारी, अधिकारी आणि मंडळी; अंक ७ ते १२ व वर्ष २ वामन पांडुरंग केळकर, पुणे. मुद्रक – आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणे. वा. व. रु. २०१०. अंकात ४८ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – जानेवारी १९३१. ( वर्षवार, शिवाय सलग अंकक्रमांक. )

**उद्देश** – प्राथमिक व दुय्यम शिक्षकांचे मासिक. शिक्षणाचा शास्त्रीय व कलात्मक दृष्टीने विचार. स्वरूप – मलपृष्ठावर एका शिक्षणतज्ज्ञाचे चित्र. मुलांचे मानसशास्त्र, शैक्षणिक व प्रायोगिक मानसशास्त्र, शैक्षणिक प्रयोग व योजना, अध्यापनपद्धती, त्यांची चिकित्सा. वर्गातील पाठांची टिपणे. शिक्षकांची चरित्रे.

**विशेष माहिती** – " उत्कृष्ट लेख यावी येण्यास कालावधी लागतो म्हणून अनियमितपणा",

'दोन वर्षे चालून बंद पडले.'—पाहा 'नवे अध्यापन'. काही अडचणींमुळे बंद.

[ दवापो, मगंजा, मुमग्रं ]

वर्ष १—अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३१.

*वर्ष २—अंक १ ते ५. जानेवारी ते मे १९३२.*

## अध्यापन

**मासिक**: संपादक—गोपाळ गोविंद अधिकारी. प्रकाशक—संपादक, महाराष्ट्र प्रकाशन लि., पुणे. वा. व. रु. ५७४. अंकात २४ पृष्ठे. ७·२ X ४ ९. प्रथमांक—जुलै १९४८.

उद्देश—प्राथमिक व दुय्यम शिक्षकाचे.

[ दवापो ]

वर्ष १—अंक १ ते ३. जुलै ते सप्टेंबर १९४८.

## अबलामित्र

**मासिक**: प्रकाशक—रा. ह. आठवले, अलीबाग. मुद्रक—सत्यसदन छा. वा. व. रु. ३८६. ९.३ X ६.४. प्रथमांक—सप्टेंबर १८७६. (पुस्तक-अंक).

उद्देश—स्त्रियांकरिता. स्वरूप—नाटक, कादंबरी, निबंध, कविता.

[ मग्रं, मुंमग्रं ]

वर्ष १—अंक १ ते ६, (७-८), ९ ते १२. सप्टेंबर १८७६ ते आगस्ट १८७७ +

वर्ष २—अंक १, २, (३ ४), ५. जानेवारी ते मे १८७८.

## अबलामित्र

**मासिक**: प्रकाशक—रावजी हरि आठवले. मुद्रक—सत्यसदन छापखाना, अलीबाग. वा. व. आगाऊ रु. १०८, मागाहून दुप्पट. पु.अं.८४. अंकात २४ पृष्ठे. ८·३ X ५·३. प्रथमांक श्रावण श. १८०१.

उद्देश—स्त्रियांकरिता उपयुक्त विषयाचे मासिक पुस्तक. स्वरूप—स्त्रीशिक्षणावर निबंध, प्रसंगसंबंधी एक नाटक, पतिव्रता स्त्रियांच्या पौराणिक *कथा, पाकशास्त्र, जुनाट कवींची रसाळ कविता,* म्हाण्या, स्त्रीगीते, कादंबरी.

[ मुंमग्रं ]

वर्ष १—अंक १ ते ४, (५-६), (७-८), (९-१२). श्रावण १८०१ ते आषाढ १८०२.

वर्ष २—अंक १, २, (३-४), (५-८), ९, (१०-१२). श्रावण १८०२ ते आषाढ १८०३.

वर्ष ३—अंक १ ते ३, (४-५), (६-७), ८, (९-१२). श्रावण १८०३ ते आषाढ १८०४.

वर्ष ४—...अंक २ भाद्रपद १८०४, ... ५ फा १८०४,...७ वै १८०५, ८ ज्ये, (९-११) (? आ-भा) १८०५.

## अबलामित्र

**मासिक**: मुद्रक—सत्यसदन छा., अलीबाग. पु. अं. ८२. अंकात १२ पृष्ठे. ७·२ X ४.२. प्रथमांक श्रावण श. १८०५.

वर्ष १—श्रावण १८०५...३ अश्विन १८०५.

## अबलारक्षण

**मासिक**: संपादक—मा. र. ठकार. प्रकाशक—संपादक, सोलापूर. वा. व. रु. २. अंकात २० पृष्ठे. ७·२ X ४·९. प्रथमांक—मार्च १९३०.

उद्देश—अनाथ अबलांचा कैवारी. स्वरूप—अनाथ अबलांचे जीवन आर्थिकदृष्ट्या सुखावह कसे करता येईल, त्यांना करता येण्यासारखे उद्योगधंदे, मोहाची कारणे इ. शिवाय सामाजिक, धार्मिक, औद्योगिक इ. विषयांची चर्चा.

ब्रीदवाक्य —
यत्र नार्यस्तु पूज्यन्ते । रमंते तत्र देवताः ॥
[पुमग्रं]

वर्ष १— अंक १ मार्च १९३०.

## अभिप्राय - संग्राहक

त्रैमासिक : संपादक — गणेश रंगनाथ दंडवते. प्रकाशक — संपादक, बडोदे. मुद्रक — लक्ष्मीकान्त प्रिंटिंग प्रेस, बडोदे. वा. व. रु. १. अंकात २४ पृष्ठे. ९·५×६·५. प्रथमांक — अक्टोबर १९३४, शेवटचा — जून १९३८. (पुस्तक-भाग)

उद्देश — 'बुक रिव्हयु डायजेस्ट' च्या धर्तीवर नियतकालिकांत प्रकाशित झालेल्या अभिप्रायातून अवतरणाच्या साह्याने बृहन्महाराष्ट्रातील पुस्तकांचा वर्गवार परिचय. स्वरूप — पुस्तकाचे नाव, पृष्ठे, लेखक, प्रकाशक, प्रकाशनाचे स्थल व काल, किंमत, विषयाची साधारण कल्पना यावी इतपत प्रकाशित अभिप्रायाचा सारांश, अभिप्रायाचा संदर्भ.

विशेष माहिती — पुस्तक २ भाग १-२ पासून मथळ्याखाली (इंग्रजीत) 'दि मराठी बुक रिव्हयु डायजेस्ट्'; पु. २ भाग ३ पासून आणखी 'ॲण्ड इंडेक्स टु करंट मराठी लिटरेचर' हे शब्द. *प्रकाशन तारीख* — प्रत्येक भागाच्या प्रकाशनाची तारीख मुद्रक नोंदीबरोबर शेवटी. *मुद्रण* — वर्ष २ पासून श्री इंदिरा प्रिंटिंग प्रेस, बडोदे. *कायम ग्राहक योजना* — पुस्तक ३ भाग २ पृ. २४ वर 'एकदम रु. २५ देऊन कायम ग्राहक होण्याची योजना' व पुढे कायम ग्राहक झालेल्यांची नावे वेळोवेळी. पुस्तक ३ भाग १ मलपृष्ठ ३ — लेखक, प्रकाशक व छापखानेवाले यास आग्रहाची विनती — 'प्रत्येक पुस्तकाची एक प्रत व वर्णन पाठवा.' संपादकाच्या आजारामुळे बंद.

[ मुंमग्रं, दवापो ]

वर्ष १ – अंक (१-२) अक्टोबर १९३४ (प्रकाशन ४ नवंबर १९३४) ग्रंथांची नोंद जानेवारी ते जून १९३३.
— अंक (३-४) जानेवारी १९३५ (प्र. १ मे १९३५) ग्रंथनोंद जुलै ते डिसेंबर १९३३.

वर्ष २ – अंक (१-२) (प्र. ३० अक्टोबर १९३५) ग्रंथनोंद अधिकांश १९३४.
— अंक ३ (प्र. १६ फेब्रुवारी १९३६) ग्रंथनोंद १९३४चे राहिलेले विषय — निबंध, प्रवास, चरित्रे, किरकोळ, बालवाङ्मय.
— अंक ४ (प्र. ५ जून १९३६) ग्रंथनोंद १९३५.

वर्ष ३ – अंक १ अक्टोबर १९३६ (प्र. १५ नवंबर १९३६) ग्रंथनोंद जुलै ते डिसेंबर १९३५.
- अंक २ जानेवारी १९३७ (प्र. १ जून १९३७) ग्रंथनोंद जानेवारी ते मार्च १९३६.
— अंक (३-४) एप्रिल व जुलै १९३७ (प्र. १ नवंबर १९३७) ग्रंथनोंद एप्रिल ते डिसेंबर १९३६.

वर्ष ४ – अंक १ जानेवारी १९३८ (प्र. १५ एप्रिल १९३८) ग्रंथनोंद जानेवारी ते मार्च १९३७.
— अंक (२-३) एप्रिल व जुलै, १९३८ (प्र. ३० सप्टेंबर १९३८) ग्रंथनोंद एप्रिल ते सप्टेंबर १९३७.
— अंक ४ अक्टोबर १९३८ (प्र. १० एप्रिल १९३९) ग्रंथनोंद अक्टोबर ते डिसेंबर १९३७.

वर्ष ५ – अंक (१-२) जानेवारी व एप्रिल १९३९ (प्र. ?) ग्रंथनोंद जानेवारी ते जून १९३८.

## अभिरुचि

मासिक : संपादकमंडळ — सौ. विमल चित्रे, मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष, पुरुषोत्तम आत्माराम चित्रे. प्रकाशक — पुरुषोत्तम आत्माराम चित्रे, बडोदे.

४ थे ' या नावाने मसिद्ध होईल, याप्रमाणेच पुढेही प्रत्येक वर्षी (वर्ष ३ अंक ६ सप्टेंबर १९०४, मलपृष्ठ ४).

[ मुमसं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८२४.
वर्ष २ – अंक १, २, (३-४), ५ ते ७, (८-९), १०, (११-१२). चैत्र ते फाल्गुन १८२५.
वर्ष ३ – अंक १ ते ३, (४-५), ६, (७-८), (९-१०) चैत्र ते पौष १८२६—
वर्ष ८ – अंक + १ कार्तिक संवत १९६५ (नवंबर १९०९).

## कला-संग्रह

मासिक : संपादक – (समाहक) डी. के. जाधव. सहसंपादक – (मदतनीस) सौ. रोजाबाई राणे. प्रकाशक – द. वि. पाठक, महिला कलामंदिर, मुंबई. वा. व. रु. ६. फु. अं. ८८. अंकात १६ (८ + चित्रे ८) पृष्ठे. ९·८ × ७·४. प्रथमांक – नवंबर १९४५. (माला-पुष्प)

उद्देश – औद्योगिक माला. स्वरूप – कपडे, पर्सेस, फॅशन्स.

[ मसं ]

वर्ष १ – अंक १ ते ८ – नवंबर १९४५ ते जून १९४६.

## काव्यविकास

त्रैमासिक : संपादक – शंकर गोपाळ सात्त्विक. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. २. अंकात २४ पृष्ठे. ८·५ × ५·५. प्रथमांक – (आषाढ शु. १८०१ ?)

उद्देश – अखिल काण्वशाखीय ब्राह्मण मंडळ, मुंबई, या शाखेचे मुखपत्र.

ब्रीदवाक्य :

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात्पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥

[ मसं ]

वर्ष १ – अंक (१, २), ३ (पौष १८७१) जा १९५०, ४ चैत्र वर्षप्रतिपदा १८७२.

## कादंबरीकलाप

मासिक : संपादक – (सरकारी नोंद) श्रीनिवास बी. सरदेसाई, गो. ब. देवल. प्रकाशक व मुद्रक – पुणे वैभव छापखाना, पुणे. वा. व. रु. २·८ आगाऊ. फु. अं. ८४. अंकात २४ पृष्ठे. ८ × ५·२. प्रथमांक – एप्रिल १८८४. (पुस्तक - अंक)

ब्रीदवाक्य –

होवो रसज्ञमानस मुदित सदा या कथाकलापाने ॥
जेवि युवा आनंदे सुंदर नवयुवतिच्या सुलापाने ॥

विशेष माहिती – नावाखाली ' अथवा रीनाल्डादीकरून सुप्रसिद्ध इंग्रजी कादंबरीकाराच्या ग्रंथाचे मराठी भाषान्तर ' असा मजकूर. नवंबर १८८५ पासून एप्रिल १८८७ पर्यंत प्रकाशनात खंड. प्रकाशक – वर्ष २ अंक ८ वर गोविंद बल्लाळ देवल. वर्ष ३ अंक १ वर शंकर बापूजी मुजुमदार. वर्ष ३ अंक ८ वर हाताने ' डिसेंबर अंक ९ ' लिहिलेले आढळते.

[ मुंमसं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. एप्रिल १८८४ ते मार्च १८८५. अंक ३ वर मे १८८४ चुकून छापले आहे, जून पाहिजे.
वर्ष २ – अंक १ ते ८ एप्रिल १८८५ ते नवंबर १८८५.
वर्ष ३ – अंक + १ ए १८८७... ५ आ,

(६-७), ८ न १८८७...एप्रिल१८८७ ते नवंबर १८८७.

## कादंबरीकल्पद्रुम

**मासिक :** प्रकाशक – अनंत केशव चिनळे आणि मंडळी, वाई. मुद्रक – मोदवृत्त छापखाना, वाई. वा. व. रु. २८८. फु. अं. ८४. अंकात ४८ पृष्ठे. ८'८×५'८. प्रथमांक – चैत्र शुद्ध १ श. १८२२. शेवटचा अंक – फाल्गुन श. १८२६. ( प्रकरणासाठी – भाग, परिच्छेद, पर्व, कथन. )

**उद्देश** – उत्कृष्ट कादंबऱ्या प्रसिद्ध करून लोकरंजन करणे. **स्वरूप** – बंगाली व हिंदी कादंबरीकार बंकिमचंद्र चतर्जी, लखनौ काँग्रेसचे अध्यक्ष आर. सी. दत्त व काशीनिवासी देवकीनंदन खत्री इत्यादिकांच्या चटकदार कादंबऱ्या सरळ आणि मनोहर महाराष्ट्र भाषेत.

**ब्रीदवाक्य** –

मृदु मंजुळ कोमळ । भव्य अद्भुत विशाळ ॥
गौल्य माधुर्य रसाळ । भक्तिरसें ॥ १ ॥

—समर्थ रामदास.

**विशेष माहिती** – *प्रकाशक* – वर्ष ५ – भावे सहस्रबुद्धे आणि मंडळी. या मासिकात 'युगलांगुरीय', 'लावण्यमयी', 'कृष्णकांताचे मृत्युपत्र', 'चंद्रशेखर', 'राधाराणी' इ. बंकिमचंद्राच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. संपादकाचा मृत्यू व इतर आर्थिक नुकसानी यामुळे मासिकावर घाला पडला. म्हणून दुसऱ्या नावाने 'मकरन्द' सुरू केले. ( संदर्भ वर्ष ५ अंक १२ ).

[ मम ]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८२२, २ वै... (११-१२) मा-फा १८२२. चैत्र ते फाल्गुन १८२२.

वर्ष २ – अंक १ ते ५ अधिक श्रावण १८२३.. ९ कार्तिक १८२३.

वर्ष ४ – अंक १ चैत्र १८२५, २, ३, (५-६) श्रा-भा, ७, (८ ते १२). चैत्र ते फाल्गुन १८२५.

वर्ष ५ – अंक १, (२-३), (४-५), (६-७), (८-९), (१०-११), १२. चैत्र ते फाल्गुन १८२६.

## कादंबरीसंग्रह

**मासिक :** प्रकाशक – पांडुरंग बळवंत देवल, पुणे. मुद्रक – श्रीभागवत छा. पुणे. वा. व. रु. २ (पृ. ४० चा अंक), १९०५ (!) पासून रु. १ (पृ. २० चा अंक पाहिजे असलेल्यास). फु. अं. ८२. अंकात ४० पृष्ठे. ८'४×५'४. प्रथमांक – जानेवारी १८९३.

**उद्देश** – ( वर्णन – विषय स्वाभिमानपूर्ण. वाचनाऱ्याच्या मनात पूर्वजप्रीती, स्वदेशाभिमान, मुत्सद्दीपणा व एकनिष्ठ स्वामिभक्तीचा ठसा उमटेल असे ). **स्वरूप** – कादंबऱ्या, काव्ये, नाटके, इतिहास अथवा चरित्रे, ऐतिहासिक साधने अथवा प्रवासवर्णने. ऐतिहासिक प्रसंग.

**ब्रीदवाक्य** –

यातायातैः मुहुर्मुहुः श्रान्तोसि यदि हे सखे ।
एकं गुरुघनच्छाय सीतारामवरं भज ॥

**विशेष माहिती** – मथळ्याखाली कंसात निर्देश – 'ऐतिहासिक पुस्तकमाला'. या मासिकात 'माधव राज्यारोहण', 'महाराष्ट्रवीर', 'ताराबाई', 'मराठ्यांच्या वैभवाचा शेवटचा पडदा', 'सवाई माधवराव निधन नाटक', 'पृथ्वीराजसंयोगिता', 'रावबाजी' इ. पुस्तके प्रसिद्ध झाली. *आश्रयदात्याचे दोन वर्ग* – एक–संबंध ४० पृष्ठांचे मासिक पुस्तक, याची वर्गणी ट. ह. सह रु. २. दुसरा – २० पृष्ठांचे मासिक पुस्तक, याची वर्गणी ट. ह.सह रु. १. 'कमी किंमतीची मासिक पुस्तके पाहिजे असणारास अजब कल्पना.' ( संदर्भ – विविधज्ञानविस्तार वर्ष ३६ अंक ९, सप्टेंबर १९०५, मलपृष्ठ २ ).

[ मग्र ]

वर्ष ८ – अंक ( १ ते ६ ), ७ ते १२. ( जानेवारी ) ते डिसेंबर १९००...
वर्ष १२ – अंक ( १ ते ३ ), ४ ते १२. ( जानेवारी ) ते डिसेंबर १९०४.
वर्ष १३ – अंक ( १ ते ३ ), ४ ते १२. ( जानेवारी ) ते डिसेंबर १९०५.
वर्ष १४ – अंक ( १ ), २ फेब्रुवारी १९०६.

## कायस्थप्रभूंच्या इतिहासाची साधने

**मासिक** : संपादक – ( सरकारी नोंद ) बाळकृष्ण आत्माराम गुप्ते. मुद्रक - निर्णय सागर छापखाना, मुंबई. वा. व. रु. ३. फु. अं. ८५. अंकात प्रकरणवार २४ पृष्ठे. ९.२ X ६.३. प्रथमांक – आगस्ट १८८१. शेवटचा अंक – पु. १ अं. १२ ( महिना वर्ष नाही ). ( पुस्तक-अंक )

**उद्देश** – वाडवडिलांनी केलेल्या पराक्रमाचे यथायोग्य उल्लेखन व्हावे म्हणून तथा इतिहासास साधनीभूत जुने लेख मिळवून सरकारापुढे व विचारी देशबांधवापुढे ठेवावे. स्वरूप – बखरी, ताम्रपटे, राजाच्या सनदा, जातिप्रकरणी जुनी पत्रे, पोवाडे, बहादुरीची चिन्हे, दाखले, स्थानिक कथा, उत्पत्ती व स्थिती यासंबंधी इतिहास, मूलदेश व स्थानांतराची कारणे, थोर पुरुषांची चरित्रे, आडनावे व त्यांची उत्पत्ती, इ. इ. तीन विभाग – १ थोर पुरुषांची चरित्रे वगैरे. २ पुराणप्रसिद्ध गोष्टी व ग्रामण्यप्रकरण. ३ संस्कृत ग्रंथसंग्रह.

**विशेष माहिती** – ( ' मटीरिअल्स फॉर दि हिस्टरी ऑफ दि कायस्थ प्रभुज ' ). अंक १० ते १२ यावर कालनिर्देश नाही. सरकारी कामाचा चेप असल्यामुळे पुढे हा विषय मासिक पुस्तकाच्या रूपाने छापला जाणार नाही, असा खुलासा करून बंद.

[ मुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ आगस्ट १८८१ ते ९ एप्रिल १८८२, १०, ११, १२.

## कायस्थमित्र

**मासिक** : संपादक – विनायक सीताराम जयवंत. प्रकाशक – संपादक, चेंदणी, ठाणे. वा. व. रु. १. फु. अ. ८२ अंकात प्रकरणवार १२ पृष्ठे. ७.८ X ५.१. प्रथमांक – चैत्र शके १८५२.

**स्वरूप** – ऐतिहासिक वगैरे माहिती.

**ब्रीदवाक्य** –

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥

**विशेष माहिती** – पहिल्या चार अंकांची द्वितीयावृत्ती निघाली. वर्ष १ अंक १ मलपृष्ठावर मार्च १९३०, पण आतल्या पहिल्या पृष्ठावर एप्रिल १९३०. दुसरा अंक मे १९३०.

[ ठामग्र, मुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८५२ ( मार्च १९३१ ).
वर्ष २ – अंक १ ते ४, ( ५-६ ) एप्रिल ते सप्टेंबर १९३१.

## कारागीर

**मासिक** : प्रकाशक – नागपूर धंदेशिक्षण मंडळीचे चिटणीस गणेश काशिनाथ खरे, नागपूर. मुद्रक – दंडधारी छापखाना, नागपूर. वा. व. रु. २. फु. अ. ८४. अंकात २४ पृष्ठे. ८.५ X ६.२. प्रथमांक – जुलै १८८७. ( पुस्तक अंक )

**उद्देश** – उद्योगधंद्याबद्दल तांत्रिक माहिती देणे. स्वरूप – रेखाचित्रे, धंदेशिक्षणविषयक लेख, शेतकाम, विणकरीचे काम, सुतार-लोहारकाम, यंत्रशास्त्र, विद्युत्शास्त्र, इत्यादीविषयी सोप्या भाषेत क्रमिक धडे, उद्योगी पुरुषांची चरित्रे, नवे शोध व सुधारणा, उद्योगाविषयी प्रीती वाढावी असे निबंध, प्रश्नांची उत्तरे.

**विशेष माहिती** – इंग्रजी मथळा – ' दि टेक्निकल एज्युकेटर '. परिभाषा – ' बॉयलर '

शब्द तोच कायम ठेवला. ' काक ' याचा अर्थ पितळेचे तोंड लावलेले असते ते असा दिला.

[ सुंमग्र ]

वर्ष १ – अंक १ जुने, २ आ १८८७, ३ ऑ, ४ अक्टोबर १८८७.

## कारागीर लोकांचे कामाविषयी

त्रैमासिक ( तिमाही पुस्तक ) : प्रकाशक – काशिनाथ महादेव थत्ते ( हक्क व मुद्रण ), पुणे. मुद्रक – दत्तप्रसारक ( शिळाछाप ). वा. व. रु. ३ आगाऊ, रु. ५ मागाहून. फु. अं. रु. २ ( अंक १ – रु. १ ). अंकात २४ पृष्ठे. १० × ६·७. प्रथमांक – १० मार्च १८७८.

उद्देश – उपयुक्त कला आणि धंदे. स्वरूप – शाई, तेले, इ. करण्याच्या कृती.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ मार्च १८७८, २ जुने १८७८.

## कालेज-युग

त्रैमासिक : संपादक मंडळ – रमेश मास गावकर, मोहन चवाथे, स. पु. सक्सेनीस, कु. रतन देवळालीकर. प्रकाशक – म. भ. बादेकर, मुंबई. अंकात ३२ पृष्ठे. १०·८ × ८·५. प्रथमांक – ( जानेवारी १९४२ ).

स्वरूप – सचित्र.

विशेष माहिती – वर्णन इलस्ट्रेटेड कॉलेज. वर्णन – वर्ष ३ अंक २ वरून

[ मग्र ]

वर्ष ३ – अंक (१), २ एप्रिल १९४४.

## काव्य कुसुमांजलि

मासिक : संपादक – नारायण वामन टिळक. प्रकाशक – संपादक, नागपूर. मुद्रक – आल्बर्ट प्रेस, नागपूर. वा. व. रु. ८८. अंकात १६ पृष्ठे. ६·१ × ३·९. प्रथमांक – जानेवारी १८८९. शेवटचा अंक – एप्रिल - मे १८८९.

उद्देश – स्वतःच्या कवितांचे मासिक. स्वरूप – विविध विषयावरील कविता, पादटीपासह.

विशेष माहिती – संपूर्ण कवितेचे पुस्तक चालविणे अशक्य वाटल्यावरून बंद करावे लागले ( स्मृतिचित्रे पृ. ९४ ). पुढे ' विविध विषयतरंगिणी ' मासिकात सामील.

[ देनाटिळक, आकुटे ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १८८९, (२-३), ( ४ - ५ ) मे १८८९.

## काव्यनाटकादर्श

मासिक : संपादक – (कर्ते) बापूशास्त्री जोशी. प्रकाशक – संपादक, धारवाड. मुद्रक – ज्ञानवर्धक छा. धारवाड. वा. व. रु. ३८६ आगाऊ, ४८६ मागाहून. फु. अं. ८८. अंकात प्रकरणवार २०, २८ पृष्ठे. १० × ६·८. प्रथमांक – नवंबर १८८२. ( पुस्तक - अंक )

उद्देश – नाटके, काव्ये, चम्पू इत्यादींचे मूळ संस्कृत व मराठी भाषांतर देणे. स्वरूप – काव्ये, नाटके, त्यांची संस्कृतात टीका, महाराष्ट्र भाषेत भावार्थ व शेवटी वर्णानुक्रमे मराठी, कानडी व इंग्रजी अर्थ व संस्कृत विग्रहसहित निकाड अमरकोश (व्युत्पत्ति-रत्नाकर), मनोरंजक विषय ( कूटबंध इ.), अलंकारशास्त्र, संस्कृत शब्द व व्युत्पत्ती.

ब्रीदवाक्य –

माघश्चोरो मयूरो मुररिपुरपरो भारविः सारविद्यः ।
श्रीहर्षः कालिदासः कविरथ भवभूत्याह्वयो
भोजराजः ।
श्रीदण्डी डिंडिमाख्यः श्रुतिमुकुटगुरुर्भल्लटो भट्टबाणः।
ख्याताश्चान्ये सुबन्ध्वादय इह कृतिभिर्विश्व-
माल्हादयन्ति ॥
– वेंकटाध्वरि

विशेष माहिती – सर्व संस्कृत विद्याभिलाषी आर्यबंधूस हा ग्रंथ अत्यादरे अर्पण केला असे.

प्रार्थना – ग्रंथे चास्मिन् कुत्रचिच्चेदवद्यं व्याख्यातुर्वा लेखकस्य प्रमादात् । हित्वासूयां शोधयंतोऽनुकंपावंतो मंतुं क्षंतुमर्हंतु सन्तः ॥

[ मंडलिकफर्ग्यु, मग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते ११. नवंबर १८८२ ते सप्टेंबर १८८३.

## काव्यरत्नावली

**मासिक :** संपादकमंडळ – ( काव्ये तपासण्याचे काम ) १ लक्ष्मण रामचंद्र वैद्य, २ जनार्दन बाळाजी मोडक, ३ वामन दाजी ओक. प्रकाशक – नारायण नरसिंह फडणीस, जळगाव ( खानदेश ). मुद्रक – जगदीश्वर प्रेस, मुंबई / बाबाजी स्टीम प्रिंटिंग प्रेस, जळगाव. वा. व. रु. १८८ आगाऊ. फु. अं. ८४. अंकात २४, १६, ३२ पृष्ठे. ८'४ X ५'२. प्रथमांक – जून १८८७. ( पहिली ६ वर्षे सलग अंकक्रमांक ).

**उद्देश** – अर्वाचीन कवींच्या काव्यांचे प्रकाशन. **स्वरूप** – अलीकडील कवींची मराठी काव्ये, साहित्य, महाराष्ट्र कविवर्गावर निबंध, काव्यपरीक्षण आणि प्राचीन व अर्वाचीन काव्यांतील उत्कृष्ट उतारे, इत्यादी विषय, मुक्तावली, स्फुट काव्ये, दीर्घ व खंडकाव्ये इ. काल्पनिक, ऐतिहासिक, पौराणिक, संस्कृत व इंग्लिश काव्यांची भाषांतरे. सदरे – सालअखेर, पोच व अभिप्राय, काव्यरत्नावलीचे दप्तर, कविचरित्रे.

**ब्रीदवाक्य** –

( १ ) त एव पदविन्यासास्त एवार्थविभूतयः ।
तथापि नव्यं भवति काव्यं ग्रथनकौशलात् ॥
( २ ) ती ती पदे नित्य फिरूनि येती ।
त्या त्याच अर्थांप्रति दाविताती ।
कौशल्य मोठे रचनेत आहे ।
सत्काव्य तेणे नव वाटताहे ॥
( ३ ) व्याधींच्या गुरुवेदना शमविते, आधींस नेते लया ।
नाना चित्तरुजा प्रसन्न करुनी दे दिव्य दीप्ती तया ॥
जे जे शुद्ध, उदात्त, उज्ज्वल असे हे– लाविते ते मनी ।
धन्या ती कविता भवार्तहि जना जी वृत्ति दे उन्मनी ॥

– चंद्रशेखर

**विशेष माहिती** – " मूळ हेतू सर्व कविताच याव्या, पुरवठा न झाल्यास गद्यात्मक भाग द्यावा. पुरवठा झाल्यामुळे केव्हाच गद्यात्मक भाग द्यावा लागला नाही व तो बंदच केला " ( वर्ष १ अंक १२ सालअखेर ). *काव्यपरीक्षक* – अंक ४, १ वैद्य, २ मोडक, ३ ओक अधिक ४ वासुदेव वामनशास्त्री खरे; अंक ५ - अधिक ५ गणेश बळवंत मोडक, अंक ३२ – फक्त ३, ४ व ५; वर्ष ७ – ६ विष्णु मोरेश्वर महाजनी, ७ हरी महादेव पंडित व ८ मोरो गणेश लोंढे. शिवाय ३,४. *आकार* – वर्ष ११–७'९ X ५.१; वर्ष १३–७'२ X ४'१. *संपादक* – ( कर्ते ) वर्ष ७ वर नारायण नरसिंह फडणीस. *ब्रीदवाक्य* – वर्ष १८ वर १ व २; वर्ष २२ – फक्त क्र. २; वर्ष ३२ – क्र. २ मलपृष्ठावर, क्र. ३ आरंभपृष्ठावर. *वार्षिक वर्गणी* – वर्ष १८–रु. १८४; वर्ष ३० - रु. १॥; वर्ष ३३ ; रु. २; वर्ष ४२ – रु. १॥.

[ मग्रं, फर्ग्यु, पुमग्रं, एसपीकॉ ]

वर्ष १ – अंक १ ते १२. जून १८८७ ते मे १८८८.

वर्ष २ – अंक १३ ते १८, ( १९ - २० ), २१ ते २४. जून १८८८ ते मे १८८९.

वर्ष ३ – अंक + २५ ते ३६. जानेवारी ते डिसेंबर १८९०.

वर्ष ४ – अंक ३७ ते ४६, ( ४७ - ४८ ). जानेवारी ते डिसेंबर १८९१.

वर्ष ५ – अंक ४९ ते ५४. जानेवारी ते जून १८९२ ( सहाच अंक निघाले ).

वर्ष ६ – अंक ( ५५ - ५६ ), ५७ ते ६३, ( ६४-६६ ). जानेवारी ते डिसेंबर १८९३.

वर्ष ७ – अंक १, ( २ - ३ ), ( ४ - ६ ), ( ७ - ९ ), १०, ( ११ - १२ ). जानेवारी ते डिसेंबर १८९४. पृ. १८४.

वर्ष ८ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८९५. पृ. १८८.
वर्ष ९ – अंक (१-२-३ ४), ५,६ जानेवारी ते जून १८९६. (वर्ष अर्धेच दाखिले). +
वर्ष १० – अंक १ ते ६. जानेवारी ते जून १८९७. +
वर्ष ११ – अंक १ ते १२. जुलै १८९८ ते जून १८९९. +
वर्ष १२ – अंक (१-३), (४-६), (७-९), (१०-१२). जानेवारी ते डिसेंबर १९००. पृ. २१६.
वर्ष १३ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०१. पृ. १९६.
वर्ष १४ – अंक १ ते ४, (५-६) जानेवारी ते जून १९०२. (सहाच अंक निघाले).
वर्ष १५ – अंक १ ते ५, (६) जानेवारी ते जून १९०३. (सहाच अंक निघाले).
वर्ष १६ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०४. पृ. १९२.
वर्ष १७ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०५. पृ. १९२.
वर्ष १८ – अंक १ ते ५, (६-८), ९, (१०-१२). जानेवारी ते डिसेंबर १९०६ + पृ. २८८.
वर्ष १९ – अंक (१-४), ५ ते ९, (१०-११), १२. जानेवारी ते डिसेंबर १९०८. पृ. २८८.
वर्ष २० – अंक (१-३), (४-७), (८-१०), (११-१२). जानेवारी ते डिसेंबर १९०९. पृ. २८०.
वर्ष २१ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१०. पृ. २८०.
वर्ष २२ – अंक (१-३), (४-५), ६ ते १०, (११-१२). जानेवारी ते डिसेंबर १९११.
वर्ष २३ – अंक (१-४), (५-६), (७-८), ९ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१२. पृ. ३०४.
वर्ष २४ – अंक (१-२), ३ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१३. पृ. २६४.
वर्ष २५ – अंक १ ते ४, (५-६), (७-८), (९-१०), (११-१२). जानेवारी ते डिसेंबर १९१४. पृ. २८८.
वर्ष २६ – अंक १ ते १०, (११-१२). जानेवारी ते डिसेंबर १९१५.
वर्ष २७ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१६. पृ. २८८.
वर्ष २८ – अंक १ ते ६. जानेवारी ते जून १९१७ + ३॥ वर्षे बंद.
वर्ष २९ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२१. पृ. २८८.
वर्ष ३० – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२२. पृ. २८८.
वर्ष ३१ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२३.
वर्ष ३२ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२४. +
वर्ष ३३ ते ३६ – अंक प्रत्येकी १ ते १२ (जु ते जू) जुलै १९२५ ते जून १९२९.
वर्ष ३७ – अंक १ जुलै १९२९ + २ फे १९३० ते १२ डि १९३०. जुलै १९२९ ते डिसेंबर १९३०.
वर्ष ३८ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३१.
वर्ष ३९ – अंक (१-४), (५-६), ७ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३२.
वर्ष ४० – अंक (१-२), ३ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३३ + अंक फार मागासले, १ वर्ष गाळले.
वर्ष ४२ – अंक १ ते १०...जानेवारी ते अक्टोबर १९३५ —.

## काव्यसंग्रह

**मासिक** : संपादक – जनार्दन बाळाजी मोडक. प्रकाशक – तुकाराम जावजी, निर्णयसागर छा. मुंबई. मुद्रक – निर्णयसागर छा. मुंबई. वा. व. रु. ४८. फु. अं. ८८. अंकात प्रकरणवार १०० पृष्ठे. ८'८ × ५'८. प्रथमांक –

जानेवारी १८९०, शेवटचा अंक – अंक १६२ जून १९०७. (अंकवार गणना)

**उद्देश** – 'सर्वसंग्रह' व 'काव्येतिहास-संग्रह' वगैरेंची किंमत फार. शिवाय दुर्मिळ. म्हणून दोन्ही संग्रहात प्रसिद्ध झालेले, त्यात न येता बाहेर छापलेले किंवा कोठेही न छापलेले असा महाराष्ट्र काव्यग्रंथांचे पुनरुज्जीवन. एका मासिकात सर्व महाराष्ट्रकवींचे उत्तमोत्तम ग्रंथ प्राप्त करून देणे. स्वरूप – 'प्राचीन कवींची उत्तम काव्ये, रसाळ आख्याने, उपाख्याने, पदे, स्तव वगैरे अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपांसह, अनेक लेखी प्रती मिळवून पाठभेद व अधिक पद्ये इत्यादींचा समावेश.' कवींची चरित्रे, काव्यगुणावगुण, पुराणेतिहास, व्युत्पत्ती, व्याकरण, छंद, अलंकार इत्यादी संक्षिप्त पण विपुल टीपा.

**विशेष माहिती** – अंक ४ पासून 'ज. बा. मोडक यांचे स्मारक' असा निर्देश. संपादक – अंक ७ – वामन दाजी ओक, अंक ११३ – न. चिं केळकर, अंक १३६ – बाळकृष्ण अनंत भिडे. सर्व चालू प्रकरणे पुरी करून मासिक बंद केले.

अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८९०.
अंक १३ ते २४. जानेवारी ते डिसेंबर १८९१.
अंक २५ ते ३६. जानेवारी ते डिसेंबर १८९२.
अंक ३७ ते ४८. जानेवारी ते डिसेंबर १८९३.
अंक ४९ ते ६०. जानेवारी ते डिसेंबर १८९४.
अंक ६१ ते ७२. जानेवारी ते डिसेंबर १८९५.
अंक ७३ ते ८४. जानेवारी ते डिसेंबर १८९६+
अंक ८५ ते ९६. जानेवारी ते डिसेंबर १८९८.
अंक ९७ जाने १८९९ ते १०८. जानेवारी १८९९ ते डिसेंबर (१९००)+.
अंक १०९ ते १२०. जानेवारी ते डिसेंबर १९०२
अंक १२१ ते १३२. जानेवारी ते डिसेंबर १९०३.
अंक १३३ ते १४४. जानेवारी ते डिसेंबर १९०४+
अंक १४५ ते १५६. जानेवारी ते डिसेंबर १९०६.
अंक १५७ ते १६२. जानेवारी ते जून १९०७.

## काव्यार्थदीपिका

**मासिक** : संपादक – वामन गोविंदशास्त्री इस्लामपूरकर. प्रकाशक – मुंबई. मुद्रक – इंदुप्रकाश, मुंबई. वा. व. रु. ६ आगाऊ, रु. ९ मागाहून. फु. अं. ८१२. अंकात ४८ पृष्ठे. ८'५ × ५'३. प्रथमांक – १५ फेब्रुवारी १८७०. (पुस्तक अंक)

**उद्देश** – संस्कृत भाषेतील उत्तम व रसभरित काव्यांचा संग्रह करणे – मराठी भाषांतरासह. संस्कृत शिकणारांस सहाय्य व रसिकांस आनंद. स्वरूप – क्रम, श्लोक, पदच्छेद, गद्यरूप अन्वय, समासांचे विग्रह, शब्दार्थ, शुद्ध मराठी कविहृद्गतार्थ. प्रथम कालिदासकृत मेघदूतकाव्य.

वर्ष १ – अंक १ (१५ फेब्रुवारी १८७०), २ (१ ए), ३ (१ मे), ४ (१ जू) १८७०.

## काव्यार्थप्रकाश

**मासिक** : संपादक – (तयार करणार) बाळाजी नारायण फडके. प्रकाशक – पुणे. मुद्रक – विठ्ठल स. अग्निहोत्री यांचा छा. पुणे. वा. व. रु. ४. अंकात ४८ पृष्ठे. ९ × ५'८. प्रथमांक – जानेवारी १८७३.

**उद्देश** – (जाहिरात) श्रीमहाभारत समग्र प्राकृत टीकेसहित देणे. स्वरूप – श्रीहर्षकृत नैषधकाव्य सर्ग १ – मूळ, समासांचे विग्रह, पदच्छेद, गद्यरूप अन्वय, शब्दार्थ, मराठी भावार्थ इ.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ जाने १८७३.

## काव्यार्थप्रकाश

**मासिक** : प्रकाशक – श्रीराम नारायण चितळे व मंडळी, मुंबई. मुद्रक – सुबोधप्रकाश छापखाना, मुंबई. वा. व. रु. ३. फु. अं. ८६. अंकात ३२ पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – जून १८८४.

उद्देश — रघुवंश, किरात, शिशुपालवध, कुमारसंभव, गंगालहरी, महिम्न इ. संस्कृत काव्ये, त्याचे अन्वयार्थ, मराठी भाषांतर इ. छह. स्वरूप — मूळ, पदच्छेद, अन्वय, स्पष्टीकरण, भावार्थ.

ब्रीदवाक्य —

मान्मृच्छामः सुधा स्वर्गे नियमामो वयं भुवि ।
किं वा काव्यरसः स्वादुः किं वा स्वादीयसी सुधा ॥

विशेष माहिती — पत्ता — शिवराम त्र्यंबक ठाकूरदेसाई, फणसवाडी, मुंबई.

वर्ष १ ते ३ — अंक सलग १ ते १२ (जु ते जू). जुलै १८८४ ते जून १८८७. (तीन वर्षे).

वर्ष ४ — अंक १ ते ४...जुलै ते अक्टोबर १८८७.

## काव्यार्थप्रदीप

मासिक : संपादक — वे. शा. स. विठ्ठलशास्त्री वारळेकर. प्रकाशक — विनायक रघुनाथ वैद्य, मुंबई. मुद्रक — जगदीश्वर (शिळाछाप), मुंबई. वा. व. रु. ३॥. फु. अं. ८६. अंकात ३२ पृष्ठे. प्रथमांक — कार्तिक शु. १८०५.

उद्देश — मूळासह संस्कृत पंचमहाकाव्याचे भाषांतर — आबालवृद्ध विद्याभिलाषी जनांचे उपयोगार्थ. स्वरूप — किरात व रघुवंश.

[मग्रं]

वर्ष १ — अंक १ कार्तिक १८०५, २, ३ पौष १८०५

## काव्येतिहास-संग्रह

मासिक : संपादकमंडळ — [प्रकाशक - (एडिटर)] जनार्दन बाळाजी मोडक, काशिनाथ नारायण साने. प्रकाशक — पत्रव्यवहार पत्ता — सेक्रेटरी नेटिव जनरल लायब्ररी, पुणे. मुद्रक — ज्ञानप्रकाश छापखाना, पुणे. वा. व. रु.४ आगाऊ, मागाहून रु. ५. फु. अं. ८८. अंकात प्रकरणवार ५०, ४० पृष्ठे. १०×७, ९·४×६·५, ८·९×६·२.

प्रथमांक — जानेवारी १८७८. शेवटचा अंक — डिसेंबर १८८८. (पुस्तक - अंक)

उद्देश — जुन्या ग्रंथांचा जीर्णोद्धार. त्यामार्गे देशसेवा. आपल्या देशातील लोकांनी मोठ्या श्रमाने रचलेली काव्ये व लिहिलेले इतिहास, बखरी इ. प्रसिद्ध करणे. स्वरूप — सामान्यतः अप्रसिद्ध साधनांची प्रसिद्धी, तीन मार्गांनी — (१) मराठी कविता, (२) संस्कृत कविता व (३) महाराष्ट्र इतिहास, यात जुन्या बखरी, निरखोळ लेख, भावी इतिहासकार्यात आधारभूत व्हावेत म्हणून. बुडत असलेल्या हस्तलिखिताचा जीर्णोद्धार.

ब्रीदवाक्य —

भुजतरुवनच्छायां येषां निषेव्य महौजसां ।
जलधिरशनामेदिन्यासीदसावकुतोभया ।
स्मृतिमपि न ते यान्ति क्ष्मापा विना यदनुग्रहम् ।
प्रकृतिमहते कुर्मस्तस्मै नमः कविकर्मणे ॥
— राजतरंगिणी.

विशेष माहिती — मलपृष्ठ २ व ३ वर अप्रसिद्ध ग्रंथ मिळवून देण्याच्या जाहीर विनंतीच्या सदर्भाने उपलब्ध काव्ये, बखरी याची यादी, दुरुस्त्या, शोध, अभिप्राय इ. मलपृष्ठावरच. वर्ष ११ अंक १२मध्ये मासिकाचा संपूर्ण इतिहास — "मूळ कल्पना साने याची. चिपळूणकरांची संमती घेऊन मासिक काढले. मराठी काव्याचे संपादन ज. बा. मोडक, संस्कृत काव्याचे विष्णुशास्त्री चिपळोणकर व महाराष्ट्र इतिहास विभागाचे का. ना. साने करीत. सर्वसाधारण व्यवस्था कृष्णाजी रघुनाथ फेळकर पाहत. चार वर्षांनी चिपळोणकर यांनी संबंध सोडला. जावजी दादाजी यांनी संस्कृत ग्रंथ छापण्यासाठी 'काव्यमाला' मासिक (१८८६) काढल्यामुळे इ. १८८७ पासून संस्कृत भाग बंद केला व ऐतिहासिक मजकूर वाढविला". या मासिकात सुमारे २२ बखरी, ५०१ पत्रे, २० च्यावर संस्कृत प्रकरणे आणि अनेक मराठी काव्ये प्रसिद्ध झाली. पुढे वर्गणी वेळेवर येईनाशी झाली व अंक मागासत गेले. शेवटचा अंक डिसेंबर १८८९ मध्ये निघाला. त्या अंकात — 'संग्रहाच्या कामाचा आजच्या अंकाने शेवट करीत आहो' असे जाहीर केले.

[ डेक्कॉं ]

वर्षे १ ते ११ – अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि). जानेवारी १८७८ ते डिसेंबर १८८८. (अकरा वर्षे)

## काव्येंदुशेखर

**मासिक** : संपादक – (कर्ते) सखाराम बाळकृष्ण सरनाईक. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – ज्ञानप्रकाश (शिळाछा.) पुणे. वा. व. रु. २ आगाऊ, रु. ३ मागाहून. अंकात २४ पृष्ठे. १०×६·८. प्रथमांक – चैत्र शु. १ श. १८०८.

**उद्देश** – प्राचीन कवींची कविता, नाटक इ.

**स्वरूप** – वासुदेवरहस्य, योगवासिष्ठ रंगनाथी टीकेसह, शिवलीलामृत, महाभारत ओवीबद्ध, श्रीकृष्णविजय, पहिल्या बाजीरावाचे संगीत चरित्र (नाटक), इ.

**ब्रीदवाक्य** –

(१) प्रायः पुराणगतभावविबोधनार्थं
नाट्येन किं च जनचित्तविनोदनार्थं
काव्येन्दुशेखरमनं खलु देशवाचा
काव्येंदुशेखरमिमं वितनोमि यत्नात् ॥

(२) सर्वां पुराणगतभाव कळावयासी
खाणी सुरम्य उघडी जनरंजनासी
राखावियाधि नमुनी निजदेशवाचे
मयत्न काव्यशशिशेखर नाम याचे ॥

**विशेष माहिती** – सन १८६७ चे २५ व्या आक्टाप्रमाणे पुस्तककर्त्याने सर्व हक्क आपलेकडे ठेविले आहे.

[ दवाखो, मर्म ]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८०८, २.

## कासार

**मासिक** : संपादक – विठ्ठल गणेश रासने. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. २·८. फु. अं. ८४. अंकात २० पृष्ठे. ८·२×५·४. प्रथमांक – मार्गशीर्ष श. १८४३. (डिसेंबर १९२१.)

**उद्देश** – कासार समाजाचे मुखपत्र.

**ब्रीदवाक्य** –

श्रद्धावाल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ।
– भगवद्गीता.

**विशेष माहिती** – संपादक – वर्ष २ व ३ – गणपत भयाजी वेळापुरे (प्रकाशक).

[ मर्म, पुमर्म ]

वर्ष १ – अंक १ मार्गशीर्ष १८४३ (डि १९२१), २ पौ (डि २१), ३ ते १२. डिसेंबर १९२१ ते अक्टोबर १९२२.

वर्ष २ – अंक १ ते १२. नवंबर १९२२ ते अक्टोबर १९२३.

वर्ष ३ – अंक १ नवबर १९२३ ते ४, (५-६) एप्रिल १९२४.

## कासार

**द्वैमासिक** : संपादक – नथु दत्तु कासार, मालेगावकर. प्रकाशक – संपादक, मालेगाव. मुद्रक – कलाप्रकाश छा. वा. व. रु. १. ८×५. प्रथमांक – चैत्र श. १८४७.

**उद्देश** – कासार समाजाच्या उन्नतीस वाहिलेले, समाजोन्नतीप्रीत्यर्थ.

वर्ष १ – अंक १ चैत्र १८४७.

## कासारसंदेश

**मासिक** : संपादक – मारुती गोविंद घोडेकर. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. १·८. फु. अं. ८३. अंकात १२ पृष्ठे ८·३×५·५. प्रथमांक – मार्गशीर्ष शु. १५ श. १८४५.

**स्वरूप** – सामाजिक, धार्मिक व राजकीय विषय.

प्रीद्वाचय

निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या
विनिवृत्तकामाः ।
द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः
पदमव्ययं तत् ॥

— भगवद्गीता.

**विशेष माहिती** — *संपादक* — प्रथम कागार मासिकाचे दुय्यम संपादक होते. ते काम सुटल्यामुळे विचारप्रदर्शनाचे साधन म्हणून हे मासिक सुरू केले.

**वर्ष १** — अंक १ डिसेंबर १९२३, २ जा १९२४, ३ फेब्रुवारी १९२४.

## किसानी व परस्पर साहाय्यकारी समाचार

**मासिक** : प्रकाशक — नागपूर. मुद्रक — देशसेवक छा. नागपूर (वर्ष १९१४). वा. व. रु. १. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ८·७ × ५·७. *प्रथमांक* — एप्रिल १९१२. (पुस्तक-अंक).

**उद्देश** — मध्यप्रदेशातील शेतकीखात्याचे.
**स्वरूप** — मधूनमधून आर्ट पेपरवरील चित्रे, कृषिविभाग व सहकारी विभाग.

**विशेष माहिती** — 'किसानी समाचार' ह्या मासिकाचाच नवा अवतार. पूर्वीची वर्षगणना पुढे चालू वर्ष ९ व १०. इंग्रजी नाव — ॲग्रिकल्चरल ॲण्ड को-ऑपरेटिव्ह गॅझेट. वर्ष १० नंतर वर्ष ११ न मोजता पुनः १९१४ पासून पुस्तक १ अशीच गणना सुरू केली.

[ गोरक्षणसभानागपूर ]

(वर्ष १ ते वर्ष ९ अंक ३ करिता पुढे 'किसानी समाचार' पाहा).

**वर्ष ९** — अंक ४ ते १२. एप्रिल ते डिसेंबर १९१२.

**वर्ष १०** — अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१३.

**वर्ष १** (नवा अनुक्रम) — अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१४.

## किसानी समाचार

**मासिक** : संपादक — (१ वर्ष २ महाजन, वर्ष ७ पासून कुर्तु). प्रकाशक — नागपूर. वा. व. रु. १. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ८·७ × ५·७. प्रथमांक — (जानेवारी १९०४). शेवटचा अंक — मार्च १९१२. (पुस्तक-अंक)

**उद्देश** — मध्यप्रदेशातील शेतकी खात्याचे.
**स्वरूप** — मधूनमधून आर्टपेपरवरील चित्रे. पुढील महिन्यांची बागाची कामे, हवा व पाणी यासंबंधी हालहवाल.

**विशेष माहिती** — इंग्रजी मथळा - ॲग्रिकल्चरल गॅझेट. मध्यप्रदेशातील शेतकी खात्याच्या हुकुमावरून प्रसिद्ध केले असे. वर्ष ९ अंक ४ पासून नाव बदलून 'किसानी व परस्परसाहाय्यकारी समाचार' असे केले.

[ गोरक्षणसभानागपूर ]

**वर्ष १ ते ८** — अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि) (जानेवारी १९०४) ते डिसेंबर १९११ (आठ वर्षे).

**वर्ष ९** — अंक १ ते ३ जानेवारी ते मार्च, १९१२.

## किर्लोस्कर

**मासिक** : संपादक — शं. वा. किर्लोस्कर. प्रकाशक — संपादक, किर्लोस्करवाडी. मुद्रक - किर्लोस्करवाडी प्रेस. वा. व. रु. २. फु. अं. ८३. अंकात ३२ - ६४ पृष्ठे. १०·२ × ७·८. प्रथमांक मे १९२९ पुढे चालू १९६७. (वर्ष - अंक, शिवाय सलग अनुक्रमांक वर्ष ११ पासून)

**उद्देश** — कारखान्याच्या सेवेबरोबरच उत्कृष्ट समाजसेवा — उद्योग, उत्कर्ष व उत्साह या तत्त्वाचा प्रसार करणे हे मुख्य ध्येय. म्हणून पूर्वीच्या संकुचित धोरणाला अनुसरून ठेविलेले नाव बदलले.

**विशेष माहिती** — पूर्वीचे 'किर्लोस्कर खबर' [ पाहा ]. *वा. वर्गणी* - वर्ष १८ रु. २८८. *फु. अं.* वर्ष २० - ८४, वर्ष २२ - ८५; वर्ष २४ - ८८; वर्ष २५ - ८१०.

[ सुरुवात ]

वर्ष ९ – अंक ( १ ते ९ ) 'किर्लोस्कर खबर' पाहा, १० ते १२. मे ते जुलै १९२९. अंक ११ महिला अंक.

वर्ष १० – अंक १ ते १२. आगस्ट १९२९ ते जुलै १९३०. अंक ४ दिवाळी अंक.

वर्ष ११ – अंक १ ते १२. ( सलग क्रमांक १२७ ते १३८ ). आगस्ट १९३० ते जुलै १९३१. अंक १ खास दुकानदारी अंक. अंक ४ - दिवाळी अंक.

वर्ष १२ – अंक १३९ ते १५०. आगस्ट १९३१ ते जुलै १९३२.

वर्ष १३ – अंक १५१ ते १६२. आगस्ट १९३२ ते जुलै १९३३.

वर्ष १४ – अंक १६३ ते १७४. आगस्ट १९३३ ते जुलै १९३४. अंक १६५ दिवाळी अंक.

वर्ष १५ – अंक १७५ ते १८६. आगस्ट १९३४ ते जुलै १९३५.

वर्ष १६ – अंक १८७ ते १९८. आगस्ट १९३५ ते जुलै १९३६. अंक १९० दिवाळी अंक.

वर्ष १७ – अंक १९९ ते २१०. आगस्ट १९३६ ते जुलै १९३७. अंक २०२ दिवाळी अंक.

वर्ष १८ – अंक २११ ते २२२. आगस्ट १९३७ ते जुलै १९३८. अंक २१४ दिवाळी अंक.

वर्ष १९ – अंक २२३ ते २३४. आगस्ट १९३८ ते जुलै १९३९. अंक २२५ दिवाळी अंक.

वर्ष २० – अंक २३५ ते २४६. आगस्ट १९३९ ते जुलै १९४०. अंक २३८ दिवाळी अंक.

वर्ष २१ – अंक २४७ ते २५८. आगस्ट १९४० ते जुलै १९४१. अंक २५० दिवाळी अंक.

वर्ष २२ – अंक २५९ ते २७०. आगस्ट १९४१ ते जुलै १९४२. अंक २६१ दिवाळी अंक.

वर्ष २३ – अंक २७१, २७२, (२७३ - ४), २७५ ते २८२. आगस्ट १९४२ ते जुलै १९४३. अंक (२७३ - ४) दिवाळी अंक.

वर्ष २४ – अंक २८३ ते २९४. आगस्ट १९४३ ते जुलै १९४४. अंक २८६ दिवाळी अंक.

वर्ष २५ – अंक २९५ ते ३०६. आगस्ट १९४४ ते जुलै १९४५. अंक २९७ दिवाळी अंक. अंक ३०० रौप्य-महोत्सव विशेषांक.

वर्ष २६ – अंक ३०७ ते ३१८. आगस्ट १९४५ ते जुलै १९४६. अंक ( ३०९ - १० ) दिवाळी अंक.

वर्ष २७ – अंक ३१९ ते ३३०. आगस्ट १९४६ ते जुलै १९४७.

वर्ष २८ – अंक ३३१ ते ३४२. आगस्ट १९४७ ते जुलै १९४८. अंक ३३१ – वर्षारंभांक ( डॉक्टर - लेखक विशेषांक ); अंक ३३२ – १५ आगस्ट स्वातंत्र्यदिन विशेषांक; अंक ३३५ – दिवाळी अंक; एप्रिल १९४८ ( क्र. ३४० ) चा अंक संपामुळे निघाला नाही. तो क्रमांक पुढच्या मे च्या अंकाला देऊन गणना. अंक ३४२ – काश्मीर विशेषांक.

वर्ष २९ – अंक ३४३ ते ३५४. आगस्ट १९४८ ते जुलै १९४९. अंक ३४३ वर्षारंभ अंक; अंक ३४४ संरक्षण खास अंक.

वर्ष ३० – अंक ३५५ ते ३६६. आगस्ट १९४९ ते जुलै १९५०. अंक ३५७ दिवाळी अंक.

वर्ष ३१ – अंक ३६७ ते ३७१. आगस्ट ते डिसेंबर १९५०. अंक ३६७ वर्षारंभ अंक; अंक ३७० नवंबर दिवाळी अंक.

## किर्लोस्कर खबर

**मासिक**: संपादक – शं. वा. किर्लोस्कर. सहसंपादक – ( वर्ष १ अंक १६ ) ना. ह. आपटे. प्रकाशक – संपादक, किर्लोस्करवाडी.

मुद्रक – किर्लोस्करवाडी प्रेस. वा. प. रु. १. पु. अं. ८२. अंकात १६-२४ पृष्ठे. ९·४ × ६·३. प्रथमांक – (अंक ६) आगस्ट १९२०. शेवटच्या अंक – एप्रिल १९२९.

उद्देश – उद्योग, उत्साह व आत्मोन्नती याचे मासिक. कालनिक गोष्टी देणार नाहीत. (कारखान्याचे) ग्राहक व कारखाना यामध्ये निकट स्नेह उत्पन्न व्हावा व त्यांत सुधारलेल्या औतांच्या आउतांबद्दल खरी माहिती व फायदे कळावे. स्वरूप – सचित्र. व्यंग्यचित्रे इ. वाद, बातमी, कविता. कारखान्याचे, स्त्रियांचे, उत्कर्षमंडळाचे पान. उत्साहाचे झरे.

*विशेष माहिती* – *आकार* – वर्ष ४ अंक ७ – ९·२ × ७; वर्ष ८ – १०·४ × ८·२. *वा. वर्गणी* – वर्ष ५ रु. १८४. पूर्वेतिहास असा – नमुना अंक सप्टेंबर १९१६; वर्षगणनेच्या पूर्वीचे (छोटेखानी वर्तमानपत्र) अंक १ जानेवारी १९२० + अ. २ ते ५ एप्रिल, मे, जून, जुलै १९२०. पृष्ठे अंक १ ची २, पुढे ४ झाली. ५ व्या अंकाला मलपृष्ठ घालण्याची व्यवस्था. अंक ६ पासून नियमित मासिकाचे पहिले वर्ष चालू. तरी सलग अंकगणनेत पहिले ५ अंक धरलेले आहेत प्रारंभी पृष्ठसंख्या १६. वर्ष ९ अंक १० पासून नाव बदलून 'किर्लोस्कर' केले. पाहा.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक ६ ते ९, (१०-११), (१२-१३), १४ ते १७. आगस्ट १९२० ते जुलै १९२१.

वर्ष २ – अंक १, २, (३-४), ५ ते १२. आगस्ट १९२१ ते जुलै १९२२. अंक (३-४) दिवाळी अंक.

वर्ष ३ – अंक १ ते १२. आगस्ट १९२२ ते जुलै १९२३. अंक ३ दिवाळी अंक.

वर्ष ४ – अंक १ ते १२. आगस्ट १९२३ ते जुलै १९२४. अंक ४ दिवाळी अंक, अंक ८ उत्सव अंक.

वर्ष ५ – अंक १, २, (३ ४), ५ ते १२. आगस्ट १९२४ ते जुलै १९२५.

वर्ष ६ – अंक १ ते १२. आगस्ट १९२५ ते जुलै १९२६.

वर्ष ७ – अंक १ ते १२. आगस्ट १९२६ ते जुलै १९२७. अंक १ स्वदेशी अंक; अंक ४ उत्साह अंक; अंक १० शिवजन्मोत्सव अंक.

वर्ष ८ – अंक १ ते १२. आगस्ट १९२७ ते जुलै १९२८. अंक ४ दिवाळी अंक; अंक १० (१०० वा) खास महोत्सव अंक.

वर्ष ९ – अंक १ ते ९. आगस्ट १९२८ ते एप्रिल १९२९.

## किशोर

**मासिक** : संपादक – वै. अनंत कुळकर्णी. सहसंपादक – (सहायक) विष्णु विनायक बोकील. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. ५. फु. अं. ८८. अंकात ५०-६० पृष्ठे. ७·२ × ४·८. वर्ष १ अं. ९ चे पुढे ९·६ × ७·२. प्रथमांक – मे १९४८.

**उद्देश** – मुलांसाठी.

**विशेष माहिती** – मासिक सुरु होण्यापूर्वी 'किशोर'चा दीपावली विशेषांक (१९४७) निघाला होता. वा. वर्गणी – वर्ष ३ रु. ४. फु. अं. ८६

[ मग्रं, कचेरी ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मे १९४८ ते एप्रिल १९४९.

वर्ष २ – अंक १ मे १९४९ ते ६ अ १९४९, + ७ डि १९४९ ते ११ एप्रिल १९५०. अंक १ खास वर्षारंभ अंक, अंक ६ दिवाळी अंक.

वर्ष ३ – अंक १ मे १९५० ते ८ डिसेंबर १९५०.

## कीर्तन

**मासिक** : संपादक – कृष्णाजी नारायण आठल्ये. प्रकाशक – यशवंतबुवा दिनकर ब्रह्मनाळ-

वर, मुंबई. मुद्रक - कर्नाटक प्रिं प्रेस, मुंबई. वा. व. रु. ४. फु अ. ८८. अकात ४८ पृष्ठे. ९'६ × ६'४. प्रथमाक – अश्विन श १८४१.

उद्देश – धर्म, वक्तृत्व व कीर्तन याना वाहिलेले. धर्म-नीतिप्रसार करणाऱ्याना घरबसल्या अभ्याससाधने पुरविणे. परस्पराच्या उत्कर्षाबद्दल मत्सरभाव काढून टाकला म्हणजे धर्मभेद व जातिभेद समाजोन्नतीच्या आड येत नाहीत या धोरणास अनुसरून सनातन धर्मनीतिप्रसारार्थ जुना व नवा अशा दोन्ही काळाना अनुरूप असे प्रपच व परमार्थ याचे रहस्य लोकप्रिय रीतीने सागणे. स्वरूप – निबध, स्फुटलेख, पूर्वरग, आख्यान, भजनसापदायी कीर्तन, प्राचीन मदिरे व मठाचा जीर्णोद्धार, संगीत, सुभाषिते, काव्यचमत्कृती, मठनिरीक्षणे इत्यादी.

ब्रीदवाक्य –

सतत कीर्तयन्तो मा यतन्तश्च दृढव्रता ।
नमस्यन्तश्च मा भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥

विशेष माहिती – ' मुंबई येथील श्रीहरिकीर्तनाल्यामार्फत प्रसिद्ध होणारे '. संपादक – वर्ष ३ अक १ पासून ग. वि केतकर.

[ मग्र, पुमग्र ]

वर्ष १ – अक १ ते ५, ( ६ - ७ ), ८ ते १३ अश्विन १८४१ ते भाद्रपद १८४२. अक १० अधिक आषाढ जादा अक, अक १२ श्रावण लो टिळक अक

वर्ष २ - १ ते १२. अश्विन १८४२ ते भाद्रपद १८४३.

वर्ष ३ – अक १ अश्विन १८४३.

## कीर्तन ( आख्यान )

द्वैमासिक : संपादक – देवीदास लक्ष्मण महाजन प्रकाशक – गणेश अनंत सराफ. वा. व. रु २८८ अकात ३६ पृष्ठे ८'४ × ५ ४. प्रथमाक – ( श १८५५–५६ ? )

वर्ष १ – अक . . ४ आषाढ १८५६.

## कुंजविहारी

मासिक : संपादक – सीताराम दत्तात्रय आजगावकर. प्रकाशक – संपादक, शांतवाडी. वा. व. रु. २. फु. अ. ८३. अकात ३६ पृष्ठे. ८'४ × ५'३. प्रथमाक – ( मे १९२५ ).

उद्देश – विद्यार्थ्यांचे मासिक. स्वरूप – संकीर्ण वाङ्मय, मनोरजक गोष्टी, गोड कविता, विनोदी लेख, चटकदार चरित्रे, हास्यकारक चुटके, विविध विषयाची सर्वोपयोगी व समाज माहिती.

विशेष माहिती – आकार – वर्ष १ अक ८ – ८'४ × ५ ३, अक ( ११ - १२ )- ७'२ × ४'८, वर्ष ३ – ६'८ × ४'७.

[ मुमग्र, पुमग्र ]

वर्ष १ – अंक ( १ ते ७ ), ८, ( ९ - १० ), ( ११ - १२ ). ( मे १९२५ ) ते एप्रिल १९२६ +

वर्ष २ – अक १ ते ९, ( १० - ११ ), १२. आगस्ट १९२६ ते जुलै १९२७ +

वर्ष ३ – अक १ जा १९२८, ( २ - ३ ), . . ५ आ ते ७ अ १९२८ + ८ जा १९२९ – अक ५ बद्दल श. वि. साठे लिखित ' मजूषा ' मोफत दिले

वर्ष ४ – अक + . , २ फे ३० ते ९ सप्टेंबर १९३०.

## कुटुंब करमणूक

मासिक : संपादक – ( सरकारी नाद ) गोविंद मोरोबा कार्लेकर. प्रकाशक – स्वदेशहित वर्धक मडळी, मुंबई मुद्रक – जगदीश्वर छापखाना ( शिळाछाप ) वा. व. रु ३८६ आगाऊ फु अ ८६. अकात १६ पृष्ठे. १०'७ × ७ ६ प्रथमाक – ( फेब्रुवारी १८८३ ) ( पुस्तक – अक )

उद्देश – विश्रांतीच्या वेळी मनरंजन स्वरूप – सचित्र मनोरजक चुटके, सुरस वार्दबऱ्या,

नाटके, प्रहसने, संवाद, लहान लहान गोष्टी, आख्यायिका, कविता, बोधपर लेख, सुभाषिते, कूट प्रश्न इ.

विशेष माहिती – कूटप्रश्न – " यांतील प्रश्न सोडविणाराला बक्षीस मिळते. "

[ मसं ]

वर्ष १ – अंक ....३ ए १८८३, (४-५), ६ जु, ७ ऑ, ८ स, ९ अक्टोबर १८८३.

## कुटुंबमित्र

मासिक : संपादक – ( सरकारी नोंद ) रे. पी. ब्लेक. प्रकाशक – बॉबे ट्रॅक्ट अँड बुक सोसायटी, मुंबई. मुद्रक – निर्णयसागर छा. मुंबई. वा. व. रु. १८८. पृ. अ. ८२. अंकात २४ पृष्ठे. ९·८ × ६·६. प्रथमांक – जानेवारी १८८४.

उद्देश – मासिक पुस्तकाचा प्रसार व्हावा व मराठी वाचकांस नाना विषयाचे ज्ञान व्हावे. ( ख्रिस्ती धर्मविषयक ). स्वरूप – प्रसिद्ध स्त्री-पुरुषाची चरित्रे, प्राचीन लोकांच्या रीतिभाती, सांप्रतकाळच्या लोकांचे रिवाज, पदार्थविज्ञान-शास्त्र, शाळांत शाळाँत उपयोगी पडण्यासारखे वाचनपाठ, गोष्टी, चुटके.

[ मुमम, मसं ]

वर्ष १ ते ३ – अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि ) जानेवारी १८८४ ते डिसेंबर १८८६ ( तीन वर्षे )

## कुटुंबशिक्षक

मासिक : संपादक – ( सरकारी नोंद ) अनंत वामन बर्वे. प्रकाशक – नारायण रामचंद्र सोहनी, मुंबई. वा व रु २ अंकात २० पृष्ठे प्रथमांक – कार्तिक शु १८११

उद्देश – कुटुंबातील लहान थोर सर्व मनुष्यांना उपदेश, करमणूक आणि उपयुक्त माहिती याच्या-द्वारा सुशिक्षण देणे. बोधपर सामाजिक विषयाचे मा. पु. स्वरूप – सचित्र. चरित्रे, उपदेशपर चुटके, निबंध, पर्तीव्य, कविता, जुने धंदे, परस्परव्यवहार, चातुर्य, मनोरंजन, लोकवार्ता, खेळ.

[ ग्रंसम, दवाखो ]

वर्ष १ – अंक १ ते १३. कार्तिक १८११ ते अश्विन १८१२ ( अधिक भाद्रपद धरून तेरा अंक ).

वर्ष २ – अंक १ कार्तिक १८१२ ते ६ चैत्र १८१३.

## कुंडली वर्णन

पाक्षिक : संपादक – गणेश प्रभाकर दीक्षित ( होराभूषण ), नारायण गणेश दीक्षित. प्रकाशक – ग. प्र. दीक्षित, पुणे. वा. व. रु. २८८. पृ. अं. ८२. अंकात १६ - २४ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – एप्रिल १९३७.

स्वरूप – साप्ताहिक तारीखवार व व्यापारी भविष्य, पंचांग व स्पष्टग्रह, कुंडलीवर्णन.

ब्रीदवाक्य –

अर्थांगने सहाय. पुरुषाणामारदर्णवे पोत ।
यात्रासमये मन्त्री जातकमसहाय नास्त्यपर ॥

यथा शिखा मयूराणां नागानां मणयो यथा ।
तद्वद्वेदांगशास्त्राणां ज्योतिषं मूर्धनि स्थितम् ॥

विशेष माहिती – १३ मार्च १९३५ पासून दोन वर्षे साप्ताहिक होते. पाक्षिक वर्ष ३ पासून.

[ मुनमं, वर्तक पुणे ]

वर्ष ३ – अंक १ ते २४ ( प्रतिमास दि १ व १५ ). एप्रिल १९३७ ते मार्च १९३८ अंक ( १४ - १५ ) वर्षभविष्य खास अंक.

वर्ष ४ – अंक १ - १ एप्रिल १९३८ ते ९ १ ऑगस्ट १९३८.

## कुंडली विज्ञान

**मासिक / दाशाहिक/पाक्षिक** : संपादक — विष्णु गोपाळ नवाथे. प्रकाशक — महाड. मुद्रक — विराजवैभव छा. वाई; १९०५ पासून 'मोदवृत्त' प्रेस, वाई. वा. व. रु. १॥३, १९०५ पासून रु.१॥८. फु. अंक ॥२॥. अंकात २४ पृष्ठे. ७·३ × ४·४. प्रथमांक — कार्तिक शु. १८२२ (नवंबर १९००). (पुस्तक - अंक)

**स्वरूप** – फलज्योतिष, कुंडलीसंग्रहालय, प्रश्न, उत्तरे, पत्रव्यवहार, विविध योग, चरित्रात्मक कुंडलीसंग्रह, ज्योतिष ग्रंथांची भाषांतरे, विविध चर्चा वगैरे.

**ब्रीदवाक्य** –

कालात्मा दिनकृन्मनस्तु हिमगुः सत्त्वं कुजो ज्ञो वचः
जीवो ज्ञानसुखं सितश्च मदनो दुःखं दिनेशात्मजः।
राजानौ रविशीतगू क्षितिसुतो नेता कुमारो बुधः
सूरिर्दानवपूजितश्च सचिवौ प्रेष्यः सहस्रांशुजः ॥१॥
— बृ० जा०

**विशेष माहिती** – *आकार* – पु. २ अंक २ नंतर ८·८ × ५·७. *ब्रीदवाक्य* – पुस्तक ३ व ४ मध्ये मलपृष्ठावर 'कालात्मा...' व शिवाय आरंभपृष्ठावर 'यदा किंचिज्ज्ञोऽहं द्विप इव मदांधः समभवं।...' इत्यादी भर्तृहरीचा श्लोक. पुस्तक १० अंक ५ पासून आरंभपृष्ठावर 'ये नाम केचि-दिह नः प्रथयन्त्यवज्ञाम्।...' इत्यादी भवभूतीचा श्लोक (काही अंक). कालनिर्देश – आरंभपृष्ठावर शक व मलपृष्ठावर सन. दाशाहिक गणना वा पाक्षिक गणना १, १०, २० आणि १, १५ अशा तारखांच्या अनुरोधाने करून आरंभपृष्ठावर त्यांची तिथी देण्यात येई.

[वर्तक, मग्रं]

मासिक

वर्ष १ – अंक १ ते १२. कार्तिक १८२२ ते अश्विन १८२३. (अंक १० अधिक श्रावण; अंक ११ श्रावण - भाद्रपद).
वर्ष २ – अंक १ ते २, (३ - ४), (५ - ६), (७ - ८), (९ - १०), (११ - १२). कार्तिक १८२३ ते अश्विन १८२४.
वर्ष ३ – अंक..., २ ते ४, ..., ७ ते १०, (११ - १२). कार्तिक १८२४ ते अश्विन १८२५.
वर्ष ४ – अंक १ ते ३, (४ - ५ - ६), ७ ते १०, (११ - १२). कार्तिक १८२५ ते अश्विन १८२६.
वर्ष ६ – अंक + १ ते ३, (४ - ५), ६ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०६. +
वर्ष ७ – दाशाहिक अंक ..., ६, ७, ..., १३ ते २४, (२५ - २६), ......, २८. (मार्च ते डिसेंबर १९०७).
वर्ष ८ – अंक १ ते ८, (९ - १०), ११ ते १६, ..., १८ ते २४, ..., २७, (२८ - २९), ३०, ..., ३२, ३३. जानेवारी ते डिसेंबर १९०८.
वर्ष ९ दाशाहिक. नंतर पाक्षिक – अंक १ ते ७, (८-९), १० ते २० जानेवारी ते डिसेंबर १९०८.
वर्ष १० पाक्षिक – अंक १ ते २१. जानेवारी ते डिसेंबर १९१०. यात 'जातक पारिजात'.
वर्ष ११ – अंक १ ते २१. जानेवारी ते डिसेंबर १९११.
वर्ष १२ – अंक १ ते १५, (१६ - १७), १८. जानेवारी ते डिसेंबर १९१२ (अनियमित)
वर्ष १३ – अंक १ ते ६, (७ - ८), (९ - १०)....जानेवारी ते १५ मे १९१३ (अनियमित)
वर्ष १४ मासिक – अंक + १ ते १२. डिसेंबर १९२५ ते नवंबर १९२६.
वर्ष १५ – अंक १ ते ३...डिसेंबर १९२६ ते फे १९२७...

## कुणबी

**मासिक** : संपादक – भाऊ गोरख पंडित. प्रकाशक – लोणखेडे (ता. शहादे, जि. धुळे). मुद्रक – द. गो. खडेकर, धनंजय प्रेस, रावापूर. वा. व. रु. १. फु. अं. ॥३. अंकात सरासरी २४ पृष्ठे. ८·५ × ५·४. प्रथमांक – नवंबर १९०६.

**उद्देश** – बहुसंख्याकांचा धंदा असूनही शेतीत सुधारणा न होता त्यावर नव्या यांत्रिक शोधांमुळे जुने हस्तव्यवसाय बुडाल्याने अधिकच भार वाढत आहे. तेव्हा सरकारची वाट न पाहता आपली स्थिती आपणच सुधारण्याचा शास्त्रीय मार्ग सोप्या भाषेत शेतकरी बंधूंस दाखविणे. **स्वरूप** – शेतीबद्दलच्या परदेशातील नव्या व स्वदेशातील जुन्या लाभदायक शोधांची माहिती देऊन रोचकतेकरिता कादंबरी, कथा, धार्मिक गोष्टी, चरित्रे, कविता, इतिहास इ. करमणुकीचे विषय. उपयुक्त वनस्पती, वेचे व वर्तमाने.

**ब्रीदवाक्य** –

ॐ श्री आर्यभू जयति ।

**विशेष माहिती** – वर्ष १ अंक १ मलपृष्ठ ३ वर जाहीर नोटीस : " आम्ही कुणबी मासीक पुस्तकास मृत्युफंड जोडिला आहे." इच्छा असेल त्यांनी ८८ जास्त वर्गणीशिवाय द्यावे. जोड अंकात प्रत्येक अंक स्वतंत्र आरंभपृष्ठाचा, फक्त एकत्र बांधणी.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ न १९०६ पृ. २४, (२ - ३) डि १९०६ - जा १९०७ पृ. ३२, (४ - ५) फे - मा १९०७ पृ. २४.

## कुमार

**मासिक** : संपादक – सीताराम नरसिंह पटवर्धन. प्रकाशक – संपादक, पनवेल. बा. व. रु. २. फु. अं. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ९·८ X ७·२. प्रथमांक – आगस्ट १९३५.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ आगस्ट १९३५.

## कुमार

**मासिक** : संपादक – सीताराम नरसिंह पटवर्धन. प्रकाशक – संपादक, कर्जत. वा.व. रु.२. फु. अं. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ९·७ X ७·२. प्रथमांक – जुलै १९३८.

**उद्देश** – हायस्कूलमधील शिक्षण घेण्याइतक्या प्रौढ मुलांमुलींच्या वैचारिक स्वरूपाच्या सर्व गरजा भागविणे व त्यांना मार्गदर्शन करणे. **स्वरूप** – लेख, कविता, लघुकथा, स्वभावचित्रे, काव्यशास्त्रविनोद, नाटक, कोडी इ.

**ब्रीदवाक्य** –

उत्तिष्ठत जाग्रत प्राप्य वरान्निबोधत ।

[ दवापो, मग्रं ]

वर्ष १ – अंक १ जुलै १९३८.

## कुमार

**मासिक** : संपादक मंडळ – वीरेंद्रभाई अढिया, विमला वार्यगणकर. सहसंपादक – सिंधु जोशी, सुशीला गुजरकर. प्रकाशक – डहाणू. अंकात ३२ पृष्ठे. ९·३ X ७. प्रथमांक – एप्रिल १९४७. पुढे चालू.

**उद्देश** – उगवत्या आशांचे – मध्यवर्ती मराठी कुमार साहित्य मंडळाचे मुखपत्र.

[ नूमवि ]

वर्ष १ – अंक १ ते ६, ( ७-८ ), ९ ते १२. एप्रिल १९४७ ते मार्च १९४८. अंक ( ७ - ८ ) दीपावली अंक.

वर्ष २ – अंक १ ते ३, ( ४ - ५ ), ६, ७, ( ८-९ ), १०, ( ११ - १२ ). एप्रिल १९४८ ते मार्च १९४९. अंक ७ मिशाळ अंक, अंक ( ८ - ९ ) गुजरात - महाराष्ट्र दिवाळी अंक, अंक १० पत्रमित्र अंक. अंक (११ - १२) बापू अंक.

वर्ष ३ – अंक १ ते ५, (६, ७), (८ - ९) ... एप्रिल १९४९ ते न - डि १९४९. अंक ५ स्वातंत्र्य अंक.

वर्ष ४ – अंक ... ५ आगस्ट १९५० सानेगुरुजी अंक.

## कुमारवय

**त्रैमासिक :** संपादक — यशवंत गोपाळ निरगुडे. प्रकाशक — संपादक, (पुणे). वा. व. रु. १०८. फु. अं. ८६. अंकात २४ पृष्ठे. ८·६ × ५·६. प्रथमांक— आगस्ट १९५०.

**उद्देश** — पालक, शिक्षक व युवक नेते यांच्याकरिता. 'कुमारवय उत्कर्ष मंडळा 'च्या ध्येयाचा उच्चार व कार्याचा प्रसार.

**विशेष माहिती** — 'कुमारवय उत्कर्ष मंडळ' या संस्थेचे मुखपत्र.

**वर्ष १** — अंक १ आगस्ट १९५०.

## कुमारसंभव

**मासिक :** प्रकाशक — श्रीराम नारायण चितळे व मंडळी, मुंबई. मुद्रक — फ्यामिली प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. रु. २. फु. अं. ८४. अंकात २४ पृष्ठे. ८·३ × ५·४. प्रथमांक — एप्रिल १८८६.

**उद्देश** — (कुमारसंभवाचे समूळ भाषांतर).

**ब्रीदवाक्य** —

अलौकिकोल्लिखसमर्पणेन निदग्धचेतः कषपट्टिकासु ।
परीक्षितं काव्यसुवर्णमेतल्लोकस्य कण्ठाभरणत्वमेतु ॥
— विक्रमाङ्कदेवचरिते बिल्हणः

**विशेष माहिती** — पंचम सर्ग समाप्त. पुढील भाग 'काव्यार्थप्रकाशा 'त येईल असे निवेदन. [पाहा 'काव्यार्थप्रकाश ' मुंबई जुलै १८८४] लोकाश्रय नाही म्हणून एक वर्षाने बंद केले.

[मग्रं, राजवाडेसम]

**वर्ष १** — अंक १ ते १२. एप्रिल १८८६ ते मार्च १८८७. पृ. २८८.

## कुंभावत-क्षत्रिय-मित्र आणि शिल्पकला-दर्पण

**मासिक :** संपादक — रामचंद्र नारायण सातारकर माळवाळ. प्रकाशक — संपादक, पुणे. वा. व. रु. ३. फु. अं. ८४. ९·५ × ६·५. प्रथमांक — चैत्र शक १८४१.

**उद्देश** — कुंभावत क्षत्रिय (प्रचलित नाव 'परदेशी गवंडी व नाईक') या समाजाचे स्वरूप — समाजात विद्यावृद्धी कशी करता येईल, शांतिबाधराची माहिती, समाजातील चालीरीतींची चिकित्सा, चालू वर्तमान (जननमरण), कर्मणुकीचे लेख.

**ब्रीदवाक्य** —

धर्माय यशसेऽर्थाय कामाय स्वजनाय च ।
पंचधा विभजन्वित्तमिहमुत्र च मोदते ॥
— भागवत ८।१९।

[मग्रं]

**वर्ष १** — अंक १ चैत्र १८४१, २ वै, ३ ज्येष्ठ १८४१.

## कृषिकर्मप्रकाश

**मासिक :** प्रकाशक — कोल्हापूर. मुद्रक — विद्याविलास छा. कोल्हापूर. वा. व. रु. २, मागाहून रु. ३. फु. अं. ८४ अंकात ३२ पृष्ठे. ९ × ६·२. प्रथमांक — ज्येष्ठ शके १८२२ (जून १९००).

**ब्रीदवाक्य** —

" उत्तम शेती, मध्यम व्यापार. आणि कनिष्ठ नोकरी. "
" शेती करी त्यास कधी पडेना उपास "

[मुंमग्र]

**वर्ष १** — अंक १ ज्येष्ठ १८२२ ते ५ अश्विन १८८२. पृ १५६.

## केतकी

**मासिक :** प्रकाशक — कृष्णराव नानजी अस्नोडकर, मुंबई. मुद्रक — मंगुळा छापखाना मुंबई. वा. व. रु. ०८. फु. अं. ८२. अंकात २६, १६ पृष्ठे ७·३ × ४·२. प्रथमांक — जानेवारी १९०१.

उद्देश – मनरंजन. " प्लेगने लोकांची मने त्रासलेली आणि महाराष्ट्रभाषेकडे पहुतेकांची कोपदृष्टी वळलेली; परंतु दुःखातसुद्धा मनाचे रंजन करणारे एखादे साधन हवे लागते. " *स्वरूप* – कविता, कथा, एक बंगाली धर्तीवर कादंबरी, देश-वर्णन, आध्यात्मिक, नीतिपर, मनोरंजक व शास्त्रीय चटकदार आणि उपयुक्त लेख, वर्तमान-सार, विवेकानदांगारख्याचे विचार.

ब्रीदवाक्य –

ब्रह्मण्याधाय कर्माणि संगं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा । – गीता.

विशेष माहिती – *वा. वर्गणी* – वर्ष २ पासून रु. ८१२. *आकार* – वर्ष १ अंक ३ पासून ८·४×५·३; वर्ष २ – ९×६·१. मुद्रक – वर्ष १ अंक ११ - शारदाक्रीडन छा. मुंबई. पृष्ठे – वर्ष १ अंक १ - २६, वर्ष १ अंक ३ पासून १६. वर्ष १ मध्ये 'संन्यासी' व वर्ष २ मध्ये 'धवलकुमारी' कादंबरी.

[ मुंमग्रं, मग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२ जानेवारी ते डिसेंबर १९०१.

वर्ष २ – अंक १ ते ८, (९ - १०), ११, १२. जानेवारी ते डिसेंबर १९०२. पृ. १९२.

## केरळकोकिळ

मासिक ( प्रथम खंड ) : संपादक – ( कृष्णाजी नारायण आठल्ये ). प्रकाशक – देवजी भीमजी, केरळमित्र छापखान्याचे मालक. मुद्रक – बाळकृष्ण अनंत गोरे, केरळमित्र छापखाना, मलबार कोस्ट, कोचीन. वा. व. रु. १ आगाऊ, रु. २ मागाहून. अंकात प्रकरणवार १६ पृष्ठे. ८×५·२. प्रथमांक – कार्तिक शुद्ध १ शक १८०८ ( २८ अक्टोबर १८८६ ). शेवटचा अंक फाल्गुन श. १८३१. ( पुस्तक – अंक )

उद्देश – बहुत वर्षे मलबारची सेवा तद्देशीय भाषेत केली. यापुढे महाराष्ट्र भाषेस हातभार लावावा, हिकडील स्थिती महाराष्ट्रीय जनतेपुढे मांडावी. *स्वरूप* – पंचोत्की, खबरबात, . प्रश्न, कविता, उदीम, बुद्धिबळ *प्रश्न*, *कूटप्रश्न* इ., मलबारच्या प्राचीन व अर्वाचीन इतिहास, जाती, चालीरीतींचे वर्णन, महासागरातील चमत्कार, सृष्टीतील लोकोत्तर चमत्कार, गोष्टी, चरित्रे, चुटके, पुस्तक परीक्षा.

ब्रीदवाक्य –

( १ ) *क्वचिज्झिल्लीनादः क्वचिदपुलकाकोलकलहः* ॥
क्वचित्केकारावः क्वचिदपि कपीनां कलकलः ॥
क्वचिद्घोरः फेरुध्वनिरयमहो दैवघटनात् ॥
कथं कारं तारं रसति चकितः कोकिलयुवा ॥ १ ॥
( २ ) काकः कृष्णः पिकः कृष्णः को भेदः पिककाकयोः
वसंतसमये प्राप्ते काकः काकः पिकः पिकः ॥ २ ॥
( ३ ) विधिरेवविशेषगर्हणीयः करट त्वं रट कस्तवा-पराधः ॥ सहकारतरौ चकार यस्ते सहवासं सरलेन कोकिलेन ॥ ३ ॥

विशेष माहिती – *कालनिर्देश* - पहिल्या अंकावर पहिल्याने तुलामास ता. १३, १०६२ माड व नंतर शक व सन. पुढे हा माड वर्षाचा निर्देश निदान दोन वर्षे चालू. *ब्रीदवाक्य* – पुस्तक १ ते ३ व ५ फक्त (१) 'क्वचिज्झिल्लीनादः...' पुस्तक ४ – क्रम ( २ ) ' काकः कृष्णः...' पुस्तक ६ ते १५ फक्त 'विधिरेव....'; पुस्तक १६ पासून पुन्हा 'क्वचित्...' *प्रकाशक* – पुस्तक ५ ते २० जनार्दन महादेव गुर्जर, मालक, प्रोप्रायटर. *संपादक* – पुस्तक २२ पासून मलपृष्ठावर नाव : एडिटर 'महाराष्ट्रभाषाचित्र-मयूर' कृ. ना. आठल्ये. पृष्ठे – पुस्तक ५ नंतर बहुधा २४ व १२ अंकाचे सलग पृष्ठांक. मुद्रक - प्रकाशक – पुस्तक २१ - अं. १ गो. ना. सोहनी; अं. ५ पासून कृ. ना. आठल्ये. पु. २२ प्रकाशक – दत्ताराम हरी घुर्ये, व्यवस्थापक. पुस्तक २ अं. १ मलपृष्ठ २ वर बाजारभाव व सुमारे पाऊण पृष्ठ मलबारी मुळाक्षरे. १९०४ चे १० ते १२ अंक योग्य वेळी छापले नाहीत. एका वर्षाने १० वा अंक छापला. पण ११ व १२ या अंकाऐवजी

एक विष्णुशास्त्री चिपळूणकराचे 'कविपंचक' आणि दुसरे, 'उदार दामोदर नाटक' यापैकी कोणतेही एक वाचकाच्या निवडीप्रमाणे दिले (पुस्तक १९ अंक ९ रंगीत मलपृष्ठ २).

[मुमग्र, मग्र, पुमग्र, जमं]

वर्ष १ — अंक १ ते १२. कार्तिक १८०८ ते अश्विन १८०९.
वर्ष २ — अंक १ ते १३. कार्तिक १८०९ ते अश्विन १८१०. (अंक ६ अधिक चैत्र)
वर्ष ३ — अंक १ ते १२. कार्तिक १८१० ते अश्विन १८११.
वर्ष ४ — अंक १ ते १३. कार्तिक १८११ ते अश्विन १८१२. (अं. ११ अधिक भाद्रपद)
वर्ष ५ ते १० — अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि). जानेवारी १८९१ ते डिसेंबर १८९६. (सहा वर्षे)
वर्ष ११ — अंक १ ते ७. जानेवारी ते जुलै १८९७. (प्लेगमुळे पुढचे अंक निघाले नाहीत).
वर्ष १२ — अंक १ ते ३, (४-६), (७-९), (१०-१२). जानेवारी ते डिसेंबर १८९८. (जोडअंकात प्रत्येक अंकाचे आरंभपृष्ठ वेगळे).
वर्ष १३ ते १५ — अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि) जानेवारी १८९९ ते डिसेंबर १९०१ (तीन वर्षे).
वर्ष १६ — अंक १ ते ७, (८-९), (१०-१२). जानेवारी ते डिसेंबर १९०२.
वर्ष १७ — अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०३.
वर्ष १८ — अंक १ ते ६, (७-९), १०. जानेवारी ते अक्टोबर १९०४. (अंक ११-१२ बद्दल पुस्तक).
वर्ष १९ — अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०५.
वर्ष २० — अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०६ + पुढे एक वर्ष बंद.
वर्ष २१ — अंक १ ते ४, (५-६), ७ ते ९, (१०-१२) जानेवारी ते डिसेंबर १९०८.
वर्ष २२ — अंक १ ते ९, (१०-११), १२. चैत्र ते फाल्गुन १८३१ ('अंक मागासल्यामुळे चालू वर्षापासून मराठी पद्धती' अंक १ मध्ये खास चिठी).

## केरळकोकिळ

**मासिक** ('द्वितीय खंड') : संपादक — कृष्णाजी नारायण आठल्ये. प्रकाशक — अच्युत चिंतामण भट, पुणे. मुद्रक — यशवंत छापखाना, पुणे. वा. व. रु. १॥. फु. अं. ८४. अंकात ४८ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक — जुलै १९११. (वर्ष - अंक)

**उद्देश** — बदलत्या काळाला शोभेसा नव्या-जुन्याचा समन्वय, सामान्यजनांच्या क्षुद्र मतलबी बुद्धीचे निर्मूलन व राष्ट्रीय सद्गुणांची वाढ, राजकीय बाबी वगळून विविधता व वैचित्र्य. स्वरूप — सचित्र, प्रसिद्ध पुरुषांची चरित्रे, प्रवास व स्थलवर्णने, चालू व संपूर्ण गोष्टी, कविता, शास्त्रीय व सामाजिक विषयावर निबंध इ., बक्षिसाचे बुद्धिचलप्रश्न व कूटप्रश्न.

**ब्रीदवाक्य** —

'क्वचिद्झिल्लीनादः...' वगैरे पूर्वोक्त.

**विशेष माहिती** — प्रकाशकांनी मालकी हक्क मिळवून मासिक चालविले. जाहिरातीत लेखकास योग्य मोबदला व प्रसिद्ध केलेल्या लेखावर केरळकोकिळचा हक्क ह्या गोष्टींचा निर्देश. जुने वर्ष २३, २४...असा प्रत्येक अंकाच्या मलपृष्ठावर शिरोभागी निर्देश. वा. वर्गणी — वर्ष ३ अंक ५ ते १२ रु. २॥, फिरून वर्ष ४ ला रु. १॥.

वर्ष १ (जुने २३ वे) — अंक १ ते ९, (१०-११), १२. जुलै १९११ ते जून १९१२.
वर्ष २ (जुने २४ वे) — अंक १ ते ४, (५-६), ७ ते १२. जुलै १९१२ ते जून १९१३.
वर्ष ३ (जुने २५ वे) — अंक १ ते १२. जुलै १९१३ ते जून १९१४.

वर्ष ४ (पुनें २६ ?) – अंक १ ते १२. जुलै १९१४ ते जून १९१५.

## केरळकोकिळ आणि नवे मन्वंतर

मासिक (नवाकार) : संपादक – कृ. ना. आठल्ये आणि नागनाथर. प्रकाशक – मोरेश्वर विश्वनाथ गोग, म्यानेजर हिंद एजन्सी, पुना शॅच. मुद्रा – यशवंत छापखाना, पुणे. वा. व. रु. २॥. पृ. अ. ८४. अवांत छापण म मारणदार ९६ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – जुलै १९१५ (जुने वर्ष २७). (वर्ष - अंक)

उद्देश – पहिल्याच धर्तीवर परंतु थोडी विस्तृत योजना. स्वरूप – चित्र, कविता, लोकोत्तर चमत्कार, संपूर्ण गोष्ट, चरित्रमालिका, कलमबहादराव शेखचल्लीगोष्टी, पुस्तक परीक्षा, कूट प्रश्न व बुद्धि-कलाचा डाव, कादंबरी, कृष्णगीता, स्थलवर्णन, निबंध, चुटके, शास्त्रीय माहिती.

ब्रीदवाक्य –

' कविकिशोलीनाद ... ' वगैरे पूर्वीच.

विशेष माहिती – प्रथमाका कृ. ना. आठल्ये यांच्या उभय मासिकाचा पूर्वेतिहास छापला.

[ पुमसं ]

वर्ष २७ – अंक १ ते १२. जुलै १९१५ ते जून १९१६.

वर्ष २८ – अंक १ जुलै १९१६, २, ३, (४ अ – ५ नवंबर १९१६).

## कोकण शेतीसमाचार

मासिक : प्रकाशक – दत्तात्रय हरि लिमये, रत्नागिरी. वा. व. रु १·४. ८·४ × ५·४. प्रथमांक (नवंबर १९१७ ?).

उद्देश – कोकणातील शेतीविषयक माहिती देणारे. स्वरूप – जन्तुशास्त्र, बागाईत पिके, खते, उपधंदे, सहकारिता, शेतीसमाचार, जनावराची जोपासना, कीड, फळझाडे इ.

ब्रीदवाक्य –

अन्नाद्भवन्ति भूतानि । कृषिरन्नेन कारयेत् ॥

विशेष माहिती – यशवंत गोविंद गुर्जर यांनी १९१७ साली सुरू केलेले.

[ मुम्बादेवीग्रंथागार, ठाणे ]

वर्ष ६ – अंक १ ते १२. नवंबर १९२३ ते अक्टोबर १९२४.

वर्ष ८ – अंक १ ते १२. नवंबर १९२५ ते अक्टोबर १९२६.

## कोल्हापूर समाचार

मासिक : प्रकाशक – करवीर सरकार प्रसिद्धी अधिकारी, कोल्हापूर. ९·६ × ७·४. प्रथमांक – (मे १९४५ ?).

उद्देश – करवीर सरकारची अधिकृत माहिती-पत्रिका.

ब्रीदवाक्य –

ऐक्य–सेवा–त्याग.

[ दवाखो ]

वर्ष ४ – अंक २ जुलै १९४८ ते १० मार्च १९४९. अंक १० विलीनीकरण खास अंक – यात गावांची यादी आहे.

## कोळी समाजसेवक

त्रैमासिक : संपादक – दत्तात्रय दगडू ठाणेकर. प्रकाशक – संपादक, चेंदणी, ठाणे. वा. व. रु. १·४. पृ. अ. ८५. ९·३ × ६·६. प्रथमांक – (मे १९३८).

उद्देश – अखिल कोळी समाज परिषदेचे. स्वरूप – समाज, समाजातील पोटजाती, धंदे, परिषदा, सभा इत्यादींची वृत्ते व लेख, कविता इ.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक २ आगस्ट १९३८, ३ नवंबर १९३८.

## कोष्टी ज्ञानोदय

**मासिक :** संपादक – महादेव छटवाजी डेकाटे. प्रकाशक – नागपूर. मुद्रक – सी. पी. प्रिंटिंग वर्क्स, नागपूर. वा. व. रु. २. फु. अं. ८४. अंकात ३२ पृष्ठे. रॉयल १६ पत्री. प्रथमांक – अक्टोबर १९२०.

**उद्देश –** कोष्टी समाजाच्या उन्नतीकरिता. स्वरूप – सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, नैतिक, बौद्धिक व राष्ट्रीय इ. विषयावर राष्ट्रीय विचाराने भरलेले लेख. लोकमान्यांच्या आयुष्यातील महत्त्वाच्या गोष्टी, पुढाऱ्यांची चरित्रे.

**विशेष माहिती –** संदर्भ – आनंदराव जोशी यांचा लेख – विहंगम मार्च १९३४. नावापुढे ( देशाग ज्ञानोद्धार ) असा निर्देश.

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १९२०.

## कौमुदीमहोत्सवः

**त्रैमासिक :** संपादक – ( विक्रति सही व सर्व हक्क ) रामचंद्र भिकाजी गुंजीकर. प्रकाशक – संपादक व काशीनाथ पांडुरंग परब, मुंबई. मुद्रक – निर्णयसागर छा. मुंबई. वा. व. (वर्ष २) रु. ४. फु. अं. रु. १. अंकात प्रकरणवार सुमारे १०० पृष्ठे. १० × ६·७. प्रथमांक – चैत्र शु. १७९९. ( खण्डवार )

**उद्देश –** वैयाकरणपरंपरा अखंडित ठेवण्यासाठी प्राचीन वैयाकरणाशी देशबांधवांचा स्नेह करून देणे. गुरुवाचून व्याकरणामध्ये सामान्य माणसाला प्रवेश करून देणे. स्वरूप – सिद्धान्तकौमुदीचे विस्तीर्ण महाराष्ट्र विवरण. मूळ पाणिनीसूत्रे, भट्टोजी दीक्षितकृत वृत्ती आणि उदाहरणे, त्यातील शंका, वाद, समाधाने मूळाच्याप्रमाणे देऊन त्यांचे सरळ भाषांतर, स्पष्टीकरण, सबंध निर्देश, परिभाषा – सर्व मिळून पंधरा सोळा खंड होतील.

**विशेष माहिती –** खंड ४ मलपृष्ठ ३ – "प्रत्येक अंकाची वर्गणी वेगळी घेण्याने काम वाढते. याकरिता पुढील सर्व वर्गणी एकदम आगाऊ पाठवावी". खंड ५ मलपृष्ठ ३ – "मागील खंड दोघे ( गुंजीकर व परब मिळून ) भागीने छापवीत होतो. मे १८७८ च्या आरंभापासून भागी मोडून टाकिली. पुढे ग्रंथाचे स्वामित्व रा. मि. गुंजीकर यांचेच आहे." [ प्रथम खंडापासूनच पुनर्मुद्रण-भाषांतरादी सर्व हक्क गुंजीकर यांचेच ]

[ डेकॉ ]

वर्ष १ – खंड १ चैत्र शु. १ श. १७९९, खंड २ आषाढ, खंड ३ अश्विन, खंड ४ पौष १७९९.

वर्ष २ – खंड ५ आषाढ १८००, + खंड ६ श्रावण १८०१.

## खरा प्रकार

**मासिक :** संपादक – ( कर्ते ) व्ही. एन्. भाटये ( पु. १ अंक १२ मलपृष्ठ २ ). प्रकाशक – बॉम्बे न्यू प्रेस, मुंबई. मुद्रक – इंडियन प्रि. प्रेस, गणपत कृष्णाजीचा छा., मुंबई. वा. व. रु. १।८ आगाऊ. फु. अं. ८४. अंकात २४ पृष्ठे. ८·४ × ५·५. प्रथमांक – डिसेंबर १८९०.

**उद्देश –** पाश्चात्त्य विद्यासंस्काराच्या प्रभावामुळे आपले ते वाईट, परकीय ते सर्वथा ग्राह्य असे मानण्याची हौस उत्पन्न झाली आहे, तिचे निरसन व्हावे म्हणून खोट्याचा द्वेष असून नेहमी चाबूक चमकविणारा. स्वरूप – नावास अनुसरून लेख, निबंध, चुटके, खऱ्या गोष्टी, नाटके, चरित्रे, कविता, प्रस्तुत सुधारक टोळीच्या सुधारणेचे वर्णन, सामाजिक विषय, पुस्तकावर टीका, प्रस्तुत स्थितिरीतीसंबंधी झणझणीत लेख, खबरबात, सचित्र ( वर्ष १ अंक ८ पासून एक चित्र ).

**ब्रीदवाक्य –**

दान वित्तादृत वाचः कीर्तिधर्मौ तथायुषः ॥
परोपकरणं कायादसारात्सारमुद्धरेत् ॥ १ ॥

**विशेष माहिती –** इंग्रजी मथळा " ऑर दि ट्रुथ सेअर, ए मंथली मॅगझीन". *बहुतुकसानीची फिर्याद* – वर्ष १ अंक ८ ' अतीच निंद्य गोष्ट'

वर्ष ८ – अंक...माहिती नाही. ( १९३४ – १९३५ ).
वर्ष ९ – अंक + १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३६. अंक १० दिवाळी अंक.
वर्ष १० – + अंक १ ते ४, ५ ते ७, ...., ९, १० – (फेब्रुवारी १९३७) ते नवंबर १९३७. अंक ९ दिवाळी अंक ( अनियमित निर्देश )
वर्ष १३ ते १५ – अंक प्रत्येकी १ ते १२. फेब्रुवारी १९४० ते जानेवारी १९४२ ( तीन वर्षे ). वर्ष १३ व १४ चे अंक ९ दिवाळी अंक. वर्ष १५ अंक १ ख्रिस्तजयंती.
वर्ष १७ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १९४४ ते जानेवारी १९४५.
वर्ष १८ – अंक १, ( २-३ ), ४ ते १२. फेब्रुवारी १९४५ ते जानेवारी १९४६. अंक ११ कुमारसाहित्यसंमेलन ( १९४५ ) अंक.
वर्ष १९ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १९४६ ते जानेवारी १९४७.
वर्ष २० – अंक १ ते १०, ( ११-१२ ). फेब्रुवारी १९४७ ते जानेवारी १९४८. अंक १ ख्रिस्तजयंती, अंक १० प्रवास अंक.
वर्ष २१ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १९४८ ते जानेवारी १९४९.
वर्ष २२ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १९४९ ते जानेवारी १९५०.

## ख्रिस्ती नागरिक

मासिक : संपादक – देवदत्त नारायण टिळक. सहसंपादक – वर्ष ९ ना. दे. टिळक. प्रकाशक – संपादक, नासिक. मुद्रक – नागरिक प्रिं. प्रेस, नासिक. वा. व. रु. ८९. अंकात १६ पृष्ठे. प्रथमांक – १९३३.

स्वरूप – इंग्रजी - मराठी.

ब्रीदवाक्य –

पाणी पोखुनिया तळ्यात वरती लोके जरी काढिले।
पद्माने तरि कृत्य तेच अवघे त्याचे पुरे जाहले।
त्याला गंधर्विकाय सुंदरता ये, कृत्य हे मानुने।
धारि देव करांग्र, हेतु धरणे हे मात्र ही आमुचे॥

विशेष माहिती – इंग्रजी नामरूपांत 'दि ख्रिश्चन सिटिझन.' बंद करावे लागले [ प्रगति वर्ष २ अंक ( ३ - ४ ) मार्च १९४९ अग्रलेख ]

वर्ष ७ – अंक... ११ नवंबर १९३९, १२ डिसेंबर १९३९.
वर्ष ९ – अंक १ जानेवारी १९४१.

## गद्यकथार्णव अथवा चार घटका मौज

मासिक : प्रकाशक – मॅनेजर, विद्यासंवर्धक मंडळी, पुणे. वा. व. रु. ८८, मागाहून ८१२. पु. अं. ८१. अंकात १२ पृष्ठे. ६·७ × ४·१. प्रथमांक – जानेवारी १८९४. ( पुस्तक - अंक )

स्वरूप – कादंबऱ्या, निबंध, ऐतिहासिक गोष्टी.

ब्रीदवाक्य –

'नॉलेज इज पॉवर.'

विशेष माहिती – रा. ब. कल्याण सीताराम चिने, माजी कारभारी मिरज, यांच्या उदार आश्रयाखाली निघणारे.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १८९४, २ फेब्रुवारी १८९४.

## गांधर्व महाविद्यालय

मासिक : संपादक – विष्णु दिगंबर पलुस्कर. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु १. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – मार्च १९१०.

स्वरूप – लेखनपद्धतीवरून लिहिलेल्या गायनवादन पुस्तकाची प्रायः चार पृष्ठे – नोटेशन पद्धती.

ब्रीदवाक्य –

वेदाना सामवेदोऽस्मि।

स्मृतिस्मृत्यादि साहित्यनानाशास्त्रविदोऽपि च।
संगीत ये न जानन्ति ते द्विपादी मृगाः स्मृताः॥

[ मुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मार्च १९१० ते फेब्रुवारी १९११.

वर्ष २ – अंक १ ते १२. मार्च १९११ ते फेब्रुवारी १९१२.

वर्ष ३ – अंक ३ मे १९१२, (४ ते ९), १०, ११ जानेवारी १९१३.

## गायनाब्धिसेतू

मासिक : संपादक – (कर्ते) मौलाबक्ष विनकार, विश्वनाथ रामचंद्र वकील. प्रकाशक – बडोदे. मुद्रक – विद्वद्भूषण छा (शिळा) बडोदे. वा. व. रु. ३, मागाहून रु. ४. आकार १२ पृष्ठे. ९'८ X ६'७. प्रथमांक – एप्रिल १८७०. (पुस्तक - अंक)

वर्ष १ – अंक १ एप्रिल १८७० ते ५ ऑगस्ट १८७०.

## गावकरी

मासिक : संपादक – बाळकृष्ण गोविंद नाडकर्णी. प्रकाशक – मुंबई. आकार ३२ पृष्ठे. ८.४ X ५'४. प्रथमांक – जून १९३४.

उद्देश – शेती, ग्रामसुधारणा, खेड्यांतील राहणी वगैरे विषयासंबंधी.

विशेष माहिती – इंग्रजी मथळा 'दि व्हिलेजर'.

[ आइटे ]

वर्ष १ – अंक १ जून १९३४.

## गिरणी समाचार

मासिक : संपादक – बाजीराव गोविंद पाडगावकर. प्रकाशक – आर. के. तटणीस, मुंबई. फु. अ. ८'/'. आकार ३२ पृष्ठे. ९'८ X ७'२. प्रथमांक – (सप्टेंबर १९३१ ?).

उद्देश – कारखाने, कारखान्यांतील नोकर व इतर श्रमिकवर्ग यासाठी. स्वरूप – सचित्र.

विशेष माहिती – वर्णन वर्ष ४, ५ चे. "गिरणी समाचार" हे नाव पुढे सरकारी यादीत सन १९५० मध्ये आढळते.

[ मर्म ]

वर्ष ४ – अंक...१२ ऑगस्ट १९३५.

वर्ष ५ – अंक १ सप्टेंबर १९३५, ..., ४ डिसेंबर १९३५.

## गीतारहस्यप्रकाश

मासिक : संपादक – (सरकारी नोंद) मोरेश्वर रामचंद्र काळे (मापारकार) प्रकाशक – मुंबई. मुद्रक – आर्यसेवक छापखाना, मुंबई. वा. व. रु. २८४. फु अ. ८४. आकार ३२ पृष्ठे. ८'७ X ५'७. प्रथमांक – चैत्र शु. १८१५.

उद्देश – गीतेचे महाराष्ट्रभाषेत विस्तृत विवरण. स्वरूप – यात मूळ, अन्वय, पदबोध, अर्थ व अनेक टीकाकारांचे अभिप्राय इतक्यांचा समह.

ब्रीदवाक्य –

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दन।
पार्थो वत्स सुधीर्भोक्ता दुग्ध गीतामृत महत्॥

विशेष माहिती – वर्ष २ अंक १० या अंकात पृ २४ व वा व. रु १८१२ अशी नोंद. अंकावर फक्त वर्ष व अंक स्पष्ट कालनिर्देश नाही. वर्ष १ अंक ४ मलपृष्ठ २–"सर्व ग्रंथ अदमासे तीन साडेतीन वर्षांत पुरा होईल", असे निवेदन.

[ मुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ३, ४ आ १८१५, ५, ६, (७-८), ९ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८१५

या मजकुराबद्दल वामन आबाजी मोडक यांजकडून. त्यात दंड व शिक्षा होऊन अंक मागासले. वर्षारंभ वर्ष ५ पासून दोन अंक मागे अक्टोबर मध्ये घेतला. *वा. व.* — दुसऱ्या वर्षापासून रु. १. मुद्रक — वर्ष १ अंक ११ पासून बॉम्बे न्यू प्रेस, मुंबई. वर्ष १ अंक ४ पर्यंत मलपृष्ठ व आरंभ अखेरची काही जाहिरातींची पृष्ठे वगैरे शिळा प्रेसची व पुढेही काही त्याच प्रकारची काही अंकात चालू. या मासिकात १ सजीव यमपुरी, २ अरे पण मीच गुलजार चंद्री, ३ अंतःकरण-तरंगावलि, ४ श्रीमंत थोरले माधवराव पेशवे नाटक, ५ आचारमीमांसा, ६ कादंबरी नाटक, ७ वस्त्राच्छादन, ८ पिरली, इत्यादी प्रकरणे प्रसिद्ध झाली.

[ सरस्वतीमंदिरपणजी, पुमग्रं, दवापो, मग्रं ]

वर्ष १ — अंक १ ते १२. डिसेंबर १८९० ते नवंबर १८९१. पृ. २८८.

वर्ष २ — अंक १, (२-३), ४, (५-६-७-८), (९-१०), (११-१२). डिसेंबर १८९१ ते नवंबर १८९२. पृ. ३०४.

वर्ष ३ — अंक (१-२-३), ४ ते ९, (१०-११-१२). डिसेंबर १८९२ ते नवंबर १८९३.

वर्ष ४ — अंक (१-४), (५-८), (९-१२). डिसेंबर १८९३ ते नवंबर १८९४.

वर्ष ५ — अंक (१-३), (४-७), ८, ९, (१०-११), १२. अक्टोबर १८९४ ते सप्टेंबर १८९५. वर्षारंभ बदलला (!)

वर्ष ६ — अंक (१-२), (३-५), ६, ७, (८-१०), ११, १२. अक्टोबर १८९५ ते सप्टेंबर १८९६.

वर्ष ७ — अंक (१-३), (४-९), (१०-१२). अक्टोबर १८९६ ते सप्टेंबर १८९७.

वर्ष ८ — अंक १ ते ५, (६-१०), ११, १२. अक्टोबर १८९७ ते सप्टेंबर १८९८.

— अंक (१-२), (३-५), (६-. अक्टोबर १८९८ ते मे १८९९.

## खानदेशमित्र

**मासिक :** ( नामांतर ' देशमित्र ' ) प्रकाशक — हरि सखाराम खानोलकर आणि मंडळी, खानापूर ( बेळगाव ). वा. व. रु. १८३ अगाऊ. फु. अं. ८२. अंकात सदरवार व प्रकरणवार २४,३६ पृष्ठे. ७·२ × ४·२. प्रथमांक — मार्च १८९२. ( पुस्तक - अंक )

**स्वरूप** — नाटके, कादंबऱ्या, चातुर्यकथा, अद्‌भुतकथा, कविता, चरित्रे, स्थलवर्णन, विनोदपर चुटके, लोकोत्तर चमत्कार, पुराणसार, सुभाषिते, देशी औषधे, कूट प्रश्न इ.

*ब्रीदवाक्य —*

कस्यापि कोऽप्यतिशयोऽस्ति स तेन लोके ।
ख्यातिं प्रयाति नहि सर्वविदस्तु सर्वे ॥
किं केतकी फलति किं पनसः सपुष्पः।
किं नागवल्ल्यपि च पुष्पफलैरुपेता ॥ १ ॥
यज्जीव्यते क्षणमपि प्रथितं मनुष्यै
र्विज्ञानविक्रमयशोभिरभज्यमानम् ।
तन्नाम जीवितमिह प्रवदन्ति तज्ज्ञाः
काकोऽपि जीवति चिराय बलिं च भुङ्क्ते ॥ २ ॥

**विशेष माहिती** — कालातिक्रम — वर्ष १ अंक ३ व ४ *यामध्ये* ८ महिने खंड; वर्ष १ अंक १० हा तीन महिन्यांचा अंक, पुढील वर्षारंभ जानेवारी करण्यासाठी. *वा. वर्गणी* ,- वर्ष २-८५, फु. अं. ८१. जाने १८९५ पासून वर्गणीदारांचे पाच वर्ग रु. १८१२ पासून ८११ पर्यंत व *विद्यार्थी व अविवाहितांसाठी* एकरकमी १०००,२००० रु. मिळण्याची विम्यासारखी योजना [ संदर्भ मराठी ग्रालपत्रक वर्ष ६ अंक १० मलपृष्ठ ४ वर जाहिरात ] *प्रकाशन-स्थल* — वर्ष १ अंक २ फक्त प्रकारी ( खानदेश ). नंतर खानापूर ( लोकमित्र ). नामांतर — वर्ष ४ अंक ७ ' ( खान ) देशमित्र '; अंक ९ पासून ' देशमित्र '.

[ पुमग्र, ममसवाई, मंडलिकफर्गो ]

वर्ष १ — अंक १ मार्च १८९२, २ ए, ३ मे, + ४ फे १८९३, ५ मा, ६ ए, ७ मे, ८ जू,

९ जु, १० आ-सं-आ १८९३, ११ न, १२ डि ९३. मार्च १८९२ ते डिसेंबर १८९३.

वर्ष २ – अंक १, (२ ते १२). जानेवारी ते डिसेंबर १८९४.

वर्ष ३ – अंक १ ते ३, (४-५), ६ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८९५.

वर्ष ४ – अंक १ ते १०, (११-१२). जानेवारी ते डिसेंबर १८९६. अंक ७ पासून नामांतर 'देशमित्र'.

वर्ष ५ – अंक २ फे १८९७.

## खेळगडी

**मासिक** : संपादक – बाळकृष्ण रावजी पाल्वणकर. प्रकाशक – संपादक, महाड (कुलाबा). मुद्रक – वर्ष ३ मराठा छा. महाड. वा. व. रु. १८१०. अंकात ३२ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – (जानेवारी १९०८ ?).

– उद्देश – बालवयाचे मनोरंजन करून ज्ञान देणारा. स्वरूप – सचित्र. निरनिराळ्या प्राण्यांची माहिती, सोप्या व मनोरंजक कविता, बोधपर गोष्टी, वस्तूंची वर्णने, सुलभ शास्त्रीय ज्ञान, इ. विषय. ऐतिहासिक इ. काही संवादरूपाने. हाफटोन चित्रे.

**विशेष माहिती** – वर्णन वर्ष ५ सुमारचे. *वा. वर्गणी* – वर्ष १ रु १८३. संपादक – बाळकृष्ण अनंत भिडे. [ संदर्भ - केरळकोकिळ, सरस्वती मंदिर ]. मुद्रक – वर्ष ७ - खेळगडी छा. मुंबई. *प्रकाशनस्थळ* – वर्ष ७ मुंबई.

[ मुंमग्रं, मग्रं ]

वर्ष ३ – अंक १ ते ८, (९-१०), (११-१२). जुलै १९१० ते जून १९११.

वर्ष ४ – अंक १ ते १०, (११-१२). जुलै १९११ ते जून १९१२. अंक ६ दिवाळी अंक - दरबार अंक.

वर्ष ५ – अंक १ ते १२. जुलै १९१२ ते जून १९१३. अंक ४ दिवाळी अंक.

वर्ष ६ – अंक १ ते १२. जुलै १९१३ ते जून १९१४. अंक १२ = पुस्तक 'नित्यकृत्ये'.

वर्ष ७ – अंक + १ ते ४ – जानेवारी ते एप्रिल १९१५ –

वर्ष ९ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१८.

वर्ष १० – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१९.

वर्ष ११ – अंक १ ते ६, (७-९), (१०-१२). जानेवारी ते डिसेंबर १९२०.

## खेळगडी

**मासिक** : संपादक – पांडुरंग महादेव भागवत. प्रकाशक – काशीनाथ रावजी पालवणकर, मुंबई. वा. व. रु. २. फु. अं. ८४. ७·२ × ४·८. प्रथमांक – अक्टोबर १९२७.

स्वरूप – सचित्र-पर्णचित्रे.

**विशेष माहिती** – *आकार* – वर्ष ४-९·३ × ७. *वा. वर्गणी* – वर्ष ६ रु. २८४; वर्ष १८ रु. ४, फु. अं. ८६; वर्ष २० रु. ३. *संपादक* – वर्ष ९ - का. रा. पालवणकर (प्रका.), वर्ष २१ अंक ८ – वा. ल. कुलकर्णी, वर्ष २२ अं. ९ – मा. रा. भागवत. *प्रकाशक* – वर्ष २१ के. मि. ढवळे, मुंबई. आकर्षक सजावट वर्ष २० शोवटापासून.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. अक्टोबर १९२७ ते सप्टंबर १९२८.

वर्ष २ – अंक १ ते ८, (९-१०), ११, १२. अक्टोबर १९२८ ते सप्टंबर १९२९.

वर्ष ३ व ४ – अंक प्रत्येकी १ ते १२. अक्टोबर १९२९ ते सप्टंबर १९३१ (दोन वर्षे).

वर्ष ५ – अंक १ ते १२. अक्टोबर १९३१ ते सप्टंबर १९३२. अंक ११ केळकर अंक.

वर्ष ६ व ७ – अंक प्रत्येकी १ ते १२. अक्टोबर १९३२ ते सप्टंबर १९३४ (दोन वर्षे). वर्ष ६ अंक १ दिवाळी अंक.

वर्ष ८ – अंक...मासनिर्देश नाही. ( १९३४ – १९३५ ).
वर्ष ९ – अंक + १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३६. अंक १० दिवाळी अंक.
वर्ष १० – + अंक १ ते ४, ५ ते ७, . .., ९, १० – (फेब्रुवारी १९३७) ते नवंबर १९३७. अंक ९ दिवाळी अंक ( अनियमित निर्देश )
वर्ष १३ ते १५ – अंक प्रत्येकी १ ते १२. फेब्रुवारी १९४० ते जानेवारी १९४२ ( तीन वर्षे ). वर्ष १३ व १४ चे अंक ९ दिवाळी अंक. वर्ष १५ अंक १ बाललेखांक.
वर्ष १७ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १९४४ ते जानेवारी १९४५.
वर्ष १८ – अंक १, ( २-३ ), ४ ते १२. फेब्रुवारी १९४५ ते जानेवारी १९४६. अंक ११ कुमारसाहित्यसमेलन ( १९४५) अंक.
वर्ष १९ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १९४६ ते जानेवारी १९४७.
वर्ष २० – अंक १ ते १०, ( ११-१२). फेब्रुवारी १९४७ ते जानेवारी १९४८. अंक १ बाललेखांक, अंक १० प्रवास अंक.
वर्ष २१ – अंक १ - ते १२. फेब्रुवारी १९४८ ते जानेवारी १९४९.
वर्ष २२ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १९४९ ते जानेवारी १९५०.

## ख्रिस्ती नागरिक

**मासिक** : संपादक – देवदत्त नारायण टिळक. सहसंपादक – वर्ष ९ ना. दे. टिळक प्रकाशक – संपादक, नासिक. मुद्रक – नागरिक प्रिं. प्रेस, नाशिक. वा. व. रु. ०९. अंकात १६ पृष्ठे. प्रथमांक – १९३३.

**स्वरूप** – इंग्रजी मराठी.

**ब्रीदवाक्य** –

पाणी फोडुनिया तळ्यात वरती डोके जरी काढिले।
पद्माने तरि कृत्य तेच अवघे त्याचे पुरे जाहले।
त्याला गंधविकास सुंदरपणा ये, कृत्य हे मानुचे।
सारे देव करील, हेतु धरणे हे मात्र हो आमुचे॥

**विशेष माहिती** – इंग्रजी नामपर्याय 'दि ख्रिश्चन सिटिझन.' बंद करावे लागले [ प्रगति वर्ष २ अंक ( ३ ४ ) मार्च १९४९ अग्रलेख ]
वर्ष ७ – अंक... ११ नवंबर १९३९, १२ डिसेंबर १९३९.
वर्ष ९ – अंक १ जानेवारी १९४१.

## गद्यकथार्णव अथवा चार घटका मौज

**मासिक** : प्रकाशक – मॅनेजर, विद्यासवर्धक मंडळी, पुणे. वा. व. रु. ०८, मागाहून ०१२. फु. अं. ०१. अंकात १२ पृष्ठे. ६·७ × ४·१. प्रथमांक – जानेवारी १८९४. ( पुस्तक - अंक )

**स्वरूप** – कादंबऱ्या, निबंध, ऐतिहासिक गोष्टी.

**ब्रीदवाक्य** –

'नॉलेज इज पॉवर.'

**विशेष माहिती** – रा. ब. कल्याण सीताराम चिने, माजी कारभारी मिरज, यांच्या उदार आश्रयाखाली निघणारे.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १८९४, २ फेब्रुवारी १८९४.

## गांधर्व महाविद्यालय

**मासिक** : संपादक – विष्णु दिगंबर पलुस्कर. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु १. फु. अं. ०२. अंकात १६ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – मार्च १९१०.

**स्वरूप** – लेखनपद्धतीवरून लिहिलेल्या गायनवादन पुस्तकाची प्रायः चार पृष्ठे – नोटेशन पद्धती.

**ब्रीदवाक्य** –

वेदानां सामवेदोऽस्मि।

स्मृतिस्मृत्यादि साहित्यनानाशास्त्रविदोऽपि च ।
संगीतं ये न जानन्ति ते द्विपादे मृगाः स्मृताः ॥

[ मुंमप्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मार्च १९१० ते फेब्रुवारी १९११.
वर्ष २ – अंक १ ते १२. मार्च १९११ ते फेब्रुवारी १९१२.
वर्ष ३ – अंक ३ मे १९१२, (४ ते ९), १०, ११ जानेवारी १९१३.

## गायनाब्धिसेतु

**मासिक :** संपादक – (कर्ते) मौलाबक्ष विनकार, विश्वनाथ रामचंद्र वकील. प्रकाशक – बडोदे. मुद्रक – विद्वद्भूषण छा. (शिळा) बडोदे. वा. व. रु. ३, मागाहून रु. ४. अंकात १२ पृष्ठे. ९·८ X ६·७. प्रथमांक – एप्रिल १८७०. (पुस्तक - अंक)

वर्ष १ – अंक १ एप्रिल १८७० ते ५ आगस्ट १८७०.

## गावकरी

**मासिक :** संपादक – बाळकृष्ण गोविंद नाडकर्णी. प्रकाशक – मुंबई. अंकात ३२ पृष्ठे. ८.४ X ५·४. प्रथमांक – जून १९३४.

**उद्देश** – शेती, ग्रामसुधारणा, खेड्यांतील राहणी वगैरे विषयांसंबंधी.

**विशेष माहिती** – इंग्रजी मथळा ' दि व्हिलेजर '.

[ आड्टे ]

वर्ष १ – अंक १ जून १९३४.

## गिरणी समाचार

**मासिक :** संपादक – बाजीराव गोविंद पाडगावकर. प्रकाशक – आर. के. तटणीस, मुंबई. फु. अं. ८·१". अंकात ३२ पृष्ठे. ९·८ X ७·२. प्रथमांक – (सप्टेंबर १९३१ ?).

**उद्देश** – कारखाने, कारखान्यातील नोकर व इतर श्रमिकवर्ग यांसाठी. स्वरूप - सचित्र.

**विशेष माहिती** – वर्णन वर्ष ४, ५ चे. " गिरणी समाचार " हे नाव पुढे सरकारी यादीत सन १९५० मध्ये आढळते.

[ मग्रं ]

वर्ष ४ – अंक...१२ आगस्ट १९३५.
वर्ष ५ – अंक १ सप्टेंबर १९३५, ..., ४ डिसेंबर १९३५.

## गीतारहस्यप्रकाश

**मासिक :** संपादक – (सरकारी नोंद) मोरेश्वर रामचंद्र काळे ( मापारकर ). प्रकाशक – मुंबई. मुद्रक – आर्यसेवक छापखाना, मुंबई. वा. व. रु. २८४. फु अं. ८४. अंकात ३२ पृष्ठे. ८·७ X ५·७. प्रथमांक – चैत्र श. १८१५.

**उद्देश** – गीतेचे महाराष्ट्रभाषेत विस्तृत विवरण. स्वरूप – यात मूळ, अन्वय, पदबोध, अर्थ व अनेक टीकाकारांचे अभिप्राय इतक्यांचा संग्रह.

**ब्रीदवाक्य** –

सर्वोपनिषदो गावो दोग्धा गोपालनन्दनः ।
पार्थो वत्सः सुधीर्भोक्ता दुग्धं गीतामृतं महत् ॥

**विशेष माहिती** – वर्ष २ अंक १० या अंकात पृ. २४ व वा. व. रु. १८१२ अशी नोंद. अंकावर फक्त वर्ष व अंक. स्पष्ट कालनिर्देश नाही. वर्ष १ अंक ४ मलपृष्ठ २–" सर्व ग्रंथ अदमासे तीन साडेतीन वर्षांत पुरा होईल ", असे निवेदन.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते ३, ४ श्रा १८१५, ५, ६, (७-८), ९ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८१५.

वर्ष २ – अंक १ चैत्र १८१६, २, ३ ज्येष्ठ १८१६, ..., १०...

## (श्री) गुरुदेव

मासिक : संपादक – सुदाम तुकाराम सावरकर (हिंदी), देवदास वन्हाडपांडे (मराठी). प्रकाशक – वामन रामचंद्र लेहोळ्रे, अमरावती. वा. व. रु. ४, वर्ष २ रु. ५, वर्ष ६ रु. ६. फु. अ. ८६. अंकात ३६ पृष्ठे. ९·६ X ७·२. प्रथमांक – चैत्र श. १८६५.

उद्देश – प्रपंच व परमार्थ यांचा समन्वय करून मानवधर्माचा समयोचित पुरस्कार. स्वरूप – मराठी-हिंदी.

ब्रीदवाक्य –

सूर्य उगवूनि आकाशी। जगाची जडनिद्रा निरसी।
'गुरुदेव' उगवूनि चिदाकाशी। जीवा चित्प्रकाशी प्रबोधी॥

विशेष माहिती – *संचालक* – श्रीसंत तुकडोजी महाराज. *संपादक* – वर्ष १ - अं. बा. नवाडे, वर्ष ५ – रामचंद्र कापडी व इतर, वर्ष ६ – मो. सी. चौधरी; वर्ष ७ – पुरुषोत्तमदास देशमुख व इतर.

[मुमग्र, श्रीगुरुदेवप्रकाशनमंडळ अमरावती]

वर्ष १ – अंक १ ते ११. चैत्र ते माघ १८६५.
वर्ष २ – अंक १ ते ३. चैत्र ते ज्येष्ठ १८६६ + ४ ते ८ अश्विन ते माघ १८६६ अंक १ प्रार्थना तत्त्वांक.
वर्ष ३ – अंक १ ते ११. चैत्र ते माघ १८६७.
वर्ष ४ – अंक १ ते ७, (८-९), (१०-११). एप्रिल १९४६ ते फेब्रुवारी १९४७.
वर्ष ५ – अंक १ ते १२. एप्रिल १९४७ ते मार्च १९४८. अंक ४ नागपूरनगर संमेलन विशेषांक.
वर्ष ६ – अंक १, (२-३), ४ ते ९, (१०-११), १२. एप्रिल १९४८ ते मार्च १९४९. अंक ८ सेवाविशेषांक, अंक ९ परिशिष्टांक.
वर्ष ७ – अंक १ ते १२. एप्रिल १९४९ ते मार्च १९५०. अंक ५ स्वातंत्र्य अंक; अंक ९ व्यायाम विशेषांक.
वर्ष ८ – अंक १ ते ३. एप्रिल ते जून १९५०.

## गुरुपुष्य

मासिक : संपादक – माधव गोविंद शिंडे. प्रकाशक – नारायण प्रभाकर वैद्य, पुणे. मुद्रक – श्रीदत्तात्रय छापखाना, पुणे. वा. व. रु. ३. फु. अं. ८३. प्रत्येक अंकात ४८ पृष्ठे. ८·५ X ५·५. प्रथमांक – अक्टोबर १९२६ (विजयादशमी श. १८४८).

उद्देश – साहित्यसुवर्ण स्वभाषाद्वारेच सघन व्हावे, परकीय संस्कृतीची झापड दूर करून स्वसंस्कृतिरक्षणाविषयी दक्षता. स्वरूप – मननामोद, सत्पुरुष नारायण महाराज, देवमामलेदार यांची पत्रे, कागदी बदाम आणि जरदाळू (रंजक मजकूर), परीक्षणे, प्रासंगिक टिपणे, गीतविलास (तांबे-शास्त्री), सिद्धचरित्राभ्यास, कविता इ.

ब्रीदवाक्य –

सत् स्वीकारो हि गौरवम्।

विशेष माहिती – *या वर्गणी* : अंक १ वर व्ही. पी. सह रु. ३, फु अं. ८३; अंक २ वर रु. ३ ट. ख. निराळा, फु. अं. ८५. •दुसऱ्या अंकावर 'महाशिवरात्रीच्या दिवशी' असा प्रकाशनकाळ.

[दवापो]

वर्ष १ – अंक १ विजयादशमी १८४८ (अक्टोबर १९२६), २ प्रकाशन महाशिवरात्र १८४८ (नवबर १९२६).

## गुलजार गुलहौसी

मासिक : संपादक – (पुस्तककर्ता) गोविंद विठ्ठल. प्रकाशक – धी. एन्. म्यानेजर, मुंबई.

वा. व. रु. १८४, मागाहून २८४. फु. अं. ८४. अंकात , ३६ / २४ पृष्ठे. ७·१ × ४·१. प्रथमांक — अश्विन शके १८०५. (पुस्तक - अंक)

**उद्देश** — हिंदुस्थान आळशी गुल्जार गुल हौसी बनला आहे. म्हणून देशाची व समाजाची स्थिती सुधारण्यासाठी — गोष्टी यागून लोकांची नीती सुधारणे. **स्वरूप** — गोष्टी, सुभाषिते, चुटके, चरित्रे, आख्यायिका, सामाजिक स्थिती सुधारण्या-सारखे निबंध. मनोरंजक विषय.

**विशेष माहिती** — (सरकारी नोंद) संपादक - अंक १ - २ गो. वि. शिरसट, अंक ३ - ४ भास्कर नारायण वसईकर. " काही कारणामुळे हा (पहिला) अंक आम्ही ३६ पृष्ठांचा काढला; परंतु पुढील खेपेपासून आमच्या मूळ उद्देशान्वये २४ पृष्ठांचा अंक काढीत जाऊ " यात ' मदनसेन अथवा प्रीतीचा प्रवासी ' ही कादंबरी छापली.

[ मुमग्रं ]

वर्ष १ — अंक १ अश्विन १८०५ ते ११ श्रावण १८०६.

## गृहलक्ष्मी

**मासिक** : संपादक — तारा टिळक, पिरोज आनंदकर. सहसंपादक — वसंत बळवंत मराठे. प्रकाशक — नरहर रामचंद्र जोशी, मुंबई. मुद्रक — रामदास प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. रु. ३. फु. अ. ८८. अंकात ४८ ते ५६ पृष्ठे. ९·८ × ६·६. प्रथमांक — जून १९२७ (तारीख १५).

**उद्देश** — केवळ स्त्रियांकरिता — महाराष्ट्रीय स्त्रियांचे रंजन, सेवा आणि उन्नती. **स्वरूप** — सचित्र, गोष्टी, चरित्रे, गाणी, धर्म, शिवाय स्त्रियांचे नित्योपयोगी व्यावहारिक विषय, बाल-विभाग (अंक ४ पासून).

**ब्रीदवाक्य** —

शनी व स्वतंत्र स्त्री राष्ट्राची शक्ती व वैभव आणि मानवजातीचे सौंदर्य आहे.

**विशेष माहिती** — द्वितीयावृत्ती पहिल्या अंकाची दि. १ आगस्ट १९२७ ला व दुसऱ्या अंकाची दि. ६ आगस्ट १९२७ ला प्रकाशित झाली. दि. २७ नवंबर १९२८ रोजी संपूर्ण मालकी हक्क न. रा. जोशी यांनी सोडून वसंत बळवंत मराठे यांच्याकडे दिला.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ — अंक १ ते १२. जून १९२७ ते मे १९२८. अंक ५ अक्टोबर खास दिवाळी अंक, अंक ७ डिसेंबर खास शिशु अंक.

वर्ष २ — अंक १ ते ३, (४ - ५), (६ ७), ८ ते १२. जून १९२८ ते मे १९२९. अंक १ जून ' पतिता अंक '

वर्ष ३ — अंक १ जू. १९२९, २, ३ आ, ४ स, ५ डि१९२९, ६ मा १९३०, (७-८) जा १९३१, (९ - १०) मे १९३१. अंक (७ - ८) जानेवारी १९३१ स्वातंत्र्य अंक.

## गृहिणी

**मासिक** : संपादक — (सरकार-नोंद) बळवंत भाऊ नगरकर. प्रकाशक — (व्यवस्थापक) व्यंकटेश मोरेश्वर वाळवेकर, मुंबई. मुद्रक — सुबोध प्रकाश छापखाना, मुंबई. वा. व. रु. १८८. फु. अ. ८४. अंकात सलग १६ पृष्ठे ८·४ × ५·४. प्रथमांक — एप्रिल १८८७. (पुस्तक अंक)

**उद्देश** — उत्तम प्रकारच्या गृहिणी होण्यास त्यास साह्य व्हावे म्हणून कुलवधूंच्या ज्ञानवर्धनार्थ आणि मनोरंजनार्थ. **स्वरूप** — पुराणप्रसिद्ध व ऐतिहासिक स्त्रियांची चरित्रे, नीती, पदार्थविज्ञान, आरोग्य, पाकशास्त्र, शिवणकाम, इ. स्फुट विषय, विचारवाटिका, गृहिणीचे अनुभव, बोधमौक्तिके, बालसंगोपन, चालू कादंबरी ' मधू '.

**ब्रीदवाक्य** —

शरद्गुलपत्राक्षी, शरद्गुलपुण्यगंधसम गंधा।
अस्खलित चालवी गृह धर्मी, मन यद्दि पर्मी जशी अधा॥ — मोरोपंत

[ ठामग्रं, मग्रं, मुंमग्र ]

वर्ष १ ते ३ – अक प्रत्येकी १ ते १२ (ए ते मा). एप्रिल १८८७ ते मार्च १८९०. ( तीन वर्षे )

वर्ष ४ – अंक १ एप्रिल १८९०, २ मे, ३ जू. १८९०.

## गृहिणी-रत्न-माला

**मासिक** : सपादक – श्री. सौ सीताबाई ( सीताराम सावत ). प्रकाशक – गोपाळ दाजीबा दळवी (मुद्रक) मुंबई. मुद्रक – मराठा प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. रु. १. अकात २४ पृष्ठे. ८'४ X ५'३. प्रथमाक – १ मे १९१६.

**उद्देश** – वेदकालापासून स्त्रियाची स्थित्यतरे, त्याची कारणे व त्यापासून भरतभूमीवर घडलेले इष्टानिष्ट परिणाम, स्त्रियांच्या शिक्षणविषयक गरजा व त्यासाठी स्त्रीपुरुषाचे परस्परांशी वर्तन कसे असावे वगैरे विषयाचे विवेचन. **स्वरूप** – सचित्र – मुख्यत्वे स्त्रियाचे लेख व महाराष्ट्रीय कुलस्त्रियाच्या हातीं जाण्यासारखे लेख, कविता, चरित्रे, निबध, बोध इ० सर्व प्रकारचे साहित्य, स्त्री व बालरोग.

**ब्रीदवाक्य** –

पत्यु शुश्रूषण गेहे कार्याण्यपि च तत्क्षणात्
कार्यादीना च सर्वेषा सगमस्तत्र नित्यदा ।
साध्वी सा हि परिज्ञेया ययाचोभ्रियते कुल
पतिव्रता या देहे तु सर्वे देवाश्च सति हि ॥ १ ॥

**विशेष माहिती** – *या वर्गणी* – वर्ष २ रु. १८८, वर्ष ५ रु ३ कुलस्त्रियानी चालविलेला स्त्रियाच्या उन्नतीसाठी प्रथम प्रयत्न वर्ष ४ – ' सपादिकेची गरिबीची सपत्तिक स्थिती ' असा उल्लेख. वर्ष ५ – ' मासिकाची विकट आर्थिक परिस्थिती. '

[ पुमम, मम, मुमग्र ]

वर्ष १ – अक १ ते १०, ( ११ - १२ ) मे १९१६ ते एप्रिल १९१७

वर्ष २ – अंक १ मे १९१७ –

वर्ष ३ – अंक + १, २, ( ३ ४ ), ( ५ - ६ ), ( ७ - ८ ) – जानेवारी ते आगस्ट १९१९.

वर्ष ४ – अंक १, ( २ - ३ ), ( ४ - ६ ), ( ७ - ८ ), ( ९ - १० ), ( ११ - १२ ). जानेवारी ते डिसेंबर १९२०.

वर्ष ५ – अंक १ ते १०, ( ११ - १२ ). जानेवारी ते डिसेंबर १९२१.

वर्ष ६ – अक + १ चैत्र १८४४, २ वै.

## गोधन

**मासिक** : सपादक – वामन विनायक सहस्त्रबुद्धे, ( वर्ष ३ ) ना. रा. पढरपूरकर. सहसपादक – कृ. वि. सरजामे. प्रकाशक – गोरक्षणसभा ( स्था. १८८८ ), नागपूर वा. व. रु. २८८, बाहेरगावी रु. ३. फु. अ. ८४. अकात ६४ पृष्ठे. ८'४ X ५'४. प्रथमाक – फेब्रुवारी १९२५ ( माघ श. १८४६ ).

**उद्देश** – गोरक्षणविषयाची सागोपाग व शास्त्रीय चर्चा करून प्रचारकास उपयुक्त वाङ्मय प्रसिद्ध करणे. **स्वरूप** – हिंदी व मराठी. सचित्र. कृषिगोरक्षणविषयक लेख, कविता इ.

**ब्रीदवाक्य** –

( १ ) यस्य धेनु गृहे नास्ति स्मशान सदृश हि तत् ।

( २ ) सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचे । परतु तेथे भगवताचे । अधिष्ठान पाहिजे ॥

**विशेष माहिती** – दाजीसाहेब बुटी यांच्या प्रोत्साहनाने

[ पुमम, माइसम, राजाराम लायब्ररी कोल्हापूर ]

वर्ष १ – अक १ फेब्रुवारी १९२५ ते ११ डिसेंबर १९२५. ( माघ १८४६ ते मार्गशीर्ष १८४७ )

वर्ष २ – अक १ ते ८, ( ९ - १० ), ( ११ - १२ ) चैत्र ते फाल्गुन १८४८.

वर्ष ३ – अंक १ चैत्र १८४९ ते ६, (७-८) कार्तिक १८४९.

## गोमंतक

पाण्मासिक : संपादकमंडळ – कु. विजया द. तळावलीकर, बाळकृष्ण दत्तात्रय सातोस्कर, सर्वोत्तम पुरुषोत्तम दणाईत. प्रकाशक – बा. द. सातोस्कर, मुंबई. अक्षात ५२, ४४ पृष्ठे ८·२ × ५·४. प्रथमांक – आगस्ट १९३३. शेवटचा अंक – अक्टोबर १९३५. (वर्ष – पूर्वांक व उत्तरांक).

उद्देश – गोमन्तक हिंदु विद्यार्थिमंडळ या संस्थेचे मुखपत्र. स्वरूप – सचित्र संकीर्ण – गोमन्तक परिचयार्थ.

ब्रीदवाक्य –

ॐ सहनाववतु। सहनौ भुनक्तु। सहवीर्यं करवावहै।
तेजस्वि नावधीतमस्तु। मा विद्विषावहै।

[ गोहिंअमुंबई, मडगाव ]

वर्ष १ – अंक १ पूर्वांक आगस्ट १९३३, २ उत्तरांक वर्ष प्रतिपदा श. १८५६ (ए. १९३४)

वर्ष २ – अंक १ पूर्वांक डिसेंबर १९३४, २ उत्तरांक अक्टोबर १९३५.

## गोमंतक मराठा

द्वैमासिक : संपादक – वा. मो. कुडईकर. सहसंपादक – र. बा. काकोडकर. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – फेमस प्रिंटर्स, मुंबई. वा. प. रु. १. फु. अं. ८३. अक्षात ३२ पृष्ठे. ८·५ × ५·४. प्रथमांक – जानेवारी १९४१.

उद्देश – राष्ट्रकार्याच्या मार्गात कसलीच धोंड उपस्थित न करता समाजाची सामाजिक स्थिती सुधारण्यासाठी काही प्रयत्न करावा.

विशेष माहिती – गोमंतक मराठा समाजाचे पुरोगामी द्वैमासिक. गोमंतक मराठा समाजाच्या तेरा वर्षांच्या सुसंघटित चळवळीचा एकमेव उद्देश समाजातील वेश्याव्यवसायनिर्मूलन [ प्रासंगिक विचार, वर्ष १ – अंक १ पृ. २९ ].

वर्ष १ – अंक १ जाने १९४१.

## गोवर्धन

मासिक : संपादक – रघुनाथ बाळकृष्ण चौंडे. प्रकाशक – शंकर सखाराम ढोले, पुणे. वा. व. व. ३. फु. अं. ८४. अक्षात २० पृष्ठे. ९·३ × ७. प्रथमांक – वैशाख श. १८६९ (मे १९४७). पुढे चालू १९६७.

उद्देश – गोरक्षण, गोसंवर्धन, शेतीसुधारणा, शेतकऱ्याच्या उद्धाराचे प्रश्न, आरोग्याचे उपाय, श्रीसमर्थसंप्रदायानुसार धर्मप्रचार.

ब्रीदवाक्य –

जगो गो जगि गौरवे।

विशेष माहिती – गोवर्धन संस्थेचे मुखपत्र. पूर्वी साप्ताहिक वा पाक्षिक होते वर्ष २३ पासून मासिक

[ कचेरी ]

वर्ष २३ – अंक १ ते १२. वैशाख ते (अधिक श्रावण धरून) फाल्गुन १८६९.

## गोवर्धनमाला

मासिक : संपादक – दत्तात्रय हरि न्यायाधीश. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – (वर्ष ३) सिद्धनाथ छा., वाई. वा. व. रु. १. अक्षात प्रकरणवार ४४, ३२ पृष्ठे ८ × ४ × ५·४. प्रथमांक – आषाढ शके १८३५. (वर्ष पुष्प)

उद्देश – धार्मिक जागृती.

ब्रीदवाक्य –

गावो मे अग्रत सन्तु गावो मे सन्तु पृष्ठत।
गावो मे हृदये सन्तु गवां मध्ये वसाम्यहम्॥

देवधर्मगोब्राह्मण । करावया सरक्षण ।
हृदयस्थ झाला नारायण । प्रेरणा केली ॥
(वर्ष ३) बहुधन असो नसो परि गृही
असावीच एक ती गाय ।

विशेष माहिती – गोवर्धन संस्था, श्रीक्षेत्र, वाई या संस्थेतर्फे. मलपृष्ठावर नाव 'गोवर्धनमाला'. आत फक्त 'गोवर्धन'. शेवटच्या काही वर्षांत आत व बाहेर दोन्ही ठिकाणी नाव 'गोवर्धनमाला'. *वार्षिक वर्गणी* – वर्ष ३ रु. १८४. फु. अं. ८२. *संपादक* – वर्ष २ अंक ३ पासून अनंतदास रामदासी (प्रकाशक). *प्रकाशक* – वर्ष ३ पासून दत्तात्रय मोरेश्वर लोहकरे, वाई.

[ मग्रं, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक ..२, श्रावण १८३५ ते १२, ज्येष्ठ १८३६.

वर्ष २ – अंक १ जुलै १९१४, २, (३-४), (५-७), (८-९), १०, ११ मे १९१५ +

वर्ष ३ ते ५ – अंक प्रत्येकी १ ते १२ (का ते आ) कार्तिक १८३७ ते अश्विन १८४०. तीन वर्षे

वर्ष ६ – अंक १ कार्तिक १८४०, २, (३-४), (५-६), ७, (८-९) आषाढ १८४१.

## गौड ब्राह्मण

त्रैमासिक : संपादक – नारायण गणेश सामंत. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. १८८. फु. अं. ८६. ८·४ × ५·४. प्रथमांक – (जुलै १९३९).

उद्देश – आपला समाज सुसंघटित, कार्यक्षम व सन्मान व्हावा, त्याला राजकीय शैक्षणिक व औद्योगिक क्षेत्रात मानाचे स्थान प्राप्त व्हावे, पटकातील दुरभावाचा पडदा नाहीसा होऊन खेळी-मेळीचे वातावरण उत्पन्न व्हावे. स्वरूप – कविता, गोष्टी इ. साहित्य, इतिवृत्त, चरित्रे, निबंध इ.

ब्रीदवाक्य –
अमतश्चतुरो वेदान्पृष्ठतः सशरं धनुः ।
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥ १ ॥

विशेष माहिती – सहकारी मंडळ – रघुनाथ गणेश ठाकूर, बाळकृष्ण रामचंद्र प्रभू, हरिश्चंद्र कृष्णराव पळसेकर, मुकुंद श्रीकृष्ण झारापकर, वामन श्रीधर पळेकर. महत्त्वाची लेखमाला – विशाळ्या शतकापूर्वीचे पुढारलेले पुरुष नीलकंठशास्त्री. श्री. वाडेकरांचे संशोधनपर लेख.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक ४ एप्रिल १९४०.

वर्ष २ ते ७ – अंक प्रत्येकी १ ते ४ (जु, अ, जा, ए). जुलै १९४० ते एप्रिल १९४६ (सहा वर्षे). प्रत्येक ४ था अंक – अहवाल अंक.

वर्ष १० – अंक ३ जानेवारी १९४९.

## गौडसारस्वत ब्राह्मण ज्ञातिवृत्त

मासिक : संपादक – (आर्योत्कर्ष प्रकाश कर्ते) गणेश रामचंद्र शर्मा. प्रकाशक – संपादक, खानापूर (बेळगाव.) वा. व. रु. २८८. फु. अं. ८५. ८·५ × ५·६. प्रथमांक – (चैत्र श. १८४३) शेवटचा अंक – भाद्रपद श. १८४४.

उद्देश – ऐतिहासिक मासिक पुस्तक – गृहस्थ, कुलस्त्रिया व मुले यांकरिता. स्वरूप – श्रुती, स्मृती, पुराणे इ. प्राचीन ग्रंथ व बखरी, सनदा, ताम्रपट, दानपत्र, जुने लेख, पुस्तके इ. उपलब्ध साधनावरून गौड सा. ब्रा. ज्ञातीसंबंधी प्राचीन अर्वाचीन ऐतिहासिक माहिती. समयानुसार धार्मिक मजकूर.

ब्रीदवाक्य –

श्रुतिस्मृतिपुराणसद्गादितविप्रधर्मोदये ।
कुरीतितमविदारणे विविधवृत्तविख्यापने ।
प्रमुदितमिदं सत्, मन्दवर्धनं रोचता ।
चिरं सुयवनैश्रितं बुधजनाय सारस्वतम् ॥

विशेष माहिती – लोकमित्र-वर्ष ३१ अंक ३ सप्टेंबर १९२१ – येथे – 'गेल्या चैत्रमासात सुरू झाले' (= चैत्र श. १८४३). आश्रयाभावी बंद केले.

[ मग्रं ]

वर्ष २ – अंक +. २ श्रावण १८४४, ३ भाद्रपद १८४४ (' अखेरचा ')

## ग्रंथमाला

**मासिक** . संपादक – विष्णु गोविंद विजापूरकर. प्रकाशक – संपादक, कोल्हापूर. मुद्रक – विद्याविलास छा., कोल्हापूर वा. व. रु. ५. फु अ ८८. अंकात सदरवार ६४,८०,१७२ पृष्ठे. ८·१ × ५·२. प्रथमांक – एप्रिल १८९४ शेवटचा अंक – मार्च १९०६ ( वर्षवार व सलग अंकक्रमांक )

**उद्देश** – केवळ मराठी जाणणाऱ्यांच्या विकासासाठी, गुणांचा प्रादुर्भाव होण्यासाठी, मातृभाषेतून ज्ञानप्रसार करणे. स्वधर्म-स्वदेश स्वभाषादिकांचा । जगी मान व्हावा असा हेतु साचा ॥ *स्वरूप* – या मासिक पुस्तकात इतिहास, थोर पुरुषांची चरित्रे, प्रसिद्ध वक्त्यांची भाषणे, अनेक धर्मांतील व अनेक देशांतील सत्पुरुषांची उपदेश-वाक्ये, भाषाशास्त्रीय टीपा, प्राचीन कलाविषयक शोध, राजनीती, तत्त्वशास्त्र, अर्थशास्त्र, पदार्थविज्ञानादी सृष्टिशास्त्रे, कृषिशास्त्र, वैद्यक, पशुवैद्यक, या व इतर विषयांवर लोकोपयोगी व सामान्य वाचकांस समजण्याजोगे ग्रंथ व निबंध अवकाशानुसार येत जातील. ते भाषांतर, रूपांतर व काही स्वतंत्रही असतील. केवळ कल्पित गोष्टी, कादंबऱ्या व नाटके खेरीज बहुतेक सर्व विषय. मुख्यत्वेकरून शास्त्रीय, ऐतिहासिक व तात्त्विक. अंक ६७ पासून परिचय-चर्चात्मक ' सारसंग्रह ' विशेष सदर.

**ब्रीदवाक्य** –

बहूनामप्यसाराणां समवायो हि दुर्जयः ।
तृणैरावेष्ट्यते रज्जुर्यया नागोऽपि बध्यते ॥

**विशेष माहिती** – ' छत्रपती सरकार करवीर यांच्या आश्रयच्छत्राखाली प्रसिद्ध होणारी ' ( प्रथमाला ) असे शिरोभागी वर्णन, ते अंक १४१ पर्यंत व पुढे नाही. पृष्ठसंख्या - वर्ष २ पासून ८०, अंक ६७ पासून १७२. करवीर सरकारचा आश्रय – दरसाल १०० प्रतींचे रु. ५०० अंक ८७ पासून बंद. *मुद्रण* – वर्ष ३ स्वतःचा समर्थ प्रसाद छा. कोल्हापूर, शिवाय क्वचित मोदवृत्त वाई, आर्यभूषण पुणे, श्रीव्यंकटेश्वर समाचार व इंदुप्रकाश मुंबई *या वर्गणी* – वर्ष २ पासून सौरतीचा दर मासिक ५० रुपयांहून कमी उत्पन्नाच्या पुस्तकालयास व व्यक्तींस रु. ३८८, फु. अ. ८१०; वर्ष ७ पासून रु. ६, सौरतीचा दर रु. ५, अंक ८३ च्या सुमारास व पुढे फु अ. रु. १८५८६. १००० वर्गणीदार झाल्यावर दरमहा पृष्ठे २०० [ टपालाच्या सोयीसाठी १७२ पृष्ठांचे १४ अंक निघतील ]. व्यापारीदृष्ट्या यशस्वी होत नाही तरीही सुधारणा करून उपक्रम चालविला असता, परंतु सप्टेंबर १९०५ मध्ये ( नोकरी सुटून ) चरित्रक्रमास निराळे वळण लागले. नुसत्या ग्रंथमालेसारख्या मासिक पुस्तकात गुरफटून राहण्यापेक्षा विश्वसंचारास मोकळे व्हावे असा निश्चय झाला ( सालअखेर अंक १४४ ). तेव्हा ग्रंथमालेच्या स्वरूपात थोडा फेरफार करून पूर्ण ग्रंथाच्या स्वरूपात सालीना १२०० पृष्ठे देण्याचा विचार.

[ मुमग्र, ढवापो ]

वर्ष १ – अंक १ ते १२. एप्रिल १८९४ ते मार्च १८९५.

वर्ष २ – अंक १३ ते २४. एप्रिल १८९५ ते मार्च १८९६.

वर्ष ३ – अंक २५ ते ३६. एप्रिल १८९६ ते मार्च १८९७.

वर्ष ४ – अंक ३७ ते ४८ एप्रिल १८९७ ते मार्च १८९८.

वर्ष ५ – अंक ४९ ते ६० एप्रिल १८९८ ते मार्च १८९९

वर्ष ६ – अंक ६१ ते ७२ एप्रिल १८९९ ते मार्च १९००

वर्ष ७ – अंक ७३ ते ८४ एप्रिल १९०० ते मार्च १९०१.

वर्ष ८ – अंक ८५ ते ९६. एप्रिल १९०१ ते मार्च १९०२

वर्ष ९ – अंक ९७ ते १०८ एप्रिल १९०२ ते मार्च १९०३.

वर्ष १० – अंक १०९ ते १२०. एप्रिल १९०३ ते मार्च १९०४.
वर्ष ११ – अंक १२१ ते १३२. एप्रिल १९०४ ते मार्च १९०५.
वर्ष १२ – अंक १३३ ते १४४. एप्रिल १९०५ ते मार्च १९०६.

## ग्रंथरत्नाकर

**मासिक** : संपादक – आप्पाजी विष्णु कुलकर्णी, विनायक दत्तात्रय मिलवडीकर. प्रकाशक – चिक्कोडी ( बेळगाव ). मुद्रक – ज्ञानप्रसारक छा., चिक्कोडी. वा. व. रु. १८८. फु. अं. ८४. अंकात ३२, ४० पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – जानेवारी १८९८.

**उद्देश** – मनोरंजक मासिक. **स्वरूप** – सचित्र. चटकदार निबंध, कादंबऱ्या, नाटके, साधुपुरुषांची चरित्रे, देश व स्थलवर्णने, कविता, थोरांचे फोटो, देखावे ( जाहिरातींतील वर्णन ).

**विशेष माहिती** – वर्ष २ पासून – पृ. ४८ व वा. व. रु २८४, फु. अं. ८६. यात निबंधावली, शेक्सपियरचा अभ्यास, कृपण घनाजीराव, सरोजिनी अशी सदरे व प्रकरणे छापली.

[ मुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ९, ( १० - १२ ). जानेवारी ते डिसेंबर १८९८.
वर्ष २ – अंक......( ७ जु - १२ डि ). डिसेंबर १८९९.

## ग्रामणी अर्थात् खेड्यातील पुढारी

**मासिक** : संपादक – वासुदेव रामचंद्र पुराणिक. सहसंपादक – महादेव भास्कर जोशी. प्रकाशक – विश्वनाथ महादेव नवाथे, नागपूर. वा. व. रु. १८४. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ९'६ × ६'४, ( वर्ष १२ ) ७'७ × ६'४. प्रथमांक – एप्रिल १९३२ ( वर्षप्रतिपदा ).

**उद्देश** – सर्व हिंदुस्थानभर ग्रामपंचायतींचा प्रसार व्हावा व तत्संबंधी वाङ्मय उपलब्ध व्हावे म्हणून इंग्रजीत ' ग्रामणी ' चालू होते. त्याचीच मातृभाषेचा पेहराव दिलेली छोटेखानी प्रतिकृती खेड्योपाडी संदेश पोचविण्यासाठी.

**ब्रीदवाक्य** –

दक्षिणावान् ग्रामणीरग्रमेति । – ऋग्वेद.
लोकानुरंजन करी, जडता निरोधी ।
कार्यैकनिष्ठ करण्या जनता प्रबोधी ।
आत्माधिकार विवरूनि झटे तदर्थ ।
तो ग्रामणी जनपदा करि जो समर्थ ॥
– उपाध्ये.

**विशेष माहिती** – महाराष्ट्रातील ग्रामपंचायतींचे मुखपत्र. संचालक, प्रेरक – बाबासाहेब परांजपे. संपादक (?) – पुरुषोत्तम दिवाकर ढवळे. *नावबदल* – वर्ष ११ अं. ८ पा. – स्थानिक स्वराज्य व ग्रामणी. *सहसंपादक* – वर्ष २ अं.४ – श्री. ना. हुद्दार; वर्ष ४ – उत्तमराव पाटील इटकीकर, श्री. ना. हुद्दार; वर्ष ९ – ना. वि. पेंडसे. *वा वर्गणी* – वर्ष ३ रु. १८८; वर्ष ५ रु. २, फु अ. ८३. *प्रकाशनस्थल* – इ.१९३७ ते १९३९ पुणे. *संपादक* – वर्ष ९ श्री. ना. हुद्दार, वर्ष ११ सखाराम सीताराम नाईक.

[ मुमग्र, भाइसमं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. एप्रिल १९३२ ते मार्च १९३३.
वर्ष २ – अंक १ एप्रिल १९३३ ते ९ डिसेंबर १९३३.
वर्ष ३ – अंक १ ते १०, ( ११ - १२ ) जानेवारी ते डिसेंबर १९३४.
वर्ष ४ – अंक ( १ - २ ), ( ३ - ४ ), ५ ते ७, ( ८ - ९ ), ( १० - ११ ), १२. जानेवारी ते डिसेंबर १९३५.
वर्ष ५ – अंक..., २ फेब्रुवारी १९३६, ( ३ - ४ ) एप्रिल १९३६—
वर्ष ६ – अंक ..., ९ नवंबर १९३७ ते १२ डिसेंबर १९३७.
वर्ष ७ – अंक १ जानेवारी १९३८ ते ८ आगस्ट १९३८—

वर्ष ९ ते १० – प्रत्येकी अंक + १ ते १२. एप्रिल १९४० ते मार्च १९४२ (दोन वर्षे)

वर्ष ११ – अंक १ ते ७, (८-९), (१०-११), १२. एप्रिल १९४२ ते मार्च १९४३.

वर्ष १२ – अंक (१-२), (३ ४), (५-६), (७-८), (९-१०), (११-१२). एप्रिल १९४३ ते मार्च १९४४.

## ग्रामराज्य

**मासिक** : संपादक – द. स. झोडगे. सहसंपादक – कैलास झोडगे. प्रकाशक – संपादक, मुढवा, पुणे. मुद्रक – शिवाजी प्रिंटिंग वर्क्स, पुणे. वा. व. रु. ३. फु. अ. ८८. ९'८ × ७'३. प्रथमांक– अक्टोबर १९४६ (मलपृष्ठावर नवंबर !). पुढे चालू (फक्त महिना व सन; वर्ष अंक निर्देश नाही)

उद्देश – ग्रामीण पुनर्रचनेचा पुरस्कार करणारे ग्रामीण जनतेचे आद्य नि प्रमुख मासिक. स्वरूप – गरिबांच्या प्रचारास मार्गदर्शक व त्यांच्या आनंदात भर टाकणारे बहुजनसमाजोपयोगी लिखाण.

**ब्रीदवाक्य** –

ग्रामस्य तत्वं निहितं गुहायां ।
महाजनो येन गतः स पंथाः ॥

**विशेष माहिती** – संचालक – श. रा. भागवत, *सहकारी संपादक* – माई झोडगे, म. ना. जोशी, बा. बा. पुराणिक. "ग्रामराज्य" हे नाव पुढे सरकारी यादीत सन १९५१ मध्ये आढळते

[ औद्योगिक प्रदर्शनालय ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १९४६ (मलपृष्ठावर नवंबर १९४६).

वर्ष ३ – अंक १ नवंबर १९४८, . . , ४ फेब्रुवारी १९४९.

वर्ष ४ – अंक (१-२) नवंबर डिसेंबर १९४९, ....., ५ मार्च १९५० + ६ आगस्ट १९४९ (१९५०?)

## ग्रामशिक्षक

**मासिक** : संपादक – नारायण विनायक जोशी. प्रकाशक – संपादक, चिटणीस साक्षरताप्रसारक मंडळ, मानेजे (राहुरी, नगर) वा. व. रु. २. फु. अ. ८४. अंकात २० पृष्ठे. ७'१ × ४'८. प्रथमांक – (एप्रिल १९४०).

**ब्रीदवाक्य** –

सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचे ।
परि तेथे भगवंताचे । अधिष्ठान पाहिजे ॥–रामदास

[ मग्र ]

वर्ष १ – अंक . . , ६ सप्टेंबर १९४० ते ९, (१० ११), (वर्ष १ अंक १२ मा – वर्ष २ अंक १-२ ए मे असे तीन अंक एकत्र) मे १९४१.

वर्ष २ – अंक . . (३ जून १९४१ - ५), (६-७), (८-९), (१०जा४२-११), (वर्ष २ अंक १२ मा - वर्ष ३ अंक १ ए असे एकत्र) एप्रिल १९४२.

वर्ष ३ – अंक . ., (२ मे १९४२ - ३), (४-५), (६ ७), (८-१०) जानेवारी १९४३—

वर्ष ४ – अंक . ., (४-५) जुलै आगस्ट १९४३, (६-७) सप्टेंबर - अक्टोबर १९४३.

## ग्रामसेवक

**मासिक** : संपादक – रामचंद्र सीताराम खोल्कुटे. सहसंपादक – लक्ष्मीकांत परमानंद मिसेकर. प्रकाशक – सहसंपादक, नागपूर. मुद्रक – साहित्य मुद्रणालय, सीताबर्डी. वा. व रु. २८८ फु. अ. ८४. अंकात ३२ पृष्ठे. ७'२ × ४'८.

प्रथमांक – चैत्र शु. १८५१ (१९२९). नेवटचा अंक – फाल्गुन शु. १८५२.

उद्देश – रोडगावाचे मासिक.

ब्रीदवाक्य –

जे जे आपणासि ठावे । ते ते दुसऱ्यासि शिकवावे ।
शहाणे करूनि सोडावे । सकळ जन ॥

विशेष माहिती – बंद करावे लागले.

[ श्रीसमर्थ गोरक्षण वाचनालय नागपूर ]

वर्ष १ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८५१.

वर्ष २ – अंक १ ते ८, (९ - १०), (११ - १२). चैत्र ते फाल्गुन १८५२.

## ग्रामसेवक अथवा हळ्ळिय आळु

मासिक : संपादक – वाय्. आर्. मणेरीकर. ८ × ५'३. प्रथमांक – ( फेब्रुवारी १९३३ ).

स्वरूप – मराठी व कानडी. ( शेतकी, उद्योगधंदे, सहकारिता, आरोग्य, ग्रामसंस्था इ. विषय ).

वर्ष १ – अंक... ७ ऑगस्ट १९३३.

## ग्राम-सेवा-वृत्त

मासिक-पत्र : संपादक – ( वर्ष ४ ) *वल्लभभाई भगवानजी पटेल. प्रकाशक* – गोपाळ नरहर काळे, ग्रामसेवामंडळ, वर्धा. वा. व. रु. १ ( वर्धा तालुक्यासाठी सवलतीची ८६ ) फु. अ. ८२. अंकात २४ पृष्ठे. प्रथमांक – ( एप्रिल १९३७ ).

उद्देश – वर्धा तहसिलीतील खेड्यांशी 'जीवंत' संबंध ठेवणे. विनोबाजी ( भावे ) यांच्या विचारांशी, उद्गारांशी व प्रवृत्तींशी वाचकांना परिचित राखणे. स्वरूप – पूज्य विनोबाजींचे मूळ मराठी लेख या मासिकात येतात : विषय – खादी, ग्रामोद्योग, अहिंसा इ.

*विशेष माहिती* – *'मासिक-पत्र' किंवा 'मासिक पुस्तिका'*. वर्णन वर्ष ४च्या अंकावरून दिले आहे. ग्रामसेवामंडळाने मुखपत्र ( कार्यक्षेत्र वर्धा तहसील ). *संपादक* – वर्ष ४ पासून संपादनाची जबाबदारी गो. न. काळे यांजकडून वल्लभभाई पटेल यांनी घेतली. *वार्षिक वर्गणी* – १९४२ पासून १।८.

[ मुंबई, दवाखे ]

वर्ष ४ – ..., अंक ६ सप्टेंबर १९४० ते १२ मार्च १९४१.

वर्ष ५ – अंक १ ते १२. एप्रिल १९४१ ते मार्च १९४२. अंक ४ पुढे व अंक ९ डिसेंबर यांना जादा पुरवणी विनोबांची.

वर्ष ६ – अंक १ एप्रिल १९४२, २, ३ जून १९४२.

## चतुष्पाद आणि कृषिकर्म

मासिक : संपादक – रामचंद्र रघुनाथ जोशी, व्हे. सर्जन. प्रकाशक – संपादक, हैद्राबाद ( दक्षिण ). मुद्रक – वैद्य ब्रदर्स प्रेस, मुंबई. वा. व. रु. २ इंग्रजी शिक्का (रु. २॥४ निजामी). फु. अं ८४. अंकात प्रकरणवार ३४ पृष्ठे. ८'५ × ५'४. प्रथमांक – ऑगस्ट १९१३.

स्वरूप – सचित्र. जनावरांचे शारीरशास्त्र, *रोग व त्यावरील उपाय, जोपासना, जातिवंत पैदास, गाईचे संरक्षण, जमिनींचे प्रकार,* विविध पिके, खते व तदंगभूत विषयांची सोपपत्तिक चिकित्सा.

विशेष माहिती – शेतकी आणि शेतकरी ऑक्टोबर १९१४ च्या अंकात जाहिरात – "नूतन मराठी व उर्दू या दोन भाषांत निघते. तेलगी व कानडी भाषांत काढण्याचा विचार चालू आहे. यातील मुख्य लेखक जपानी ॲग्रिकल्चरल व हॉर्टिकल्चरल एक्सपर्ट के. टॉकमोरा ( निजाम सरकारच्या खासगी बागांचे सुपरिंटेंडंट ) यांस बागाईत व फुलझाडे यांचे अगाध ज्ञान आहे."

[ पुमग्रं, मग्रं, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ आगस्ट १९१३ ते १० मे १९१४–

वर्ष २ – अंक ..., २ सप्टेंबर १९१४ ते ६, (७ ८) मार्च १९१५ –

## चंद्रकला

**मासिक** : संपादकमंडळ – डी. एस्. मुळे, एस्. बी. राणे, आर. टी. खुर्द, डी. एन्. मोकाशी. प्रकाशक – गोविंद श्री. मुळे, कोल्हापूर. वा. व. रु. १८८. फु. अं. ८२. ९·१ × ६·१. प्रथमांक – जानेवारी १९३८.

**उद्देश** – वाङ्मय व कलाविषयक.

[ नगरवाचनमंदिर, डॉ. श्रीखंडे, कोल्हापूर. ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १९३८ ते ६ जून १९३८.

## चंद्रिका

**मासिक** : प्रकाशक – मुंबई. मुद्रक – 'सन्मार्गदर्शक मंडळी' चा छा. (शिळा), मुंबई. वा. व. रु. (३). फु. अं. वर्गणीदारांस ८४, इतरांस ८६. अंकात ३२ पृष्ठे. ८·१ × ५·४. प्रथमांक – मार्च १८५४. (पुस्तक - अंक)

**उद्देश** – लोकांस वाचनीय मजकूर स्वस्तात पुरविणे. स्वरूप – कथा, संस्कृत गद्यपद्य नाटकांची भाषांतरे, नवीन कविता, चरित्रे, वर्तमाने, नीतिपर उपदेश, शास्त्रीय विषय, मद्यनिषेधक व व्यभिचारनिषेधक कविता. ऐतिहासिक माहिती.

**ब्रीदवाक्य** –

सुचंद्रिका ही, प्रतिमासी की, निघते जन बोधाया।
होइल सुज्ञ बहु, संसारी जे, घेती जन बोधा या॥

**विशेष माहिती** – इंग्रजीत 'दि मूनलाइट'. यात भवानी विश्वनाथ कानविंदेलिखित 'मानवी कर्तव्यकर्मे' हे पुस्तक प्रसिद्ध झाले.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मार्च १८५४ ते फेब्रुवारी १८५५.

वर्ष २ – अंक..., ४ जून १८५५ ते ६ आगस्ट १८५५–

वर्ष ३ – अंक ..., ३ मार्च १८५६ ते १२ डिसेंबर १८५६.

वर्ष ४ – अंक..., ३ मार्च १८५७, (४, ५), ६, ..., १२ डिसेंबर १८५७.

## चंद्रिका

**मासिक** : प्रकाशक – चंद्रिकेचे व्यवस्थापक, शिराळे, जि. सातारा. मुद्रक – ज्ञानसागर छापखाना, कोल्हापूर (शिळाछाप). वा. व. रु. (वर्षाची किंमत) १८४. फु. अं. ८२. अंकात सलग २० पृष्ठे. ७·५ × ५·५. प्रथमांक – अश्विन शु. १० (श. १८०४) (पुस्तक अंक)

**उद्देश** – सुज्ञ बंधुजनाकरिता. स्वरूप – मनोरंजक उपयोगी असे विषय, धर्म, वक्तृत्व, कविता, चरित्र, स्थलवर्णन, पत्रव्यवहार.

**विशेष माहिती** – कोणत्याही अंकावर फक्त देशी महिना, जोडीला शक वा सन नाही. जाहिरातीच्या तारखेवरून प्रथमांकाचा काल ठरविला.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ अश्विन शु. १० श. १८०४ (२१ अक्टोबर १८८२), २ का, ३ मा, ४ पौ, ५ माघ १८०४.

## चंद्रिका

**मासिक** : प्रकाशक – कृष्णराव सखाराम पाटकर, मुंबई. मुद्रक – लक्ष्मीनारायण प्रेस, मुंबई. वा. व. रु. २. फु. अं. ८३. अंकात सलग ४८ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – एप्रिल १९१५.

**उद्देश** – स्वाभिमानाची ज्योत पेटवून एकारमतावृद्धीसाठी वाङ्मयाभिवृद्धीला वाहिलेले.

वरिष्ठ दर्जाची साहित्यसेवा. स्वरूप – उपयुक्त, मनोरंजक, सारदस्त. साहित्यनर्तनरोबरच रंजनार्थ विनोदप्रचुर लेख, गोष्टी, कविता, विविधपर्तीय वाङ्मयपरिचय, चारित्र्य व सृष्टिप्रेम यास पोषक. मौक्तिकमाला, सुभाषिते, वाङ्मयचर्चात्मक निबंध.

विशेष माहिती – यात ' मोरोपंती सुभाषिते ' छापली. संपादक – " संपादक कोल्हापूरचे कोणी कार्यकर्ते असे कळते. खरे खोटे आम्हांस माहीत नाही. " – ( पोच ' सकल ' वर्ष १ अंक ४ ऑगस्ट १९१५ ).

[ मुनय, मग्र ]

वर्ष १ – अंक १ एप्रिल १९१५, २, ३, ४जु, ५, ६, ७ अक्टोबर १९१५.

## ( सार्थ श्री ) चरकसंहिता

त्रैमासिक / मासिक : संपादक – शंकर दाजी-शास्त्री पदे. प्रकाशक – संपादक, मुंबई, वा व. रु. १८४. अंकात ३२ पृष्ठे ७ ८ × ५'१. प्रथमांक – ५ अक्टोबर १८९७. ( पुस्तक-अंक )

ब्रीदवाक्य –

चिरिंसित बहिर्वैद्यस्तस्यानुरहित प्रति ।
यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥

– इदबल

विशेष माहिती – त्रैमासिक म्हणून सुरू, परंतु दुसऱ्याच महिन्यात मासिक झाले

[ मुमंग्र ]

त्रैमासिक

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १८९७

मासिक

वर्ष १ – अंक ( २ नवंबर १८९७ - ३ ), ( ४ ५ फे १८९८ ) + ६ ए १८९८, ( ७ ८- ९ नवंबर १८९८ ), ( १० - ११ १२ ) –

## चलित सृष्टी

मासिक : संपादक – गो. गो. गोखले, रा. कां फाटक. प्रकाशक – संपादक, नागपूर. मुद्रक – साहित्य मुद्रणालय, नागपूर. वा. व. रु. १८८. अंकात १६ पृष्ठे. ९'६ × ७'५. प्रथमांक – जानेवारी १९३३.

उद्देश – सिनेमामधील वाहिलेले. स्वरूप – सचित्र. हिंदी-मराठी ( अंक १० पासून हिंदी )

विशेष माहिती – [संदर्भ – विहंगम वर्ष २ अंक १४ ऑगस्ट १९३४ पृ. ५७ ५८] संपादक – अंक १० पासून राघवेंद्र. प्रकाशक – अंक १० पासून दि गोपाळ सिनेटोन कॉर्पोरेशन लिमिटेड, नागपूर ( रजिस्टर झाली नवंबर १९३२ ) तर्फे डॉ. वी. व्ही. सहस्रबुद्धे. " अंक ९ मध्ये संपादक आपला मासिकाचा संबंध सुटून यापुढे दि गोपाळ सिनेटोन कॉर्पोरेशन ही संस्था प्रकाशन करील असे निवेदन करतात "

[मग्र ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १९३३ ते १० अक्टोबर १९३३. अंक ७ चु प्रभात फिल्म कंपनी खास अंक.

## चालना

मासिक : संपादक – के नाथ चिंचणीकर, अरविंद हरि राऊत. प्रकाशक – अ. ह राऊत, मुंबई. वा व रु १८४. अंकात १६ पृष्ठे ८'३ × ५'२. प्रथमांक – ( जानेवारी १९५० ) पुढे चालू १९६७.

उद्देश – पुरोगामी सामाजिक सुधारणाचा पुरस्कार

ब्रीदवाक्य –

योगस्थ. कुरु कर्माणि ।

[ मग्र ]

वर्ष १ – अंक , ४ एप्रिल १९५० ते ६ जून १९५०.

## चिकित्सक

त्रैमासिक : संपादक – दत्तात्रेयशास्त्री जळू-कर. प्रकाशक – का. सी. मावे, आयुर्वेदसेवामंडळ, भुसावळ/धुळे. वा. व. रु. १८४ (१९४२). ८·४ × ५·४. प्रथमांक – (मार्च १९४०).

उद्देश – संयुक्त खानदेश वैद्यमंडळाचे.

ब्रीदवाक्य –

नाऽर्थार्थं नाऽपि कामार्थं । अथ भूतदयां प्रति ॥

विशेष माहिती – वर्णन वर्ष १० अंक २चे. आकार – वर्ष १० - ९·४ × ७·२.

वर्ष २ – अंक ..., २ जुलै १९४१, ३ अक्टो-बर १९४१.
वर्ष ३ – अंक १ मार्च १९४२–
वर्ष १० – अंक..., २ जून १९४९.

## चित्तवेधक

मासिक : प्रकाशक – अमरावती. मुद्रक – पुरुषोत्तम न्यू प्रेस, अमरावती. वा. व. रु. १. अंकात १६ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – ऑगस्ट १९०२.

ब्रीदवाक्य –

चित्तवेधकासि कार्य सुज्ञचित्तरंजनी । असे म्हणूनि लोकसेवनार्थ हा झटे जनी ॥ प्रथम भेट अमुची ही जातसे तुम्हाकडे । स्वीकरा कृपा करोनि धन्य या करा पुढे ॥

[ आकटे ]

वर्ष १ – अंक १ आगस्ट १९०२.

## चित्ताकर्षण

मासिक : संपादक – बाळकृष्ण रामचंद्र घाणेकर. प्रकाशक – चित्ताकर्षक ग्रंथप्रसारक मंडळी (नवीन गोवे). मुद्रक – हित-चिंतक छापखाना. वा. व. रु. १८४, वर्ष ४ गोव्यात रु. १८८ (बाहेर रु. १८१२). पृ. अं. ८३. अंकात १६, ४० (वर्ष४) पृष्ठे. ७·१ × ४·९. प्रथमांक – जानेवारी १९०६.

उद्देश – मनोरंजनार्थ. स्वरूप – सचित्र. कविता, गोष्टी, चुटके.

ब्रीदवाक्य –

आकाश अंत न कळोनिहि अंतरिक्षी ।
आक्रमितो गगन शक्त्यनुसार पक्षी ॥
निश्चयाचे बळ । तुका म्हणे तेची फळ ॥

विशेष माहिती – मुखपृष्ठावर 'मासिक चित्ताकर्षण'. संपादक – वर्ष ३ पुरुषोत्तम वामन शिरगावकर; वर्ष ४ – रामचंद्र सदाशिव वाळके, शिवराम बळवंत देशपांडे. यात 'कमलकुमारी', 'मालिनी', 'सुड की प्रणयकलह' इ. कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या.

[ गोवाहिअमुंबई, मग्र, साशाग्रमडगाव ]

वर्ष १ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०६.
वर्ष २ – अंक १, २, (३ - ४), ५ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०७.
वर्ष ३ – अंक १ जानेवारी १९०८ + २ आ १९०८ ते ४, (५ - ६), ७ आ १९०९, (८ - ९), १० ते १२ जून १९०९. पृ. १९४ अधिक १६ (अंक १२ ची पुरवणी).
वर्ष ४ – अंक १ जुलै १९०९,२ आगस्ट १९०९–

## चित्पावन

मासिक : संपादक – घनःशाम नारायण खरे. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – गोरे प्रिंटिंग प्रेस, पुणे. वा. व. रु. ३. फु. अं. ८४. अंकात २६ पृष्ठे. ९·८ × ७·३. प्रथमांक – २९ मार्च १९४०.

उद्देश – अखिल जगातील चित्पावनांचे एकीकरण व आर्थिक, औद्योगिक व बौद्धिक उन्नती

करवून जगातील पुढारलेल्या समाजाच्या बरोबरीचे स्थान मिळविण्यास समर्थ करणे. स्वरूप — चित्पावनाच्या सर्वांगीण उन्नतीस उपकारक होणारे लेख.

ब्रीदवाक्य —

उद्धरेदात्मनात्मानम् ।

[ दमजेरेस ]

वर्ष १ — अंक १ मार्च १९४०.

विशेष माहिती — पर्णन — मराठी सिनेमा मासिक. पहिले दोन अंक द्वैमासिकाप्रमाणे ( ! ). वर्ष १ अंक १० वर चुकून आगस्ट असे छापले आहे.

[ संपादक ]

वर्ष १ — अंक १ (अक्टोबर — नवंबर १९४९), २ (डि १९४९ - जा १९५०), ३ फे ५० ते १० आगस्ट ( मरा सप्टबर ) १९५०.
वर्ष २ — अंक १ अक्टोबर १९५०, २ नवंबर १९५०. अंक २ न मास दिवाळी अंक.

## चित्रदर्शन

**मासिक :** प्रकाशक — नारायण शिवराम मालवणकर आणि कंपनी, मालवण. मुद्रक — बकुल छा., रत्नागिरी. वा. व. रु. २, मागाहून रु.४. पु. अं. ८५॥ अंकात १२ पृष्ठे. ८'८ × ५'८. प्रथमांक — फेब्रुवारी १८८३.

उद्देश — चित्रकलाविषयक. स्वरूप — सचित्र. प्रसिद्ध पुरुषांचे चेहेरे, प्राचीन कारागिरीची कामे ( लेणी, गुहा, भुयारे, लेख, नाणी, खोदीव कामे, किल्ले, गड वगैरे ), देवस्थाने, पूल, पुले वगैरेंचे सचित्र वर्णन. शिळाछापाची चित्रे.

[ मम ]

वर्ष १ — अंक १ फेब्रुवारी १८८३.

## चित्रपट

**मासिक** संपादक — श्रीहरि विठोबा खेरडे. प्रकाशक — डी व्ही देशमुख, जीवनकला प्रकाशन, अमरावती. वा. व रु. ४८८ पु अं ८६. अंकात ३० ते ४० पृष्ठे ९'८ × ७'२. प्रथमांक — अक्टोबर नवंबर १९४९

उद्देश — चित्रपटाचे समाजावर होणारे परिणाम व त्याचे सामर्थ्य देशाला कसे उपयोगी होईल त्याचा विचार स्वरूप — अंजन, प्रश्न पूर्ती, नवलविशेष, नाव सुचवा चढाओढ, बक्षिसाचे प्रश्न, छायाचित्रे व व्यंगचित्रे, बोलपट परीक्षण इ.

## चिन्मय कृषीवल

**मासिक :** संपादक — वामन रामचंद्र गाडगीळ. प्रकाशक — रामचंद्र वासुदेव शेवडे, चित्रशाळा, पुणे. मुद्रक — चित्रशाळा छा पुणे वा. व. रु. ३८६. अंकात ३२ पृष्ठे. ९'२ × ६'२. प्रथमांक — जुलै १९३१.

उद्देश — ' शेतकी, उद्योगधंदे, व्यापार व संपत्तीच्या उत्पादनास, संवर्धनास व विनिमयास पोषक असे लहानमोठे धंदे, कला व हुन्नर याची माहिती ' पुरविणे. स्वरूप — सचित्र. ग्राम सुधारणा, लहान धंदे, कोरडवाहू व बागाईत शेती, देशी व परदेशी खते, पिकाचे रोग, किडी व अन्य शत्रू याचे निवारण, गुराची जोपासना, दूधदुभते, कोंबड्या, मेंढ्या, पक्षी, बकऱ्या इत्यादी पाळणे, ग्रामप्रचारक व शेतकरी याना उपयोगी.

ब्रीदवाक्य —

नसे आता थारा क्षणहि तुजला घोर विपदे ।
इथे भू गो सेवारति कृषिवळा धन्य पद दे ।
तियेने त्याना गे अमित धनधान्यादि मिळती ।
न आश्चर्य की ते धनकनमदान्धा न गणती ॥

विशेष माहिती — चिन्मय कृषीवल म्हणजेच पूर्वीचे ' महाराष्ट्र कृषीवल ' पुणे १९२२. चित्रशाळेचे नवे सचित्र मासिक.

[ चित्रशाळा ]

वर्ष १ — अंक १ ते १२. जुलै १९३१ ते जून १९३२.

वर्ष २ – अंक (१-२), ३ ते १२. जुलै १९३२ ते जून १९३३.

## चित्रमयजगत्

**मासिक :** संपादक – ऑगस्ट १९२७ (वर्ष १८ अं. ८) ते १९४८ – त्र्यंबक रघुनाथ देवगिरीकर; फेब्रुवारी १९३२ (वर्ष २३ अंक२) - राजाराम प्रल्हाद कानिटकर (१९३२ ते १९३४, १९४२ ते १९४४, व १९४९ पासून). प्रकाशक –रामचंद्र वासुदेव जोशी, चित्रशाळा, पुणे. मुद्रक – चित्रशाळा छा., पुणे. वा. व. रु. ३८४, जाड आर्टपेपर प्रत रु. ५.८८. फु. अं. ०४०६, जाड आर्ट पेपर ०८. अंकात १६ पृष्ठे. १३.८ × ९.४. प्रथमांक – जानेवारी १९१०. पुढे चालू १९६७.

उद्देश – विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी लावलेली न्यू इं. स्कूल, केसरी...ही झाडे वाढीस लागून त्यास सुंदर फळे येत आहेत, त्यापैकीच चित्रमयजगत हे एक फळ. त्या दृष्टीने चिपळूणकरांचे अवतारकार्य सफलण्यासाठी स्वभाषेची सेवा, स्वदेशसेवा, सत्यप्रीती व स्वावलंबनप्रीती इ. गुणांचे संवर्धन करणे. स्वरूप –(इलस्ट्रेटेड लंडन न्यूजच्या धर्तीवर) चित्रमय संकीर्ण लेख, धर्मविषयक लेख, प्रवासवर्णने, नाटकांची परीक्षणे, राष्ट्रीय स्वरूपाच्या लघुकथा, चालू कादंबऱ्या, आरोग्यविषयक व इतर शास्त्रीय लेख, कविता, पुस्तकपरीक्षणे, स्वराज्याचा लढा, चरित्रे, स्थलवर्णने, वर्तीक व सचित्र मार्मिक बातम्या व विनोदी चित्रे इ.

**ध्येयवाक्य –**

(वर्ष १ अंक १ ते १०)

मी वंदितो श्रीगणनायकासी।
विद्या अनिर्वाहि यदीय दासी॥
मवद्व मनासि होय विद्या।
पोंहो अमत्त्वास् सदा अविद्या॥

**विशेष माहिती** – वर्ष १ पहिले तीन अंक लगेच संपले. जानेवारीला पुन्हा छापून दिला. पुढचे लवकरच छापून रवाना करणार (अंक १२ पृ. २०२). सरकारकडून *जामिनकीची मागणी*– वर्ष २३ अंक १ लष्करी अंक. सर्व प्रती जप्त करून नेल्या व रु. ४००० ची जामिनकी मागितली. *आकार* – वर्ष ३४ अंक ३ (मा ४३) ते वर्ष ३५ अंक ४ (ए ४४) – १२.५ × ९.५; वर्ष ३५ अंक ५ (मे ४४) ते वर्ष ३६ अंक १२ (डि. ४५) – १३.८ × ९.४. वर्ष ३७ अंक १ ते ५ (जा ते मे ४६) - १०.५ × ८.२. वर्ष ३७ अंक ६ (जू ४६) – ते वर्ष ३८ अं २ (फे ४७) – १३.८ × ९.४. वर्ष ३८ अंक ३ मार्च १९४७ पासून १०.५ × ८.२. *खास व सरकारजप्त अंक* – वर्ष २ अंक १२ दिल्ली दरबार अंक; वर्ष ३ अंक १ दिल्ली दरबार अंक; वर्ष १८ अंक ८ चीन अंक; वर्ष १९ अंक ६ रशिया अंक, वर्ष २० अंक ६ आशिया अंक; वर्ष २१ अंक १ औद्योगिक हिंदुस्थान अंक; वर्ष २२ अंक ४ महात्मा गांधी अंक; वर्ष २३ अंक १ लष्करी अंक, अंक २ ना. के. बेहरे यांची कविता 'सप्तर्षी' (पृ. ७१) व अंक ३ संपादकीय स्फुट 'वीणा दास' (पृ. १५९) हे तिन्ही अंक सरकार जप्तीत; वर्ष २४ अंक १ जागतिक शांतता अंक; वर्ष २५ अंक १ जर्मनी अंक; वर्ष २६ अंक १ काँग्रेस सुवर्ण महोत्सव अंक, अंक १२ काँग्रेस अंक; वर्ष २७ अंक १ जपान अंक; वर्ष २८ अंक १ महाराष्ट्र काँग्रेस अंक, अंक ६ यूरोप अंक; वर्ष २९ अंक १ स्पेन अंक; वर्ष ३० अंक १ झेकोस्लोव्हाकिया अंक, वर्ष ३१, ३२, ३३, ३४, ३५ अंक १ महायुद्ध अंक, लागोपाठ ५ वर्षे, वर्ष ३६ अंक १ काशुकाका जोशी अंक; वर्ष ३७ अंक ८ काँग्रेस हीरक महोत्सव अंक (१९४६), वर्ष ३८ अंक १ स्वातंत्र्य अंक, अंक ८ ऑगस्ट स्वातंत्र्य महोत्सव अंक; वर्ष ३९ अंक १ ग्राम पुनर्रचना अंक, अंक ३ महात्मा गांधी निर्वाण खास अंक, वर्ष ४० अंक १ राज्यघटना विशेषांक, अंक ११ अन्नधान्य विशेषांक; वर्ष ४१ अंक १ भारताचे ध्येयदर्शन अंक, अंक ९ नाशिक काँग्रेस अंक.

[ चित्रशाळा ]

वर्ष १ व २ – अंक प्रत्येकी १ ते १२ (जा-डि). जानेवारी १९१० ते डिसेंबर १९११.

वर्ष ३ – अंक १, (२-३), ४ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१२.

वर्ष ४ ते १७ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९१३ ते डिसेंबर १९२६. (चौदा वर्षे). फक्त वर्ष १२ अंक (८-९) जोड अंक.

वर्ष १८ ते ४१ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९२७ ते डिसेंबर १९५०. (चोवीस वर्षे). खास अंकाची यादी विशेष माहितीत पहा.

## चित्ररेखा

**मासिक** : संपादक – म. व. वाझलवार. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. ६. अंकात ४८ पृष्ठे. ९'६ × ६'५. प्रथमांक – (१९३६-३७).

**उद्देश** – (जाहिरात १९३९) सिनेमा व्यवसायाच्या उत्कर्षाला वाहिलेले. *स्वरूप* – सचित्र.

**विशेष माहिती** – वर्ष १२ पासून मासिकात रूपांतर. वर्ष १ अंक १३ वा ३० अक्टोबर १९३७ चा दीपोत्सव अंक निघाला होता. वर्णन वर्ष १२ अंक (१-३) वरून.

[ मुमग्रं ]

वर्ष १२ – अंक (१-३) मार्च १९४८—

## चित्सदानंदलहरी

**मासिक** : प्रकाशक – बाबाजी अनंत प्रभु, तेंडुल्कर, मुंबई. फु अ. ८४. अंकात ४० पृष्ठे. १०'८ × ७'४. प्रथमांक – जानेवारी १८९२ (शके १८१३). शेवटचा अंक – (अक्टोबर १८९२!). (पुस्तक – अंक.)

**विशेष माहिती** – पोट मथळा "अथवा श्रीमद्भगवद्गीतेवर श्रीरंगनाथस्वामीकृत प्राकृत टीका" मगिरथ प्रयत्नाने मिळविलेली. अंक १० बरोबर समाप्त झाले.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ६ जानेवारी ते जून १८९२, ७ ते १० समाप्त. पृ. २ + ३९४ + २.

## चैतन्य

**द्वैमासिक / मासिक** : संपादक – वासुदेव शिवराम कोल्हटकर. प्रकाशक – संपादक, पुणे; *मुद्रक – आनंद मुद्रण मंदिर, पुणे.* वा. व. रु. २. फु.अं. ८६. अंकात ४० पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – चैत्र शु. १८५६. शेवटचा अंक माघ शु. १८६१.

**उद्देश** – मक्तिज्ञानवैराग्यादी तारक उपायांचे सुलभ रीतीने प्रतिपादन करून, स्वधर्मपरिपालनाविषयी *अंत:करणात चेतना उत्पन्न* करण्याचा प्रयत्न करणे व कीर्तनासारखी धर्मप्रचाराची उपकारक साधने अधिक लोकोपयोगी बनविणे. *स्वरूप* – सचित्र. हरिकथेला पोषक असे वक्तृत्व, आख्याने, पूर्वरंग, संगीत इ. विषय, स्वधर्म, सदाचार व चालीरीती यांची तत्त्वे विशद करणे; मौतिकशास्त्रदृष्ट्या वैदिक धर्माचे सनातन सिद्धान्त कसे अबाधित ठरतात याची चर्चा. चित्रे.

**ब्रीदवाक्य** –

(१) मुख्य हरिकथा-निरूपण।
दुसरे ते राजकारण ॥
तिसरे ते सावधपण।
सर्व विषयी ॥ – *समर्थ*

(२) अहो देवर्षिर्धन्योऽयं यत्कीर्तिं शार्ङ्गधन्वनः।
*गायन्माद्यन्निदं तन्त्र्या रमयत्यातुरं जगत् ॥*

**विशेष माहिती** – कीर्तनसंस्थेच्या कार्यालयाचे. *आकार* – वर्ष ३ पासून ९'३ × ६'४ वर्ष ५ – ९'६ × ७'२. वर्ष २ पासून

उद्बोधक विचार प्रदर्शित करणे. स्वरूप – सचित्र – आर्टपेपर पर्णेचित्रे. सर्वांगीण विषय.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते ५ जुलै ते नवंबर १९४१ + ६ मार्च १९४२.

## नवे जग

मासिक : संपादक – दि. वा. फडणवीस. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – न्यू एज प्रे. वा. व. रु. ५ (वर्ष २). फु. अं. ८८. अंकात ६४ पृष्ठे. १०·९ × ८·६; वर्ष २ अंक ३ – ८·३ × ५·३. प्रथमांक – अक्टोबर १९४८.

उद्देश – कम्युनिस्ट पक्षाचे – कामगार वर्गाच्या जागृतीसाठी – आपल्या जनतेसमोरील प्रश्नांची मार्क्सवाद - लेनिनवादाच्या भूमिकेवरून चर्चा करणे. लोकशाही व समाजसत्तावाद याच्या लढ्यात शास्त्रशुद्ध दृष्टिकोण आत्मसात करण्यास मदत करणे, लढ्यासाठी जनतेला सुसज्ज करणे.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ५ अक्टोबर १९४८ ते फेब्रुवारी १९४९ + (६ - ७),...९, (१० - ११), १२. एप्रिल ते अक्टोबर १९४९.

वर्ष २ – अंक १ नववर १९४९ ते ८, (९ - १०) आगस्ट १९५०—.

## नवे मन्वन्तर

मासिक : संपादक – कृ. ना. आठल्ये. प्रकाशक – हिराचंद गुलाबचंद मारवाडी, परिंचे (पुणे). मुद्रक – लॉ प्रिंटिंग प्रेस, पुणे. वा. व. रु. २. फु. अं. ∂३. अंकात २२ पृष्ठे. ८·४ × ५·५. प्रथमांक – जानेवारी १९१४. शेवटचा अंक – जून १९१५. (रूप-दर्शन).

उद्देश – स्वतंत्र विचार करण्याची व लिहिण्याची गोडी लागावी म्हणून नव्या व स्वतंत्र विचाराचे मासिक. स्वरूप – सचित्र – आर्टपेपर-पर्णेचित्रे.

ब्रीदवाक्य –

शारदा शारदांभोजवदना वदनाम्बुजे ।
सर्वदा सर्वदास्माकं सन्निधिं सन्निधिं क्रियात् ॥

विशेष माहिती – *आकार* – वर्ष २ अंक १ पासून ७·२ × ४·९. जून १९१५ नंतर पुढे 'केरळ कोकिळ आणि नवे मन्वंतर' अशा संयुक्त नावाने चालू. यातील 'कृष्णगीता' व 'मराठ्यांची धामधूम' (चालू कादंबरी) त्या संयुक्त मासिकात चालू राहिल्या.

[ मग्रं, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १, (२ - ३), ४ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९१४.

वर्ष २ – अंक १ ते ६ जानेवारी ते जून १९१५—.

## नागर शिक्षक

त्रैमासिक ? : संपादक – ग. म. घुले. प्रकाशक – संपादक, अहमदनगर. मुद्रक – हनुमान प्रेस, पुणे. वा. व. – रु. १॥८. अंकात ५६, ४८ पृष्ठे. ८ × ५·३. प्रथमांक – (जून १९२९)?

उद्देश – शिक्षणविषयक. स्वरूप – प्राथमिक वाल्वाङ्मय वगैरे. अभ्यासक्रम, सर्क्युलर्स, पोच आणि अभिप्राय.

विशेष माहिती – *संपादक व प्रकाशक* – ॲडमिनिस्ट्रेटिव्ह ऑफिसर. संपादक – वर्ष ४ – वि. द. घाटे, वर्ष ५ – ग. म. घुले; वर्ष ६ – प. रा. जव्हेरी. वर्ष ६ – 'सरकारी शाळाखात्याने शिक्षकांच्या लायब्ररीसाठी मंजूर केलेले'.

[ मुंमग्र ]

वर्ष ४ – अंक..., ३ फेब्रुवारी १९३२...

वर्ष ५ – अंक (१ जू. - २ अ) १९३३, ३ जानेवारी १९३४...

वर्ष ६ – अंक..., ४ एप्रिल १९३५.

## नाटकी

मासिक : प्रकाशक – शंकर गोपाळ पटवर्धन आणि कंपनी, पुणे. वा. व. रु. ३ आगाऊ. पु. अं. ८६. अंकात ४८ पृष्ठे. ८·५ × ५·१. प्रथमांक – जानेवारी १८९५.

स्वरूप – चाद्र नाटके, दशरूप या नाट्यविषयक ग्रंथाचे मूळ व संस्कृत टीका इ.

ब्रीदवाक्य –

न तज्ज्ञानं न तच्छिल्पं न सा विद्या न सा कला ।
नासौ योगो न तत्कर्म यन्नाटयेऽस्मिन्न दृश्यते ॥
– भरत

नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ॥
– कालिदास

विशेष माहिती – यात 'मीठ अथवा विमर्गीगर्वपरिहार', 'अपहृत सुशील', 'उत्तरल्यरित' अशी नाटके व 'दशरूप' संस्कृत मूळ व टीका.

[ दवापो, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १८९५, २ फेब्रुवारी १८९५—.

## नाट्यकथामाला

मासिक : संपादक – (सरकारी नोंद) नारायण गणेश मंडलिक. प्रकाशक – संपादक, पेण. मुद्रक – सुधाकर छापखाना, पेण. वा. व. रु. १८८ आगाऊ, रु. ३ मागाहून. बक्षिसाची योजना. पु. अं. ८५. अंकात प्रकरणवार ३२ पृष्ठे. ८·८ × ५·६. प्रथमांक – चैत्र शके १८०९. (पुस्तक-अंक).

उद्देश – अशा तऱ्हेची मासिके थोडी व त्यांची किंमत अमळ जबर. सर्वत्रास घेण्याची शक्ती नसते. ती अडचण दूर व्हावी म्हणून स्वल्प किंमतीत काढण्याचे योजिले. स्वरूप – यातील विषय उपपदधारी विद्वान व नामांकित ग्रंथकार यांजकडून लिहिले जातील. नाटके, संगीत नाटके, फार्सवजा, प्रहसने इ.

विशेष माहिती – अंकाच्या मलपृष्ठावर इंग्रजीत नाव व वर्णन – 'द मंथली मॅगेझिन कंप्रायझिंग द सीरीज ऑफ मराठी ड्रामाज, नॉव्हेल्स एट्सेट्रा एट्सेट्रा'. कालनिर्देश – पुस्तक १ अं. ६ पासून मलपृष्ठावर सनगणनेत निर्देश. इंद्रप्रहसन, स्थानिक स्वराज्यसिंधवादर्श, आधुनिक शिक्षणविचार नाटक, एकतर्फी शिक्षण प्रहसन, पुनर्विवाह विस्फोट नाटक, इत्यादी एकूण सुमारे २६ पुस्तके प्रसिद्ध झाली.

[ मुंमग्र, मंडलिकफर्डो ]

वर्ष १ ते ५ – अंक प्रत्येकी १ ते १२ (चै ते फा). चैत्र १८०९ ते फाल्गुन १८१३ (पाच वर्षे).

वर्ष ६ – अंक १ चैत्र १८१४ ते ११ माघ १८१४—

## नाट्यकथार्णव

मासिक : संपादक – (वर्ष १ अंक १० पासून पुढे) शंकर मोरो रानडे (व मालक). प्रकाशक – (पत्रव्यवहाराचा पत्ता) शंकर मोरो रानडे व नारायण व्यंकाजी खोत, मुंबई. मुद्रक – इंदुप्रकाश छा., मुंबई. वा. व. रु. ३ आगाऊ, रु. ४८८ मागाहून. पु. अं. ८६. अंकात प्रकरणवार २४ पृष्ठे. ९·७ × ६·६. प्रथमांक – चैत्र श. १८०१. (पुस्तक-अंक)

उद्देश – 'नाव्हल्स' व 'नाटके' यांच्या संबंधाने भ्रांतिमूलक समाजाचा निरास होऊन या मनोरंजनसाधनाचे वास्तविक स्वरूप व वास्तविक योग्यता कळावी, सदभिरुची जागृत व्हावी व काव्यामृतरसास्वादाविषयी अंतःकरणाची साहजिक प्रवृत्ती व्हावी. स्वरूप – संस्कृत व इंग्लिश ग्रंथांच्या आधारे महाराष्ट्राणीस रुचतील अशा 'नाव्हल्स' व 'नाटके' यांचा संग्रह, स्वकपोलकल्पित कथानके व नीतिवादाचे चुटके. अश्लीलता व नीतिमर्यादा दोष न येऊ देता कुलीन स्त्रियास वाचण्याजोगे.

**ब्रीदवाक्य –**

त्रैगुण्योद्भवमत्र लोकचरितं नानारसं दृश्यते ।
नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम् ॥
– मालविकाग्निमित्रे श्रीकालिदासः

स्फुरत्कलालापविलासकोमला करोति रागं हृदि कौतुकाधिकम् ।
रसेन शय्यां स्वयमभ्युपागता कथा जनस्याभिनवा वधूरिव ॥ – कादंबर्यां बाणः

**विशेष माहिती** – कथायटिंग ए सेरीज ऑफ मराठी ड्रामाज, नॉव्हेल्स एट्सेट्रा. मुद्रक – वर्ष २ अंक (९-१०) पासून नेटिव्ह ओपिनिअन प्रेस, मुंबई, वर्ष ३ अंक (५-६) आर्यभूषण, पुणे, अंक ७-८ नेटिव्ह ओपिनिअन, मुंबई, वर्ष ५ पासून आर्यभूषण, पुणे. *पुनर्मुद्रण* – वर्ष १ अंक १-२-३ (एकत्र). इ. १८८५ च्या सुमारास रानडे नोकरीसाठी बडोद्यास गेल्यावर मासिकाची पुढील जबाबदारी वासुदेव बाळकृष्ण केळकर यांनी अंगावर घेतली – 'ब्राह्मण' गौरव (डि. १९४६) वरून. वर्ष ५ पासून फार अनियमित.

[मुमग्रं]

वर्ष १ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८०१.
वर्ष २ – अंक १ ते ८, (९-१०),...(वर्ष दोनचा १२ – वर्ष ३ चा अंक १). चैत्र ते फाल्गुन १८०२ (व चैत्र १८०३).
वर्ष ३ – अंक , २, (३ ४), (५-६), ७ ते १२. (चैत्र) ते फाल्गुन १८०३.
वर्ष ४ – अंक + १, (२ ३), (४ ५), ६ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८०५.
वर्ष ५ – अंक (१ २) चैत्र-वैशाख १८०६, ३, ४, ५. प्रकाशन जुलै १८८८, ६ ते १२.
वर्ष ६ – अंक १, २, ३ प्र ३० मार्च १८९०, ४ ते ७, ८ आ १८९२ ते १२ डिसेंबर १८९२.
वर्ष ७ – अंक १ ते ३, (४ ५), ६ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८९३.
वर्ष ८ – अंक १ जानेवारी १८९४ ते ६ जून १८९४—

## नाट्यकथासंग्रह

**मासिक** : प्रकाशक – पुणे. मुद्रक – ज्ञानचक्षु छापखाना, पुणे. वा. व. रु. २८८, मागाहून ३४८. पृ. अं. ४५. ९.८ × ६ ५. प्रथमांक – भाद्रपद श. १८०८.

**उद्देश** – स्वकल्पित व युरोपातील नामांकित नाटककार व कादंबरीकर्ते यांच्या आधारे आमच्या चालीरीतीस अनुसरून उपदेशपर कथानके, चरित्रे, छापून आपल्या देशाविषयीच्या कळकळीचे बीजारोपण करणे. विद्येचा प्रसार, अज्ञानाचे ध्वंसन व समाजसुधारणा. आमचा देश, भाषा व तीतील ग्रंथ यास ऊर्जित दशेस आणणे. स्वरूप – नाटक, कादंबरी.

**ब्रीदवाक्य –**

हा नाट्यकथासंग्रह सर्वांहि प्रजास मान्य होवोनी ।
तोषवु आश्रयदात्या जेवि सुर तृप्त त्या सुधापानी ॥

**विशेष माहिती** – यात तारा शशांक नाटक, विजया नाटक, वीरपत्नी कादंबरी. लक्षणीय मासिक.

[मुमग्र]

वर्ष १ – अंक १ भाद्रपद १८०८—

## नाट्यकला

**मासिक** : संपादक – अनंत वामन बर्वे. प्रकाशक – संपादक, नाशिक मुद्रक – विद्याभूषण छा. नाशिक वा व रु १०४. पृ अं. ८२. अंकात १६ ते २० पृष्ठे. ६·७ × ४. प्रथमांक – एप्रिल १९०४

**उद्देश** – केवळ नाट्यासंबंधाने अनेक विषयांची चर्चा करून त्या कलेची इद्दूपरस्य अनेक उपयुक्त व मनोरंजक माहिती देणारे. स्वरूप – सचित्र, नटांची छायाचित्रे वगैरे कला व व्यवहार या दोन्ही दृष्टींनी चर्चा करणारे व इतर लेख, नाटके, नट, नाट्यशिक्षण, नाट्यवार्ता, नाटकमंडळ्या इ.

ब्रीदवाक्य –

( १ ) नट नाट्य फेंठे तुम्ही याचसाठी ।
 कवतुके दृष्टी नीववावी । – तुकाराम
( २ ) त्रिवर्गसाधनं नाट्यम् । – विष्णुपुराण

विशेष माहिती – मुद्रक – वर्ष २ - नेटिव ओपिनिअन प्रेस, मुंबई; वर्ष ३ – विद्याभूषण प्रेस, नाशिक. वार्षिक वर्गणी – वर्ष २ रु. १८२; फु. अं. ८१८६ नमुना. आकार – वर्ष २ – ६·७ × ४·९; वर्ष ३ – ७·७ × ५. जोडअंक – आरंभपृष्ठे निराळी. ब्रीदवाक्य – वर्ष १ अंक ६ वर क्रमांक ( १ ).

[ मुंमम ]

वर्ष १ – अंक १ एप्रिल १९०४ ते ६ स, ७ नवंबर १९०४ ..
वर्ष २ – अंक + १ ते ५, ( ६-७ ), ८ ते १२. अक्टोबर १९०५ ते सप्टेंबर १९०६.
वर्ष ३ – अंक + ( १ न - २ डि ). १९०६.
वर्ष ४ – अंक + १ अक्टोबर १९०८ ते ८ मे १९०९—

## नाट्यमाला

मासिक : संपादकमंडळ – परीक्षक कमेटी. प्रकाशक – विवल्कर, कोकणे आणि मंडळी, रत्नागिरी. वा. व. रु. १८८. फु. अं. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ८·२ × ५. प्रथमांक – चैत्र शु. १ श. १८२७.

उद्देश – नावाजलेल्या लेखकांची नाटके छापणे.

विशेष माहिती – ' कमेटीकडून परीक्षा करवून छापणार ' असे प्रथम निवेदन, परंतु पुढे दोन्ही अंकांत नावे नाहीत. यात संगीत उत्तररामचरित, प्रोज पृथ्वीराज चव्हाण, संगीत कदलीगर्भा, प्रोज वीरवाण अशी नाटके.

[ मुमम ]

– अंक १ ते ८ चैत्र ते कार्तिक १८२७–

## नादनिनाद

मासिक : संपादक – शं. बा. भोसले, मा. द. पाटील. सहसंपादक – मा. रा. वैद्य. प्रकाशक – माधव द. पाटील, कोल्हापूर. अंकात ४० पृष्ठे. ९·४ × ७·४. प्रथमांक – नवंबर १९४७.

उद्देश – उदयोन्मुख लेखकांचे अभिनव. स्वरूप – कविता, गोष्टी इ.

[ सातारा मटगार ]

वर्ष १ – अंक १ नवंबर १९४७ दिवाळी अंक.

## नानालहरी

मासिक : प्रकाशक – नारायण हरि पतकी ( व्यवस्थापक ), गडहिंग्लज ( कोल्हापूर ). वा. व. रु. ०९. अंकात १२ पृष्ठे. ६·६ × ४. प्रथमांक – जानेवारी १८९७.

उद्देश – विद्वज्जनाश्रित, मनोरंजक, लोकप्रिय.

ब्रीदवाक्य –

जे जे काही पाहिजे । ते ते तत्काळचि दीजे ।
अत्यंत आवडी कीजे । सकळ सेवा ॥ –रामदास.

[ मुमपं ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १८९७,...५, ६.
वर्ष २ – अंक ( २ मार्च – ३ ए ) १८९८, ...,६ जुलै १८९८—.

## नापितोदय

मासिक : संपादक – वि. पों. कार्लेकर. प्रकाशक – नवीन गोवा. मुद्रक – छापखाना मिनर्व सत्राण. वा. व. रु. १. अंकात १६ पृष्ठे. ७·१ × ४·८. प्रथमांक – जुलै १९२१. ( दर्शन - किरण )

उद्देश – गोमांतकातील नापित समाजाच्या शिक्षणविषयक, सांपत्तिक, नैतिक, शारीरिक ऱ्हासाची कारणे विशद करणे व समाजाची उन्नती करणे.

ब्रीदवाक्य –

विश्वासी निर्धार। विस्तारील विश्वंभर॥
अज्ञानी रुळले, रुढीस मुलले, दुर्मार्गि जे गुंतले।
दारिद्रे पिडिले, जगास मुकले, त्या पाहिजे बोधिले।
या कार्यास्तव नापितोदय असे हा ज्ञानसूर्यापरी।
सेवा ज्ञानसुधा सुधारुनि जगा जी मानवा उद्धरी॥

[ गोहिंअ मुंबई, सरस्वतीमदिर पणजी ]

वर्ष १ – अंक १ जुलै १९२१ ते १२ जून १९२२.

## नाभिक – समाचार

**मासिक :** सपादक – बळवंत मोरेश्वर क्षीरसागर. सहसपादक – (वर्ष २) वासुदेव बाबाजी महाले. प्रकाशक – सपादक, मुंबई. वा. व. रु. १०८, वर्ष ६ रु. २०८. फु. अं. ०२. अंकात २० पृष्ठे. ८·३ × ५·५. प्रथमाक – एप्रिल १९४१.

**उद्देश** – समाजाच्या जागृतीसाठी. महाराष्ट्रातील नाभिक समाजाचे मुखपत्र. स्वरूप – सचित्र.

ब्रीदवाक्य –

स्वयेच स्वत:स उद्धरी।
उपेक्षा स्वत:ची न कधी करी॥

**विशेष माहिती** – सपादक – वर्ष १ अंक ६ – डा. सौ. अंजना मगर; वर्ष ४ – शामराव सतराम काळे.

[ मडगाव, पणजी, मुंबई ]

वर्ष १ व २ – अंक प्रत्येकी १ ते १२ (ए ते मा). एप्रिल १९४१ ते मार्च १९४३. (दोन वर्षे).

वर्ष ३ – अंक २ एप्रिल १९४३ ते ६ सप्टेंबर १९४३.

वर्ष ४ – अंक...(४ जु - ५ आ) १९४४, ६, (७ - ८),...(१० जा - ११ फे) १९४५, १२ मार्च १९४५.

वर्ष ५ – अंक (१ - २), ३ ते ६, (७ - ८), ९, (१० - ११) एप्रिल १९४५ ते फेब्रुवारी १९४६...

वर्ष ६ – अंक (१ ए - २ मे) १९४६—

## नाभिकोदय

**मासिक :** सपादक – महादेव गोविंद पालकर, (वर्ष २) बळवंत मोरेश्वर क्षीरसागर. प्रकाशक – सपादक, परळ मुंबई. वा. व. रु. १०८. अंकात १६ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमाक – आगस्ट १९२९.

**उद्देश** – न्हावी ज्ञातीच्या उन्नत्यर्थ झटणारे.

ब्रीदवाक्य –

अज्ञानी रुळले रुढीसि मुलले दुर्मार्गि जे गुंतले।
दारिद्र्ये पिडिले, जगास मुकले, त्या पाहिजे बोधिले॥
या कार्यास्तव नाभिकोदय असे हा ज्ञानसूर्यापरी।
सेवा ज्ञानसुधा सुधारुनि जगा जी मानवा उद्धरी॥
स्वहित साधावे बरे (भले)। जैसे आपणासि कळे॥

– सत सेना

[ पणजी ]

वर्ष १ – अंक १ ते १२. आगस्ट १९२९ ते जुलै १९३०.

वर्ष २ – अंक १ आगस्ट १९३० ते १० मे १९३१.

वर्ष ३ – अंक... २ सप्टेंबर १९३३, ३,...५, ...७, ८—.

## नामदेव

**मासिक :** सपादक – नीलकंठ रघुनाजी सुबध. सहसपादक – (वर्ष १६) पायगूळ सावळाराम भ्याडे. प्रकाशक – सपादक, पुणे. मुद्रक – इंदिरा छापखाना, पुणे. वा. व. रु. १. अंकात १६ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमाक – अक्टोबर १९०९.

**उद्देश** – 'नामदेव समाजोन्नति परिषदे'च्या मुख्य हेतूस अनुसरून सामाजिक, धार्मिक,

औद्योगिक, शिक्षणप्रसारादी विषयांची चर्चा करून तद्द्वारा समाजोद्धार करणारे शिंप्यांचे पत्र. *स्वरूप* – नामदेव समाजाची लोकसंख्या, लोकस्थिती, हित-संबंध, उद्योगधंदे, सांपत्तिक स्थिती वगैरे गोष्टींचा दखल करणारे लेख. चरित्रे, निबंध, नामदेव पेशापंद, मंदिर व पायरी, वर्तमानसार अशी सदरे.

ब्रीदवाक्य –

(१) कलौ मन्दबुद्धीन् निजानुग्रहेण ।
समुद्धर्तुकामो भवाब्धेरगाधात् ॥
शिंपी योऽवतीर्णो महाभक्तमुख्यः ।
समार्थैर्युतस्तं भजे नामदेवम् ॥

(२) हिताचिया गोष्टी सांगू एकमेकां ।
शोक मोह दुःखा निरसू तेणे ॥ १ ॥
एकमेकां करू सदा सावधान ।
नामी अनुसंधान तुटो नेदू ॥ २ ॥
– नामदेव

(३)
साधू श्रेष्ठचि नामदेव भवचे चारित्र्य ते जाणुनी ।
प्रेमाने जन-ईश ही सतत की, सेवा करू या जनीं ॥
उद्योगे बहु उन्नतीगिरिशिरी जाऊ चला सत्वरी ।
आनंदे मिळुनी तिथे सकल्ही राहू यशो मंदिरी ॥ १ ॥

(४) म्हणोनि जे उचित । आणि अवसरे करूनी प्राप्त । ते कर्म हेतूरहित । आचरे पार्था ॥ १ ॥
– श्री ज्ञानेश्वरी

विशेष माहिती – *आकार* – वर्ष १ अंक ४ व ५ चा फक्त ७·२×४·२. *संपादक व प्रकाशक*– वर्ष ४ अंक २ पासून दामोदर बळवंत सुर्द; वर्ष ४ अंक ५ पासून बाबूराव आत्माराम बाचल, वर्ष ६ अंक १२ पासून र. ह. भाळुकर; वर्ष ८ शेवटचा अंक शंकर विठोबा आकोलकर, वर्ष १२- रामचंद्र हरी मिरजकर (सातारा). *संचालक* – वर्ष २५ वसंत रामचंद्र म्हेत्रस. *संपादक* – वर्ष १६ – गणपत अण्णाजी कारजकर; वर्ष १८ बगाडे; वर्ष २१ – राजाराम तुकाराम बगाडे (प्रका.), कोल्हापूर; वर्ष २३ – बाळकृष्ण सावळाराम बारटक्के; वर्ष २५ – गो. रा. म्हेत्रस, सोलापूर; वर्ष ३८ – दत्तात्रय बळवंत मुतकर (प्रका.); वर्ष ३८ अंक ८ – रामचंद्र तुकाराम कापडे. *मांडणावळ* – वर्ष १ पासून क्रम (१) व (२) दोन्ही; वर्ष ८ अंक ५ पासून फक्त क्रमांक (२); वर्ष १२ पासून फक्त क्रमांक (३); वर्ष २३ पासून फक्त क्रमांक (४). *स्थलांतर* – चैत्र १८४१ (वर्ष ८ अंक ५) पासून मुंबईत प्रसिद्ध होऊ लागले. तेथपासून नवे ८ वे वर्ष धरले. *वा. वर्गणी* – वर्ष २१ रु. १-१२; वर्ष २३ - रु. १-८; वर्ष २६ - रु. २-४. *वर्षगणना* – वर्ष ३१ ते वर्ष ३४ ही चार वर्षे वगळून वर्ष ३० नंतर एकदम वर्ष ३५ असा निर्देश केला. तसे करण्याचा उद्देश मध्यंतरीचा खंड सांधून देऊन आरंभकालाशी थेट मेळ घालण्याचा दिसतो.

[ जग्रं, मुंमग्रं, पुमग्रं, मग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १०, (११ - १२). अक्टोबर १९०९ ते सप्टेंबर १९१०. अंक (११ - १२) नामदेव समाजोन्नतिपरिषद, बैठक ४, मिरज, खास अंक.

वर्ष २ – अंक १ ते ६, (७ - ८), ९ ते १२. अक्टोबर १९१० ते सप्टेंबर १९११. अंक (७ - ८) नामदेव समाजोन्नति परिषद, बैठक ५, इचलकरंजी.

वर्ष ३ – अंक + (१ - २), ३ ते ५, (६ - ८), ९ ते १२. डिसेंबर १९११ ते नवंबर १९१२.

वर्ष ४ – अंक १ डि १९१२ + (२ - ३) जू १९१३, ४ जु १९१३, + ५ मे १९१४, ६ जू १४, ७ जु, ८ आ, ९ आ, १० स, ११ अ, १२ नवंबर १९१४.

वर्ष ५ – अंक १, (२ - ३), (४ - ५), (६ - ७), ८, (९ - १०), (११ - १२). पौष १८३६ ते मार्गशीर्ष १८३७.

वर्ष ६ – अंक + १ चैत्र १८३८, २ वै ३८, + ३ फा ३८, ४ चै ३९ ते १२ कार्तिक १८३९. चैत्र १८३८ ते कार्तिक १८३९. अंक ९ अधिक भाद्रपद.

वर्ष ७ – अंक १ ते ४, (५ - ६), ७ ते १०, (११ - १२) पुढच्या वर्षाच्या जोड अंकात. मार्गशीर्ष १८३९ ते कार्तिक १८४०.

वर्ष ८ – अंक ( १ मा ४ फा ) १८४० मागील वर्षाच्या अंक ११ १२ समवेत, ५ चैत्र, १८४१, ( ६ ७ ), ( ८ ९ १० ), ( ११ १२ ) माघ फाल्गुन १८४१

वर्ष ९ – अंक १ चै १८४२, ( २ वै ३ ज्ये ), ( ३ ज्ये ४ आ ), ( ५ ६ ), ( ७ ८ ) ( ९ - १० ), ( ११ मा १२ फा ४२ ) चैत्र ते फाल्गुन १८४२

वर्ष १० – अंक ( १ चै २ वै ३ ज्ये ) १८४३, ( ४ ५ ), ( ६ ७ ), ८, ( ९ मा १० पौ ) १८४३ अंक ( ९ १० ) नामदेव समाजोन्नतिपरिषद १५वी हुबळी

वर्ष ११ – अंक १ चैत्र १८४४ ते ८ कार्तिक ४४ अंक ७ अश्विन के आत्माराम नारायण बनारसे सगुणसमुच्चय

वर्ष १२ – अंक १ ते १२ चैत्र ते फाल्गुन १८४५.

वर्ष १३–१४ – अंक प्रत्येकी १ ते १२ ( चै ते फा ) चैत्र १८४६ ते फाल्गुन १८४७ ( दोन वर्षे )

वर्ष १५ – अंक १ अधिक चैत्र १८४८ ते ११ पौष १८४८—

वर्ष १६ – अंक ( १ २ ) चैत्र १८४९, ( ३ ४ ), ( ५ ६ ) भाद्रपद १८४९

वर्ष १७ – १८ – अंक + १ ते १२ श्रावण १८५० ते आषाढ १८५२ ( दोन वर्षे )

वर्ष १९ – अंक १ ते ४, ( ७ ८ ), ९ ते १२, १३ श्रावण १८५२ ते ( अ आषाढ धरून ) आषाढ १८५३ १३ अंक

वर्ष २० – अंक १ ते ५, ( ६ ७ ), ८ ते १२ श्रावण १८५३ ते आषाढ १८५४

वर्ष २१ – अंक १ ते ७ श्रावण ते माघ १८५४ + ( ८ ९ ), १०, ११ आ ते अ १८५५ + १२ पौष १८५५

वर्ष २२ – अंक + १ फाल्गुन १८५५

वर्ष २३ – अंक + १ ते ११, ( १२ फा ५७ १ वर्ष २४ चा ) चैत्र १८५७ ते चैत्र १८५८

वर्ष २४ – अंक २ वैशाख १८५८ ते ४, ( ६ ७ ), ( ८ ९ ), ( १० ११ ), १२ फाल्गुन १८५८ अनियमित अंक ( ८ ९ ) श्रीमत लाडके हीरक महोत्सव, अंक ( १० ११ ) परिषद अंक

वर्ष २५ – अंक + १ नवबर, २ डिस १९३७ + ३ ते १२ मार्च ते डिसेंबर १९३८

वर्ष २६ – अंक १ जानेवारी १९३९, ( २ ३ ), ४ ते ९, ( १० - ११ ) नवंबर १९३९ अंक ( १० ११ ) लाडके खास अंक

वर्ष २७ – अंक १ ते १२ जानेवारी ते डिसबर १९४० अंक ११ बागडे अंक

वर्ष २८ – अंक १ जानेवारी १९४१ ते ४ ११, १२ डिसबर १९४१ अंक ४ साहित्य संमेलन विशेषांक

वर्ष २९ – अंक १ ते १०, ( ११ १२ ) जानेवारी ते डिसबर १९४२

वर्ष ३० – अंक ११ नवबर १९४३, १२ डिसबर १९४३

वर्ष ३५ – अंक १ जानेवारी १९४४, ३, ४ ९, ( १० ११ ), १२ डिसेंबर १९४४

वर्ष ३६ – अंक ( १ २ ), ३, ( ४ ५ ), ( ६ ७ ), ८, ९, ( १० ११ ), १२ जानेवारी ते डिसबर १९४५ अंक ( १ २ ) परिषद विशेषांक, अंक ( १० ११ ) दिवाळी अंक

वर्ष ३७ – अंक ( १ २ ), ३, ( ४ ५ ), ६, ७, ( ८ ९ ), १०, ( ११ १२ ) जानेवारी ते डिसेंबर १९४६ अंक १० दिवाळी अंक

वर्ष ३८ – अंक ( १ जा – २ फे ) १९४७ + ३ डि ४७, ४, ( ५ ६ ), ७ ए १९४८ + ८ जून १९४८ ते ११ सप्ट बर १९४८ अंक ८ परिषद अंक

वर्ष ३९ – अंक...२ डिसेंबर १९४८

## नामदेवसेवक

**मासिक** : संपादक – अनंत गणेश माढरे. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – हरिभाऊ गणपतराव माढरे, मनोहर प्रि. प्रेस, पुणे. अंकात १६ पृष्ठे. ८·४ × ५·५. प्रथमांक - फाल्गुन श. १८४७.

**उद्देश** – ज्ञातिविषयक. स्वरूप – परमार्थ - संग्रह ( अवतरणे ), परिषदा, सभा, ज्ञातिवृत्त, वर्तमानसार, नामदेवपायरी फंड इ.

**ब्रीदवाक्य** –

उद्यम. साहस धैर्य बुद्धिः शक्तिः पराक्रमः ।
षडेते यत्र वर्तन्ते तत्र देवः सहायकृत् ॥

**विशेष माहिती** – पूर्वीचे ' सहकारी नामदेव ' पुणे श. १८४७ – कायद्याच्या अडचणीमुळे पाचव्या अंकापासून नामांतर.

[ मुंमग्रं ]

**वर्ष १** – अंक ( सहकारी नामदेव १ ते ४ ), ५ फाल्गुन १८४७, ६ चैत्र १८४८, ( ७ वै - ८ ज्ये ) १८४८–

## नामदेवसेवक

**मासिक** : संपादक – रणजित बुधकर. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – प्रदीप प्रिंटिंग प्रेस, दादर. वा. व. रु. ४. फु. अं. ८६. अंकात १४ पृष्ठे. १०·९ × ८·६. प्रथमांक – ( जानेवारी १९४८ ).

**उद्देश** – श्रीनामदेवमहाराजांच्या साहित्याचा उद्धार व्हावा व त्यांच्या नावाने ओळखल्या जाणाऱ्या अनुयायी वर्गाची सामाजिक, औद्योगिक व शैक्षणिक सुधारणा व्हावी. स्वरूप – नामदेव ज्ञातिविषयक – समाजसमाचार, चित्रपट व रंग भूमी, ललितकला मंदिर इ.

**ब्रीदवाक्य** –

एकनेका करू सदा सावधान ।
नामी अनुसंधान तुटो नेदू ॥

–श्रीनामदेव

**विशेष माहिती** – वर्णनातील तपशील अंक २ चा.

[ मुंमग्रं ]

**वर्ष १** –(अंक १ जानेवारी १९४८), २ एप्रिल १९४८ ( =बापूजी विशेषांक ).

## (श्री)नारद

**त्रैमासिक** : संपादक – धरणीधर बापुशास्त्री गुर्जर. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – हेरंब बापु गुर्जर, आयुर्विद्या मुद्रणालय, पुणे. वा. व. रु. १·४. फु. अं. ८६. ८·५ × ५·४. प्रथमांक – अश्विन श. १८६२. शेवटचा अंक – ( पौष १८६९ ? ).

**ब्रीदवाक्य** –

( १ ) नामसंकीर्तनं यस्य सर्वपापप्रणाशनम् ।
*प्रणामो दुःखशमनस्तं नमामि हरिं परम् ॥*

–भागवत.

( २ ) कीर्तनें वाचा पवित्र ।
कीर्तनें होय सत्पात्र ।
कीर्तनें प्राणिमात्र ।
सुशील होती ॥

–रामदास

**विशेष माहिती** – श्रीहरिकीर्तनोत्तेजक सभा, पुणे व अखिल भारतीय कीर्तन संस्था, मुंबई यांच्या विद्यमाने चालविलेले त्रैमासिक. ' शके १८७० चैत्र शुद्ध प्रतिपदेपासून श्रीनारद त्रैमासिकाचे मासिक बनविणार आहो ' – वर्ष ६ अंक २ – पृ. २ - ३ . *पाक्षिक पर्वणी* – वर्ष ६ क. २.

[ मुंमग्रं ]

**वर्ष १** – अंक १ अश्विन १८६२, २ पौ, ३ चै १८६३, ४ आ १८६३.

**वर्ष २** – अंक १, २, ३, ४. अश्विन १८६३ ते आषाढ १८६४.

वर्ष ३ – अंक १, (२-३), ४. अश्विन १८६४ ते आषाढ १८६५.

वर्ष ४ – अंक १, २, ३, ४. अश्विन १८६५ ते आषाढ १८६६. अंक २ वै. भिल्वडीकर खास अंक.

वर्ष ५ – अंक (१-४). अश्विन १८६६ ते आषाढ १८६७

वर्ष ६ – अंक ..., २ पौष १८६९—.

## नाशिक धर्मप्रान्त

**मासिक :** संपादक – रे. दि. रा. आठवले. प्रकाशक – संपादक, एन. डी. कमिटीकरिता, भुसावळ. वा. व. रु. १८४. अंकात १२ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – (अक्टोबर १९३०).

**विशेष माहिती** – इंग्रजी मथळा – 'नाशिक डायोशीझन मॅगेझीन'. वर्ष ११ व वर्ष १२ असा स्पष्ट वर्षक्रमांक सिवा अंकक्रमांक याचा निर्देश आढळत नाही.

[ मग्रं ]

वर्ष ७ – अंक ... ११ आगस्ट १९३७, १२ सप्टेंबर १९३७.

वर्ष ८ – अंक १ ते १२. अक्टोबर १९३७ ते सप्टेंबर १९३८.

वर्ष ९ – अंक १ ते ७, (८-९), १० ते १२. अक्टोबर १९३८ ते सप्टेंबर १९३९.

वर्ष १० – अंक १...३ ते ५, (६-७), ८, ९...१२. अक्टोबर १९३९ ते सप्टेंबर १९४०.

(वर्ष ११) – अंक...डि १९४०, फे १९४१, मा, ए,... जु, आ, सप्टेंबर १९४१ (? अक्टोबर १९४० ते सप्टेंबर १९४१).

(वर्ष १२) – अंक अक्टोबर १९४१, न, डि, + (फे-मा). (? अक्टोबर १९४१ ते मार्च १९४२)—

## निजामशालापत्रक

[ पाहा (श्री) शारदामंदिर अथवा निजाम शालापत्रक ]

## निबंधचंद्रिका

**मासिक :** संपादक – (सरकारी नोंद) रामचंद्र भिकाजी जोशी. प्रकाशक – शंकर सदाशिवशेट शेटये, पुणे. मुद्रक – बकुल छापखाना, रत्नागिरी. वा. व. रु. २८८. फु. अं. ८४. अंकात ३२ पृष्ठे. ८·६ × ५·८. प्रथमांक – जानेवारी १८८३. शेवटचा अंक – डिसेंबर १८८६. वर्षवार विभागणी नाही. अंकावर सन व महिना फक्त.

**उद्देश** – निबंधमाला व शास्त्रीबुवा यांचे स्मारक. निबंधमालेची जागा भरून काढणे. राजकीय विषयावर एकेक निबंध हे अपूर्वत्व. कालानुरूप बदल. देशबंधूस माहीत नाहीत अशा विषयाचे ज्ञान करून देऊन जिज्ञासा व शोधक बुद्धी जागृत करणे. एखाद्या विषयाच्या सर्व बाजू समजतील असे करणे. इतिहासविषयक चर्चा. स्वरूप – धार्मिक, सामाजिक व राजकीय विषयावर विस्तृत लेख, मनोरंजक माहिती, विनोदमहदाख्यायिका, सुभाषित, नवीन कविता, विस्तारपूर्वक परीक्षणे, चरित्रे, ऐतिहासिक पत्रे.

**ब्रीदवाक्य** –

विरम तिमिर साहसादमुष्माद्
यदि रविरस्तमितः स्वतस्ततः किम् ।
कलयसि न पुरो महामहोर्मिर्
द्युतिनिधिरभ्युदयत्ययं शशांकः ॥

– शार्ङ्गधरः

**विशेष माहिती** – मुद्रक – अंक २२ पासून ज्ञानप्रकाश छा., पुणे. *विषयाची जंत्री* – सर्व ४८ अंकांतील आलेल्या विषयाची वर्गीकृत यादी ४८ व्या अंकात शेवटी पृ. ३३-३८. अंक (४७-४८) मध्ये 'शेवटचे दोन शब्द'–

पुस्तक ५८ केल्याचा उल्लेख ( पत्ता – निबंध-चंद्रिकाकर्ते, न्यू इंग्लिश स्कूल, पुणे ) वर्गणीदारांकडून मागणीची पत्रे आली म्हणून हे पुस्तक १८८७ सालापासून 'मनोरंजन' मासिक पुस्तकाशी सामील केले 'मनोरंजन आणि निबंधचंद्रिका' पाहा.

[ मुमग्र, पुमग्र, जम ]

अंक १ ते ५, ( ६ - ७ ), ८, ९, ( १० ११ ), १२ जानेवारी ते डिसेंबर १८८३

अंक १३ ते १७, ( १८ - १९ ), २० ते २४, जानेवारी ते डिसेंबर १८८४.

अंक ( २५ २७ ), २८ ते ३०, ( ३१ - ३३ ), ३४ ते ३६ जानेवारी ते डिसेंबर १८८५

अंक ३७ ते ४६, ( ४७ ४८ ) जानेवारी ते डिसेंबर १८८६

## निबंधमाला

मासिक संपादक – ( स्वतः ) विष्णु कृष्ण चिपळोणकर प्रकाशक – संपादक, पुणे मुद्रक – आबाजी कृष्ण गोखले, ज्ञानप्रकाश छा, पुणे वा. व. रु आगाऊ २॥८, मागाहून रु ३ फु अ ८४ अंकाव ३२ पृष्ठे ७ १ × ४ ८ प्रथमांक – २५ जानेवारी १८७४ शेवटचा अंक – डिसेंबर १८८१ ( प्रकाशन ता १ एप्रिल १८८३ ) ( एकूण अंक ८४ )

उद्देश – मुख्यत भाषाशोधन व त्याबरोबरच मनोरंजन व बोध, बहुश्रुत करणे विद्यालयांत शिक्षणाच्या अभावी ज्यास ज्ञानाचा मार्ग खुला नाही त्यास संस्कृत व विशेषत इंग्रजी भाषेतील अगाध ज्ञान पाट फोडून आपल्या भाषेकडे वळवून देणे सदभिरुचीचा प्रसार वाचनाची गोडी लावणे स्वरूप – निबंध, प्राय मराठी भाषा, देश स्थिती, लोकाचार, वगैरेसंबंधी चर्चा अवकाशानुसार इतिहासादि शास्त्रीय विषय शिवाय उत्कृष्ट ग्रंथकाराचे उतारे, सुभाषित, विनोदपर चुटक, महदाख्यायिका इ ग्रंथसादृश्य, भाषापरिज्ञान, चमत्कारिक माहिती, साहित्य ( अलंकार ), पत्रव्यवहार इ

ब्रीदवाक्य –

( प्रत्येक अंकावर विषयानुरूप वेगवेगळा श्लोक )

विशेष माहिती – *प्रत्यक्ष प्रकाशनाची तारीख* – अंक २७ पासून प्रत्येक अंकावर दर्शनी मुखपृष्ठाच्या शेवटी प्रत्यक्ष प्रकाशनाची तारीख *पुढच्या अंकाची किंमत* – अंक १७ – 'दर अंकावर पृष्ठाच्या मानाने किंमत असते.' अंक १ वर ८२ *आकार* – अंक २७ पासून ७'८ × ५'१. *पृष्ठसंख्या* – अंक १–पृ २०, अंक २ ते २४–पृ ३६; अंक २५ पासून पृ ३२ *मुद्रक* – अंक ६१–शिळाप्रेसवाले छा, अंक ६९ – आर्यभूषण छा शेवटच्या अंकात उपसंहार 'दुराग्रहांचे खंडन करून खरोखर समज करावे' हा जो दुर्मत व्यसनात्मक 'मनोरथ होता त्याचे साफल्य झाले,' म्हणून यद पुढे 'ग्रंथमाला' हाती घेण्याचा संकल्प होता

[मुमग्र, मग्रमन्डळ मुंबई, चित्रशाळा, डेक्कॉ, मग्राप]

वर्ष १ – अंक १ ते १२ जानेवारी ते डिसेंबर १८७४.

वर्ष २ – अंक १३ ते २४ जानेवारी ते डिसेंबर १८७५ ( अंक २४ चे प्रकाशन १ फे १८७६ )

वर्ष ३ – अंक २५ ते ३६ जानेवारी ते डिसेंबर १८७६ ( अंक ३६ चे प्रकाशन २४ फे १८७७ )

वर्ष ४ – अंक ३७ ते ४२, ( ४३ ४५ ), ४६ ते ४८ जानेवारी ते डिसेंबर १८७७. ( अंक ४८ चे प्रकाशन ६ जुलै १८७८ )

वर्ष ५ – अंक ४९, ५०, ( ५१ ५२ ), ५३, ( ५४ ५६ ) ( ५७ ५९ ), ६० जानेवारी ते डिसेंबर १८७८ + ( शेवटच्या अंकात १८७९ साल गाळणार अशी सूचना)

वर्ष ६ – अंक ६१ ते ६८, ( ६९ ७१ ), ७२. जानेवारी ते डिसेंबर १८८०

वर्ष ७ – अंक ७३, ७४, ( ७५ ७८ ), ७९, ( ८० ८२ ), ( ८३ ८४ ) जानेवारी ते

डिसेंबर १८८१. ( अंक ८२ चे प्रकाशन ३० एप्रिल १८८२, अंक ८४ चे १ एप्रिल १८८३ ).

## निबंधशृंगार

**मासिक** : संपादक – बळवंत अण्णा रद्दुड्डु प्रकाशक संपादक – ( म्यानेजर ), पुणे. मुद्रक – ज्ञानचक्षु, पुणे, ( अंक २ ) पुना सिटी प्रेस, पुणे. वा. व. रु. ३. फु. अं. ८६. अंकात सलग मु. ३२ पृष्ठे. ८'३ × ५'३. प्रथमांक – जुलै १८७८. ( पुस्तक अंक ).

**उद्देश** – देशसुधारणेवर व पुष्कळ उपयुक्त विषयावर निबंध. स्वरूप – निबंधमालेचे अनुकरणरूप – निबंध, पद्य, स्थलवर्णन, चरित्र, इ. सर्वांगे, भाषापरिज्ञान, पत्रे.

**ब्रीदवाक्य** —

अंक १ – मैत्री हि लोकाभ्युदयाय तादृशाम् ।
अंक २ – मो वाचका. सुमार्गमनुसरत ।

[ मग्र, मुमग्र ]

**वर्ष १** – अंक १ जुलै १८७८, २ ऑगस्ट १८७८.

## निराश्रित हिंद नागरिक

**मासिक** : संपादक – किसन फागू महार बनसोडे पाटील, प्रकाशक – संपादक, मोहपा ( नागपूर ). वा. व. रु. १. अंकात १२ पृष्ठे. ७ ९ × ५'२. प्रथमांक – जून १९१३.

**उद्देश** – अस्पृश्य वर्गाच्या उन्नतीसाठी झटणारे.

**ब्रीदवाक्य** –

जेथ सत्कर्मे समता वसती ।
स्त्रीपुरुष प्रेमे नांदती ।।
सत्वरक्षणे धार्मीय जागृती ।
त्या नाव सुधारणा ।।

**विशेष माहिती** – इंग्रजी मथळा – 'डिप्रेस्ड् क्लासिस गॅझेट '

[ आप्टे ]

**वर्ष १** – अंक १ जून १९१३, २ जु, ३ आगस्ट १९१३.

## ( ख्रिस्ती ) निरीक्षक

**मासिक** : संपादक – अनंत विश्राम मकासरे. सहसंपादक – ( वर्ष १२ ) शाहू दगडोबा उजगरे. प्रकाशक – मायपळा, मुंबई. मुद्रक – चकुल आर्ट प्रि. प्रेस. वा. व. रु. ०१२. फु. अं. ८१. अंकात ८ पृष्ठे. ९'६ × ७'२. प्रथमांक – ( मे १९३८ ).

**उद्देश** – महाराष्ट्र ख्रिस्ती जनतेचे आवडते.

**विशेष माहिती** – नामांतर – पहिली दोन वर्षे नाव ' ख्रिस्ती निरीक्षक ' किंवा इंग्रजीत ' ख्रिश्चन ऑब्झर्व्हर.' नंतर वर्ष ३ पासून नाव नुसते ' निरीक्षक ' किंवा ' ऑब्झर्व्हर. ' या वर्गणी – वर्ष ८ रु. १, फु. अं. ०१८६; वर्ष १० रु. २, फु. अं. ८२, वर्ष १२ रु. ३, फु. अं. ८६. मुद्रक – वर्ष ३ पॉप्युलर प्रिं. प्रेस मुंबई, वर्ष १० नॅशनल प्रि. प्रेस, मुंबई. वर्ष ४ पासून काही दिवस नवी व्यवस्था – मॅनेजिंग एडिटर बी. ए. पाटेकर, पुणे ( प्रकाशक ), मुद्रक – शिवाजी प्रि. वर्क्स, पुणे.

[ जाधव संग्रह ]

( ख्रिस्ती निरीक्षक )

**वर्ष २** – अंक १ मे १९३९, ... १० फेब्रुवारी १९४०.

( निरीक्षक )

**वर्ष ३** – अंक . . १० फेब्रुवारी १९४१,... १२ एप्रिल १९४१.

**वर्ष ४** – अंक १ मे १९४१ ..

**वर्ष ८** – अंक . ( २ - ३ ) जून - जुलै १९४५ ..

**वर्ष १०** – अंक . . ३ आगस्ट १९४७,... ६ न ४७, ७ डि १९४७ .. ८ फे ४८... १० मार्च १९४८... अंक ७ खास ख्रिस्त जयंती अंक.

वर्ष १२ – अंक ... ९ (ऑक्टोबर - डिसेंबर) १९४९ ?—

## निरोप्या

**मासिक :** प्रकाशक – आर्चबिशप, पुणे. मुद्रक – मुंबई. वा. व. रु. १-८. फु. अ. ८२. अंकात २४ पृष्ठे. ८·५ × ५·५. प्रथमांक – (जू. १९१६).

**उद्देश** – कॅथोलिक धर्मासंबंधी, स्वरूप – प्रार्थनाविषयक, धर्मबोध इ.

**ब्रीदवाक्य –**

तुझे राज्य येवो.

[ मबं ]

**वर्ष २१ ते २८** – अंक प्रत्येकी १ ते १२ (जू. ते मे). जून १९३६ ते मे १९४४ (आठ वर्षे).

**वर्ष २९** – अंक १ जून १९४४, २, (३-४), (५-६), (७ डि-८ जा १९४५).

## निर्झर

**मासिक :** संपादक – श्रीनिवास बाबाजी पाठक. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – लोकमान्य प्रेस, खटाववाडी, मुंबई. वा. व. रु. २-८४. अंकात ३२ पृष्ठे ८·४ × ५·४. प्रथमांक – नवंबर १९३१

**उद्देश** – बाल आणि तरुण या उभयतांच्या आकांक्षांचे प्रतिबिंब.

**ब्रीदवाक्य –**

जो हलुहलु वळसे घेत।
लपतछपत हिरवाळीत।
पाचूंची हिरवी राने।
झुल्प गंटे। झुळझुळ गाने॥
"राष्ट्राच्या प्रगतीतच राष्ट्राची उन्नती आहे."

**विशेष माहिती** – मुखपृष्ठ – प्रत्येक अंकात मजकुरावर व आवरणावर शिरोभागी 'गद्राज्य...', वर्ष १ – अंक ९, 'जा हलु-हलु...'. आकार – वर्ष २ अंक १-९ × ६·३.

[ मुमग्र, कोल्हापूर ]

**वर्ष १** – अंक १ ते ११ नवंबर १९३१ ते ऑक्टोबर १९३२.

**वर्ष २** – अंक + १ नोव्हेंबर १९३२, २ डि..., (५ मा - ६ ए) १९३३, ७ मे,..., १० ऑगस्ट १९३३. अंक १ दिवाळी खास अंक. अंक (५ ६) वसंत अंक.

**वर्ष ३** – अंक . . ३ डि १९३३, ४ जा १९३४,..., ६ मार्च १९३४.

## निशा

**मासिक :** संपादक – दत्तोपंत तेलंग. सह-संपादक – एस्. माधव. प्रकाशक – संपादक, वर्धा. अंकात २४ - ३२ पृष्ठे. ड्यू फुल्स्कॅप. प्रथमांक – १५ जून १९३९.

**उद्देश** – ललित वाङ्मय साहित्यिके, स्वरूप – नवोदित कविलेखकांना उत्तेजनार्थ. कविता, कथा, लघुनिबंध व परीक्षणे.

[ लिहून आलेल्या मजकूर तुलनात्मकर ]

**वर्ष १** – अंक १ जून १९३९, २, ३ ऑगस्ट १९३९.

## निसर्गोपचार

**मासिक :** संपादक – माधव मैराळ सुरतकर. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. १-८. फु अ ८२. अंकात ३२ पृष्ठे. ८·४ × ५·३. प्रथमांक - (एप्रिल १९३६).

**विशेष माहिती** – इंग्रजी पर्याय 'नेचर क्युअर'.

[ रमासुरतकर पुणे, पुमग्र ]

**वर्ष १** – अंक...२ मे १९३६ (वैशाख १८५८)

## नीत्युपदेशक

**मासिक** : संपादक – (सरकारी नाव) सिमिअन बेंजामिन, मॅनेजर. प्रकाशक – मुंबई. बा. प. रु. १८८ मागाहून रु. २८८. फु. अ. ८३. अंकात १६ - १८ पृष्ठे. ८·५ × ५.४. प्रथमांक – जानेवारी १८८५. (पुस्तक - अंक).

**उद्देश** – मुंबई येथील 'नीतिप्रसारक मंडळी' (स्थापना १५ नोव्हेंबर १८८२) व तिच्या हालचालींसंबंधी माहिती देणे व अनीतीचा निषेध करणे. नीती, सदाचार, सभ्यता यांचा प्रसार करणे. स्वरूप – खाजगी व सामाजिक नीतीचे व नीतीला साहाय्य करणारे सामाजिक, व्यावहारिक, विद्या, ज्ञान वगैरेसंबंधाचे विषय. सद्गुणाचा ठसा उमटावा व दुर्गुणाचा तिटकारा उत्पन्न व्हावा असे लेख. मुलांचा कायदा इ. नीतिपर कविता. बोधपर चुटके. पुस्तकांवर अभिप्राय

**ब्रीदवाक्य** –

यमान् सेवेत सततं न नित्यं नियमान् बुधः ।
यमान् पतत्यकुर्वाणो नियमान् केवलान् भजन् ॥
– मनु.

न करिति जरि ज्ञाते स्नानसंध्यादि कर्मे ।
परि पतित न होती चालता नीतिधर्मे ॥
सतत अनुसरे जो स्नानसंध्यादि कर्मा ।
तरि पतितचि होतो सोडिता नीतिधर्मा ॥

**विशेष माहिती** – ऑर दि मोरॅलिस्ट. यात 'आगगाडीतील नीतीवर लेख' छापले आहेत प्रकृतीच्या कारणासाठी बंद केले

[ टामय, मग्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२ जानेवारी ते डिसेंबर १८८५.

## नीरजोल्हास

**मासिक** : संपादक – (एडिटर) विनायक बाळकृष्ण घडाळे. प्रकाशन – संपादक, नागपूर. मुद्रक – यादवेंद्रप्रसाद छापखाना, नागपूर. वा. व. रु. १८८ ट. प. ८३ मागाहून रु. २. फु. अ. ८३. अंकात २४ पृष्ठे. ८·३ × ५·३. प्रथमांक – जुलै १८९२. (पुस्तक – अंक).

**उद्देश** – सर्व विविध विषयाचा समावेश करणारे असे उपयुक्त प्रकाशन करणे. स्वरूप – सचित्र. प्रांतातील मोठ्या पुरुषांची सचित्र संक्षिप्त चरित्रे, वैदिक, शास्त्रीय, धार्मिक व सामाजिक निबंध, प्राचीन व अर्वाचीन कविता, सुभाषिते, पदे, आतम्या, चंपू, अलंकार इ. संगीताच्या चालीवर करुणापर पदे.

**ब्रीदवाक्य** –

पाराशर्यवचः सरोजममलं गीतार्थगंधोत्कटं ।
नानाख्यानककेसरं हरिकथासंबोधनाबोधितं ॥
लोके सज्जनषट्पदैरहरहः पेपीयमानं मुदा ।
भूयाद्भारतपंकजं कलिमलप्रध्वंसि नः श्रेयसे ॥
शुक्तुण्डच्छविसवितृश्चण्डरुच. पुण्डरीकवनबन्धोः ।
मण्डलमुदितं वन्दे कुण्डलमाखण्डलाशायाः ॥ १ ॥

**विशेष माहिती** – मॅनेजर – गोविंदराव काठीकर. यात अरण्यपंडिताचा रंजक पत्रव्यवहार व अंक ६ मध्ये ना. वा. टिळक यांचे एक धर्मपर पद आहे.

[ राजाराम लायब्ररी नागपूर, ब्वापो, मुमग्र, ढेरे पुणे ]

वर्ष १ – अंक १ ते ९, (१० - ११), १२. जुलै १८९२ ते जून १८९३.

## नूतन शैव

**द्वैमासिक** : संपादक – के. वी. नेवासकर. वर्ष २ – एस्. के. केंदूरकर. प्रकाशक – संपादक, पुणे वा. व. (वर्ष ३) रु. २ अंकात १६ पृष्ठे ८ १ × ५ ६, ७ ९ × ५·४. प्रथमांक – चैत्र श १८४६

**उद्देश** – गुरव समाजाचे. शैव समाजाच्या हिताची चर्चा सामाजिक चळवळी व घडामोडी.

**ब्रीदवाक्य** –

स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।

ॐकाररूपी भगवानुतस्ते (? म्यते) गणनायक.।
यथा सर्वेषु कार्येषु पूज्यतेऽसौ विनायक ॥

विशेष माहिती – उत्पादक – डॉ. एम्. पे पेंडूरकर. "सन १९२० साली गणेशचतुर्थीच्या शुभमुहूर्तावर जेजुरी येथे 'शैव - वैभव' नावाने हस्तलिखित मासिक सीताराम सदाशिव बारमाई याच्या संपादनाने सुरू झाले. त्यानेच स्पार पुढे द्वैमासिकात झाले."

[ मग्रं ]

वर्ष २ – अंक ...४ अश्विन, ५ मार्गशीर्ष, ६ फाल्गुन १८४७.

वर्ष ३ – अंक १ ते ६. चैत्र, ज्येष्ठ, श्रावण, अश्विन, मार्गशीर्ष, माघ १८४८

## न्याय

**मासिक** • संपादकमंडळ – गंगाधरराव वकील, बॅ. विनायकराव रेणुकादासराव वकील, रामराव नाकलकर वकील प्रकाशक – देवीदास गंगाराम नावलकर (च क), औरंगाबाद. वा व रु ४ पु अ. ८८. अंकात ३६ पृष्ठे ९·६ × ६·४ प्रथमांक – माहे दय सन १३३८ फसली (अक्टोबर - नवबर १९२८)

**उद्देश** – दक्षिण हैद्राबाद संस्थानातील कायद्याची माहिती संस्थानात राजभाषा उर्दूस अनभिज्ञ असलेल्या बहुसंख्य प्रजेला आपल्या हक्काची जाणीव करून घेऊन त्याच्या सरक्षणाचा प्रयत्न करता यावा म्हणून मराठी जनतेला मातृभाषेतून कायद्याचे ज्ञान होण्यासाठी स्वरूप – पाच भागात – १ सपादकीय लेख, २ दिवाणी फैसले, ३ फौजदारी फैसले, ४ माल्चे फैसले, ५ कायदे व गस्त्या.

वर्ष १ – अंक १, २, (३ ४) दय १३३८ ते फर्वर्दीन फसली सन १३३९ (अक्टोबर नवबर १९२८ ते जानेवारी फेब्रुवारी १९२९)

## न्यायदीपिका

**मासिक :** संपादक – (तयार करणार) वामन रामचद्र ओक, महादेव विनायक चौकळ, यशवत मल्पित्र रासकर. प्रकाशक – ठाणे. वा. व. रु. ६०१२. फु अ. रु १८ × ५ २. प्रथमांक – नोवर १८७०. (पुस्तक - आत).

**उद्देश** – दिवाणी फौजदारी कायद्याची माहिती मराठी भाषात.

**विशेष माहिती** – इंग्रजी वर्णन – लाइट ऑफ जस्टिस, मॅगझीन ऑफ लॉ लिटरेचर सपादक – वर्ष २ ओक व चौकळ दुसऱ्या वर्षात अंकाचे प्रकाशन आरंभापासूनच रेंगाळले

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२ नोवर १८७० ते अक्टोबर १८७१.

वर्ष २ – अंक १ नवबर १८७१ ते ६ एप्रिल १८७२ (प्रत्यक्ष प्रकाशनदिन २२ सप्टेंबर १८७२)

## न्यायनिर्णय

**पाक्षिक** प्रकाशक – केशव बळवंत वैद्य आणि मडळी, वाई वा. व रु २ फु. अ ८४. अंकात ३२, २८ पृष्ठे. ८ ४ × ५ ४. प्रथमांक – नवबर १८९७.

**उद्देश** – कायद्याचे पुस्तक.

**ब्रीदवाक्य** –

लक्ष्मीं येन विना नृपा स्वभवन नेतु न शक्ता पर।
पातु पृथ्विमिमामपारमनुजा न्यायेन हीना न च।
त न्याय हृदये निधाय सतत चिन्तन्तु सार बुधा।
पत्र नित्यमिद विलोक्य जगता सन्न्यायनिर्णायकम्॥

**विशेष माहिती** – अंक २ मलपृष्ठ ४ वरील निवेदन "३२ पृष्ठांचे पाक्षिक पत्र सुरू केले आहे"

[ मुमग्र, सरस्वतीवाचनालय शहापूर ]

वर्ष १ – अंक ..२ नवबर १८९७, ३, ४ डि १८९७ ... ६ जा १८९८, (७ फे-

१८ जू) १८९८, (१९ - २०)
वर्ष २ – अंक १ –

## न्यायप्रकाश

**मासिक :** संपादक – (कर्ते) शंकर रामचंद्र हतवळणे. प्रकाशक – अहमदनगर. मुद्रक – न्यायसिंधु छा. (शिळा) अहमदनगर, वर्ष ४ ज्ञानचक्षु छा. पुणे. वा. व. रु. ४८८ मागाहून रु. ७. अंकात ३२ पृष्ठे. ९·६ × ६·४. प्रथमांक – जानेवारी १८७६. (पुस्तक-अंक)

**उद्देश** – कायदाविषयक. *स्वरूप* – मुंबई, मद्रास, कलकत्ता इ. हायकोर्टाचे ठराव.

**विशेष माहिती** – 'अगर सर्व हायकोर्टाचे निवाडे' असा पोटमथळा. *पत्रव्यवहार* – रामचंद्र कृष्ण जोशी. *वा. वर्गणी* – वर्ष ४ आगाऊ रु. ५८८ मागाहून रु. ८.

[ पुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते ६,....८...१० ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८७६.
वर्ष ४ – अंक ... (९ - १०) सप्टेंबर - अक्टोबर १८८९...
वर्ष ६ – अंक ... १० अक्टोबर १८८० (शिळा छपाई).

## न्यायबोध

**मासिक :** संपादकमंडळ – राजारामपंत पोळ, चपतराव सीमत, प्रभाकर मोगले, सोमेश्वर आरळकर. प्रकाशक – औरंगाबाद. वा. व. रु. ३८८ हाली, रु. ३ कल्दार. फु. अं. ८७ हाली, ८६ कल्दार. अंकात ३० पृष्ठे. ९·६ × ६·३. प्रथमांक – इस्फिदार सन १३३४ फसली (जानेवारी १९२५).

**उद्देश** – उर्दू भाषेतील कायद्याचे ज्ञान महाराष्ट्र जनतेस करून देणे. *स्वरूप* – दिवाणी फैसले, फौजदारी फैसले, मालगुजारीचे फैसले, कायदे कानून वगैरे.

**ब्रीदवाक्य –**

(मलपृष्ठावर)
सर्व अधिकाराचे मूलस्थान प्रजाच आहे.
(आरंभपृष्ठ)
सर्व कायद्याचा मूलाधार जनतेची इच्छा हाच होय.

[ पुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १९२५, २ फेब्रुवारी १९२५.

## न्यायबोध

**मासिक :** संपादक – नरहर बळवंत चांदुरकर. सहसंपादक – श्री. के. औरंगाबादकर. प्रकाशक – के. के. पागे, नागपूर. वा. व. वर्ष ८ रु. ६, वर्ष ११ रु. ८, वर्ष १४ रु. १०. अंकात ५२ (वर्ष ७ अंक १) पृष्ठे. प्रथमांक – जानेवारी १९३७.

**उद्देश** – कायद्याचे मराठी मासिक. विधिमंडळाने केलेली विधेयके व वरिष्ठ कोर्टाचे निर्णय सामान्य मराठी वाचकांना सुबोध भाषेत उपलब्ध करून देणे. *स्वरूप* – सुप्रीम कोर्ट व भारतातील सर्व हायकोर्टे यांनी दिलेल्या महत्त्वाच्या निवाड्यांचा समावेश.

**विशेष माहिती** – वर्ष ३ - १९३९ मध्ये ग्रामपंचायत विशेषांक. भाषा–वर्ष ११ हिंदी व मराठी. वर्ष ९, १०, ११ व १२ वर्ष अखेर स्वतंत्र पृष्ठे विषयसूचीची.

[ मुमग्रं ]

वर्ष २ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३८.
वर्ष ७ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९४३.
वर्ष ८ ते ११ – अंक प्रत्येकी १ ते ५, (६ - ७), ८ ते १२. जानेवारी १९४४ ते डिसेंबर १९४७ (चार वर्षे)
वर्ष १२ – अंक १ ते १२. जानेवारी - ते डिसेंबर १९४८.
वर्ष १३ व १४ – अंक प्रत्येकी १ ते ५,

मिळालेल्या वर्षांचा तपशील संकलित असा
वर्ष ९ ( १८७५ ) १० अंक; वर्ष ११ ( १८७७ ) १० अंक सूचीवरून वार्षीक पुस्तक, वर्ष २२ ( १८८७ नमशः १८८८ पावेतो ) १२ अंक, वर्ष ३२ ( १८९७ ) १२ अंक; वर्ष ३३ ( १८९८ ) १२ अंक, वर्ष ३६ ( १९०१ ) १२ अंक, वर्ष ४० ( १९०५ ) १२ अंक, वर्ष ४९ ( १९१४ ) १२ अंक, वर्ष ५० ( १९१५ ) १२ अंक, वर्ष ५१ ( १९१६ ) १२ अंक.

वर्ष ५२ व ५३ – ( १ - ३ ), ( ४ - ६ ), ( ७ - ९ ), ( १० - १२ ) जानेवारी १९१७ ते डिसेंबर १९१८ ( दोन वर्ष ).

## न्यायास मदत

मासिक : संपादक – ( तयार करणार ) शंकर कृष्ण देवमानकर, विनायक गणेश दातार. प्रकाशक – संपादक, धुळे. मुद्रक – अरुणोदय छा. ठाणे. वा. व. रु. ६, मागाहून रु ८. पु. अं. ८१२. अंकात २४ पृष्ठे. ९·८ × ६·३. प्रथमांक – जानेवारी १८७०. ( पुस्तक अंक ).

उद्देश – "अथवा मुंबई, मद्रास व कलकत्ता या तिन्ही कोर्टाच्या निवडक फौजदारी निवाड्याचे मासिक पुस्तक."

*विशेष माहिती – प्रथम – अथवा इत्यादी* उद्देशात नमूद केला आहे.

[ दवाणी, मंग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ७ जानेवारी ते जुलै १८७०—

## पंचम जॉर्ज विजय

मासिक : संपादक – कान्त रामनाथ शेळकी. प्रकाशक – संपादक, बेळगाव. वा व. • १८८. ८·५ × ५·५. प्रथमांक – ऑक्टोबर १९११

उद्देश – सांप्रत सुधारणेच्या मार्गावर येऊ पाहणाऱ्या आपल्या हिंदी राष्ट्राला काय पाहिजे आहे त्याचे विवेचन. स्वरूप – विविध विषयांची सांगोपांग चर्चा.

ब्रीदवाक्य –
सत्यमेव जयते नानृतम् ।

वर्ष १ – अंक १ सप्टेंबर १९११.

## पत्रिका

मासिक ( पत्र ) . संपादक – भाऊ गोरक्ष पंडित. प्रकाशक – संपादक, वढवाणी. वा. व. रु. १८८ माफफलाहद. १३·२ × ८·२. प्रथमांक – ( जून १९१४ ? ).

उद्देश – ज्योतिर्विषयक.

ब्रीदवाक्य –

ज्योतिर्विद्भ्यो ग्रहीतव्या ज्ञानमिलेच पत्रिका ।
नाम्ना प्रकाश्यते पत्री प्रमोदन्तां विपश्चितः ॥

विशेष माहिती – *संपादकाची माहिती* – ज्योतिर्विद्याविशारद, लोणखेडे, पो. शहादे ( प. खानदेश ). याच संपादकाचे याच नावाचे मासिक फेब्रुवारी १९०९ मध्ये वर्षारंभ असलेले निघत होते. [ संदर्भ फलज्योतिषादर्श वर्ष ३ अंक ७ ( एप्रिल १९०९ ) पोच मलपृष्ठ २ ].

[ मग्र ]

वर्ष ५ – अंक ... ९ फेब्रुवारी १९१९, ... १२ मे १९१९.

## पथ्यबोध

मासिक : संपादक – ( सरकारी नोंद ) रामचंद्र पांडुरंग वैद्य. प्रकाशक – पणजी, गोवे., मुद्रक – हिंदु पोर्तुगीज छा., पणजी. वा. व. रु. १. पु. अं. ८४. ७·१ × ४·२. प्रथमांक – कार्तिक शके १८१०.

उद्देश – ( कवितारूपाने निवडक चरण ) "आरोग्यार्थक निबंध, मार्मिक कविता, स्फुटलेखादी ।

देटनि बाल-तरुण स्त्रियांची प्रिय सेवा घेतली।
अनेक डॉक्टर वैद्यांनी हे पसंत केले आहे।
लोकारोग्यस्थैर्य यत्न हेतु मनी धरताहे॥"

स्वरूप – रोग न होण्याविषयी उपायपर निबंध, वैद्यकविषयक कविता, गोमंतकीयांच्या लोकहित विचार, गोव्यातील वनस्पतींचे गुणधर्म, आरोग्य-विचार इ.

ध्येयवाक्य –

आयुः कामयमानेन धर्मार्थसुखसाधनम्।
आयुर्वेदोपदेशेषु विधेयः परमादरः॥

–वाग्भट.

विशेष माहिती – पोटमथळा – 'अथवा आरोग्याची मेजवानी'. प्रकाशक – वर्ष २ गणेश महादेव जानोरीकर; वर्ष ४ ह. गो. खडेकर, गानापूर. लोकाश्रयाच्या अभावी १९०२ मध्ये बंद झाले.

[ मुंमरं, अकावि, माग्रम ]

वर्ष १ – अंक १, २, ..., ५, ६, ..., ९ ते १२. कार्तिक १८१० ते अश्विन १८११.

वर्ष २ – अंक ..., (५-७), ..., ९, ..., ११, १२. (कार्तिक १८११) ते अश्विन १८१२.

वर्ष ३ – अंक १ १८९३, (२-१०) १८९४. पण शिवाय (७-८) हा निराळा आढळतो.

वर्ष ४ – अंक + १ ते ५, (६-७), (८-९), (१०-१२). जुलै १९०० ते जून १९०१.

## पद्मनाभांचा कवितासंग्रह

मासिक : प्रकाशक – ए. के. देसाई, नूल्वि, ता. हुबळी. मुद्रक – बोधमातु छा. नूल्वि. वा. व. रु. २, मागाहून रु. २८११. अंकात २० पृष्ठे. ९ × ५.१. प्रथमांक – कार्तिक शु. १ श. १८१९.

विशेष माहिती – प्रस्तावना – श्रीमत्परमहंस पद्मनाभ यांच्या वर्षे. यात मुंडोतिनिषद्गार्य-प्रकाशिका मराठी ओवीबद्ध प्रसिद्ध झाली.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ कार्तिक ते ४ फाल्गुन १८१९

## पराग

मासिक : संपादकमंडळ – ग. ना. जोशी, य. न. केळकर, मो. ग. दीक्षित. प्रकाशक – जनार्दन गणेश जोशी, पुणे. वा. व. रु. ९. पु. अं. रु. १. अंकात ४८ पृष्ठे. ९·६ × ७·३. प्रथमांक – सप्टेंबर १९४७.

उद्देश – इतिहास विषयाला वाहिलेले. इतिहासप्रेमी सामान्य वाचकाच्या अपेक्षा व आकांक्षा पूर्ण करणारे. क्षेत्र – भारतीयांचा इतिहास. स्वरूप – सचित्र, चित्रे, नकाशे, चर्चात्मक निबंध, ऐतिहासिक टिपणे, बखरी, प्रकरणे, संशोधनात्मक संकीर्ण लेख, आख्यायिका, चरित्रे, ऐतिहासिक पत्रे, ऐतिहासिक वृत्तवार, किल्ले, आत्मचरित्रे, शहरांची माहिती, शिलालेख, देवस्थाने इ.

विशेष माहिती – वर्ष ३ पासून बदल. संपादक – ग. ना. जोशी, वा. व. रु. ३८६. विषय – फक्त संकीर्णविषय; प्रकाशक – ज. ग. जोशी, श्रीकृष्ण गोपाळ आणि कंपनी करिता, पृष्ठे अंदाजे २४. वर्ष ४ – वा. वर्गणी रु. २, पृ. ३२.

[ माइसमं, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ सप्टेंबर १९४७ + २ नवंबर १९४७ ते १२ सप्टेंबर १९४८. अंक २ दिवाळी.

वर्ष २ व ३ – अंक प्रत्येकी १ ते १२ (अ ते स) अक्टोबर १९४८ ते सप्टेंबर १९५० (दोन वर्षे).

वर्ष ४ – अंक १ ते ३ अक्टोबर ते डिसेंबर १९५०... अंक २ दिवाळी.

## पवित्रनाम

**मासिक :** प्रकाशक – पाच हौर मिशन, पुणे. मुद्रक – इलस्ट्राइट छा. पुणे. वा. व. रु. ०१२. पु. अ. ८८६. अंकात ८, १२ पृष्ठे. १०·९ × ८ ६. प्रथमांक – डिसेंबर १९०६.

**स्वरूप** – आराधना, पचांगावर स्फुट टीका, मत्यर्थीच्या प्रार्थनेचे व उपकारस्तुतीचे विषय, मातिस्ने, मृत्यू, वृत्ते, टिपणे, कविता, चरित्रे इ. स्त्रिस्ती मताचे.

**विशेष माहिती** – *या वर्णनी* – वर्ष १ अंक ९ पासून ८९. *भाषा* – वर्ष १ अंक ९ पासून इंग्रजी मजकूर. *मुद्रण* – वर्ष १ अंक ३ कोल्हापूर मिशन छा.

[ जाधव संग्रह ]

वर्ष १ ते ३ – अंक १ ते १२. डिसेंबर १९०६ ते नवंबर १९०९ (तीन वर्षे). वर्षवार अनुक्रमे पृष्ठे ९६, ९८, १४४.

## पांचजन्य

**मासिक :** संपादक – गु. शि. कुळकर्णी. सहसंपादक – कॉ. वा. सावंत, आ. धो. ढेरे, शि. म राजमाने. प्रकाशक – मिरज. वा. व. रु. ४. फु. अं. ८६. अंकात ३६ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – भाद्रपद श. १८७०.

**स्वरूप** – भगवद्गीतेच्या श्लोकांवर प्रवचन, शेतकरी व कामकरी यांची संपत्ती, नैतिक स्थिती व शिक्षण यावर लेख, शेती इ. विषय.

**ब्रीदवाक्य** –

मरोनि सद्भावाची अञ्जुळी । मिया वोविया फुले मोकळी ।
अर्पिली अंघ्रियुगुली । विश्वरूपाच्या ॥

[ लोकमान्य छा मिरज ]

वर्ष १ - अंक १ भाद्रपद १८७०.

## पांचाल

**मासिक :** संपादक – शंकर कृष्णाजी रावूर्डी-कर. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. ४. अंकात २८ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – मे १९४८.

**उद्देश** – महाराष्ट्र पांचाल सभेच्या विद्यमाने सुतार लोहार समाजाचे एकमेव मुखपत्र. स्वजातीची सांस्कृतिक उन्नती, औद्योगिक क्षेत्रात भरभराट व जातीच्या कलाविषयक आकांक्षा पुऱ्या करण्याचा प्रयत्न करणार. स्वरूप – धंद्याला पोषक उच्च शिक्षण देणारे लेख.

**विशेष माहिती** – संचालक – रामचंद्र तात्याराव बळगडेकर, चेअरमन सखाराम चंदन-पूरकर.

[ कालिकाप्रसाद छा. पुणे ]

वर्ष १ – अंक १ मे १९४८ ते ४ आगस्ट १९४८ + (५–६) नवंबर १९४८ —.

## पारिजात

**मासिक :** संपादक – रघुनाथ ज. सामंत ('कुमार रघुवीर'). प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – इंडिया प्रिंटिंग प्रेस, मुंबई, मन्वंतर छापखाना, मुंबई. वा. व. रु. ४. फु. अ. ८६. अंकात साधारणत. ६४ पृष्ठे. ९ × ६·१. प्रथमांक – जानेवारी १९३४. (सत्य अंकक्रमांक)

**उद्देश** – विस्तृत शाखांचा, सुगंधाने उदात्त मनोवृत्ती जागृत करणारा, सुंदर फुलांचा वाङ्मय पारिजात, महाराष्ट्रभाषेच्या उद्यानात लावावा. स्वरूप – वर्णनात्मक लेख, लघुकथा, लघुनिबंध, कविता, वाङ्मयमत्ताची रोजनिशी, साहित्याचे महत्त्वमापन, आमचे आयुष्य, कलोपासना, पर भाषेतून मराठीकरण, व्यक्तींची शब्दचित्रे, जीवन चरित्रे, जुन्या वाङ्मयातील सौंदर्यस्थळे, सामाजिक, आर्थिक व शिक्षणविषयक टिपणे.

**विशेष माहिती** – 'स्वच्छ पांढरा कागद, उत्तम छपाई, रत्नाकराच्या बरोबरीचा'.

वर्ष २ – अंक (१ - २), ३, (४ - ५), (६ - ७), (८ - ९), १० ते १२. सप्टेंबर १८८२ ते आगस्ट १८८३.
वर्ष ३ – अंक १, (२ - ४), ५, (६ - ७), ८, (९ - १०), (११ - १२). सप्टेंबर १८८३ ते आगस्ट १८८४.
वर्ष ४ – अंक (१ - २), (३ - ४), (५ - - ६), (७ - ८), (९ - १०), (११ - १२). सप्टेंबर १८८४ ते आगस्ट १८८५.
वर्ष ५ – अंक + (१ - २), (३ - ४), (५ - ६), (७ - ८), (९ - ११), १२. जानेवारी ते डिसेंबर १८८६.
वर्ष ६ – अंक + (१ जा - २ फे), (३ मा - ४ ए) जानेवारी ते एप्रिल १८८८.

## पुराणप्रकाश

मासिक : संपादक – (भाषांतरकार) गोविंद परशुरामशास्त्री रावेरकर. प्रकाशक – पुराणप्रकाशक मंडळी, मुंबई. मुद्रक – पुराणप्रकाश आणि गोरक्षण छा. मुंबई. वा. व. रु. ३ ट. ह. ०६. फु.अ. ०४. अंकात प्रकरणवार ४८ पृष्ठे. ९·१ × ६·३. प्रथमांक – श्रावण भाद्रपद शु. १८१७.

उद्देश – अलीकडे परभाषेतील पुस्तकांची भाषांतरे होऊ लागली आहेत, त्यापेक्षा रसाळ, गहन व आश्चर्यकारक असे प्राचीन ग्रंथ आहेत, त्यांचा स्वाद महाराष्ट्रभाषा जाणणाऱ्याला मिळवून देणे.

स्वरूप – महाभारत व पुराण ग्रंथाचे सरळ मराठी भाषांतर – महाभारत, गणेशपुराण, वराहपुराण, नृसिंहपुराण असे चार ग्रंथ सुरू.

विशेष माहिती – पॉट मथळा – "अर्थात महाभारत व पुराण ग्रंथाचे सरळ मराठी भाषांतर." प्रथमांकी प्रत्येक अंकात ९६ पृष्ठे व वार्षिक वर्गणी ६ रु. फु. अं. ०८ असे छापून पुढे पृष्ठे व वर्गणी निम्मी केली. वर्ष १ अंक १ वर (१) प्रथम आषाढ शु. १८१७ जुलै १८९५ असे छापलेले, नंतर (२) श्रावण मासाची त्यावर चिठी चिकटविलेली व (३) वर्ष १ श्रावण– भाद्रपद, शके १८१७ अंक १. २, अशी लाल पाटली चिठी छापून चिकटविलेली, असे पहिल्या अंकाचे तीन पर्याय आढळतात.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक (१ श्रा - २ भा) १८१७, ..., (५ मा - ६ पौ) १८१७.

## पुराणमतवादी

मासिक : संपादक – निंबक रामचंद्र घाटपांडे. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. १८८. फु. अं. ०२. ८·३ × ५·२. प्रथमांक – कार्तिक शु. १ श. १८५१.

उद्देश – सनातन धर्माबद्दल अभिमान बाळगणारा – जुन्या राहणी, पूर्वीचे आचार-विचार (यांची माहिती) आणि सध्या पाश्चात्य शिक्षणामुळे मनुष्यास मार्गाचे अवलंबन करून होणारी प्रगती किती नुकसानकारक आहे व परिणामी भयंकर आहे याचे यथार्थ ज्ञान देणे.

स्वरूप – धर्म, राजकारण, पौराणिक संस्कृती इत्यादीविषयक लेख.

बोधवाक्य –

वेदशास्त्रानुसारे वागणे ।
शास्त्रसंमत कर्तव्याने राहणे ।
गोब्राह्मण पालन करणे ।
हा धर्म. यावरच राजकारण ॥

[ पुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ कार्तिक १८५१, २ मार्गशीर्ष १८५१.

## पुराणादर्श

मासिक : संपादक – (कर्ते) विष्णु लक्ष्मण शास्त्री पुरोहित. प्रकाशक – संपादक, वाई. वा. व. रु. ४८१०. फु अं ०८, ०४. अंकात ८० पृष्ठे. ८·३ × ५·३. प्रथमांक – ज्येष्ठ शु. १ श. १८२३.

उद्देश – पुराणे–मूळ व भाषांतर. स्वरूप – आनंदरामायण, देवी भागवत इ. समूळ भाषांतर.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १, २, ३ ( अधिक श्रावण ), ४, ( ५ - ६ ), ( ६ - १२ ). ज्येष्ठ १८२३ ते वैशाख १८२४. अधिकमासामुळे तेरा अंक – अंक क्रमांक ६ दोनदा आल्यामुळे शेवटचा अंक क्रमांक १२.

## ( समूल ) पुराणार्थप्रकाश

मासिक : संपादक – ( सर. नांव ) मोरेश्वर हरिश्चंद्र जोशी. प्रकाशक – म्यानेजर, काळकादेवी रोड, मुंबई. वा. व. रु. ३, मागाहून रु. ४. फु.अं. ८६. अंकात २०-२४ पृष्ठे. ९·५ × ६·३. प्रथमांक – कार्तिक श. १८०६.

उद्देश – जी पुराणे व उपपुराणे छापली नाहीत ती सर्व मूळ संस्कृत आणि मराठी टीकेसहित स्वल्प किंमतीत मिळावी – प्रथम अद्‌भुतरामायणम् । स्वरूप – अद्‌भुतरामायण इ.

### ध्रीदवाक्य –

पुराणाज्ञानसंभूततमोनाशकरः परः ।
पुराणार्थप्रकाशोऽयं भूयाद्विद्वन्मुदे मुहुः ।
अयं हि शुक्लप्रतिपद्दिवसे प्रतिमासभूः ।
लोहाक्षरैर्मुद्यते हि सर्वेषां हितकाम्यया ॥

विशेष माहिती – सरकारी कॅटलॉगमध्ये 'समूल पुराणार्थप्रकाश' असे नाव आहे. " ' पुराणार्थप्रकाश ' याच नावाचे एक गुजराथी मासिक पुस्तक येथे निघत असते. त्याच्या व आमच्या नावाच्या सारखेपणामुळे पत्रव्यवहारासंबंधी गोंधळ होण्याचा संभव आहे, म्हणून आम्ही आमच्या नावास ' समूल ' हे विशेषण जोडिले आहे."

[ मुमग्र, मग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते ९, ( १० - १२ ). कार्तिक १८०६ ते अश्विन १८०७.

## पुरुषार्थ

मासिक : संपादक – श्रीपाद दामोदर सातवळेकर. प्रकाशक – संपादक, औंध ( सातारा ). मुद्रक – भारत मुद्रणालय, स्वाध्याय मंडळ, औंध. वा. व. रु. २. फु. अं. ८३. अंकात २४ पृष्ठे. ९·२ × ६·८. प्रथमांक – आगस्ट १९२४ ( श्रावण श. १८४६ ). पुढे चालू १९६७. ( मधून सलग अंकक्रमांक ).

उद्देश – स्वधर्माचे ज्ञान करून देऊन पुरुषार्थास प्रवृत्त करणारे. आम्हांला स्वधर्माचे ज्ञान झाले की मग परधर्मीयांच्या हल्ल्याची मुळीच भीती नाही, ते स्वधर्माचे ज्ञान आपल्या लोकांस करून देणे. स्वरूप – धार्मिक, नैतिक, शैक्षणिक, औद्योगिक, सामाजिक व राष्ट्रीय अर्थात सर्वांगीण उन्नतीचे मार्ग दाखविणारे लेख. सुगम व अनुभूत योगसाधनांची माहिती.

### ध्रीदवाक्य –

कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः ।
( वर्ष १३ ) पुरुषार्थे जिणे गोड । पुरुषार्थेंचि मरण वाड ।
पुरुषार्थ नाही तैं उघड । मुख न दावावें ॥
–दासोपंत

विशेष माहिती – वर्ष १ अंक १ ची द्वितीयावृत्ती निघाली. *वा. वर्गणी* – वर्ष ९ रु. ३, फु. अं. ८५. *प्रकाशनस्थळ* – वर्ष २५ पारडी, जि. सुरत.

[ मुंमग्रं, डेक्कॉ, जग्रं ]

वर्ष १ ते ७ – अंक प्रत्येकी १ ते १२ ( आ ते जु ). आगस्ट १९२४ ते जुलै १९३१. ( सात वर्षे )

वर्ष ८ – अंक १ ते ४, ( ५ - ६ ), ७ ते १२. आगस्ट १९३१ ते जुलै १९३२. अंक ( ५ - ६ ) भगवद्गीतांक; अंक ७ भगवद्गीतांक भा. २.

वर्ष ९ व १० – अंक प्रत्येकी १ ते १२. आगस्ट १९३२ ते जुलै १९३४. वर्ष ९ अंक ८ व ९ शिवाजी अंक. ( दोन वर्षे )

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ऑगस्ट १९५०.

## भारतीय कथाकल्लाप

मासिक : संपादक – (तयार करणार) महादेव विनायक बेळकर. प्रकाशक – मालक. मुद्रक – (शिळाछाप). शा. व. क. १८८. पु. अं. ८३. अंकात १६ पृष्ठे. ८'३ × ५'३. प्रथमांक – श्रावण शु. १ श. १८०५. (पुस्तक-अंक).

स्वरूप – एक शिक्षणपर निबंध, नाटके, उपदेशपर निबंध, मनोरंजक गोष्टी, जुन्या कविता.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ श्रावण १८०५.

## भारतीय संगीत

द्वैमासिक : संपादक – गंगाधर नारायण मुजुमदार. सहसंपादक – केशव अनंत गोडबोले. प्रकाशक – सहसंपादक, पुणे. मुद्रक – समर्थ भारत छा., पुणे. शा. व. क. १८८. पु. अं. ८६. अंकात ४८ पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – ऑक्टोबर १९३२. शेवटचा अंक – जुलै १९३५.

उद्देश – संगीत कलेची सर्वांगीण उन्नती करणे, गवई लोकांतील तीव्र मतभेद नाहीसे करणे, संगीतकलेवरील शास्त्रीय निबंध, लेख, चर्चा प्रसिद्ध करणे. संगीताची कला व शास्त्र यांस वाहिलेले.

स्वरूप – गायनशास्त्र, ध्वनिविचार, नाट्यशास्त्र, संगीताचे मराठीकरण, संगीतलिपी इत्यादींवर लेख. कठीण रागदारीतील पदे नोटेशनसह, संगीत स्वरशास्त्र, कलावंतांची चरित्रे, आर्यसंगीतावरील संस्कृत ग्रंथ, तबला मृदंगादी वादनावर लेख, संगीताचा विश्वविद्यालयात प्रवेश इ.

ब्रीदवाक्य –

(वर) वर्णाकारैर्विरचितवपुर्योऽखिलस्यानवस्थो
ऽस्तोक शोकं नुदति नितरां य: श्रुतिग्रामवर्ती ।
योऽलंकारैरविगुणगो रागरागिणिगम्यो
वन्दे नादानियमरहितं माधवं तं च नादम् ॥ १ ॥
(आत) यत्पादपद्मैः समस्तं यो जगदेतच्चराचरम् ।
सर्जनस्थिति विश्वात्मा स नो विष्णुः प्रसीदतु ॥

विशेष माहिती – 'भारत गायनसमाजा'च्या वतीने प्रसिद्ध होणारे द्वैमासिक.

[ मुंमग्रं, भारतगायनसमाज, मग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते ६, ऑक्टोबर १९३२, जा, मा, मे, जु, सप्टेंबर १९३३.
वर्ष २ – अंक १ ते ६, नोव्हेंबर १९३३ ते ऑक्टोबर १९३४.
वर्ष ३ – अंक १ नोव्हेंबर १९३४, २, ३, (४-५) जुलै १९३५.

## भारतोदय

मासिक : संपादक – गोविंद पुंडलीक हेगडे देसाई. प्रकाशक – हिंदुसमाज, रिवण, गोवा. मुद्रक – पुंडलिक छा. पेपे. शा. व. क. २. पु. अं. ८४. अंकात २० पृष्ठे. ८'२ × ५'६. प्रथमांक – मार्च १९२१.

उद्देश – जनतेला देशी उद्योगधंद्यांचे महत्त्व पटवून नेवाइसीविषयी तिरस्कार उत्पन्न करावा.

स्वरूप – कविता, निबंध इ.

ब्रीदवाक्य –

उद्योगाच्या घरी ऋद्धिसिद्धि पाणी भरी ॥

विशेष माहिती – पोर्तुगीज वर्णन – सप्लि-मेंतो मेन्साल आओ भारत.

[ गोहिअ मुंबई, मडगाव. ]

वर्ष १ – अंक १ मार्च १९२१, २ एप्रिल १९२१.

## भालचंद्र

मासिक : संपादक – विनायक दामोदर दाणी. प्रकाशक – संपादक, नाशिक. मुद्रक –

(वर्ष २ अंक १२) संगीत प्रिंटिंग प्रेस, नाशिक. वा. व. रु. १८८; वर्ष ११ रु. ४८८. फु. अं. ८२; वर्ष ११ - ८६. अंकात ४४ पृष्ठे (१९४४ चा दिवाळी अंक). ९'८ × ७'४; दिवाळी अंक काही १०'८ × ८'५. प्रथमांक - (जानेवारी १९३९). पुढे चालू १९६७. (फक्त महिना व साल, अंकक्रमांक नाही).

**उद्देश** – विचार व आचारप्रवर्तक. मालचंद्र वाङ्मयमालेतर्फे निघणारे. **स्वरूप** – कविता, कथा, लेख इ. संकीर्ण.

**ध्येयवाक्य** –

जेथे जातो तेथे तू माझा सांगाती ।
चालविसी हाती धरोनिया ।
चालो वाट आम्ही तुझाचि आधार ।
चालविसी भार सवे माझा ॥

[ मग्रं, मुमग्रं ]

**वर्ष १ ते १०** – अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि). जानेवारी १९३९ ते डिसेंबर १९४८. बहुधा प्रत्येक अंक स्वतंत्र. दिवाळी अंक – वर्ष ४, ५, ६, ७, ९, १० चे निघाले.

**वर्ष ११** – अंक…फेब्रुवारी १९४९, मा… जू., जुलै १९४९.

## भावसार क्षत्रिय

**मासिक** (प्रचारपत्रिका) : संपादक – सेवकराम दिगंबर भावसार (सोनटक्के), विलेपार्ले. प्रकाशक – सुखदेव त्रिंबक मोरे, मुंबई. वा. व. रु. १. फु. अं. ८१. अंकात ८ पृष्ठे. १३ × १०. प्रथमांक – डिसेंबर १९३४.

**उद्देश** – उच्च ध्येयास वाहिलेली व भावसार-क्षत्रिय ज्ञातिहितार्थ झटणारी मासिक प्रचारपत्रिका.

[ मग्रं ]

**वर्ष १** – अंक…९ ऑगस्ट १९३५…

**वर्ष २** – अंक १ डिसेंबर १९३५, (२-३), ४ ते १० सप्टेंबर १९३६ ..

**वर्ष ३** – अंक १ डिसेंबर १९३६—

## भावसारक्षत्रियप्रबोध (१)

**मासिक** : प्रकाशक – मार्गोजी अनंत सर्वदे, बाळकृष्ण गोविंद कुळकर्णी; मुंबई/ पुणे. मुद्रक – यशवंत प्रेस, पुणे. वा. व. रु. २८८. फु. अं. ८४. अंकात ६४ पृष्ठे. ७'२ × ४'८. प्रथमांक – चैत्र श. १८३७.

**स्वरूप** – सचित्र. समाजविषयक लेख, कविता, गोष्टी, चालू कादंबरी 'यशाजा'.

**ध्येयवाक्य** –

उपजला भावो । तुझे कृपे सिद्धि पावो ॥

**विशेष माहिती** – *प्रकाशनस्थळ* – वर्ष १ अंक ९ पासून पुणे. *प्रकाशक* – वर्ष २ पासून मा. अ. सर्वदे फक्त.

[ सुंमग्र ]

**वर्ष १** – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८३७.

**वर्ष २** – अंक १ चैत्र १८३८ ते ५ श्रावण १८३८.

## भावसारक्षत्रियप्रबोध (२)

**मासिक** : संपादक – भाऊ बाबाजीराव मेहेंदरकर. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. २८८. फु. अं. ८४. अंकात (६४) पृष्ठे. ९'६ × ६'४. प्रथमांक – मागील भा. क्ष. प्र. (१) पाहा.

**विशेष माहिती** – सर्वदे यांच्या मासिकाच्या प्रकाशनाची नवी व्यवस्था. वर्ष ३ अंक २ मध्ये नियतकालिकाबद्दल समर्पक विचारप्रदर्शन.

[ मग्र ]

**वर्ष १** – अंक भावसार क्षत्रियप्रबोध (१) पाहा.

**वर्ष २** – अंक पुढे चालू ६ मा १८३८ ते १२ फा १८३८.

वर्ष ३ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८३९.

वर्ष ४ – अंक १, (२-३), ४ ते ९, (१०-११), १२. चैत्र ते फाल्गुन १८४०.

## भावसारक्षत्रियप्रबोध (३)

मासिक : संपादक – स्वामी दत्तात्रय महंत तुळजापूर. प्रकाशक – संपादक, तुळजापूर/सोलापूर (अधिकृत). वा. व. रु. १८८. पृ. अ. ८२. सरासरी ३० पृष्ठे. ८·३ × ५·४. प्रथमांक – कार्तिक शु. १ श. १८४९.

**ब्रीदवाक्य –**

भावसार तितुका मेळवावा ।
व्यापार अवघा करी घ्यावा ।
जगी उज्ज्वल कराना ।
भारत देश ॥

**विशेष माहिती** – *क्षत्रियदर्श* – वर्ष १-अंक १ यामध्ये आरंभपृष्ठावर, शिवाय मुख पृष्ठाच्या आत वर्ष ५, अंक १ असा निर्देश. "श्री. सर्वदे यांच्या मासिकाचाच नवा अवतार पुढे चालू."

[ शमाउरणकर पुणे. ]

वर्ष १ – अंक १ ते १२. कार्तिक १८४९ ते *आश्विन १८५०.*

वर्ष २ – अंक १ ते १०, (११-१२)-कार्तिक १८५० ते अश्विन १८५१. अंक (११-१२) भा अ एल्चिपूर परिषद खास अंक

वर्ष ३ – अंक १ ते ७, (८ ९), १० ते १२. कार्तिक १८५१ ते अश्विन १८५२

वर्ष ४ – अंक १ ते ३, (४ ६), (७ ९), (१०-१२) कार्तिक १८५२ ते अश्विन १८५३. अंक (४-६) गदग महासभेचा रिपोर्ट खास अंक.

## भाषांतर

मासिक : संपादक – विष्णु काशिनाथ राजवाडे. प्रकाशक – पुणे. मुद्रक – श्रीसमर्थ छा., पुणे. वा. व. रु. ६. अंक प्रकरणवार ८०-९६ पृष्ठे. ८·८ × ५·८. प्रथमांक – जानेवारी १८९४. (बंद व दुर्मिळ)

**उद्देश** – ज्यांना केवळ स्वभाषेचे ज्ञान आहे त्यांची अन्य भाषेतील सारवाद घेण्याची इच्छा पुरी व्हावी आणि अन्य भाषा जाणणारांनाही स्वभाषेची गोडी लागावी यासाठी साधने निर्माण करणे. "कोणत्याही मार्गाने देशसेवा करणे"

**स्वरूप** – यूरोपातील व आशियातील प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांच्या ग्रंथांची भाषांतरे मानसशास्त्र, तर्कशास्त्र, अध्यात्मविद्या, अर्थशास्त्र, इतिहास, व्यवहारनीती, राजनीती इत्यादी विषयांचा परिचय करून देणारे ग्रंथ, शिवाय अनेक ग्रंथांच्या आधारे स्वतंत्र इतिहास.

**विशेष माहिती** – प्रसिद्धिपत्रकाचे सहीकर – वि. वि. चाशेरकर, वि. का. राजवाडे, शि. म. परांजपे, गो. र. भिडे, म. के. जोशी, शि. ग. भट. ग्रंथवार स्वतंत्र पृष्ठांक. प्रकाशनाचा दिनांक प्रतिमास १५. मुद्रक – अंक २ – सत्यप्रकाश छा., ८–विठ्ठल छा., १३ – जगद्धितेच्छु, १६–विठ्ठल छा. अंक ३२ मध्ये वार्षिक अंक लवकरच निघतील असे निवेदन. "देशाचा, धर्माचा, आचाराचा खरा अभिमान जागृत राहण्यास बोलणे, चालणे ..विचार करणे मराठीत झाले पाहिजे. त्याशिवाय परका व कायमचा ठसा मनावर उमटावयाचा नाही. हा हेतू सफल होण्यास दोन मार्ग – स्वतंत्र लेख लिहिणे हा पहिला. अन्य भाषातील उत्कृष्ट विचारांचे तर्जुमे मराठीत करणे हा दुसरा यापैकी दुसऱ्याचे अवलंबन आम्ही केले आहे." यात साक्रटिस, प्लेटो, अरिस्टॉटल, मिल, बेकन, बर्क, बटलर पेन, प्लुटार्क इत्यादींच्या व तर्कभाषा, शांकरभाष्य, आयने अकबरी, अशा सुमारे २५ ग्रंथांची भाषांतरे पुरी-अपुरी प्रसिद्ध झाली

[ मुंमग्रं, पुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ८, ( ९ - १० ), ( ११ - १२ ). जानेवारी ते डिसेंबर १८९४.

वर्ष २ – अंक १३ ते २०,..., २४. जानेवारी ते डिसेंबर १८९५.

वर्ष ३ – अंक २५ जानेवारी १८९६ ते ३२ आगस्ट १८९६.

## भिषग्विलास

**मासिक** : संपादक – महादेव रामचंद्र रानडे. उपसंपादक – वर्ष २२ गंगाधर गोपाळ गुणे. प्रकाशक – सोलापूर. मुद्रक – समाचार छा. सोलापूर, वर्ष १ अंक ४ आनंदवृत्त छा. सोलापूर. वा. व. रु. ३. फु. अं. ८६. अंकात १६ पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – एप्रिल १८९२.

**उद्देश** – वैद्यकसंबंधी अनेक विषयांचे सुबोध भाषेत मासिक पुस्तक. इंग्रजी 'पॉप्युलर सायन्स'च्या धर्तीवर. *स्वरूप* – शरीररचना, इंद्रियांचे धर्म, रोग, त्यांचे निदान व चिकित्सा, औषधी व त्यांचे गुण, आरोग्यरक्षण इ. विषयांवर माहिती. विशेषतः अर्वाचीन शोधांची माहिती. आर्यवैद्य-कातील उपयुक्त माहिती व उपचार.

**ब्रीदवाक्य** –

( १ ) आयुः कामयमानेन धर्मार्थसुखसाधनम् ।
आयुर्वेदोपदेशेषु विधेयः परमादरः ॥

वर्ष २८ अंक ८ - ९ पासून

( २ ) तदेवयुक्तं भैषज्यं यदारोग्याय कल्पते ।
स चैव भिषजां श्रेष्ठो रोगेभ्यो यः प्रमोचयेत् ॥

**विशेष माहिती** – वर्षक्रमांक, वारवाचे निर्देश यांबद्दल अत्यंत चुका. वर्ष ३९ – आयुर्वेद सेवासंघाचे मुखपत्र. तत्पूर्वीच वर्ष ३६ अंक १ ( मे १९३७ ) पासून 'आयुर्वेद सेवासंघाचे सघवृत्त' मासिक भिषग्विलासात सामील झाले ( पाहा 'सघवृत्त' अहमदनगर १९३५ ) व मथळा 'भिषग्विलास व ( सघवृत्त )' असा छापण्यात येऊ लागला. *या वर्गणी* – पहिल्या अंकावर रु. १८८; वर्ष ६ – सवलतीची शाळामास्तरास वगैरे रु. २; वर्ष २१ – रु. १८८; वर्ष २७ – रु. २; वर्ष ४३ – रु. ३. *मुद्रक* – वर्ष ४ – दत्तप्रसाद छा., वर्ष १२ – सोलापूर समाचार छा., वर्ष २० – कल्पतरु छा. सर्व सोलापूरचे. *संपादक* – सुमारे वर्ष २८ – अंक ८ - ९ गंगाधर गोपाळ गुणे ( अहमदनगर ). *उपसंपादक* – वर्ष २८ अंक ८ - ९ श्री. ब. पाटणकर. *विशेषांक* – वर्ष ४३ अंक १ – क्षयरोग विशेषांक, पूर्वार्ध; अंक २ – उत्तरार्ध. वर्ष ४६ – अंक १ संशोधन ( अन्वेषण ) विशेषांक; अंक २ – पुरवणी. ( वर्ष ४९ अंक १२ व वर्ष ५० अंक १ ) कै. गंगाधरशास्त्री गुणे विशेषांक.

[ मुंमग्रं, मग्रं ]

वर्ष १ ते १३ – अंक प्रत्येकी १ ते १२ ( ए ते मा ). एप्रिल १८९२ ते मार्च १९०५ ( तेरा वर्षे ).

वर्ष १४ – अंक १ ते ३, ( ४ - ५ ), ६, ( ७ - ८ ), ( ९ - १० ), ११, १२. एप्रिल १९०५ ते मार्च १९०६.

वर्ष १५ – अंक + १ ते १२. अक्टोबर १९०६ ते सप्टेंबर १९०७.

वर्ष १६ ते १९ – अंक प्रत्येकी १२ ( जा ते डि ). + जानेवारी १९०८ ते डिसेंबर १९११ ( चार वर्षे ) काही जोड अंक.

वर्ष २० ते २७ – अंक प्रत्येकी १२ ( जा ते डि ). + जानेवारी १९१३ ते डिसेंबर १९२० ( आठ वर्षे ). काही जोड अंक.

वर्ष २८ – अंक + १, २, ( ३ - ४ ), ( ५ - ७ ), ( ८ - ९ ), ( १० ११ ), १२. जानेवारी ते डिसेंबर १९२२.

वर्ष २९, ३० – अंक प्रत्येकी १२ ( का ते अ ). + कार्तिक १८४५ (नवेंबर १९२३) ते अश्विन १८४७ ( दोन वर्षे ). काही जोड अंक.

वर्ष ३१ ते ३३ – अंक प्रत्येकी १२ ( चै ते फा). + चैत्र १८५० ते फाल्गुन १८५३ ( तीन वर्षे ). काही जोड अंक.

वर्ष ३४ – अंक + १ ते ३, (४ - ६), ७ ते ९, ( १० १२ ). चैत्र ते फाल्गुन १८५५.

वर्ष ३५ – अंक + १ चै १८५७, २ ते ६ + ( ७ - ८ ) श्रा १८५८, ९ ते १२. चैत्र १८५७ ते फाल्गुन १८५८ ( मार्च १९३७ ).

वर्ष ३६ ते ४९ – अंक प्रत्येकी १२ (मे ते ए). + मे १९३७ ते एप्रिल १९५१. ( चौदा वर्षे ) काही जोड अंक.

## भेषजरत्नमाला

**मासिक** : प्रकाशक – काशिनाथ गोविंद उपासनी, उमरावती. वा. व. रु. २८४. फु. अं. ८४, अंकात २६ पृष्ठे. ७·२ × ४·२. प्रथमांक – मार्गशीर्ष श्र. १८२६ ( डिसेंबर १९०४ ).

**उद्देश** – आरोग्यरक्षणास अत्यंत सुलभ राजमार्ग. स्वरूप – यातायातीशिवाय घरबसल्या अनेक रोगांचा परिहार करण्याचा मार्ग. गुप्त आरोग्याचे रक्षण. क्वचित स्वदेशी चळवळीवर लेख.

**ब्रीदवाक्य** –

तदेव युक्तं भैषज्यं यदारोग्याय कल्पते ।
स चैव भिषजां श्रेष्ठो रोगेभ्यो यः प्रमोचयेत् ॥

**विशेष माहिती** – श्रीमंत खापर्डे यांच्या उत्तेजनावर व उदार आश्रयावर चालणारे. उपासनी हे रामाश्रम दवाखान्याचे मालक होते.

[ मस ]

वर्ष १ – अंक ... २ पौ १८२६, ३, ४, ५ चै १८२७, ( ६ - ९ ) श्रावण १८२७.
वर्ष २ – अंक + ... ? माघ १८२७, ३ फाल्गुन १८२७ ––.

## भोळा शेतकरी

**मासिक** : संपादक – मोरेश्वर महादेव नायक. सहसंपादक – ह. अ. असनारे. प्रकाशक – पद्मनाभ विष्णु जोशी, अमरावती. मुद्रक – सोमेश्वर प्रिंटिंग प्रेस ( वर्ष २ अंक ५ ). वा. व. रु. १८४. फु. अ. ८२. अंकात ३२ पृष्ठे. ९·५ × ६·६. प्रथमांक – डिसेंबर १९३२.

**स्वरूप** – शेती, शेतकरी, शेतीविषयक कायदा, ग्रामसंघटना इ. विषयक लेख, कविता. उत्पादनाला पोषक परिस्थिती, यंत्रे वगैरे.

**ब्रीदवाक्य** –

निजहित निजहातें साधणे मानवाने ।
विफल सकल होते मागणे दीनवाणे ॥ – केसरि
शेती, गोधनरक्षण, व्यापार तसा हा स्वभाव वैश्याचा ॥

**विशेष माहिती** – श्री. महादेव हरनाजी पाडे, डायरेक्टर, को. से. बँक उमरावती यांच्या नेतृत्वाखाली निघणारे (आरंभापासून वर्ष २ अंक ५ ). *संपादकमंडळ* – वर्ष २ अंक ५ मे १९३४ ( प्रमुख ) प. वि. जोशी, डॉ. मो. म. नायक, ह. अ. असनारे, डॉ. के. ना मुळे, के. ना लवे. *आकार* – वर्ष ३ अंक ८ – ८ × ५·२. *वा. वर्गणी* – वर्ष ३ अंक ८ – रु. २.

[ नगरवाचनालय पुणे, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ डिसेंबर १९३२, २ जा १९३३, ३ फे + ४ ए ते ८ आ, ... १२ डिसेंबर १९३३. अंक १२ संमेलन अंक.
वर्ष २ – अंक १ ते ६, ( ७ - ८ ) ९, १०, ( ११ - १२ ). जानेवारी ते डिसेंबर १९३४. अंक ( ११ - १२ ) खास अंक.
वर्ष ३ – अंक १, २, ( ३ - ४ ), ( ५ - ६ ), ७, ८, ( ९ - १० ) — १९३५. अंकावर मासनिर्देश नाही.

## मकरंद

**मासिक** : संपादक – नरहर नारायण

पटवर्धन. प्रकाशक – वाई. मुद्रक – मोदवृत्त प्रेस, वाई. वा. व. रु. २८८. पृ. अं. ८४. अंकात ५० - ६० पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – ( चैत्र श. १८२७ )

उद्देश – हिंदी, बंगाली, इंग्रजी कादंबऱ्यांची भाषांतरे व मूळ कादंबऱ्यांचे प्रकाशन. वर्षाची ६०० ७०० पृष्ठे.

ब्रीदवाक्य –

सद्गद्यकाव्यकुसुमी नवरसमय साचला मनोहरसा ।
मकरंद हा निरंतर देवो रसिकांनिया मना हरसा ॥

विशेष माहिती – वर्णन बहुतेक वर्ष ७ वरून. 'मकरंद' हा 'कादंबरीकल्पद्रुमा' चाच नवावतार असल्याने पहिल्या दोन वर्षांना वर्ष ६, ७ असाच 'कादंबरीकल्पद्रुमा' चाच क्रम चालू राहिला. यात महामाया, रजपूतकुमारी, तारा, अमात्यदुहिता, शाता, वीरधवल, विसाव्या शतकातील हिंदुस्थान, इ. अनेक कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या.

[ मम, मुमग्र ]

वर्ष जुने ६=नवे १ – अंक ( १ - २ ), ( ३ - ४ )...( ७ - ८ ), ( ९ - १० ), ( ११ - १२ ). चैत्र ते फाल्गुन १८२७.

वर्ष जुने ७=नवे २ – अंक १ ते ८, ( ९ - १० ), ११, १२. चैत्र ते फाल्गुन १८२८.

वर्ष ४ – अंक १ ते ६, ( ७ - ८ ), ९ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८३०.

वर्ष ५ – अंक १ चैत्र १८३१...४ ते ६... ८, ( ९ - १० ) मा - पौ १८३१.

वर्ष ६ – अंक १ ते ९...चैत्र ते मार्गशीर्ष १८३२.

वर्ष ८ ते २१ – अंक प्रत्येकी १ ते १२. चैत्र १८३४ ते फाल्गुन १८४७ ( चौदा वर्षे ).

## मकरन्द

मासिक : संपादक – भगवंत गोविंद माळगी प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. २. पृ. अं. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ८·८ × ६·२. प्रथमांक – जून १९३५.

स्वरूप – भारदस्त लेख, गोष्टी, कादंबऱ्या इ. [ मम ]

वर्ष १ – अंक ..४ स १९३५...७ डि ते १२ मे १९३६.

वर्ष २ – अंक १ ते ६ जू ते न १९३६ + ७ मा १९३७ ––.

## मजूर

पाक्षिक : संपादक – पांडुरंग नारायण भीमनवार. प्रकाशक – संपादक, चांदा. मुद्रक – भारत प्रिंटिंग प्रेस, चांदा. वा. व. रु. १॥८. अंकात ४ पृष्ठे. क्राउन. प्रथमांक – १ आगस्ट १९४०.

उद्देश – चंद्रपूर मंडळातील कोळशाच्या खाणमजुरांच्या सेवेकरिता. 'मजूर महाजन' संस्थेच्या पुरस्काराने. स्वरूप – प्रथम मजुरांचे व मध्यंतरी ( १९४४ - ४५ ) मुलांचे पाक्षिक.

ब्रीदवाक्य – १९४४

करी मनोरंजन जो मुलांचे ।
जडेल नाते प्रभुशी तयाचे ॥ साने गुरुजी.

विशेष माहिती – संचालक – ॲड्व्होकेट व्ही. एन्. स्वामी. अंकांचे प्रकाशन दरमहा दि. १ व १६ तारखांस. ५ आगस्ट १९४२ रोजी छपाई चालू असतानाच जप्ती व प्रकाशन बंद. १९४४ मध्ये नव्या अवतारात 'बालविश्व' जोडून नवे स्वरूप. १९४५ पर्यंत चालू. पुढे पाक्षिकाचे स्वरूपांतर व नामांतर 'नवा मनु' साप्ताहिकात ( प्रथमांक १४ जानेवारी १९४६ ) मुद्रक – वर्ष ३ श्रीगणेश मुद्रणालय. संपादक – १९४४ – तु. ना. काटकर.

[ लिंगायतराव तु ना काटकर ]

वर्ष १ – अंक १ ते २८, आगस्ट १९४० ते जुलै १९४१.

वर्ष २ – अंक १ ते २४. आगस्ट १९४१ ते जुलै १९४२.
वर्ष ३ – अंक+ १ दि.१६ एप्रिल १९४४––.

## मति-विकास

**मासिक** : संपादक – गोपाळ विष्णु तुळपुळे. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – विजय प्रेस, पुणे. वा. व. रु. १॥८. फु. अं. ≈३. अंकात ३२–२४ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक – एप्रिल १९३२ (चैत्र श. १८५४). शेवटचा अंक – मार्च १९३५.

उद्देश – इंग्रजी शाळांतील विद्यार्थी व उच्च शिक्षणाचा लाभ न झालेले वाचक यांना निरनिराळ्या विषयाचे ज्ञान व्हावे, त्यांच्या अंगी बहुश्रुतपणा येऊन जिज्ञासा उत्पन्न व्हावी व त्यांचे मन सुसंस्कृत होऊन ते कार्यक्षम व्हावे. विविध विषयसंग्राहक मनोरंजक मासिक. स्वरूप – शास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास वगैरे विविध विषयांवर ज्ञान-प्राप्ती व विचार-जागृती करणारे लेख. नामांकित विचारप्रवर्तक लेखकांच्या ग्रंथांचा सारांश. बक्षिसे ठेवून होतकरू लेखकास उत्तेजन.

**विशेष माहिती** – *आकार* – वर्ष २ – ८ × ५·२; वर्ष ३ – ८·५ × ५·४. *मुद्रक* – वर्ष ३ आनंद प्रेस, पुणे. पुरेसे वर्गणीदार न मिळाल्यामुळे पुढे चालविणे अशक्य, तथापि शिक्षणप्रसाराचे काम करीत राहावे म्हणून 'मति-विकासमाला' चालू केली [ वर्ष ३ अंक १२, मलपृष्ठ २ ].

[ मुंमग्र, गोवितुळपुळे पुणे ]

वर्ष १ ते ३ – अंक प्रत्येकी १ ते १२ (ए ते मा) एप्रिल १९३२ ते मार्च १९३५ (तीन वर्षे).

## मन्दार

**मासिक** : संपादक – मनोहर रानडे. सह-संपादक – कु. कमल जोशी. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. २. फु. अं. ≈३. अंकात ३२ पृष्ठे. ९·४ × ७·१. *प्रथमांक* – सप्टेंबर १९४०.

[ *मग्रं* ]

वर्ष १ – अंक १ व १९४० ते ९ मे १९४१.

## मन्दार

**मासिक** : संपादक – मधुसूदन रामकृष्ण उपासनी. प्रकाशक – संपादक, इंदूर. वा. व. रु. ६. फु. अं. ८८ अंकात सु. ४० पृष्ठे. १०·२ × ८·३. प्रथमांक – सप्टेंबर १९४५. शेवटचा अंक – अक्टोबर १९४६.

उद्देश – साहित्य, कला आणि जीवन यास वाहिलेले (मध्य भारतातील). पक्षभेदातीत. *स्वरूप* – एक विनोदी, एक चर्चात्मक लेख. कविता, लघुकथा, संपादकीय स्फुटे, लघुनिबंध, रूपक कथा. *'कल्पवृक्षाच्या छायेत', 'मलया-चलाचे निश्वास', 'अलका नमोवाणीवृत्त', 'हे पुण्यपावन मराठी'* इ. सदरे.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १, (२ - ३), ४ ते १०, (११ - १२). सप्टेंबर १९४५ ते आगस्ट १९४६. अंक (२ - ३) दिवाळी अंक, अंक ४ तावे पुण्यस्मरण अंक.
वर्ष २ – अंक (१ - २) व अ – १९४६ दिवाळी व साहित्य विशेषांक, अंक (३ - ४) छापला पण प्रसिद्ध झाला नाही.

## मंदिर

मासिक : संपादक – सुशीला जाधव (संचा-लिका). प्रकाशक – संपादिका, मुंबई. मुद्रक – महाराष्ट्र प्रि. प्रेस. वा. व. रु. ६. फु. अं. ८१०. अंकात ५० पृष्ठे. ९·७ × ७·२. प्रथमांक – मे १९४८.

उद्देश – महान महाराष्ट्राच्या वैचारिक, वाङ्मयिक, शैक्षणिक, औद्योगिक व इतर क्षेत्रातील

प्रगतीस पोषक अशी विचारसरणी धडेतोडपणे मांडणारे बहुजनसमाजाचे स्वतंत्र विचाराचे. स्वरूप — सचित्र, पर्णचित्रे.

[ मग्र, मुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मे १९४८ ते एप्रिल १९४९. अंक ३ जु १९४८ हैद्राबाद विशेषांक, अंक ४ आ ४८ स्वातंत्र्य अंक, अंक ७ न ४८ दिवाळी अंक.

वर्ष २ – अंक १ मे १९४९ ते ५ स १९४९. अंक १ वर्षारंभ खास अंक, अंक ४ आ ४९ स्वातंत्र्य अंक.

## मधमाशी

**मासिक** : संपादक – (पंडिता रमाबाई). प्रकाशक – मुक्ति, केडगाव. मुद्रक – मुक्तिमिशन छा. वा व. रु. १. फु. अं. ८१८६. अंकात १२ पृष्ठे. १०'९ × ८'४. प्रथमांक – मार्च १९०४. शेवटचा अंक — फेब्रुवारी १९०५ (पुस्तक-अंक.)

उद्देश – अज्ञान मुलांपासून सुशिक्षित थोरां पर्यंत (ख्रिस्ती) धर्माची शिकवण. स्वरूप – सर्वसाधारणपणे ख्रिस्ती धर्मातील गोष्टी. ख्रिस्ताची मनोरम वचने, इ. बालबोध भाषेत कविता, सृष्ट पदार्थांची माहिती.

ब्रीदवाक्य –

"मनोरमवचने मधाचा दिवा अशी आहेत ती जिवास गोड व हाडास आरोग्य आहेत"

"परमेश्वराचे न्याय सत्य आहेत. मधपेक्षा मोहळाच्या पाझरापेक्षाही ते गोड आहेत"

विशेष माहिती – यात प्रकाशित झालेल्या कवितांमध्ये काही मनोहर तर्खडकर व ना. वा. टिळक यांच्या आहेत. "हल्ली आपल्या महाराष्ट्र देशांत मुलांसाठी म्हणून प्रसिद्ध होणारी एक दोन मासिक पुस्तके आहेत. त्यांप्रमाणे आणखी हे... महिन्यातून एकदा तरी प्रसिद्ध होईल. साधल्यास दोनदा..." इतर कामामुळे प्रकाशन बंद केले.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मार्च १९०४ ते फेब्रुवारी १९०५.

## मधुकर (१)

**मासिक** : संपादक – महादेव गणेश गोरे (वर्ष ४ पासून). प्रकाशक – बापू दिनकर गोखले, मुंबई. मुद्रक – श्रीलक्ष्मीनारायण प्रेस, मुंबई. वा. व. रु. १८९. फु. अं. ८२. अंकात ४८ पृष्ठे. ६'९ × ४'७. प्रथमांक – जानेवारी १९१३. शेवटचा अंक – अक्टोबर १९२६.

स्वरूप – श्रमल्या भागलेल्यांची करमणूक करणारे लेख; वाचनाची गोडी लावण्यासाठी मनोरंजक वाङ्मय. वर्ष ३ व ४ मलपृष्ठावर ऐतिहासिक व्यक्तींची चित्रे.

ब्रीदवाक्य –

(१) उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥

(२) वर्ष ११ अंक २ पासून
उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगा: ॥

विशेष माहिती – प्रकाशक – वर्ष ३ बाळकृष्ण रावजी पाल्शणकर, वर्ष ४ म. ग. गोरे; वर्ष ४ अंक ८ पासून शंकर गणेश गोखले; वर्ष १० विठ्ठल विनायक लेले. *संपादक व प्रकाशक* – वर्ष ११ पासून मासिकाची सर्व व्यवस्था विश्वनाथ नारायण लेले यांच्याकडे. मुद्रक – वर्ष ११ अंक १० पर्यंत मकरन्द प्रिंटिंग प्रेस, नतर दि न्यू मधुकर प्रिंटिंग प्रेस. *वा वर्गणी* – वर्ष ४ रु. १८१३, वर्ष ५ रु. २, वर्ष ८ रु. २८८, वर्ष १० रु. ३. *आकार* – वर्ष २ – ७'१ × ४'८, वर्ष ११ – ८'१ × ५'४. पृष्ठे – वर्ष २ ची ३८४. हस्तांतर झाले. मधुकर (२) पाहा.

[ पुमग्र, मग्र, मुंमग्र ]

वर्ष १ ते ७ – अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि) जानेवारी १९१३ ते डिसेंबर १९१९. (सात वर्षे)

वर्ष ८ – अंक १, (२ ३), ४ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२०.

वर्ष ९ – अंक १, (२ - ३), ४ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२१. अंक ७ जादा (खास?) अंक.
वर्ष १० – अंक १ ते ८, (९ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९२२.
वर्ष ११ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२३. अंक ७ जुन्नर टिळक स्पेशल अंक.
वर्ष १२ – अंक १ ते ९, (१० - ११), १२. जानेवारी ते डिसेंबर १९२४.
वर्ष १३ – अंक (१ - २), ३ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२५.
वर्ष १४ – अंक ..., (२ - ३), फे - मा २६, (४ - ५), ६, ..., ८ ते १० अक्टोबर १९२६ (अश्विन १८४८).

## मधुकर (२)

**मासिक** : संपादक – नारायण हरि आपटे. प्रकाशक – संपादक, कोरेगाव. मुद्रक – श्रीनिवास छापखाना. वा. व. रु. ३८४. फु. अं. ८४. अंकात ४४, ४८ पृष्ठे. ९'१ × ६'१. प्रथमांक – विजयादशमी श. १८४९.

**उद्देश** – सात्त्विक मनोरंजन.

**विशेष माहिती** – हस्तांतर – "मधुकराचा पूर्वीपासून लेखक या नात्याने संबंध होताच. आता श्री. लेले 'मधुकर' चालवू शकत नसल्यामुळे आम्ही ते हाती घेतले आहे." वर्षारंभ बदलला. मध्ये एक वर्ष खंड पडला (अश्विन १८४८ ते अश्विन १८४९). *वार्षिक वर्गणी* – वर्ष ४ रु. १, फु. अं. ८१८६. वर्ष ४ ची 'सजावट आकर्षक'. यात 'विनोदक्याची कादंबरी' प्रसिद्ध झाली.

[मुंमग्रं]

वर्ष १ (जुने वर्ष १४) – अंक + १ ते १२. अश्विन १८४९ ते भाद्रपद १८५०.
वर्ष २ (जुने वर्ष १५) – १ ते १३. अश्विन १८५० ते भाद्रपद १८५१. अधिक मास धरून तेरा अंक.
वर्ष ३ – अंक १ ते १२. अश्विन १८५१ ते भाद्रपद १८५२.
वर्ष ४ – अंक + १ ते १२. चैत्र १८५४ ते फाल्गुन १८५४.
वर्ष ५ – अंक १ चैत्र १८५५ ते ७ —.

## मधुमक्षिका

**मासिक** : प्रकाशक–बेळगाव. वा. व. रु. १. ८'९ × ६. प्रथमांक – जानेवारी १८९६.

**उद्देश** – मधुमक्षिका सारखेचे. गोरगरीब कुटुंबातून ज्ञानाचा प्रसार करण्यासाठी. *स्वरूप* – मनोवेधक सचित्र मलपृष्ठ. उद्योगधंद्याची माहिती, महापुरुष, सत्पुरुष व गुणीजन यांची चरित्रे, नैतिक निबंध, कूटे, सुभाषिते.

**विशेष माहिती** – व्यवस्थापक – कुलकर्णी आणि मंडळी. 'मधुमक्षिका' वर्ष १ अंक (८ - ९) भा-स १८९६ वर यात 'कलहंस' मासिक सामील आहे' असा निर्देश. (पुरवणी नामावली पाहा.)

[मुंमग्रं]

वर्ष १ – अंक १, २, (३ - ५), (६ - ७), (८ - ९), (१० - १२). जानेवारी ते डिसेंबर १८९६.

## (श्री)मध्वसिद्धांतसुधाकर (१)

**मासिक** : संपादक – श्रीनिवास नारायण ताडपत्रीकर (लेखक व प्रकाशक). प्रकाशक – संपादक, पुणे/धारवाड. वा. व. रु. २८४. फु. अं. ८४. अंकात सरासरी ३२ पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – अश्विन श. १८३९ (विजयादशमी).

**उद्देश** – मध्वसिद्धान्तप्रचारिणी सभेचे मुखपत्र. *स्वरूप* – द्वैतमतावरील सन्मान्य ग्रंथांचे मराठी भाषांतर व सक्षेपात्मक निबंध, द्वैतमतोपपादक स्वतंत्र निबंध, मध्वआचारासंबंधाने स्वतंत्र

निबंध, मध्वसमाजास सर्व प्रकारे उपयुक्त माहिती. वर्ष २ - वर अंकावर एकच आनंदतीर्थ भगवत्पादाचार्यांचे चित्र.

ध्येयवाक्य –

श्रीमध्वसिद्धांतसुधाकरोऽयं
ज्ञानामृतं वर्षतु सज्जनेषु ।
ततो मुकुन्दाङ्घ्रिसरोजभक्त्या
ते निर्मलं मोक्षपदं लभन्ताम् ॥

**विशेष माहिती** – संपादक – वर्ष १ अंक ६ पासून रंगाचार्य बाळकृष्णाचार्य रड्डी, पुणे/धारवाड. "वर्ष ४ (?) नंतर तीन वर्षे बंद होते."

[ दमठेरे, मग्र, वर्नेक, पुमग्र, डेक्कॉ ]

वर्ष १ – अंक १ नमुना, २ फा १८३९ ते १२. (अश्विन) १८३९ ते भाद्रपद १८४०.
वर्ष २ – अंक १ ते ७, (८ - ९), १० ते १२. अश्विन १८४० ते भाद्रपद १८४१.
वर्ष ३ – अंक १, (२ - ३), (४ - ५), ..., (८ - ९), (१० - १२). अश्विन १८४१ ते भाद्रपद १८४२.
वर्ष ४ – ..., (५ फा १८४१ ७ चै १८४२) कालनिर्देश पाहता हा अंक वर्ष ३ चा असावा.

## ( श्री ) मध्वसिद्धांतसुधाकर (२)

**त्रैमासिक** : संपादक – रंगाचार्य बाळकृष्णाचार्य रड्डी, धारवाड प्रकाशक – संपादक, धारवाड. मुद्रक – चित्रशाळा छा., पुणे. वा. व. रु. ४. फु. अ. रु. १·४. अंकात – सदरवार ४८ पृष्ठे. ९·५ × ६·५. प्रथमांक – माघ शु. १८४२.

**उद्देश** – वैष्णव समाजास प्रस्तुत देशकालानुरूप तात्त्विक, धार्मिक, व्यावहारिक, योग्य माहिती देऊन धर्माविषयी जागृत करणे, विदेशीय स्वतंत्रताविषयी सहानुभूतिप्रसार करणे.

ध्येयवाक्य –

स्वतन्त्रमस्वतन्त्रं च द्विविधं तत्त्वमिष्यते ।
स्वतन्त्रो भगवान्विष्णुर्निर्दोषोऽशेषसद्गुणः ॥१॥



**विशेष माहिती** – 'जवळ जवळ तीन वर्षे व्यावहारिक व आपत्तिक अडचणीमुळे हा (मध्वसि. सु.) बंद ठेवणे भाग पडले होते.' "श्रीउत्तरादिमठाधीश श्रीसत्यध्यानतीर्थ यांच्या कृपाकटाक्षाने प्रसिद्ध होणारा." यात मराठी भाषांतरासह मध्वाचार्यकृत 'ब्रह्मसूत्रभाष्य' व संस्कृत टीकेसह 'विद्याधीशविजय' प्रसिद्ध झाले.

[ मग्र, डेक्कॉ, मुंमग्र ]

वर्ष ४ – अंक १ माघ १८४५, २ वैशाख १८४५, ३ श्रावण १८४६, ४ कार्तिक १८४६.

## (श्री) मध्वसिद्धांतसुधाकर (३)

**त्रैमासिक** : संपादक – रंगाचार्य बाळकृष्णाचार्य रड्डी. सहसंपादक – ( दुय्यम स. ) भीमराव कृष्ण कुलकर्णी. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – हनुमान प्रेस, पुणे. वा. व. रु. १. फु. अ. ०५. अंकात – सदरवार ३२ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – माघ शु. १८५५.

**उद्देश** – श्रीमध्वसिद्धान्तप्रचारिणी शास्त्रसभेचे कार्य.

**विशेष माहिती** – श्रीउत्तरादिमठाधीश श्रीसत्यध्यानतीर्थ स्वामी महाराज यांच्या आश्रयाखाली श्रीमध्वसिद्धान्तप्रचारिणी शास्त्रसभा, पुणे या संस्थेतून प्रसिद्ध होणारा.

[ वर्नेक, मग्र, मुंमग्र ]

वर्ष १ – अंक १ माघ १८५५, २ वैशाख १८५६.

## मनमोहन

**मासिक** : संपादक – नारायण विनायक कुलकर्णी. प्रकाशक – श्रीपाद रघुनाथ राजगुरु, पुणे. वा. व. रु. ३·८६. फु. अ. ०५. अंकात ४८ पृष्ठे ९·२ × ६ २. प्रथमांक – जानेवारी १९२८.

उद्देश – वाङ्मयाची सेवा. स्वरूप – पुस्तक-परीक्षणे, कथा, नाट्य, कादंबरी, कविता, विचाराचे फेरफटके.

ब्रीदवाक्य –
जनानुरागः प्रभवो हि सम्पदाम् ॥–भारविः
विशेष माहिती – यात 'महाराष्ट्र लक्ष्मी' कादंबरी सुरू.

[ मुंमग्रं कोल्हापूर ]

वर्ष १ – अंक १ जा १९२८...., ३ मार्च १९२८.

## मनमोहन

मासिक : संपादक – महादेव कृष्णाजी अभिषेकी. सहसंपादक – आत्माराम भिकाजी अभिषेकी. प्रकाशक – संपादक, खानापूर (बेळगाव). मुद्रक – धनंजय छापखाना, खानापूर. वा. व. रु. २ आगाऊ. अंकात ३२ पृष्ठे. ८·४×५·४. प्रथमांक – १ जून १९२९. शेवटचा अंक – अक्टोबर १९२९.

उद्देश – लेख, लघुकथा, चरित्र, कविता यांच्या द्वारा समाजात नवजीवन उत्पन्न करणे.

विशेष माहिती – वर्गणी – यावज्जीवन वर्गणी २५ रु. आगाऊ ५ रु. देणारास 'मनमोहन' ३ वर्षे मिळेल, आगाऊ १० रु. देणारास ६ वर्षे मिळेल. पत्रव्यवहार – मॅनेजर, मु. मंगेशी, पो. मार्दोळ–गोवा.

[ मुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ जू १९२९ ते ५ अ १९२९. ( संदर्भ 'गोमंतकीय नियतकालिके' पृ. ६२).

## मनुस्मृति

मासिक : संपादक – ( तयार करणार ) जनार्दन महादेव गुर्जर. प्रकाशक – ( प्रसिद्ध करणार ) संपादक, ( मुंबई ). मुद्रक – ( निर्णय-सागर, मुंबई ) वा. व. रु. ५ आगाऊ. अंकात ४० पृष्ठे. १०×६·९. प्रथमांक – ( डिसेंबर १८७५ ).

उद्देश – ( मथळ्याखाली ) प्राकृत भाषांतरासहित.

विशेष माहिती – 'मासिक – पुस्तकरूप' असा निर्देश. तयार करणार यांच्या नावापुढे 'विद्वानांचे आश्रयाने' असा खुलासा. अंक ११ चे शेवटी पृ. ४३० वर 'मनुस्मृति समाप्त' अशी समाप्ती.

[ मग्रं, मुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२, डिसेंबर १८७५ ते नोव्हेंबर १८७६. पृ. ४३०.

## मनो-विहार

मासिक : संपादक – मिरझा उमर बेग. प्रकाशक – ठाणे. फु. अं. ८५. अंकात २४ पृष्ठे. प्रथमांक – फेब्रुवारी १८६९.

उद्देश – मनोरंजक गोष्टींचे मासिक. स्वरूप – मराठी, हिंदुस्तानी, गुजराती, संस्कृत.

विशेष माहिती – सरकारी यादी व इंडिया ऑफिस कॅटलॉग पृ. ११५ वरून माहिती.

वर्ष १ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १८६९ ते जानेवारी १८७०.

वर्ष २ – अंक १ फे १८७० ते ४ मे १८७० —.

## मनोरंजकमित्र

मासिक : संपादक – आनंदराव बाळकृष्ण ( रागणेकर ). प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – ज्ञानदर्पण छा., मुंबई. वा. व. रु. ०११. फु. अं. ०२. अंकात १६ पृष्ठे. ७×४·१. प्रथमांक – ऑगस्ट १८९२.

उद्देश – लोकशिक्षणाचे साधन. स्वरूप – सोप्या भाषेत निबंध, सुरस कविता, मनोरंजक गोष्टी, नाटके, कादंबऱ्या, वैद्यकीय माहिती, मनोहर प्रश्न, पुस्तकावर टीका, निवडक वर्तमान.

**विशेष माहिती** – यात ' अमरेंद्रगति-लेखमाला. '

[ मग्रं ]

**वर्ष १** – अंक १ ते १०, (११ - १२). ऑगस्ट १८९२ ते जुलै १८९३.

**वर्ष २** – अंक + १ ते ३, (४ - ६), ७ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८९४.

## मनोरंजन

**मासिक** : संपादक – ( हरि नारायण आपटे). प्रकाशक – (व्यवस्थापक) नारायण नरसिंह साठे, गंगाधर अनंत ठाकूर, पुणे. मुद्रक – इंदु-प्रकाश, मुंबई. वा. व. रु. २ आगाऊ. फु. अं. ८३. अंकात प्रकरणवार २४ पृष्ठे. ८·३ × ५·२. प्रथमांक – जुलै १८८६. शेवटचा अंक – जून १८८७. (पुस्तक-अंक).

**स्वरूप** – करमणुकीच्या गोष्टी ( नॉवेल्स, नाटके वगैरे ) इ. शिवाय गंभीर विषयावरीलही लेख.

**ब्रीदवाक्य** –

आपरितोषाद्विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम् ।
—श्रीकालिदासः

**विशेष माहिती** – मलपृष्ठावर शिरोभागी ' [ कानिटकर आणि मंडळी यांचे मासिक पुस्तक ]'. ' पहिल्यापेक्षे अखेरीस निघते '. पुढे निराळे जोडनाव ' मनोरंजन आणि निबंधचंद्रिका ' ( पाहा ).

[ मुंमग्रं ]

**वर्ष १** – अंक १ ते १२. जुलै १८८६ ते जून १८८७.

## मनोरंजन आणि निबंधचंद्रिका

**मासिक** : संपादक – ( हरि नारायण आपटे ). प्रकाशक – ( व्यवस्थापक ) कुळकर्णी आणि मंडळी, पुणे. मुद्रक – ( वर्ष २ अंक १ ) जगद्धितेच्छु छा. पुणे, ( वर्ष ५ – अं. १२ ) ज्ञानप्रकाश व श्रीविठ्ठल छा. वा. व. रु. २. फु. अं. ८४. अंकात ३२ पृष्ठे. ८·३ × ५·२. प्रथमांक – जुलै १८८७ ( वर्ष २ अंक १ ). ( पुस्तक-अंक ).

**उद्देश** – " पुण्यातल्या पुण्यात दोन मासिक पुस्तके चालण्यापेक्षा एकच चांगले चालवावे. व्यक्तिस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य पूर्ण देणे हीच या पुस्तकाची पॉलिसी. " स्वरूप – कविता, कादंबरी, नाटक, गंभीर विषयावरील लेख. स्वतंत्र विषयांवर निबंध, पुस्तक-परीक्षणे, पुस्तकाची पॉलिसी म्हणतात ती ठेवली जाणार नाही. ( सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नाच्या सर्व दिशा दिसाव्या. )

**ब्रीदवाक्य** –

मनोरंजनचे ' आपरितोषाद्... ' व निबंधचंद्रिकेचे ' विरम तिमिर... ' अशी दोन्ही.

**विशेष माहिती** – मनोरंजन [ कानिटकर आणि मंडळी ] पुणे १८८६-८७ ची वर्षगणना ( वर्ष २ – अंक १ इत्यादी ) चालू ; पण त्याबरोबरच मलपृष्ठाच्या तळाला उजव्या कोपऱ्यात ' निबंधचंद्रिका - अंक ४९ ' इत्यादी निबंध-चंद्रिकेचा अनुक्रमनिर्देश. उशीर – वर्ष ५ अंक १२ मलपृष्ठ २ ' फार दिवसांनी हा अंक निघाला आहे.' या मासिकात हरिभाऊ आपटे यांच्या 'गणपतराव' व ' चाणाक्षपणाचा कळस ' या दोन ( अपूर्ण ) कादंबऱ्या, इतर प्रहसने, गोष्टी वगैरे लिखाण प्रसिद्ध झाले. याशिवाय ' भेटीचा अंक ' म्हणून निराळे अंक सुमारे ३२ ते ४० पृष्ठांचे काढीत.

[ पुमग्रं, मुमग्रं ]

**वर्ष २ ते ४** – अंक प्रत्येकी १ ते १२ ( जु ते जू ). जुलै १८८७ ते जून १८९० ( तीन वर्षे ) ( निबंधचंद्रिकेचा अनुक्रम ४९ ते ८४ )

**वर्ष ५** – अंक + १ जुलै १८९१ ते ५ नवंबर १८९१ + ६ ते ९ मार्च १८९३, १० एप्रिल १८९३, ११ मे, + १२ काल नाही. अनियमित ( निबंधचंद्रिका अंक ८५ —— )

## मनोरमा

मासिक : संपादकमंडळ – १ मल्हाद पेशव्य अत्रे, २ डॉ. इंदुमतिबाई नाईक, ३ गोपाळ गोविंद अधिकारी. प्रकाशक – गो. गो. अधिकारी, अधिकारी आणि मंडळी, पुणे. मुद्रक – चित्रशाळा प्रेस, पुणे. वा. व. रु. ३४३;२ रु. ची पुस्तके बक्षीस. पु. अं. ८४. अंकात मु. ४० पृष्ठे. ९·२ × ७. प्रथमांक – एप्रिल १९२९.

उद्देश – स्त्रियांच्या हितासाठी वाहिलेले. स्त्रियांचे मुख्य कार्यक्षेत्र गृह – तेथील व्यवस्था उत्तम प्रकारची व्हावी व जगत त्या सर्व विषयांचे ज्ञान लेखनद्वारा घरबसल्या करून यावे. स्वरूप – सचित्र. स्त्रियांच्या विविध प्रश्नांविषयी लेख, गोष्टी, निबंध, कविता, थोर स्त्रियांची चरित्रे व चित्रे, शिशुसंगोपन, स्त्रीशिक्षण, पाश्चिमात्य स्त्री-समाज, संपादकीय, चालू महाराष्ट्रातील राजकारण, महिलावृत्त, गृहशोभा इ. चित्रे-पत्रे, चालू बातमी.

ब्रीदवाक्य –

वर्ष ३ अंक ३ पासून

यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ।

विशेष माहिती – ' स्त्रियांचे उच्च दर्जाचे व मासिक '. मुद्रक – वर्ष २ अंक १० पासून आर्यसंस्कृति मुद्रणालय, पुणे, वर्ष ३ अंक ४ राजगुरु कमर्शियल प्रेस. प्रकाशक – वर्ष ३ अंक ४ वामन पांडुरंग केळकर. संपादक – वर्ष २ पासून १ प्र के. अत्रे व २ गो. गो. अधिकारी. आकार – वर्ष २ अंक ७ पासून १०·५ × ८·२.

[ पुमग्र, जम्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२. एप्रिल १९२९ ते मार्च १९३०. अंक १० वा कै. गो. म. चिपळूणकर अंक

वर्ष २ – अंक १ ते १२. एप्रिल १९३० ते मार्च १९३१.

वर्ष ३ – अंक (१ - २) ए - मे १९३१, ३, ४, ५ आ १९३१ — अंक ( १ - २ ) ए - मे वसंत अंक पृ. १३०.

वर्ष ४ – अंक + ... २ फे २८ ते १ जून १९३८—.

## मनोविनोद

मासिक : संपादक – इब्राहीम बाबाजी मल्लदार. प्रकाशक – कोल्हापूर. मुद्रक – शाहू विजय छा., कोल्हापूर. वा. व. रु. ०१५. अंकात ३२, २४ पृष्ठे. ५·७ × ४·६. प्रथमांक – (जून १९०४).

उद्देश – मनोरंजक मासिक स्वरूप – चुटके, नाटक इ. संकीर्ण.

विशेष माहिती – वर्ष २ चे. मलपृष्ठावर चुटके वगैरे मजकूर.

[ पुमग्र ]

वर्ष २ – अंक १ जून १९०५,...२ ऑगस्ट १९०५—.

## मनोहर

मासिक : संपादक – शं. वा. किर्लोस्कर. प्रकाशक – संपादक, किर्लोस्करवाडी. मुद्रक – किर्लोस्कर प्रेस, कि. वाडी. वा. व. रु. ३. पु. अं. ८४. अंकात ९६, ६४ पृष्ठे. ७·७ × ५·७ / वर्ष १ अं. ११ पा. ११·४ × ८·३. प्रथमांक – मार्च १९३४. पुढे चालू १९६७. ( सलग अंकक्रमांक )

उद्देश – कुटुंबातील मंडळींचे मनोरंजन करणे आणि विनोदवृत्तीचा परिपोष करणे. उच्चश्रेणीच्या कलात्मक साहित्यास वाहिलेले मासिक. स्वरूप – तिरंगी मलपृष्ठ व सचित्र. विविध लेख, कविता, प्रवासवृत्त, लघुकथा, चालू बातमी, ग्रंथपरीक्षण, शंकासमाधान, परभाषासाहित्यदर्शन, 'मनोहरच्या कॅमेऱ्यातून,' मेवामिठाई, छायाचित्रांची चढाओढ.

विशेष माहिती – पृष्ठसंख्या – वर्ष १ अंक १ डेमी अष्टपत्री ९६, वर्ष १ अंक ११ जानेवारी १९३५ पासून डेमी चतुष्पत्री ६४, ऑगस्ट १९४० पासून डेमी अष्टपत्री ९६. दिवाळीखेरीज

इतर विशेष अंक – वर्ष ४ न १९३७ (दिवाळी) कॉलेज विद्यार्थी व विद्यार्थिनी यांचे लेख, वर्ष १२ जा १९४६ पत्रव्यवसाय विशेषांक, वर्ष १४ अंक १६६ दि १९४७ गोमंतक साहित्य विशेषांक, वर्ष १५ जा १९४९ संपादक लेखक विशेषांक, वर्ष १७ न १९५० दिवाळी व २०० वा विशेषांक.

[ जय, क्वेरी, मुंमग्रं, ठामग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मार्च १९३४ ते फेब्रुवारी १९३५.

वर्ष २ ते १३ – अंक प्रत्येकी १ ते १२. (मा ते फे) मार्च १९३५ ते फेब्रुवारी १९४७ (बारा वर्षे). बहुधा दरसाल एकेरी शिवा जोड दिवाळी अंक. वर्ष ४ पुढे सावरकरांची 'काळेराणी' कादंबरी सुरु.

वर्ष १४ – अंक १५७ ते १६८. मार्च १९४७ ते फेब्रुवारी १९४८. अंक १६५ दिवाळी अंक.

वर्ष १५ – अंक + एप्रिल ते फेब्रुवारी. एप्रिल १९४८ ते फेब्रुवारी १९४९. मार्चचा अंक निघाला नाही.

वर्ष १६ व १७ – अंक प्रत्येकी १ ते १२ (मा ते फे). मार्च १९४९ ते फेब्रुवारी १९५१ (दोन वर्षे). प्रतिवर्ष दिवाळी अंक.

## मनोहरण

मासिक : प्रकाशक – कृष्णराव बापूजी माडे, पुणे. मुद्रक – श्रीशिवाजी छा. था. ब. रु. ३८८. फु. अ. ८८. अंकात ४८ पृष्ठे ९'८ × ६'४. प्रथमांक – अक्टोबर १८९२. (पुस्तक अंक).

उद्देश – शरीराला पुष्टी देणारी साधने उपयुक्त त्याहूनही मनाला आल्हाद देणारी अधिक उपयोगाची. ही साधने अनेक. तरी मुख्य गोष्टी आणि गोड नाटके ह्यांनी मन रमवीन म्हणी. ही महाराष्ट्रातील गोष्टी उणीव दूर करणे. स्वरूप – मुख्य गोष्टी, नाटके वगैरे. कादंबऱ्या लंडन येथील बड्या लोकांची गुप्त कृत्ये, मीमसिंग नाटक, समाजी नाटक.

[ मुमग्रं, पुमग्रं ]

वर्ष १ – अंक ... ४ दि. १५ जाने १८९३.

## मनोहर माला

मासिक : प्रकाशक – पुणे. बा. ब. रु. १०१४. अंकात ४० पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – (अक्टोबर १९२५) (वर्ष पुष्प).

स्वरूप – कविता, लेख, पुस्तकपरीक्षणे, गोष्टी, विनोदी लेख, पोच अभिप्राय, चालू कादंबरी.

ब्रीदवाक्य –

इति मनोहारि च दुर्लभं वचः ।

[ यदिपेंदरकरसंग्रह ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १९२५ ते ५ फेब्रुवारी १९२६. दिवाय दिवाळीक ,२५२. अंक ४ खास अंक.

## मन्वन्तर

मासिक : संपादक – नारायण लक्ष्मण कोराटे. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – हनुमान प्रेस, पुणे. बा ब. रु. ८१२, वर्ष ५ रु. १. फु. अ. ८१, वर्ष ५- रु. ८१८६. अंकात ३२ ६४ पृष्ठे ७'२ × ४'८, वर्ष २ – ९'७ × ६'६. प्रथमांक – जानेवारी १९३५. पुढे चालू १९६० अक्टोबरपर्यंत.

उद्देश – साक्षरतेचा प्रसार, सर्वसामान्य लोकांची बौद्धिक गरज भागविणे. "गरिबांना सहज परवडेल अशा अल्प किंमतीत भरपूर मजकूर घावा व करमणूक करून वाचकांना सहजगत्या ज्ञान प्राप्त करून यावे हेच ध्येय." स्वरूप – सर्वांगीण. राष्ट्राच्या योजना, ग्राम राज्याची कल्पना, यांचे गुरुजी यांचे लेख इ.

ब्रीदवाक्य –

( वर्ष ५ ) कोणाही जीवाचा न घडो मत्सर ।
वर्म सर्वेश्वरपूजनाचे ॥

विशेष माहिती – *विशेषांक* – वर्ष ३ ते ७ प्रतिवर्षी वर्षारंभ खास अंक. वर्ष ६मध्ये साने गुरुजी लिखित 'श्याम, खंड ३'. वर्ष ८ अंक १ वर्षारंभ खास अंक, अंक ११ दिवाळी अंक. वर्ष ९ ते १६ प्रतिवर्षी एकेरी किंवा जोड दिवाळी अंक पुढीलप्रमाणे : वर्ष ९, अंक ११, वर्ष १० अंक ( १० - ११ ), वर्ष ११ अंक ( ११ - १२ ), वर्ष १२ अंक ( १० - ११ ), वर्ष १३ अंक ११, वर्ष १४ अंक ११, वर्ष १५ अंक ११, वर्ष १६ अंक ११. इतर अंक स्वतंत्र व शिवाय वर्ष १३ अंक १ ला ४७ साने गुरुजी विशेषांक.

[ मग्र, पुमग्रं, जग्रं ]

- वर्ष १ व २ – अंक प्रत्येकी १ ते १२. ( जा ते डि ) जानेवारी १९३५ ते डिसेंबर १९३६ ( दोन वर्षे ).
- वर्ष ३ ते ७ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९३७ ते डिसेंबर १९४१ ( पाच वर्षे ).
- वर्ष ८ - अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९४२.
- वर्ष ९ ते १६ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९४३ ते डिसेंबर १९५० ( आठ वर्षे ).

## मय पंचाल

त्रैमासिक : संपादक – महादेव विष्णु पाटलो स्वर. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. १८१. अंकात ३२ पृष्ठे. ८·४ × ५.४. प्रथमांक – सप्टेंबर १९२९.

ब्रीदवाक्य –

सत्कर्मयोगे वय घालवावे ।
सर्वांमुखी मंगल बोलवावे ॥

[ मुंमग्रं ]

- वर्ष १ – अंक १ स १९२९, २ डि, ३ मा ३०, ४ जून १९३०.
- वर्ष २ – अंक १ सप्टेंबर १९३०---.

## (श्री) मयूरकवि

मासिक : संपादक – ( सरकारीनोंद ) राजाराम बाळकृष्णशास्त्री हेर्लेकर. प्रकाशक–मुंबई. मुद्रक–श्रीहरिवरदा छा., मुंबई. वा. व. रु. २८८ आगाऊ. फु. अं. ८४. अंकात ८० पृष्ठे. ७·५ × ५. प्रथमांक – नवंबर १८८९. ( पुस्तक-अंक )

उद्देश – मयूरकवीच्या सर्व वाङ्मयाचा यथाधकाश संग्रह करणे. स्वरूप – क्रमाक्रमाने छापणे – फक्त दुर्बोध स्थळी टीका.

ब्रीदवाक्य –

( वर्ष ५ )–

*अमृतप्रतिम चरित्र प्राशावे श्रवण करुनि आर्यांनी ।*
*गाईल रामकृष्णाघनमत्तमयूर तेचि आर्यांनी ॥*

विशेष माहिती – जाहिरातीवर सही करणार – बाबाजी अनंत प्रभु, तेंडुलकर. वर्ष १ अंक १० – " कै. माधव चंद्रोबा यांनी सर्वसंग्रह प्रसिद्ध केला. त्याची प्रत पंतांचे पणतू नारायण मोरेश्वर यांनी आपल्या मूळ प्रतीवरून शुद्ध करून दिली होती. त्यातील राहिलेल्या चुका पंतांचे निपणतू मोरेश्वर नारायण ऊर्फ बळवंतराव पंत यांनी दुरुस्त केल्या आहेत. टीपाही त्यांच्याच अनुमतीने दिल्या आहेत."

[ मग्रं, पुमग्रं ]

- वर्ष १ व २ – अंक प्रत्येकी १ ते १२ ( न ते अ ). नवंबर १८८९ ते अक्टोबर १८९१ ( दोन वर्षे ). भारत.
- वर्ष ३ – अंक १ ते १२. नवंबर १८९१ ते अक्टोबर १८९२. हरिवंश, बृहद्दशम, कृष्णविजय.

वर्ष ४ – अंक १ ते १२ नवबर १८९२ ते अक्टोबर १८९३ समश्लोकी, ब्रह्मोत्तरखंड, रामायण

वर्ष ५ – अंक १ नवबर १८९३ ते ८ जून १८९४–– रामायणे

## मराठा

मासिक सपादक – कृष्णातुन काळेकर (= भवानी गणपत काळकर) प्रकाशक – सपादक, मुद्रक बा व रु २, वर्ष ३ रु १ फु अ ८३ अकात ४० ते ५६ पृष्ठे ७२×४८ प्रथमांक – एप्रिल १९१४

उद्देश – जातिविषयक नव्हे सुपरिणामकारक व प्रांतिपर वाङ्मयाच्या अभिवृद्धीसाठी मनो रजनासहित ज्ञानाभिरुची वाढावी स्वरूप – सचित्र अनेक गोष्टींची चचा कविता, गोष्टी, चरित्र, निबंध, विनोदी लेख

ब्रीदवाक्य –

तद्दिव्यमव्यय धाम सारस्वतमुपास्महे ।
यत्प्रसादात्प्रलीयन्ते मोहान्धतमसच्छटा ॥

– सुभाषित

विशेष माहिती –- प्रकाशक – वष १ अक १२ – केशव कृष्णराव साळवी आणि सामत (?). सपादकाच्या सबधीचा आकार – वर्ष ४, अक ४ – ९१×५२ यात ' कक मार्तंड ', 'सुहासिनी' ह्या कादबऱ्या

[ जम, ममग्र ]

वर्ष १ – अक १ ते ५, (६ ७), (८ ९), १०, (११ १२) एप्रिल १९१४ ते मार्च १९१५

वर्ष २ – अक + १ त १०, (११ १२) जुलै १९१५ ते जून १९१६

वर्ष ३ – अक १ त ४, (५ ६), (७ ८), ९, १०, (११ १२) जुलै १९१६ ते जून १९१७

वर्ष ४ – अक १ ते ४, (५ ६), ७, (८ ९), (१० १२) जुलै १९१७ ते जून १९१८.

## मराठा

मासिक सपादकमण्डळ – बाबुराव सखाराम अनाळकर, डी एस् सावत, एन् जी वशाळकर, पी एस् साम्म प्रकाशक – बा स अनाळकर, मुद्रक बा व रु १८८ पु अ ८२ अकात ३२ पृष्ठे ९६×७२ प्रथमांक फेब्रुवारी १९३९

ब्रीदवाक्य –

मराठा तितुका मेळवावा ।
महाराष्ट्रधर्म वाढवावा ।
आपुला समाज उन्नत करावा ॥

विशेष माहिती – वर्ष २ मध्ये भास्करराव जाधवाचे काही लेख वर्ष ३ मध्यतरी युद्धाच्या महागाईमुळे प्रकाशन बेमुदत बद होते यात डी डी साठये याचे ' मी पाहिलेली नाटके व नाट्यसंस्था ' या विषयावर लेख, बाबुराव अनाळकर लिखित ' भूतनगरी ' कादबरी

[ मन ]

वर्ष १ – अक १ ते १२ फेब्रुवारी १९३९ त जानेवारी १९४० अक ७ दारूबदी अक

वर्ष २ – अक १ त १२ फेब्रुवारी १९४० ते जानेवारी १९४१ अक १२ मान्ला अक

वर्ष ३ – अक १ फेब्रुवारी १९४१ ते ४ म ४१ + ५ स ते ७ न ( साल नाही ) + ८ फ ४४ ते १२ जून १९४४ ––

## मराठा गायक मित्र

मासिक सपादक – गो पु दमडे देसाई प्रकाशक – धाडा, गोवा; ५१ बा व रु

१८११. अंकात १६ पृष्ठे. ९·५ × ६·५. प्रथमांक – चैत्र शक १८४०.

उद्देश – गायक म्हणजे वेश्यासमाज; त्याच्या उन्नत्यर्थ. स्वरूप – समाजाच्या हिताचे विषय.

ध्येयवाक्य –

आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः ।
शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः ॥
— ऐतरेय ब्राह्मण.

विशेष माहिती – संपादक हेगडे देसाई यांच्या 'भारत' साप्ताहिकाची पुरवणी म्हणून प्रकाशन.

[ गोहिअ मुंबई, मडगाव ]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८४० ते ३,(४-५), (६-७) मा-अ १८४०.

## मराठा चेंबर ऑफ कॉमर्स ॲण्ड इंडस्ट्रीजचे मासिक वृत्त

मासिक : संपादक – आत्माराम रावजी भट. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – केसरी छापखाना, पुणे. वा. व. रु. २. फु. अं. ०३. अंकात १२ ते ३२ पृष्ठे. ७·२ × ४·८. प्रथमांक–जुलै १९४५. नामांतर एप्रिल १९४८.

उद्देश – हिंदुस्थानची, विशेषतः महाराष्ट्राची व्यापारी उन्नती साधणे. महाराष्ट्राच्या व्यापाराचा फायदा महाराष्ट्रास राखणे. महाराष्ट्रीयांचा आंतरप्रांतीय व आंतरराष्ट्रीय व्यापारात प्रवेश व्हावा यासाठी झटणे. स्वरूप – कार्यकारी मंडळाने केलेल्या कार्याचे महिने महाल वृत्त, चेंबरकडे आलेली समासदास उपयुक्त माहिती, व्यापारी व औद्योगिक विषयाबाबत सरकारदरबारी झालेला पत्रव्यवहार.

विशेष माहिती – मराठा चेंबर ऑफ कॉमर्स ॲंड इंडस्ट्रीजचे (संस्थेची स्थापना वर्ष प्रतिपदा श. १८५६ =१६ मार्च १९३४). इंग्रजी मथळा अंक २ पासून – मंथली न्यूज बुलेटीन ऑफ दि मराठा चेंबर ऑफ कॉमर्स ॲंड इंडस्ट्रीज, पुणे २. पृष्ठसंख्या – वर्ष २ पासून २४ ते ३२. नामांतर वर्ष ४ पासून 'संपदा' (पाहा).

[ कचेरी मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ जुलै १९४५, (२-३), ४, ५, (६-७), (८-९) फेब्रुवारी-मार्च १९४६. अंक ५ च्या ठिकाणी ४ व (६-७) च्या ठिकाणी (४-५) चुकून छापले.

वर्ष २ – अंक १ ते १२. एप्रिल १९४६ ते मार्च १९४७. पहिल्या अंकावर वर्ष १ अंक १० असे छापले आहे.

वर्ष ३ – अंक १ ते १२. एप्रिल १९४७ ते मार्च १९४८.

## मराठा जागृति

त्रैमासिक : संपादकमंडळ – दामोदर भाऊराव त्रिवारे, नारायण बाळाजी मोरे. प्रकाशक – र. स. साळवी, मुंबई. वा. व. रु. १०४ घरपोच. फु. अं. ०५. अंकात ३६ पृष्ठे. ९·४ × ६·९. प्रथमांक – अक्टोबर १९४९ (विजयादशमी). (सलग अंकक्रमांक).

उद्देश – मराठा समाजाचे त्रैमासिक. स्वरूप – कविता, समाजातील व्यक्तींचे परिचय, लघुकथा, संस्थांचे परिचय.

[मग्र]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १९४९, २ जा, ३ ए, ४ जुलै १९५०.

वर्ष २ – अंक ५ अक्टोबर १९५० वर्षारंभ विशेषांक किं. ०१२—.

## मराठा-मंडळ

त्रैमासिक – संपादक – (व्यवस्थापक श. वि. कदम कातरणीकर). प्रकाशक – मराठा शिक्षण परिषदेचे सल्लागार मंडळ, लष्कर,

ग्वाल्हेर मुद्रक – अलिजा दरबार प्रेस, ग्वाल्हेर वा व रु १०२ अकात ६० पृष्ठ ९ १ × ६ २ प्रथमांक – अक्टोबर १९२०

**उद्देश** – मराठा समाजाच्या उन्नतीप्रीत्यर्थ स्वरूप – राजकीय विषय नाहीत समाजातील दुहीचे निराकरण पुढील पिढीची सुधारणा इ विषयक लेख

**ब्रीदवाक्य** –

१ (मलपृष्ठ)
शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम् ॥
–श्रीमद्भगवद्गीता

२ (आतपृष्ठ)
जो आपुले हित न करी ।
तो आपुला आपण वैरी ।
येथे काही कोणावरी । दोष नाही ॥
–श्रीसमर्थ रामदास.

**विशेष माहिती** – यात कर्नल नानासाहेब शिंदे यांचा 'पानपतच्या घनघोर संग्रामाचा युद्धशास्त्रदृष्ट्या विचार' हा विस्तृत लेख

[ मुमग्र ]

**वर्ष १** – अंक १ अक्टोबर १९२०, २ जा २१, ३ ए २१, ४ जुलै १९२१ अंक ३ मराठा शिक्षण परिषदेचा खास सचित्र अंक

**वर्ष २** – अंक (१ - २), ३, ४ अक्टोबर १९२१ ते जुलै १९२२—

## मराठा मित्र

**मासिक** संपादक – गोपाळ दाजीबा दळवी प्रकाशक – मुंबई मुद्रक – इंदुप्रकाश छापखाना, मुंबई वा व रु १ फु अ ०२ अकात प्रकरणवार २४ + ४, ते ४८ पृष्ठे ८ ४ × ५ ४ प्रथमांक – जानेवारी १९०९

**उद्देश** – मनोरंजनाच्या द्वारे अंतःकरणात ज्ञानामृत शिंपून सर्व मागासलेल्या समाजाच्या हिताचा विचार, वाचकांच्या मनाला उज्ज्वल नीतीचा संस्कार, शेतीविषयक व देशविषयक कर्तव्याची जाणीव व उच्च कल्पनाची प्रेरणा देणे स्वरूप – मराठादी समाजाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, स्फुट विवेचन, कूट प्रश्न, कविता, पत्रव्यवहार, चरित्रे, गोष्टी, एति कादंबरी, धार्मिक, सामाजिक, औद्योगिक लेख, सामाजिक चळवळी, मासिक समालोचन, पुस्तकपरीक्षण इ वर्ष ३ – चित्राची योजना

**ब्रीदवाक्य** –

(१) जो आपले हित न करी । तो आपला आपण वैरी । येथ काही कोणावरी । शब्द नाही ॥ १ ॥ – श्रीसमर्थ रामदास
(२) सत्यसंकल्पाचा दाता भगवान । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥

**विशेष माहिती** – मुद्रक – वर्ष ६ अंक २ पासून 'मराठामित्र' छापखाना *ब्रीदवाक्य* – वर्ष ६ अंक २ पासून फक्त क्रमांक (२), पूर्वी क्रमांक (१) फक्त. *वा वर्गणी* – वर्ष ३ रु. १०४, वर्ष ६ रु १०१३, वर्ष ७ रु २ *आकार* – वर्ष ३ ७ २ × ४ ८, वर्ष ७ ८ ९ × ६ वर्ष ६ अंक ४ – "मराठा शिक्षणपरिषदेच्या हेतूस अनुसरून घेतले"

[ मग्र, मुमग्र ]

**वर्ष १** – अंक १ ते १२ जानेवारी ते डिसेंबर १९०९ पृ २८२

**वर्ष २** – अंक १ ते १२ जानेवारी ते डिसेंबर १९१० पृ ३१२

**वर्ष ३** – अंक १ ते १२ जानेवारी ते डिसेंबर १९११ पृ ४८८.

**वर्ष ४** – अंक १ ते ९, (१० ११), १२ जानेवारी ते डिसेंबर १९१२ पृ ४१६. अंक (१० ११) दिवाळी अंक

**वर्ष ५** – अंक १ ते ९, (१० ११), १२. जानेवारी ते डिसेंबर १९१३ पृ ६४८ अंक (१० ११) दिवाळी अंक

**वर्ष ६** – अंक १, (२ ३), ४ ते ८, (९ १०), ११, १२ जानेवारी ते डिसेंबर १९१४ पृ ४०६ अंक (२ - ३) मराठा शिक्षण परिषद अंक अंक

(९ - १०) दिवाळी अंक. फक्त याचा आकार ८·९ × ६.
वर्ष ७ – अंक १ ला १५, २, (३ - ४) मा - ए १९१५...
वर्ष ८ – अंक १ ते ३, (४ - ५), ६, (७ - ८), ९, १०, (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९१६.

## मराठा-मित्र

**मासिक** : संपादक – गोपाळ दाजीबा दळवी. प्रकाशक – संपादक, नागपूर. ९ × ६·१. प्रथमांक – अक्टोबर १९१९.

**विशेष माहिती** – *स्मारक* – कै. श्री. राणा रा. सा. आनंदराव तुकारामजी देशमुख राजे बानखडे देशमुख यांचे स्मारक. नवावतार.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ (जुने ११) – अंक १ अक्टोबर १९१९ ते ६, ..., (८ - ९), (१० - ११), १२ सप्टेंबर १९२०.
वर्ष २ (जुने १२) – अंक १ अक्टोबर १९२०, (२ - ५), ६ ते १० जुलै १९२१—.

## मराठाविजय

**मासिक** : संपादक – कृष्णाजी परशराम शिंदे. प्रकाशक – संपादक, निपाणी. मुद्रक – मराठा-विजय छा. वा. व. रु. १८८. ७·२ × ४·८. प्रथमांक – (जून १९१३). (पुस्तक - अंक).

ब्रीदवाक्य –

क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे ।
विचारीं मना तूंचि शोधून पाहे ॥

[ आकृटे ]

वर्ष १ – अंक...२ आगस्ट १९१३, ४ ··· १९१३

## मराठा-वैभव

**मासिक** : संपादकमंडळ – काशिनाथ ठकुजी जाधव, पुणे; आनंद नानाजी पवार, पाटील, वाल्हे. प्रकाशक – आ. ना. पवार (मालक), पुणे. वा. व. रु. १८८, श्रीमंतांकरिता उत्कृष्ट अंक रु. १०. पु. अं. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ७·१ × ४·९. प्रथमांक – जानेवारी १९१३.

**उद्देश** – समाजाची शिक्षणाकडे प्रवृत्ती होईल असे करणे – आधी मासिक, मग पाक्षिक व नंतर वृत्तपत्र करण्याचा विचार. *स्वरूप* – निबंध, गोष्टी, वृत्तसंग्रह इ.

ब्रीदवाक्य –

सकटीं कंटाळों नये । करावे अत्यंत उपाय ।
तरीं मग पाहता काय । उणे आहे ॥–रामदास.

[ पुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ला १९१३...५ ते ७ जुलै १९१३.

## मराठी ग्रंथ संग्राहक

**पुष्पे** : संपादकमंडळ – लीला मस्तकार रेळे, प. त्र्यं. सहस्रबुद्धे. प्रकाशक – (पुष्पे १ - २) शं. वा. कुळकर्णी, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई (पुष्पे ३ - ४) वा. वि. भट, अभिनव प्रकाशन, मुंबई. मुद्रक – फेमस प्रिंटर्स, मुंबई. पु. अं. ८४. अंकात २२ – ३० पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – आगस्ट १९४६. शेवटचा अंक–डिसेंबर १९४६. (पुष्प क्रम.)

**उद्देश** – मराठी ग्रंथालयसंघ (मुंबई) प्रकाशन. ग्रंथालय चळवळीला वाहिलेले. *स्वरूप* – साहित्यसमीक्षा, ग्रंथ व ग्रंथालये, नवे प्रकाशन, दृष्टिक्षेप, मराठी ग्रंथालयसंघवार्ता. ग्रंथ व ग्रंथालयविषयक लेख.

**विशेष माहिती** – पुष्प १ पृ. २६ – " प्रकाशनाची मूळ कल्पना मुंबई मराठी ग्रंथसंग्र- ··· ची त्याच संस्थेने दोन प्रकाशने वाचकाच्य

ती दिलीटी. परतु ग्रंथालयसघाची वाढती ज ध्यानी घेऊन प्रकाशनाचे काम सग्रहालयाने गलयसघाकडे सोपविले." 'साहित्य सहकार' र्ष १६ अंक ८, पृ. १० – "१९४५ लात 'मराठी ग्रथ सग्राहक' हे ग्रथालयचळ-ळीस वाहिलेले एक प्रकाशन मुं. म. ग्रंथसंग्रहा-यातर्फे सुरू करण्यात आले. उपनगर ग्रंथालय रिषदेपर्यंत त्याची दोन पुष्पे प्रसिद्ध झाली होती. ळ त्रैमासिक स्वरूपात प्रसिद्ध करण्याची कल्पना, ण त्या वेळच्या वृत्तपत्र नियत्रण कायद्यामुळे व ागद निर्बंधामुळे तसे करता येत नव्हते. त्याचे न अक (पुष्पे) निघाल्यावर...मराठी ग्रंथालय-घाने ते चालवावयास घेतले. पहिल्या वर्षी चार ुष्पे व दुसऱ्या वर्षी डिक्लरेशन केल्यावर मासिक स्वरूपात) त्याचे चार अक निघाले." डेक्लरेशनोत्तर मासिकात रूपातर.

[डेक्कॉ, मुमग्रं]

पुष्प १ आगस्ट १९४६, २ अक्टोबर ४६, ३ नवबर ४६, ४ डिसेंबर १९४६.

## मराठी ग्रंथसंग्राहक

मासिक : सपादकमंडळ – वा. नि. भट, प. नि. सहस्रबुद्धे. प्रकाशक – सपादक, मुंबई. मुद्रक – फेमस प्रिंटर्स, मुंबई. वा. व. रु. २. फु. अ. ८४. अकात १६ – २२ पृष्ठे. ८·३ × ५·३. प्रथमाक – मे १९४७.

**उद्देश** – मराठी ग्रथालयसघ (मुंबई) प्रकाशन, ग्रथप्रसार व ग्रथालय चळवळ यांना वाहिलेले मासिक. **स्वरूप** – नव्या मराठी साहित्याची अद्य यावत माहिती, मराठी साहित्यातील उत्कृष्ट कृतींचा परामर्श, ग्रथालये व साहित्य सस्था याची माहिती, ग्रथ व ग्रथालयचळवळ यावर माहितीपूर्ण लेख, साहित्यविषयक प्रश्नावर मूलग्राही टिपणे. 'साहित्य-समीक्षा', 'नवे प्रकाशन.'

**विशेष माहिती** – अंक १ पृ. १८ – "'मराठी ग्रंथसंग्राहका'ला आवश्यक ती परवानगी मिळाल्याने मे १९४७ पासून सग्राहक मासिक स्वरूपात काढण्याचे ठरले."

[डेक्कॉ, मुंमग्रं]

वर्ष १ – अंक १ मे १९४७, २ जून ४७, ३ जुलै १९४७.

## मराठीचिये नगरी

**मासिक** : प्रकाशक – केशव भिकाजी ढवळे, मुंबई. अंकात प्रकरणवार २६ पृष्ठे. ९·७ × ७·३. प्रथमाक – मे १९४८.

**उद्देश** – मराठीचा चढतावाढता सभार दर्शविणे. **स्वरूप** – ग्रथकार, ग्रथप्रकाशन, ग्रथ-विक्रेते, ग्रथालये व विद्यालये यास उपयुक्त वाङ्मय.

[ढवाणे, मुमग्र]

वर्ष १ – अंक १ ते ८, (९ - १०), (११ - १२). मे १९४८ ते एप्रिल १९४९.

वर्ष २ – अंक १ मे १९४९.

## मराठी शालापत्रक

**मासिक** : सपादक – (वर्ष ३ अक ४ पासून) केरो लक्ष्मण छत्रे, सुपरिटेंडेंट नॉर्मल स्कूल, पुणे. प्रकाशक – पुणे. मुद्रक – ज्ञानप्रकाश छापखाना (शिळेमुद्रण). वा. व. पुढवळ अंकाच्या दराने गणित करून. फु. अ. ८२. अंकात २०/२४ पृष्ठे. ७·८ × ५·२. प्रथमाक – आगस्ट १८६३ (पुणे पाठशाळा पत्रकाचे चालू वर्ष ३ अक ४). शेवटचा अंक – डिसेंबर १८७५. (पुस्तक अत).

**उद्देश** – पुणे ट्रेनिंग कॉलेजचे प्रकाशन. **स्वरूप** – फक्त मराठी शाळाना उपयुक्त मजकूर, पत्रे, शंका, चर्चा, निबध, व्याख्याने, परीक्षणे, सरकारी जाहिराती.

**विशेष माहिती** – *नावात बदल* – पूर्वीचे 'पुणे पाठशाळा पत्रक' (पाशा) : पुण्यातील पाठशाळेविषयी काहीच मजकूर नसतो, मराठी शाळाना उपयुक्त असा पुष्कळ असतो म्हणून बदल. *इंग्रजी मथळा* – मराठी स्कूल पेपर (Marathi

School Paper) *संपादक* – वर्ष ४ अंक ११ पासून कृष्णशास्त्री चिपळोणकर (संदर्भ वर्ष ४ अंक ११ मलपृष्ठ ४) हे पुणे ट्रेनिंग कॉलेजचे पहिले प्रिन्सिपाल. (कायम नेमणूक आगस्ट १८६५). *अनुक्रमणिका* – मलपृष्ठावर दोनरकानी, डावीकडे मराठीत व उजवीकडे तीच इंग्रजीत भाषांतर केलेली. यात वर्ष १० अंक २ मध्ये 'सार्वजनिक पुस्तकालये' या विषयावर निबंध. सरकारी हुकुमावरून बंद.

[ मुंमग्रं, मसाप, मग्रं ]

वर्ष ३ (चालू) – अंक ४ ते १२. आगस्ट १८६३ ते एप्रिल १८६४.

वर्ष ४ ते १४ – अंक प्रत्येकी १ ते १२ (मे ते ए). मे १८६४ ते एप्रिल १८७५ (अकरा वर्षे).

वर्ष १५ – अंक १ ते ८. मे १८७५ ते डिसेंबर १८७५.

## मराठी शालापत्रक

**मासिक :** *संपादक* – (सरकारी नोंद) वासुदेव गणेश जोशी. प्रकाशक – पुणे. मुद्रक – आर्यभूषण छापखाना, पुणे. वा. व. रु. १॥३. फु. अं. ॥३. अंकात ३२, ४० पृष्ठे. ७·९ × ५·१; वर्ष २२ अंक ७ पासून ९·१ × ७·२. प्रथमांक – जानेवारी १८९०. पुढे चालू १९६७. (पुस्तक-अंक).

**उद्देश** – मराठी शाळांतील शिक्षक मंडळीकरिता शैक्षणिक लेखांच्या द्वारे शिक्षणप्रसार. *स्वरूप* – (१) शास्त्र, कला व धंदा या दृष्टीने शिक्षणाचा विचार, शाळाखात्यासंबधाने माहिती, *परदेशातील शिक्षणपद्धतींची माहिती, थोरांची* चरित्रे, भाषा, गणित इ. विषयांतील शंका, पुस्तकांवर अभिप्राय, शैक्षणिक विषयावर निबंध, स्फुट विचार. (२) वर्ष २२ पासून विद्यार्थ्यांचे लेख, मुलांसाठी गोष्टी, चित्रे, चित्रेपर्णे, उपदेशपर गोष्टी वगैरे बाल्मासिकाच्या विशेष लेखनाचा समावेश. (३) वर्ष ४० पासून सर्वांसाठी नव्हे मुलांचे मासिक.

**ब्रीदवाक्य** –

(१) येथे शब्द नाही शिष्यांसी । हे अ सद्गुरुपाशी । सद्गुरू पालटी अवगुणासी । नाहि यत्नेकरूनी ॥ – दासबोध.

(२) जे काही आपणांस ठावे । ते इतर शिकवावे । शहाणे करूनी सोडावे । सकल जना ॥ – रामदास.

**विशेष माहिती** – *नाव* – मलपृष्ठ आणखी 'मराठी स्कूल पेपर', पण आरंभपृष्ठ फक्त 'शालापत्रक'. *ब्रीदवाक्य* – वर्ष १ पासू क्रमांक (१) फक्त. वर्ष ८ पासून क्रमांक (१) व (२) एकापुढे एक. *मुद्रक* – वर्ष १० पासू चित्रशाळा प्रेस, पुणे. *प्रकाशक* – वर्ष ९ अंक ११ पासून विनायक निवक चिपळूणकर. वर्ष ११ अंक ८ पासून शंकर नरहर जोशी. *संपादक* – वर्ष २० रामचद्र भिकाजी जोशी. *संपादक, मुद्रक व प्रकाशक* – वर्ष ४१ पासून शंकर नरहर जोशी. वर्ष ५५ अंक ३ पासून दामोदर पांडुरंग रानडे. *स्थित्यंतरे* – वर्ष २२ अंक ७ पासून (१९११ जुलै) मुलांनाही उपयुक्त लेखनाचा समावेश; वर्ष ४० अंक ४ (एप्रिल १९२९ पासून अंतरंग व बहिरंग बदलून केवळ मुलांकरिताच चालविण्याचे धोरण. वर्ष ५२ पासून मुलांच्याासाठी उपयोगी लेख सुरू. *वार्षिक वर्गणी* वर्ष ४१ पासून रु. २॥६ फु. अं. ॥४; वर्ष ५ पासून रु. २॥१५ फु. अं. ॥५; वर्ष ६० पास रु. ३॥८ फु. अं. ॥६. *वर्षाची पृष्ठसंख्या* वर्ष ३५ ते ३९ सुमारे २५०, वर्ष ४० सु ४००, वर्ष ४१ ते ४८ सु. ५००, वर्ष ५ सु. ४००, वर्ष ५४ ते ५७ सु. ३००, वर्ष ५८ पासून सु. ४००. *विशेषांक* – वर्ष २२-२३ (१२-१) खास बाल्मासिक स्वरूपाचा अंक. वर्ष ३६ ते ३९ पहिले अंक खास वर्षारंभ अंक. वर्ष ४० अंक ५ खास अंक. वर्ष ४१ अंक १ खास चरित्रांक. वर्ष ४२ अंक १ खास हिंदुस्थान अंक. वर्ष ४३ अंक १ खास बाल बालिकांक. वर्ष ४४ अंक १ खास वीरांक; अंक

वर्ष ७ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९४९. अंक ६ गृहिणी विशेषांक; अंक ११ दिवाळी अंक.

वर्ष ८ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९५०. अंक ५ विवाह विशेषांक; अंक ११ दिवाळी अंक.

## वसंत–विहार

**मासिक :** संपादक – धोंडू तुकाराम तोडवळकर. प्रकाशक – संपादक, मुंबई. अंकात ४८ पृष्ठे. ७·२ X ४·८. प्रथमांक – अक्टोबर १९२५.

[ आफळे ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १९२५ —.

## वसुधैव कुटुंबक

**मासिक :** प्रकाशक – मुंबई. वा. व. रु. १. अंकात १६ पृष्ठे. प्रथमांक अक्टोबर १९००.

**उद्देश** – धार्मिक विषयाचे मासिक. धार्मिक विषयाची चर्चा व संग्रह करणे. परधर्माविषयी निंदात्मक मजकूर येणार नाही. **स्वरूप** – मठ विषयक माहिती, नजीकची तीर्थक्षेत्रे यांचे वर्णन, साधुसंतांची चरित्रे, चमत्कार इ., धर्मजागृतीचे लेख, इतर मासिकांतील धार्मिक लेखांची भाषांतरे, धार्मिक चळवळी व संस्था यांची माहिती. मराठी कवी व कविता, ग्रंथपरीक्षणे इ.

**ब्रीदवाक्य –**

अनित्यानि शरीराणि पै(वि)भवो नैव शाश्वतः ।
नित्यः संनिहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥

**विशेष माहिती** – पत्रव्यवहाराचा पत्ता – दामोदर गंगाधर मराठे, गाणगापूर (सोलापूर), श्रीदत्त संस्थान विठ्ठल चैतन्य विश्रांतिमठ गाणगापूरच्या विद्यमाने. मठोत्पादक – विठ्ठल चैतन्य बोवा. 'फिलॉसॉफिस्ट', 'ब्रह्मवादिन्' यांचा आदर्श. 'आर्यधर्मदर्पण' व 'आर्यधर्मरहस्य' यांची दिशा वेगळी.

[ मुंमग्रं, दकेगों ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १९००, २ नवंबर १९०० —.

## वागीश्वरी

**मासिक :** संपादकमंडळ – रामचंद्र बाळाजी मावकर ( प्रकाशक ), श्रीनिवास रामचंद्र बोबडे. प्रकाशक – वर्ष १ अंक ७ पासून रामचंद्र मार्तंड हजरनवीस, नागपूर. वर्ष २ जयकृष्ण केशव उपाध्ये. मुद्रक – महाराष्ट्र छा. नागपूर, अंक ७ – श्रीगणेश प्रि. वर्क्स, पुणे; वर्ष २ – अरुण छा., उमरावती. वा. व. रु. ४ आगाऊ. फु. अं. ८६. अंकात ४८, ६४ पृष्ठे. ९·६ X ६·५. प्रथमांक – अश्विन शु. १० श. १८५१. ( वर्ष - विलास ).

**उद्देश** – हिंदुसंस्कृतीच्या पुनरुज्जीवनार्थ झटणारे. **स्वरूप** – धार्मिक, शास्त्रीय, ऐतिहासिक, राजकीय, वाङ्मयिक, कलात्मक वगैरे ललित व विदग्ध विषयांची चर्चा, लघुकथा, कविता, नवप्रकाशित ललित विदग्धकृतींची निर्भीड परीक्षणे; प्रचलित सार्वजनिक प्रश्नांची स्पष्ट व सांगोपांग चर्चा, स्वभावचित्रे, जगप्रसिद्ध व्यक्तींचे परिचय इ.

**ब्रीदवाक्य –**

'संस्कृति म्हणजे राष्ट्राचा आत्मा'
तमोगणविनाशिनी सकलकालमुद्योतिनी ।
धरातलविहारिणी जडसमाजविद्वेषिणी ॥
कलानिधिसहायिनी लसदलोलसौदामिनी ।
मदन्तरवलंबिनी भवतु कापि कादंबिनी ॥

**विशेष माहिती** – *उत्पादक* – गोपाळ मुकुंद हुद्दार. *संपादकमंडळ* – वर्ष २ चे : १ कृष्णशास्त्री धुळे, २ श्री. रा. बोबडे, ३ गोपाळ मुकुंद हुद्दार, ४ रामचंद्र बाळाजी मावकर, ५ शंकर बाळाजी शास्त्री. संपादक – वर्ष ५, अंक १ - ७

श्री. रा. बोबडे; अंक ८ पासून शं. बा. शास्त्री. *प्रकाशक* – वर्ष ४ कृष्णा श्रीधर जोशी. *वा. वर्गणी* – वर्ष ५ रु. ३, फु. अं. ८४. *आकार* – वर्ष ५ – ९·५ × ७·२. *मनाई हुकूम* –वर्ष १ विलास १२ च्या सुमारे मुंबई सरकारचा मनाई हुकूम सुटला. *लेखलेखकसूचि* – वर्षवार.

*सरकारकडून जामीन मागणी* – वर्ष ३ विलास ८ (वैशाख श. १८५४) मधील 'संजीवन' (त्र्यं. शं. वकील) कृतिबद्दल १००० रु. चा जामीन.

[ दवापो, गगंजा, जप्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२. अश्विन १८५१ ते भाद्रपद १८५२. पृ. ७७९.

वर्ष २ – १ ते ५, (६ - ७), ८ ते १२. अश्विन १८५२ ते भाद्रपद १८५३. पृ. ८३७.

वर्ष ३ – अंक (१ - २) अश्विन - का १८५३, (३ -४), ५ ते ९ ज्येष्ठ १८५४. अंक १० ते १२ बद्दल 'अश्रु-फुले' (त्र्य. शं. वकील) कथासंग्रह देण्यात आला.

वर्ष ४ – अंक + १ ते १२. मे १९३३ ते एप्रिल १९३४, अंक ९ ला ३४ विशेषांक.

वर्ष ५ – अंक १ मे १९३४ ते ९ (जानेवारी) १९३५ —.

## वाग्विलास

**मासिक** : संपादक – (सरकारी नोंद) दामोदर सावळाराम. प्रकाशक – मुंबई. मुद्रक – विद्यामकाश छापखाना, मुंबई वा. व. रु. २ फु. अं ८६. अंकात सदरवार प्रकरणवार २४ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – अक्टोबर १८८३. (पुस्तक–अंक).

**उद्देश** – आबालवृद्ध स्त्रीपुरुषाच्या उपयुक्त विषयांचे. स्वदेशाचा बाणा धरून. *स्वरूप* – कला-कौशल्य, पदार्थ, विद्यावृद्धी वगैरे शास्त्रीय विषय. उपयुक्तविषयरत्नमाला, सत्पुरुषचरित्रमाला, मनोरंजक चमत्कार गोष्टी, सुभाषित, लोकवार्ता, कादंबरी, नाटक इ.

**ब्रीदवाक्य** –

बलस्य व्यसनानीह यान्युक्तानि मनीषिभिः ।
मुख्यो मेदोहि तेषा तु पापिष्ठो विदुषा मतः ॥
– विराटपर्व

*न ब्रह्मविद्या न च राज्यलक्ष्मी ।*
*जशी तशी हे कविता कवीची ।*
*सर्वोत्तमी अर्पण मात्र होते ।*
*चित्तास कन्येसम सौख्य देते ॥* – प्रसन्नराघव

**विशेष माहिती** – मुद्रक – पुस्तक १ अंक २ *सद्धिदर्पण छापखाना. मालकी* – पु. १ अंक ६ पासून विनायक मोरेश्वर घामणकर अथवा कृष्णाजी नारायण शास्त्री. वाग्विलासातील 'अभिनव तरुणी विद्या प्रहसना' संबंधी खटला झाल्यामुळे अंक मागासले. या खटल्यात प्रथकर्ते सुटले. मुद्रक व विक्रेते यास दंड झाला. पुस्तक २ अंक (८ - ९) पासून 'वेदान्तज्ञानप्रकाश' मासिक पुस्तकाचा मजकूर 'वाग्विलासा'तच देण्याचा ठराव केला.

[ मुंमग्रं, मग्र, दवापो ]

वर्ष १ – अंक...२ नवंबर १८८३, ३, (४ - ५) फे ८४, + ६ मा १८८५ ते ११ आगस्ट १८८५ ...

वर्ष २ – अंक १ अक्टोबर १८८५ ते ९ जून १८८६ —.

## वाग्विलास

**मासिक** : संपादक – कुमुदिनी सेन. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. १. फु. अं. ८१८२. अंकात २४ पृष्ठे. ११ × ८·७. प्रथमांक – (मे १९३५).

**उद्देश** – सुख, संपत्ती, समाधान या विषयास वाहिलेले. आबालवृद्ध स्त्रीपुरुषांसाठी स्त्रियांनी चालविलेले. *स्वरूप* – लेख, कविता, लघुकथा इ.

ध्येयवाक्य –

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।

**विशेष माहिती** – मालक लीलावती गोविंद बोले.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक ...., २ जून १९३५ ते ५ सप्टेंबर १९३५ —.

## वाङ्मय

**मासिक** : संपादक – एकनाथ यादव निफाडकर. प्रकाशक – संपादक, नाशिक. वा. व. रु. २८४ फु अं. ८५. अंकात ४० पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – चैत्र श. १८५५ ( मार्च १९३३ ).

**स्वरूप** – संपादकीय, साहित्य व भाषा, ललितवाङ्मय; तात्त्विक व शास्त्रीय, सामाजिक, धर्मविषयक, आर्थिक, ग्रंथपरीक्षणे, मनरंजन, कविता, पत्रे, डायरी इ. नटचित्रमाला, वाङ्मयभक्तचित्रमाला.

**विशेष माहिती** – यात वर्ष १ अंक १ – मराठी नियतकालिकांचे समालोचन. अंक ६, ७ – नागपूरची मासिके व मराठीचे घाट. शिवाय ( १ ) नटचित्रमाला, ( २ ) वाङ्मय भक्तचित्रमाला. वर्ष ३ अंक (३ - ४) – 'इंग्रजी अमदानीतील साठ उत्कृष्ट पुस्तके कोणती ?

[ दवापो, मग्र, मुंमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८५५. अंक ४ कविपरीक्षण अंक

वर्ष २ – अंक ... २ वैशाख १८५६, ३, ... ६ मा, .... ८ डि १९३४, ११, मार्च १९३५ .. .

वर्ष ३ – अंक .., २ जुलै १९३५, ( ३ - ४ ) आ - सप्टेंबर १९३५ —.

## वाङ्मयशोभा

**मासिक** : संपादकमंडळ – मनोहर महादेव केळकर, पु. रा. भिडे. प्रकाशक – पु. रा. भिडे प्रकाशन संस्था, पुणे. मुद्रक – प्रतिमा छापखाना पुणे. वा. व. रु. १८८ ( तीन महिन्यात नाव नोंदविणारास रु. १ ). फु. अं. ८२. अंकात ३२ पृष्ठे. ९'५ × ७'५. प्रथमांक – ५ मे १९३९. पुढे चालू १९६७. (वर्ष ९ अं ४ आगस्ट १९४७ पासून सलग अंकक्रमांक ).

**उद्देश** – ( वर्ष ५ अंक २ पासून ) जीवन व वाङ्मय यास वाहिलेले मनोहर ग्रंथमालेचे मासिक. साहित्य, साहित्यिक आणि साहित्यिकांचा परिचय. मराठी वाङ्मयासंबंधी माहिती सतत पुरविणारे मासिक किंवा 'साहित्य पुरवणी'. *स्वरूप* – सचित्र चित्रपर्णे. कथा, स्वभावचित्रे, व्यक्तिचित्रे, 'या महिन्यातील वाङ्मयशोभा' ( वाङ्मय समालोचन ), कविता इ. शिक्षणविषयक लेख, 'लयदृष्ट' ( परकीय वाङ्मयाचा परिचय ), वाहते वारे, रुपेरी संसार, ग्रह आणि तारे, गल्ल्याची सीर ( विनोद व आख्यायिका ), शास्त्र-शास्त्रज्ञ, संसार इ. सदरे.

ध्येयवाक्य –

( वर्ष १ अंक ५ ते वर्ष ५ अंक १ )
हितं मनोहारि च दुर्लभं वचः ।

**विशेष माहिती** – संस्थापक, पहिल्या तीन अंकांचे संपादक व पहिल्या आठ अंकांचे प्रकाशक – पु. रा. भिडे. फक्त वर्ष १ अंक ५ च्या मलपृष्ठावर शिरोभागी 'मनोहर ग्रंथमालेचे मासिक.' *आकार* – वर्ष १ अंक ६ - १०'६ × ८'३, वर्ष ४ – ८'२ × ५'२, वर्ष ७ अंक ११–१०'६ × ८'३, वर्ष १२ – ९'७ × ७'३. *वा. वर्गणी* – वर्ष १ अंक ८ रु. २; वर्ष ५ अंक ११ रु. २८८; वर्ष ६ अंक ८ रु. ४; वर्ष ८ रु. ५; वर्ष १० रु. ६, फु. अं. ८१२, आजीव वर्गणी रु. ६०. *प्रकाशक* – वर्ष १ अंक ९ पा. रा. दमडेरे, वर्ष २ अंक ४ म. म. केळकर. *संपादक* – वर्ष १ अंक ४

म. म. केळकर, पा. रा. दमडेरे, गं. मा. निरंतर; वर्ष १ अंक १२ फक्त केळकर. मुद्रक – वर्ष १ अंक ३ न. स. लि. प्रेस पुणे; वर्ष १ अंक ६ राजगुरु प्रेस, पुणे.

[ जग्रं ]

- वर्ष १ ते ५ – अंक प्रत्येकी १ ते १२. (मे ते ए). मे १९३९ ते एप्रिल १९४४ (पाच वर्षे). प्रतिवर्ष दिवाळी अंक. वर्ष ५ अंक २ पन्नासावा खास अंक.
- वर्ष ६ – अंक १ ते ५, (६ - ७), ८ ते १२. मे १९४४ ते एप्रिल १९४५. अंक ६ - ७ दिवाळी अंक.
- वर्ष ७ – अंक १ ते १२. मे १९४५ ते एप्रिल १९४६. अंक ७ दिवाळी अंक.
- वर्ष ८ – अंक १ ते ५, (६ - ७), ८ ते १२. मे १९४६ ते एप्रिल १९४७. अंक १ नववर्षारंभ अंक, अंक (६ - ७) दीपावली अंक.
- वर्ष ९ – अंक १ ते ६, (७ - ८), ९ आ ४८, १०, (११ - १२). मे १९४७ ते एप्रिल १९४८. अंक १ वर्षारंभ खास अंक, अंक ४ शंभरावा खास अंक. सलग अंक क्रमांक १०० पासून सुरु. अंक (७ - ८) दीपावली अंक.
- वर्ष १० – अंक १ ते १२. मे १९४८ ते एप्रिल १९४९. अंक १ नववर्षारंभ अंक, अंक ५ (११३) ट्रस्ट ऑफ इंडिया विमा कंपनी लि. निवेदन विशेषांक, अंक ७ (११५) दीपावली अंक.
- वर्ष ११ – अंक १ ते ५, (६ - ७), ८ ते १२. मे १९४९ ते एप्रिल १९५०. अंक १ नववर्षारंभ विशेषांक, अंक ४ आ स्वातंत्र्य विशेषांक, (६ ७) दीपावली; १० फे लोकसत्ताक भारत विशेषांक
- वर्ष १२ – अंक १ मे १९५० ते ६, (७ - ८) न - डि १९५०. अंक १ नववर्षारंभ विशेषांक, अंक ४ एक आगस्ट विशेषांक, अंक (७ - ८) दीपावली विशेषांक.

## वामनी ग्रंथ

**मासिक :** प्रकाशक – बाळाजी आणि कंपनी, मुंबई. मुद्रक – इंडियन प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. रु. ६. फु. अं. ८१०. अंकात १०० पृष्ठे. ८.४ × ५.४. प्रथमांक – (सरकारी नोंद) नवंबर १८८९. (सलग अंकक्रमांक)

**उद्देश –** वामनपंडिताच्या ग्रंथाच्या पुनाट प्रती मिळवून शुद्ध करून ते एकवट छापून प्रसिद्ध करणे. **स्वरूप** – ८० पृष्ठे वामनपंडिताच्या यथार्थदीपिकेकडे व राहिलेली त्याच्या इतर स्फुट काव्याकडे.

**ब्रीदवाक्य –**

नमिला साष्टांग श्रीपतिभक्तिरस वामनस्वामी ।<br>
रसभवना तत्कवना मानी या तेवि याम न स्वा मी ॥<br>
– मोरोपंत.

जैसा चंडांशु सतेज व्योमी ।<br>
तैसाचि केवळ वामनस्वामी ।<br>
ज्याची श्लोकरचना ये भूमी ।<br>
भूमंडळावरी अपूर्व गा ॥ – श्रीधर.

**विशेष माहिती –** मथळ्यात खुलासा – वामनपंडिताच्या सर्व उपलब्ध ग्रंथाचा संग्रह. पहिल्या अंकाच्या मलपृष्ठावर नाव नाही.

[ मुमग्र ]

- अंक – १ ते १२. नवंबर १८८९ ते अक्टोबर १८९०.
- अंक – १३ ते २४. नवंबर १८९० ते अक्टो-बर १८९१.

## वारांगना मित्र

**मासिक :** संपादक – विष्णु गोविंद बोरामणीकर. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – चित्रशाळा छा., पुणे. वा. व. रु. ३. फु. अं. ८४. अंकात ३२ पृष्ठे. ७.२ × ४.८. प्रथमांक – जून १९२७.

**उद्देश –** *शिक्षण व सद्गतीच्या अभावी स्वत. पतित बनून दुसऱ्यास बनविणाऱ्या वेश्या-*

समाजाला शिक्षण देणे, सुधारणे, नीतिमान करणे. स्वरूप – सामाजिक, पौराणिक विषय व समाज-सुधारणा या विषयांवर लेख. गोष्टी, प्रसिद्ध स्त्री-पुरुषांचे फोटो, ऐतिहासिक व पौराणिक वारांगनांची चरित्रे.

**विशेष माहिती** – पहिल्या अंकात हरितनय-लिखित ' पवित्र प्रेम ' ही गोष्ट व ' वेदयासमाज ' हा लेख.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ जून १९२७—.

## वाल्मीकिरामकथामहोदय

**मासिक** : संपादक – ( लिहिणार ) वे. शा. सं. गोपाळशास्त्री घाटे. प्रकाशक – जावजी दादाजी, निर्णयसागर छा., मुंबई. मुद्रक – निर्णयसागर छा., मुंबई. वा. व. रु. ५. फु. अं. ८८. अंकात ४८ पृष्ठे. ८·९×६·२. प्रथमांक – फेब्रुवारी १८७४.

**उद्देश** – वाल्मीकि रामायणातील सर्व कथांचे प्राकृत गद्यरूपाने भाषांतर. जनहितार्थ.

**ब्रीदवाक्य** –

कूजंतं रामरामेति । मधुरं मधुराक्षरम् ।
आरुह्य कविताशाखां । वंदे वाल्मीकिकोकिलम् ॥

**विशेष माहिती** – अडीच वर्षांत, ३० अंकांत सर्व ग्रंथ पुरा होईल. [ अभिप्राय ज्ञानोदय २१–५–१८७४, पृ. २४६. ]

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १८७४ ते जानेवारी १८७५. पृ. ५७२.

वर्ष २ – अंक १ ते १२. फेब्रुवारी १८७५ ते जानेवारी १८७६. पृ. ३०७ + २५२.

वर्ष ३ – अंक ( १ - २ ) फेब्रुवारी-मा १८७६, (३ - ४), (५ - ६) जू - जुलै १८७६ –. पृ. २८८.

## वाल्मीकीय रामायण

**मासिक** : संपादक – ( पुस्तककर्ता ) बी. ए. पंडित काशीकर. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. २८६. फु. अं. ८४, अंकात २४ पृष्ठे. ८·३ × ५·४. प्रथमांक – चैत्र श. १८१०. ( पुस्तक-अंक ).

**उद्देश** – आजपर्यंत वाल्मीकीय रामायणाचे भाषांतर झालेले नाही. ती उणीव नाहीशी करणे. स्वरूप – भाषांतराशिवाय चुटके, गोष्टी इ. विषय.

**विशेष माहिती** – मथळ्याखाली – (प्राकृत).

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८१०—.

## विकास

**त्रैमासिक** : प्रधान संपादक – डॉ. नरहरी अनंत खरे. प्रकाशक – संपादक, तळेगाव-दाभाडे. मुद्रक – प्रफुल्ल प्रिं. प्रेस, पुणे. वा. व. रु. ५. फु. अं. ८८. अंकात ७० पृष्ठे. ८·३ × ५·५. प्रथमांक – २६ जानेवारी १९५०. शेवटचा अंक – नवंबर १९५०.

**उद्देश** – मनाचा सर्वांगीण विकास करणे – रोगाने दुर्बल झालेल्याचे मनाला उत्साह मिळवून देणे आणि रुग्ण नाहीत त्यांना रोगाच्या उत्पादना-विषयी जागरूकता देणे व उपायांची माहिती करून देणे. स्वरूप – मराठी, गुजराती, इंग्रजी, हिंदी, चित्र व रचना असे पाच विभाग – विभागवार खाससंपादन.

**ब्रीदवाक्य** –

मवेद्विकासो मनसो विकास: ।
असतो मा सद्गमय । तमसो मा ज्योतिर्गमय ।
मृत्योर्मा अमृतं गमय ।

**विशेष माहिती** – मूळ हस्तलिखित मासिकाचे छापील त्रैमासिकात रूपांतर. तळेगाव जनरल हॉस्पिटलतर्फे, रुग्णालयात, रुग्णाकरिता व रुग्णांच्या साहाय्यावरच ' विकास ' चा जन्म. तात्त्विक मत-भेदांमुळे बंद.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ - २६ जा १९५०, २ - १४ मे, ३ - १५ ऑ, ४ - १ नवंबर १९५०. अंक १ गणराज्यदिन अंक, अंक ४ दिवाळी अंक.

## विक्रम

मासिक : प्रकाशक – व्ही.जी.देवधर, सातारा, पॉर जगदीश ( ? ), सातारा. मुद्रक – सहयत्नर छा. . वा. व. रु. १. पु. अं. ८१८६. अंकात २४ पृष्ठे. ६'९ X ४'१. प्रथमांक – ९ जुलै १९०६.

उद्देश – सरकारच्या शब्दास केवळ मान न तुकविता त्यास योग्य सल्ला देणे, लोकास त्यांचे अधिकार समजावून देणे, आपली खरी मते व विचार जनांपुढे प्रदर्शित करणे, स्वदेशप्रीती वाढविणे इ. स्वरूप – राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक विषयावर लेख. स्वदेशी चळवळीचा पुरस्कार, कादंबरी, नाटक इ.

ब्रीदवाक्य –

महंते महंत करावे । युक्तिबुद्धीने भरावे ।
जाणते करीत विचरावे । नाना देशी ॥ १ ॥
—रामदास.

विशेष माहिती – 'देशी कागदावर छापिले.'

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ जुलै १९०६, ..., ३ सप्टेंबर १९०६—.

## विजय

मासिक : संपादक – दत्तात्रय गणेश चाटोरकर प्रकाशक – ग्वाल्हेर. वा. व. रु. २८८. पु. अं. ८४. अंकात २६ पृष्ठे. ८'४ X ५'४ प्रथमांक – ( जुलै १९२१ ).

स्वरूप – सचित्र. चैतन्योत्पादक चरित्रे, सुरस कविता, गुलजार गोष्टी, चटकदार विनोद, उपयुक्त धंदे, कृत्यक्ष, जगाचा संसार इ. संकीर्ण विषय.

ब्रीदवाक्य –

स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।

विशेष माहिती – माहितीची नोंद वर्ष २ अंक ५ वरून. " सदाशिव अनंत शुक्र व भास्कर रामचंद्र मालेराव हेही संपादकमंडळात होते असे म्हणतात...विद्यार्थ्यांच्या विशेष आवडीचे. " —कचवाले – ' मध्यभारतीय मराठी वाङ्मय ' पृ. ३२३.

[ आफळे ]

वर्ष २ – अंक ... ५ नवंबर १९२२—.

## विजय

मासिक : संपादक – बसवलिंगशास्त्री पुराणिक. प्रकाशक – संपादक, सोलापूर. मुद्रक – विजय छा. सोलापूर. वा. व. रु. ३. अंकात ४० पृष्ठे. ८ X ५'३. प्रथमांक – ( मे १९३० ).

स्वरूप – संकीर्ण विषय. काही थोडे लेख स्त्रियांत धर्मविषयक.

[ शासंस्था चाकुर ]

वर्ष २ – अंक...७ नवंबर १९३१......
वर्ष ३ – अंक... ८ ( डिसेंबर ) १९३२...
वर्ष ४ – अंक... ५ अक्टोबर १९३३.
( वर्षारंभ बदलला )—.

## विजयी नामदेव

मासिक : संपादक – ( वर्ष ३ ) बाळकृष्ण राजाराम हेंद्रे. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – इंदुप्रकाश छापखाना, मुंबई. वा. व. रु. २. अंकात ३२, ४० पृष्ठे. ८'४ X ५'४. प्रथमांक – चैत्र शु. १ श. १८५४.

उद्देश – समाजाची दुःस्थिती नाहीशी होण्यासाठी दिनचर्येत, व्यापारधंद्यात व वर्तन-

समात करावयाच्या बदलाबद्दल विचारविनिमय करून माहिती पुरविणे. स्वरूप – सचित्र. नामदेव समाज व पोटभेद यांच्या हिताबरोबरच इतरत्र समाजाशी सहकार्यासंबंधी, समाजाच्या शैक्षणिक व औद्योगिक उन्नतीविषयक लेख, नामदेव-समाजोन्नति परिषदेच्या अनेक समाजकार्याबद्दलची अभिरुची उत्पन्न करणारे चर्चात्मक लेख, गोष्टी, कविता, कादंबरी, येचे, चरित्रे, स्थलवर्णने. समाजाच्या चळवळी, पोटभेद एकीकरण.

ब्रीदवाक्य –

( १ ) नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवी
माझा ॥ – नामदेव.

( २ ) नामा म्हणे आम्ही पायरीचे चिरे ।
संतपाय हिरे वर देती ॥ – नामदेव.

( ३ ) सत्य संकल्पाचा दाता भगवान ।
सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ – तुकाराम.

( ४ ) जो पंढरीचे निजभक्त मोठा ।
श्रीपांडुरंगी दृढभाव निष्ठा ।
त्यासी सदा श्रीहरि खेळ खेळे ।
तो नामदेवो स्मर एक वेळे ॥
– श्रीधरस्वामी नाझरे.

( ५ ) बुद्धीचे वैभव । आन नाहि दुजे । एका
केशिराजे । सकल सिद्धी ॥ – श्रीज्ञानदेव.

विशेष माहिती – *ब्रीदवाक्य* – फक्त पहिल्या दोन अंकाचे मलपृष्ठावर. ( १ ) व ( २ ) व आरंभपृष्ठावर ( ३ ). पुढच्या अंकावर फक्त ( १ ) व ( ३ ), वर्ष २ पासून अनुक्रमणिकेच्या वर फक्त ( ४ ); फक्त वर्ष २ अंक १ ते ४ आरंभपृष्ठावर ( ५ ). पहिल्या अंकाच्या आरंभ-पृष्ठावर चैत्र १८५३ असा निर्देश. वर्ष २ पासून रजक वाङ्मयाचा समावेश. वर्ष ३ अंक १ मलपृष्ठ ३– ' पुढील अंकात विजयन्ना अभिमानास्पद इतिहास येईल '.

[ मुंमग्रं, दवाशे, जम, ढेरेसंग्रह ]

वर्ष १ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८५४.

वर्ष २ – अंक १ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८५५. अंक १२ फाल्गुन नामदेव समाजोन्नति परिषद, महाड, अधिवेशन २५ वे विशेष अंक.

वर्ष ३ – अंक १ चैत्र १८५६ ते ५ श्रावण १८५६—.

## विणकर-सेवक

**मासिक** : संपादक :– महादेव पुंडलिक विचकर, द्वितीय खंड – रामचंद्र महादेव विचकर. प्रकाशक – संपादक, सातारा. मुद्रक – ( वर्ष ५ व द्वितीय खंड ) विजय प्रेस, सातारा. वा. व. रु. २. अंकात २४ पृष्ठे. ८·४ × ५·५. प्रथमांक – ( जून १९३५ ). पुढे चालू – १९५१ (!)

**उद्देश** – हातमागधंद्याच्या हितास वाहिलेले. स्वरूप – सचित्र.

**ब्रीदवाक्य** –

' सत्यसंकल्पाचा दाता भगवान '

**विशेष माहिती** – " विणकर सेवक " हे नाव पुढे सरकारी नोंदीत १९५१ मध्ये आढळते.

[ मग्रं ]

( **प्रथम खंड** )

वर्ष १ – अंक ..., २ ते ४, (५-६), (७-८), ९, ( १०-१२ ). ( जून १९३५ ) ते मे १९३६.

वर्ष २ – अंक + . ., २ नवंबर १९३६, ३ डि, ४ जा ३७, ... +(७-९) जू–आ-३७..., ११, १२ नवंबर १९३७.

वर्ष ३ – अंक १ डिसेंबर १९३७....

वर्ष ५ – अंक ......९ सप्टेंबर १९४०—.

( **द्वितीय खंड** )

वर्ष १ – अंक + १ ते १२. मे १९४७ ते एप्रिल १९४८.

## विदर्भ शिक्षक

**मासिक** : संपादकमंडळ – गंगाधर लक्ष्मण कुलकर्णी, पुंडलीक जगन्नाथ दबडे. प्रकाशक –

शिरखेड (अमरावती, वऱ्हाड). छा. व. क. २. आकार २८ पृष्ठे. ७·८ × ५·४. प्रथमांक – नोव्हेंबर १९२३.

ब्रीदवाक्य –

श्लिष्टा क्रिया कस्यचिदात्मसंस्था ।
संक्रान्तिरन्यस्य विशेषयुक्ता ।
यस्योभय साधु स शिक्षकाणां ।
धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ॥ – कालिदास.
असोनि बहु शारदा शिकविणे न येई (साधे) कुणा ।
कळे शिकविणे जरी बहु न शारदा ती कुणा ।
सुविद्य उभयी असे गुरु फार अल्पांतरी ।
अशा गणति शिक्षकाग्रणि विवेकशाली जनी ॥
– धा. ग. गाडगे.
[ अमरावती, गाडगेसंग्रह. ]

वर्ष १ – अंक १ नोव्हेंबर १९२३ ... ५ मार्च १९२४ —.

## विदर्भाचा शेतकरी

**मासिक :** संपादक – म. कृ. पुरकुटे. प्रकाशक – संपादक, अमरावती. छा. व. क. ४८८. फु. अ. ८६. आकार २८ पृष्ठे. ९·६ × ६·२. प्रथमांक – आगस्ट १९५०. पुढे चालू

**उद्देश** – शेतकी विषयास वाहिलेले. स्वरूप – शेतकीविषयक तज्ज्ञांचे लेख, कविता, चरित्रे व शेतीविषयी माहिती.

ब्रीदवाक्य –

मार्ग दावुनी गेले आधीं दयानिधि संत ते ।
तेचि पंथे चालों जाता न पडे गुंता कोठेही ॥
– संत तुकाराम.
[ विदर्भ छा. अमरावती ]

वर्ष १ – अंक १ आगस्ट १९५० ते ५ डिसेंबर १९५०—

## विद्या

**मासिक :** संपादक – जगन्नाथ रावजी दुल्ल. प्रकाशक – मुंबई. मुद्रक – निर्णयसागर छा., मुंबई. छा. व. क. २. फु. अ. ८४. आकार ४८ पृष्ठे. ७·१ × ४·३. प्रथमांक – जानेवारी १८९८

**उद्देश** – लहान मुलांकरिता सचित्र मासिक पुस्तक. स्वरूप – सचित्र.

ब्रीदवाक्य –

मुग्धशीलस्य किं भाषणम् ।
कधी वाण नाही फुलांच्या सुगंधा ।
सदा वाढते हासणे हे मुखाला ॥ – वामनपंडित.

**विशेष माहिती** – 'चार कथा' (स्फुट कविता) या पुस्तकाच्या प्रस्तावनेत (लेखक ज. रा. दुल्ह, इ. १९००) चार अंक निघाल्याचा उल्लेख आहे.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १८९८ ते ४....

## विद्याकल्पतरु

**मासिक :** संपादक – रावजी विनायक खांबरे, शिरस्तेदार सिलेक्ट गायकवाड महाराज. प्रकाशक – बडोदे. मुद्रक – अरुणोदय छा., ठाणे. छा. व. क. ३ आगाऊ. फु. अ. ८५. आकार १६ पृष्ठे ९·४ × ६·३. प्रथमांक – एप्रिल १८६८. शेवटचा अंक – मार्च १८७१ (?) (पुस्तक अंक).

**उद्देश** – *नाना प्रकारच्या विद्या, कला,* कौशल्ये, युक्ती व तत्संबंधी मोठमोठे कारखाने, तशीच कित्येक प्रकारची हुन्नरे, औषधे व त्यांची क्रिया व गृहसंबंधी सर्व व्यवस्था ह्यांचा विचार करून प्रत्येक वस्तूचे अनुभवसिद्ध निरूपण.

**विशेष माहिती** – इंग्रजी मथळा – 'मराठी सायक्लोपीडिया'. मराठी पर्याय – "म्हणजे मराठी भाषेमध्ये विद्यासंग्रह." "पस्तीस अंक पुरे झाल्यावर कर्ता दिवंगत झाल्या" चे वृत्त 'विद्यामाला' मासिक वर्ष १ अंक १ (सप्टेंबर १८७८) मध्ये आढळते.

वर्ष १ – अंक १ ते १२. एप्रिल १८६८ ते मार्च १८६९. पृ. १९२ – 'अश्वत्थ' – पर्यंत.

वर्ष २ – अंक १ ते १२. एप्रिल १८६९ ते मार्च १८७०. पृ. १९३ ते ३८४ – 'इष्ट'- पर्यंत. अंक ३ च्या मलपृष्ठावर चुकीने अंक पाच म्हटले आहे. अंक १० वर साल चुकीने १८६९ पडले आहे.

वर्ष ३ – अंक १ ते १२. एप्रिल १८७० ते मार्च १८७१. पृ. ३८५ ते ५७६. 'उन्माद' – पर्यंत.

## विद्यानंद

**मासिक** : संपादक – (सरकारी नोंद) बाळकृष्ण रामचंद्र बापट. प्रकाशक – अलीबाग. मुद्रक – सत्यसदन, अलीबाग. वा. व. रु. १॥ आगाऊ. फु. अं. ८३. ८'४ × ५'४. प्रथमांक – चैत्र श. १८०५. (पुस्तक अंक).

**उद्देश** – मथळ्याखाली कंसात – उपयुक्त विषयाचे मासिक पुस्तक. **स्वरूप** – ईश्वरविषयक विद्या, उपयुक्त वैद्यक संग्रह, उपयुक्त ज्ञानसंग्रह, गद्यपद्य सुभाषितसंग्रह, सर्व ज्ञानसंग्रह.

**विशेष माहिती** – पत्रव्यवहाराचा पत्ता – बाळकृष्ण रामचंद्र बापट, पुरुषोत्तम गोपाळशेट गुजर, अलीबाग, नजीक मार्केट.

वर्ष १ – अंक १ चैत्र १८०५ —.

## विद्याप्रसार

**मासिक** : संपादक – दामोदर लक्ष्मण लेले. प्रकाशक – संपादक, वाई. वा. व. रु. ३. फु. अं. ८६. अंकात ४८ पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – चैत्र श. १८४३.

**स्वरूप** – कविता, निबंध, कादंबरी इ.

**ब्रीदवाक्य** —

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

**विशेष माहिती** – पुणे शहरातील विद्वान स्नेह्यांच्या प्रोत्साहनाने – प्रवृत्त करणारे मुख्य सहायक श्री. आनंदराव बाबूराव सावरकर. मल पृष्ठावर देखील याची नोंद आढळते.

[दवाखे]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८४३ ––.

## विद्याभूषण

**मासिक** : प्रकाशक – (अंक ६) सदाशिव काशीनाथ शिराणे आणि मंडळी, सातारा. वा. व. रु. ॥. फु. अं. ८१८६. अंकात १२ पृष्ठे. ७'३ × ४'३. प्रथमांक – अक्टो १८८९. (पुस्तक – अंक).

**स्वरूप** – संकीर्ण विषय. सामाजिक, राजकीय आणि शास्त्रीय विषयावर निबंध, प्राचीन व अर्वाचीन कवींच्या कविता, स्त्रियांकरिता नीतिपर व मनोरंजक लेख, सुभाषिते, ऐतिहासिक गोष्टी, अद्‌भुत चमत्कार इ.

**ब्रीदवाक्य** –

मातेव रक्षति पितेव हिते नियुङ्‌क्ते ।
कान्तेव चापि रमयत्यपनीय खेदम् ।
लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिम् ।
किं किं न साधयति कल्पलतेव विद्या ॥

**विशेष माहिती** – नामांतर वर्ष १ अंक ५ फेब्रुवारी १८९० पासून 'महाराष्ट्र कोकिल व विद्याभूषण.' [या मध्यंतरात 'महाराष्ट्र कोकिल' मासिकाच्या दोन अवतारांमधील अल्पकालीन कालखंड होता. पाहा – 'महाराष्ट्र कोकिल.']

[मुमग्रं]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १८८९ ते १० जुलै १८९०—.

## विद्यामाला

**मासिक** : संपादक – (करणार) जनार्दन हरि आठल्ये. प्रकाशक – (रत्नागिरी). मुद्रक –

जगन्मित्र छा., रत्नागिरी. वा. व. रु. ३, मागाहून रु. ४८८. पु. अ. ८६. अंकात १६ + ४ पृष्ठे. ९·६ × ६·४. प्रथमांक – सप्टेंबर १८७८.

उद्देश – " नानाप्रकारच्या क्रिया, कला, कौशल्ये, युक्ती व तत्संबंधी मोठमोठे कारखाने तसाच त्स्तिक प्रकारच्या हुन्नरां, औषधे व त्यांची क्रिया व गृहसंबंधी सर्व व्यवस्था याचा विचार करून प्रत्येक वस्तूचे अन्योन्य पार्श्वस्थित स्पष्ट निरूपण. " ' पेनी सायक्लोपीडिया ' या इंग्रजी कोशातील शब्दांचा समावेश.

विशेष माहिती – इंग्रजी मथळा ' ऑर मराठी सायक्लोपीडिया. ' मराठीत खुलासा – ' म्हणजे महाराष्ट्र भाषेमध्ये विद्यासंग्रह अथवा ज्यात —'इ. ( उद्देशात पाहा ). वर्ष १ अखेर ' अंक एव्हाच भाग पडू लागले. आशय नाही'. यालाच ' ए मन्थली पँफ्लेट् ' असेही नाव दिलेले आहे. " विद्याकल्पतरूपेक्षा अर्थविस्तार व शब्दविस्तार अधिक " असा विविधज्ञानविस्ताराचा अभिप्राय.

[ मंडलिकफर्ग्युसन, पुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ९, ( १० - १२ ) सप्टेंबर १८७८ ते ऑगस्ट १८७९. पृ. १९२. ' अ ' ते ' अनार. '

वर्ष २ – अंक १ सप्टेंबर १८७९ ' अनुराधा ' पर्यंत.

## विद्यार्थि जीवन

**मासिक** : संपादक – बाळकृष्ण महादेव पुजारी. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – उल्हास मुद्रणालय, पुणे. फु. अ ८८. अंकात १२ पृष्ठे. ९·५ × ७·३. प्रथमांक – डिसेंबर १९४७.

**उद्देश** – विद्यार्थि जीवनाबद्दल तळमळ वाटणारे असंख्य विद्यार्थी आणि विचारवंत यांच्या विचारांना वाचा फोडणे – महाराष्ट्रातील विद्यार्थिजीवन, शिक्षक व शैक्षणिक क्षेत्र यांचे दिग्दर्शन. स्वरूप – मराठी हिंदी, उत्कृष्ट शिक्षक - शिक्षकांची छायाचित्रे – त्यांचा परिचय, हुशार विद्यार्थी, त्यांची छायाचित्रे व परिचय.

**विशेष माहिती** – संचालक – वसंत देव. आकार – वर्ष ३ – ८·७ × ५·६.

[ मग्र ]

वर्ष १ – अंक १ डिसेंबर १९४७....
वर्ष ३ – अंक १ फेब्रुवारी १९५०, २ मार्च १९५०—.

## विद्यार्थिमित्र

**मासिक** : संपादकमंडळ – ( सरकारी नाव ) जगन्नाथ घोंडो भागले, जी. एम्. कालेल्कर. प्रकाशक – जी. एम्. कालेल्कर, मुंबई. मुद्रक – शारदाक्रीडन छा., मुंबई. वा. व. रु. ८११. अंकात १६ पृष्ठे. ७·३ × ४·२. प्रथमांक – सप्टेंबर १८९४. ( पुस्तक-अंक )

**उद्देश** – मुलांसाठी. स्वरूप – विद्यार्थ्यांस आवश्यक अशी माहिती, मोठमोठ्या लोकांची विद्यार्थिदशेतील चरित्रे, नीतिबोधक व शिक्षणविषयक गोष्टी, लहान मुलांच्या गोष्टी, कविता, बापाची मुलास पत्रे, कूटप्रश्न.

**विशेष माहिती** – संपादक – वर्ष २ – महादेव गोपाळ वझे ( व आणखी एक ).

[ मुमग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ८, ( ९ - १२ ). सप्टेंबर १८९४ ते ऑगस्ट १८९५.
वर्ष २ – अंक ( १ २ ), ३ ते ७ जून १८९६—.

## विद्यार्थी

**त्रैमासिक** : संपादक – शांताराम अनंत देसाई. प्रकाशक – इंदूर. मुद्रक – इंदुप्रकाश छापखाना, मुंबई. वा. व. रु ३. अंकात सदरवार १२० पृष्ठे ७·५ × ४·४. प्रथमांक – जानेवारी १९०७. शेवटचा अंक – जानेवारी १९१४ ( सलग अंकानुक्रम )

उद्देश – धर्म आणि तत्त्वज्ञान यांचे अध्ययन शृंखलित करणे. स्वरूप – मराठी इंग्रजी. धर्म व तत्त्वज्ञानविषयक लेखमाला – उपनिषदांतील वचनांचा संग्रह, वैदिकधर्माचे परमरहस्य, पाश्चात्य तत्त्वमीमांसा, पाश्चात्य पद्धति आणि वैदिक पारमार्थिक विचार, सृष्टीची यांत्रिक उत्पत्ती, तुकारामाच्या अभंगरत्नांचे हार, पारमार्थिक व्याख्यान संग्रह, वैदिक रिलिजन, सिलेक्शन्स फ्रॉम इंग्लिश लिटरेचर, मराठी काव्यातील वेंचे, वेदान्ताचे सिद्धान्त, मोठ्या विषयावर लहान निबंध, शांकरभाष्य.

ब्रीदवाक्य –

घोडिले माडार घन्याचा हा माल ।
मी तर हमाल भार-वाही ॥

विशेष माहिती – अंक २२ एप्रिल १९१३ पासून सुमारे अर्धा मजकूर मराठीत व अर्धा इंग्रजीत. "मध्यंतरी बंद होते. आता पुन्हा जुलै १९१२ पासून होळकर सरकारच्या आश्रयाने निघू लागले आहे"–लोकशिक्षण (ओक) वर्ष १ अंक ५ पृ. १६०. यात 'पाश्चात्य संपत्ति विषयक, राज्यविषयक व तत्त्वज्ञानविषयक विचारांची उत्क्रांती' या विषयावर लेख आहेत.

[ मग्र, मुमग्र ]

- वर्ष १ – अंक १ ते ४. जानेवारी ए - जु - अक्टोबर १९०७.
- वर्ष २ – अंक ५ ते ८. जानेवारी ते अक्टोबर १९०८.
- वर्ष ३ – अंक ९ ते १२. जानेवारी ते अक्टोबर १९०९.
- वर्ष ४ – अंक १३ ते १६. जानेवारी ते अक्टोबर १९१०
- वर्ष ५ – अंक १७ जानेवारी १९११, १८ एप्रि ११ + १९ जु १९१२, २० अक्टोबर १९१२.( खंड पडला – जुलै १९११ ते जू. १९१२ ).
- वर्ष ६ – अंक २१ ते २४. जानेवारी ते अक्टोबर १९१३.
- वर्ष ७ – अंक २५ जानेवारी १९१४.

## विद्यार्थी

मासिक : संपादक – पांडुरंग सदाशिव साने. प्रकाशक – संपादक, अमळनेर. वा. व. रु. २८१२. अंकात ८८ पृष्ठे. ७'९ X ५'४. प्रथमांक – नवंबर १९२८.

उद्देश – प्रौढ विद्यार्थ्यांसाठी – विद्यार्थ्यांचा ज्ञानलालसा वाढवून ती विविध प्रकारे तृप्त करणे. स्वरूप – सचित्र.

ब्रीदवाक्य –

घोडिले माडार धन्याचा हा माल ।
मी तर हमाल भार-वाही । – तुकाराम.

विशेष माहिती – खानदेश शिक्षण मंडळा तील (के ई सोसायटी) शिक्षकांनी चालविलेले. वर्ष २ मध्ये अंक ६ व ७ यांच्या दरम्यान 'ऑर्डिनन्सची झळ लागली' संपादक – वर्ष २ अंक ७ – ग. रा. जोशी

[ मुमग्र, मुमग्र ]

- वर्ष १ – अंक १ ते १२ नवंबर १९२८ ते अक्टोबर १९२९.
- वर्ष २ – अंक १ नवंबर १९२९ ते ६ एप्रि १९३० + ७ स १९३१ ते १२ फेब्रुवारी १९३२.
- वर्ष ३ – अंक . , ३ मे १९३२ ते १२ फेब्रुवारी १९३३.

## विद्यार्थ्यांचा(च्या) कल्याणार्थ अनेक-विषयसंग्रह

साप्ताहिक पत्र · संपादक – ( कृष्णशास्त्री ). प्रकाशक – संपादक, बेळगाव. मुद्रक – सुबुद्धि प्रकाश ( शिळाछाप ), बेळगाव येथील पुस्तकालयाचा फु. अ ८८६. अंकात ८ पृष्ठे ८'१ X ५'९. प्रथमांक – १३ नवंबर १८५६. ( पुस्तक अंक ).

ध्रीद्वाक्य –

काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम्।
[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ पुणे १९२०, २ आगस्ट १९२० —.

## विद्याविलास

मासिक : प्रकाशक – शंकर रघुनाथ गोखले (गावडी), कोल्हापूर. वा. व. रु. २. फु. अं. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ९·१ × ६·१. प्रथमांक – चैत्र श. १८०९.

स्वरूप – मराठी भाषा, शिक्षण, अंतरीक्षण; काव्ये, नाटके, कादंबऱ्या; राजतरंगिणी, कथासरित्सागर इ. ची भाषांतरे, कवी, राजे यांचा काल निर्णय, उपयुक्त कलांची माहिती, स्फुट विषय; भरतस्थलादर्श.

ध्रीद्वाक्य –

किं कि न साधयति कल्पलतेव विद्या।

विशेष माहिती – १ वर्षानंतर साप्ताहिकात रूपांतर. यात सहस्रबुद्धेलिखित ' भरतस्थलादर्श ' छापले.

[ ठामग्र ]

वर्ष १ – अंक १ ते ३, ... (६ - ७), (८ - ९), (१० - ११), १२. चैत्र ते फाल्गुन १८०९.

## विद्याविहारी

मासिक : प्रकाशक – उपाध्ये आणि मंडळी, मुरुड-जंजिरा (कुलाबा). मुद्रक – सत्यसदन छा., जंजिरा. वा. व. रु. १॥. अंकात १६ पृष्ठे. ७·८ × ५·१. प्रथमांक – अक्टोबर १८९५.

उद्देश – मायदेश व मायभाषा यांच्या उन्नतीसाठी वाङ्मयप्रकाशन. स्वरूप – निबंध, शास्त्रीय लेख, भाषाभिवृद्धी, मेकॉलेच्या निबंधांची भाषांतरे.

ध्रीद्वाक्य –

अन्या जगद्धितमयी मनसः प्रवृत्ति-
रन्यैव कापि रचना वचनावलीनाम्।
लोकोत्तरा च कृतिराकृतिरार्तहृद्या
विद्यावतां सकलमेव गिरां दवीयः ॥ १ ॥ – जगन्नाथ.
[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १८९५ ते ७ एप्रिल १८९६ —.

## विद्यासेवक (१)

मासिक : संपादक – यशवंत रामकृष्ण दाते. प्रकाशक – श्रीधर व्यंकटेश केतकर, पुणे. मुद्रक – ज्ञानकोश छा. वा. व. रु. १८४ ८. सह. फु.अं. ८१८६. अंकात १६, ६४, ७२ पृष्ठे. १०·५ × ७·२. प्रथमांक – (नमुना) सप्टेंबर १९२४. शेवटचा अंक–आगस्ट १९२९.

उद्देश – महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळाचे मुखपत्र. स्वरूप – ज्ञानकोशातील चुकांच्या दुरुस्त्या व अपूर्णता दुरुस्त करण्यासाठी पुरवण्या, ज्ञानकोशविषयक बातम्या, शुद्ध भौतिक शास्त्रे, यांत्रिक कला व कादंबऱ्या, कथा वगळून वाङ्मयविषयक लेख व तासबद्ध शास्त्रे व सामान्य मानवी व्यवहार यावर लेख. प्रथमप्रकाशन, मुद्रण इत्यादी धंदे, नाट्य नृत्यादी ललितकलांशी संलग्न असणारे राजकारण वगैरे. वाङ्मय, समाजशास्त्र, अर्थशास्त्र, राजकारण इ. विषयांवर मार्गदर्शक लेख, उत्कृष्ट कविता, नावीन्यपूर्ण व उद्बोधक गोष्टी, केतकरांच्या कादंबऱ्या.

विशेष माहिती – *आकार* – वर्ष २ पासून ९·५ × ६·६. *संपादक* – वर्ष ५ श्री. व्य. केतकर. *वा. वर्गणी* – वर्ष २ – रु. १८८; वर्ष ३ – रु. ४, वर्ष ५ – रु ४. फु. अं. ८६. *पृष्ठसंख्या* – वर्ष २ – ४८, वर्ष ३ – ६४, वर्ष ४ – ७२. शिवाय यात डॉ. केतकर यांची ' नि शस्त्राचे राजकारण ' ही लेखमाला व गोविंदपीन या नावाने त्यांच्या काही जुन्या स्फुट कविता प्रसिद्ध झाल्या.

[ मुंमग्रं, बम्रं, डेकॉ ]

वर्ष १ – अंक १, २, (३-४), ५ ते १२. ऑक्टोबर १९२४ ते ऑगस्ट १९२५.

वर्ष २ – अंक १ ते ६ (फक्त सहाच अंक). सप्टेंबर १९२५ ते फेब्रुवारी १९२६. गोंडवनातील प्रियंवदा–कादंबरी.

वर्ष ३ – अंक १ ते ५, (६-७), ८ ते १२. मार्च १९२६ ते फेब्रुवारी १९२७. अंक (६-७) 'पराभव'; अंक ११ जा १९२७ राजवाडे अंक.

वर्ष ४ – अंक (१-३), (४-५), ६ ते १०, (११-१२). मार्च १९२७ ते फेब्रुवारी १९२८. अंक (१-३) 'आशावादी'; अंक (११-१२) 'महाराष्ट्रीयांचे काव्यपरीक्षण'.

वर्ष ५ – अंक १ एप्रिल १९२८, २ मे २८, + ३ जून १९२९ ते ५ ऑगस्ट १९२९. 'ब्राह्मणकन्या', 'स्त्रीसत्ता पराभव नाटक'.

## विद्यासेवक (२)

**मासिक :** संपादक – श्रीधर व्यंकटेश केतकर. प्रकाशक – रामकृष्ण हरि बापट, वा. व. रु. १८२. फु. अं. ८१. अंकात १६ पर्यंत पृष्ठे, ९·७ × ७·३. प्रथमांक – (पुनरुत्थान) ऑक्टोबर १९३५. शेवटचा अंक – डिसेंबर १९३६ (?).

उद्देश – जुन्या 'तहकूब' केलेल्या विद्यासेवका (मागे पाहा)चे पुनरुत्थान. स्वरूप – राजकारण, समाजशास्त्र, प्राचीन महाराष्ट्र, ऐतिहासिक लेख.

विशेष माहिती – अंक ३ पासून आर्टपेपरवर. संपादक – अंक ८ – श्री. व्यं. केतकर, वि. प्र. गोडबोले, हे. रा. खरे.

[ दवागो ]

वर्ष ६ – अंक १ ऑक्टोबर १९३५, २ ते ४ डि,'५ जा ३६ + [६]मा, ७ ए-मे-जू, ८ डिसेंबर १९३६—. एकूण पृष्ठे १०८.

## विधायक

**मासिक / पाक्षिक :** संपादक – गणेश भास्कर पंडित. सहसंपादक – ग. रा. सायगांवकर. प्रकाशक – संपादक, अलिबाग. मुद्रक – कुलाबा आर्ट प्रिंटिंग प्रेस, अलिबाग. वा. व. ट. सह रु. ०१२. अंकात ८ पृष्ठे. ९·४ × ६·५. प्रथमांक – मे १९२६.

उद्देश – लोकजागृति, प्रामुख्याने अस्पृश्यतेचा प्रश्न, त्याबरोबर स्वदेशी, खादीप्रसार व खेडेगावची सुधारणा या बाबतीत चळवळ करणे. स्वरूप – अग्रलेख, स्फुटे, अस्पृश्यसमाचार, स्वदेशी वस्तुप्रसार, वृत्तसार, थोरांचे बोल, सुखामुखींच्या गप्पा, पोच आणि अभिप्राय इ.

ब्रीदवाक्य –

मलपृष्ठावर – जनसेवा हीच ईश्वरसेवा.
अग्रलेखाचे वर – एकमेकां साह्य करूं।
अवघे धरूं सुपंथ ॥

विशेष माहिती – वर्णन – 'मासिक पत्रक' व 'पाक्षिक पत्रक'. वर्ष १ अंक २ पासून मलपृष्ठावर 'मासिक पत्र' असा निर्देश. कार्यक्षेत्र फक्त अलिबाग तालुका. आर्थिक परिस्थितीमुळे बंद करावे लागले.

[ मुमग्रं ]

मासिक

वर्ष १ – अंक १ ते १२. मे १९२६ ते एप्रिल १९२७.

पाक्षिक

वर्ष २ – अंक १ वै शुद्ध ७ श. १८४९, २ वै वद्य १, ३ ज्ये शुद्ध १, ४ ज्ये वद्य १ श. १८४९—.

## विनय

**षाण्मासिक/द्वैं(?)मासिक (पर्यात ५ अंक)** : संपादक – ना. वि. गोविलकर. प्रकाशक – वा. कृ. पाटणकर, औंध. वा. व. रु. १. अंकात ४८ पृष्ठे. ९·५ × ७·३. प्रथमांक – जून १९२८.

उद्देश — औधसंस्थान विद्यालयामार्फत प्रसिद्ध होणारे. स्वरूप — सचित्र. शिक्षणविषयक तज्ज्ञांचे व विद्यार्थ्यांचे लेख.

ब्रीदवाक्य —

तेजस्वि नावधीतमस्तु ।

विशेष माहिती — आकार — वर्ष ६ — ७·२ X ४·८. संपादक — वर्ष ६ धोंडो विठ्ठल कुलकर्णी. 'द्वैमासिक' — "वर्षांतून पाच वेळा प्रसिद्ध होते."

[ द्वाचो ]

षाण्मासिक

वर्ष १ — अंक १ जून १९२८, २ डिसेंबर १९२८......

द्वैमासिक (५ अंक)

वर्ष ६ — अंक ..., ४ डिसेंबर १९३३.

वर्ष ७ — अंक १ ( पोच 'सहविचार' वर्ष १३ अंक (२ - ३) डि १९३४).

## विनोदी मित्र

मासिक : प्रकाशक — यशवंत बाळकृष्ण क्षीरसागर, मुंबई. अंकांत २४ पृष्ठे. ७·२ X ४·२. प्रथमांक — आगस्ट १८९७. (पुस्तक - अंक).

स्वरूप — सचित्र. विनोदी गोष्टी, लेख इ.

ब्रीदवाक्य —

वदोनी साधूंके करिल सुविचार प्रतिपदा
कथा चातुर्याच्या कथिल रुचिरान्योक्तिहि कदा ।
सुचित्रें रेखोनी रमविल सुगानी कितिकदा
विनोदी मित्राचें वनन जनतोषास्तव सदा ॥

[ मुंमग्रं, पुमग्रं ]

वर्ष १ — अंक १ आगस्ट १८९७ ते ५ डिसेंबर १८९७—.

## विबुधप्रिया

मासिक : संपादक — ( सरकारी नोंद ) गोविंद विठ्ठल शिरसट. प्रकाशक — गोविंद विठ्ठल, मुंबई. मुद्रक — सुबोध प्रकाश छापखाना, मुंबई. वा. व. रु. २ आगाऊ, रु. ३ मागाहून. फु. अं. ०४. अंकांत प्रकरणवार २४ पृष्ठे. ८·४ X ५·४. प्रथमांक — जानेवारी १८८४. (पुस्तक - अंक)

स्वरूप — उपयुक्त सामाजिक, धार्मिक, नैतिक विषयांवर निबंध, सुभाषित, आख्यायिका, पौराणिक व मनोरंजक गोष्टी; कादंबरी, ऐतिहासिक चरित्रे; स्त्रियांची कर्तव्ये, त्यांची स्थिती; चुटके.

ब्रीदवाक्य —

मातेव रक्षति पितेव हिते नियुंक्ते ।
कान्तेव चापि रमयत्यपनीय खेदम् ॥
लक्ष्मीं तनोति वितनोति च दिक्षु कीर्तिम् ।
किं किं न साधयति कल्पलतेव विद्या ॥

विशेष माहिती — मुद्रक — वर्ष २ विद्याप्रकाश छापखाना, मुंबई. पत्रव्यवहाराचा पत्ता — गोविंद विठ्ठल, व्यवस्थापक विबुधप्रिया, मुंबई. यांत 'ज्ञानमुद्रिका' कादंबरी.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ — अंक १ जानेवारी १८८४ ते ३ मा,..., ९ स, १० अक्टोबर १८८४ ...

वर्ष २ — अंक ( १ - २ - ३ - ४ ) जानेवारी - एप्रिल १८८५. पृ. ७२ —.

## विमा आणि व्यापार

मासिक : संपादक — पांडुरंग सीताराम काणे. प्रकाशक — संपादक, पुणे. वा. व. रु. ३·८. ९·५ X ७·४. प्रथमांक — सप्टेंबर १९४७. पुढे चालू.

उद्देश — विमा, बँका व व्यापारविषयक व्यावहारिक माहिती देणारे. स्वरूप — सचित्र. विमा - व्यापार वृत्तविशेष, विमाविषयक 'स्फुट विचार', समालोचन, व्यापारी उलाढालीची माहिती, पोच व अभिप्राय इ. आर्थिक विषय.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ — अंक १ ते ३, (४ - ५),..., ७ ते १२. सप्टेंबर १९४७ ते आगस्ट १९४८.

६ वा अंक निघाला नाही; अंक ९ विमा-वार्षिक विशेषांक, अंक १२ जनरल इन्शुअरन्स विशेषांक.

वर्ष २ – अंक १ ते ८, (९ - १०), ११, १२. सप्टेंबर १९४८ ते आगस्ट १९४९. अंक ३ व्यापार विशेषांक, अंक ७ ' इन्शुअरन्स ॲन्युअल १९४८ ' (इंग्रजी), अंक ११ जनरल इन्शुअरन्स विशेषांक.

वर्ष ३ – अंक १ ते ७, ( ८ - ९ ), १० ते १२. सप्टेंबर १९४९ ते आगस्ट १९५०. अंक २ दिवाळी अंक, अंक ( ८ - ९ ) विमा – वार्षिक, इंग्रजीत, अंक १० विमा विशेषांक भाग १; अंक ११ विमा विशेषांक भाग २.

वर्ष ४ – अंक १ ते ३, ( ४ ते १२ ). सप्टेंबर १९५० ते आगस्ट १९५१. अंक ३ चौथी विमाव्यावसायिकांची जंत्री दिवाळी अंक.

## विमा - जगत्

**मासिक :** संपादक – रा. न. अभ्यंकर. सह-संपादक – हरि बाळकृष्ण कीर्तने. प्रकाशक – श्री. र. राजगुरु, पुणे. वा. व. रु. २. फु. अं. ०३. अंकात २० पृष्ठे. १०.८ X ८.४. प्रथमांक – जानेवारी १९३८. शेवटचा अंक–नवंबर १९४०.

**उद्देश** – विमा व व्यापारविषयक. विमा-विक्रेते, विमेदार, विमासंस्था व त्यांचा नोकरवर्ग यांच्या सर्वांगीण प्रगतीसाठी. **स्वरूप** – विमा शास्त्रातील आधुनिक माहिती शक्य तो सोप्या भाषेत मांडणारे लेख.

**विशेष माहिती** – " कॉमनवेल्थ कंपनीत निर्माण झालेल्या वादळात विलीन झाले. "

[ दवाखे, कीर्तने ]

वर्ष १ व २ – अंक प्रत्येकी १ ते १२ ( जा ते डि ) जानेवारी १९३८ ते डिसेंबर १९३९ ( दोन वर्षे ). वर्ष २ अंक १ खास अंक.

वर्ष ३ – अंक १ जानेवारी १९४० ते ११ नवंबर १९४०—.

## विविध

**मासिक :** प्रकाशक – सीताराम बळवंत बोटे, इंदूर. वा. व. रु. १८२. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ६.८ X ४.६. प्रथमांक – अक्टोबर १९१९.

**स्वरूप** – सचित्र, शास्त्रीय, औद्योगिक व शेतकीसंबंधी लेख, चुटके, वर्तमानसार, संकीर्ण विषय. सदरे – विविधाचे नमन, आवडीचे बोल.

**ब्रीदवाक्य –**

' *सत्य ज्ञानमनतम्* '

**विशेष माहिती** – अवघे सात अंक निघाले असा उल्लेख आढळतो. " वर्गणीदारांच्या अभावी बंद. " दुसऱ्या अंकात विष्णुपंत सरखटे यांचे चरित्र.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १९१९ ते ४ जानेवारी १९२०.

## विविधकलाप्रकाश

**मासिक :** प्रकाशक – आ. ल. चोगले, ' सायंटिफिक क्लब ' करिता, मुंबई. वा. व. रु. १. फु. अ. ०१०६. अंकात १२ पृष्ठे. ७.१ X ४.१. प्रथमांक – आगस्ट १८९४.

स्वरूप – रासायनिक व अन्य प्रकारे होणाऱ्या साध्या कृती, आजकालचे नवीन शोध व कल्पना, *लोकोत्तर चमत्कार, स्वदेशीय कारागिरीची माहिती,* कुट्टक प्रश्नोत्तरे, शास्त्रीय प्रश्न व त्यांची उत्तरे इ.

**ब्रीदवाक्य –**

कला निर्मिते मार्ग शोभा सुखाचा ।
*कला आणिते योग संवर्धनाचा ।*
कला ईश्वराच्या स्वरूपास दावी ।
कला ही म्हणोनी तुम्ही आदरावी ॥

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ आगस्ट १८९४ ते ९ एप्रिल १८९५.

## विविधग्रंथसंग्रह

मासिक : प्रकाशक – पत्रव्यवहार – सत्येंद्रनाथ रानाथ जयकर, मुंबई. वा. व. रु. १८८. अं. ८२. अंकात ३२ पृष्ठे. १०×६'६. प्रथमांक – जानेवारी १८८६.

उद्देश – महाराष्ट्रात होऊन गेलेल्या कविवर्यांच्या विविध ग्रथांचा संग्रह. रसभिरुची जागृत होऊन काव्यामृतरसास्वादाविषयी सहज प्रवृत्ती व्हावी म्हणून प्रथम कथापर ग्रंथ. स्वरूप – पांडवप्रताप, टीपासह इ. शिवाय 'वीरबंधन' ही कादंबरी.

ब्रीदवाक्य –

व्यासग्रंथगिरीचे सोनें । सस्कृत सोठिये गाळूनि मनें । देशभाषा घडिलें लेणें । साहित्यरत्नीं सुजडित ॥ १ ॥ ते लेववितां कर्णभूषण । काही परते करावे कान । श्रोतेहो तुम्हीं विचक्षण । निर्मत्सर विचारा ॥ २ ॥ –मुक्तेश्वर.

विशेष माहिती – वर्ष २ – पत्रव्यवहाराचा सपादकाचा पत्ता – अलिबाग. " सतरा अंकात 'पांडवप्रताप' पुरा झाला. नतर 'जैमिनी अश्वमेध' चालू करणार." वर्ष २ अंक १ व ४ यावर सालाचा आकडा १८८७ ऐवजी १८८६ चुकून छापला आहे.

वर्ष १ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८८६. फक्त पांडवप्रताप. पृ. ३८४.

वर्ष २ – अंक १ ते ५. जानेवारी ते मे १८८७. पृ. ३८५ ते ५२०.

## विविध-लेख-संग्रह

[ पाहा – महाराष्ट्र माध्यंदिन ( अर्थात् माध्यंदिन ब्राह्मण यूनिअनचा विविध - लेख - संग्रह. ) ]

## विविधविषयतरंगिणी

मासिक : संपादक – ( नारायण वामन टिळक ). प्रकाशक – नागपूर. अंकात २४ पृष्ठे. ७'२ × ४'२. प्रथमांक – मार्च १८९३. ( पुस्तक अंक ).

स्वरूप – विविध विषय; प्रत्येक अंकात 'काव्यकुसुमांजलि' विभाग : राखीव पाने. ( पाहा – 'काव्यकुसुमांजलि' मासिक १८९३ )

विशेष माहिती – संदर्भ – 'विहंगम' वर्ष २ अंक १४ (ऑगस्ट १९३४). विविधविषयतरंगिणीच्या पहिल्या अंकात 'काव्यकुसुमांजलि' मासिकाचा सहावा अंक व तरंगिणीच्या दुसऱ्या अंकात कुसुमांजलीचा सातवा अंक सामील केल्यासारखा दिसतो.

[ देनाटिळक ]

वर्ष १ – अंक ..., २ [ या अंकात 'काव्यकुसुमांजलि' अंक ७ पृ. ४३ ते ४८. ]

## विविधज्ञानविस्तार

मासिक : संपादक – [ ( अप्रकट ) – रामचंद्र भिकाजी गुंजीकर ( १८६७ - ७४ ), हरि महादेव पंडित ( १८७४ - ९८ ), पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी ( १८७३ - ९८ ), रामकृष्ण रघुनाथ मोरमकर ( १८९८ - १९२३ ), मध्यंतरी मगेश शिवाजी तेलंग (१९०४ १९०९) ], १९२३ पासून – अनंत आत्माराम मोरमकर; १९३४ जून पासून रामचंद्र काशीनाथ तटणीस. प्रकाशक– वर्ष १ व २ – ( व्यवस्थापक ) रामचंद्र नीलकंठ मोघे, नंतर संपादक – नाडकर्णी, मोरमकर, मोरमकर, तटणीस, मुंबई. मुद्रक – गणपत कृष्णाजी, एशिआटिक प्रि. प्रेस., निर्णयसागर, इंडिअन प्रि. प्रेस, कर्नाटक छा., इंदुप्रकाश, इ. विविध छापखाने व अखेरीस श्री लक्ष्मीनारायण प्रि. प्रेस., मुंबई. वा. व. रु. ३. फु. अ. ०६, वर्ष ५४ पासून ०८. अंकात १६ पृष्ठे. ९'५×६'५. प्रथमांक – जुलै १८६७. शेवटचा अंक – डिसेंबर १९३७. ( पुस्तक अंक ).

उद्देश – विद्यामृत प्राप्त झालेल्या लोकांच्या व विशेषेकरून स्त्रियांच्या कल्याणार्थ व विश्रांतिस्तव, स्त्रीपुरुषांच्या सत्कालक्षेपार्थ अजून पाचपन्नास जरी मासिक पुस्तकें निघाली तरी ती थोडीच

आहेत. म्हणून शासनकाळास स्मरून चांगल्या रीतीमार्तांनी युक्त अशा नीतिवादाची व व्यावहारिक गद्यात्मक भाषा सुधारून सुनीतीची अभिरुची प्राप्त करून देण्यास झटणे. स्वरूप – शास्त्रीय विषय, स्त्रियांकरिता मनोरंजक व सन्मार्गवर्ती गोष्टी, रूपके, कविता, विद्यार्थ्यांकरिता अन्य भाषांची माहिती व भाषांतरे, इतिहास, देशज्ञान, विख्यात पुरुषांची चरित्रे, आरोग्यरक्षणार्थ सूचना, नवीन पुस्तकांवर टीका, नीतिवादाचे निबंध, व्याकरणसंबंधी, इ. लेख. प्रथम प्रथम वर्गीकृत अनुक्रमणिका – विद्यालय, स्त्रीबोध, आरोग्य, मनोरंजन, कविता, भाषिक संशोधन इ. शिवाय नियडक ललित साहित्य.

विशेष माहिती – कुलस्त्रिया व गृहस्थ याकरिता. इंग्रजी वर्णन 'ए मंथली मॅगझीन ऑफ मराठी लिटरेचर फॉर लेडीज ॲण्ड् जंटल्‌मेन.' वर्ष ३१ (इ. १९००) अंक १ मलपृष्ठ २ वर सूचना – "पूर्वी विस्तारात लेखकाची नावे देण्याचा प्रघात नव्हता. मातृभाषेची निरपेक्ष सेवा हे ध्येय होते... लेखकांची हरकत नसल्यास चालू सालापासून नावे देण्याचा ठराव केला आहे." वर्ष ३८ (इ. १९०७)– विविधज्ञानविस्तार मासिक पुस्तक पोस्ट खात्यात नोंदून घेतले. प्रकाशक (स्वत्व.) – वर्ष ५ पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी, वर्ष २९ (१८९८) नाडकर्णी आणि मंडळी (विस्ताराची नवी व्यवस्था). पृष्ठसंख्या – वर्ष ५ - २०, वर्ष ११ - २४, वर्ष २९ - ३२, वर्ष ३० - ४०, वर्ष ५३ - ५६. संपादकमंडळ – वर्ष ६७ अंक १ मलपृष्ठ २ – वसंत नारायण नाईक, नरहर रघुनाथ फाटक, श्रीपाद महादेव वर्दे. संकलित लेख सूची – पुस्तक २२ 'विविधज्ञानविस्तार पुस्तकात एकवीस वर्षांत आलेल्या विषयांची सूची' स्वतंत्र पृष्ठे १ ते ७, वर्ष ६८ अंक २ - ३ 'विविधज्ञानविस्ताराच्या ५० वर्षांतील लेखांची विषयवार (व लेखकनिर्देशासह) सूची' स्वतंत्र पृष्ठे १ ते ४२. "सूचीची शेवटची चार दोन पृष्ठे नाहीत, ती सवडीप्रमाणे पुढे तयार करून देण्यात येतील," असे वाचकांशी हितगुज (मलपृ. २).

महाराष्ट्र साहित्य पत्रिका – या महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या मुखपत्राचे विविधज्ञानविस्तारातून जोडीने प्रकाशन – वर्ष ४४ अंक ८ ते वर्ष ५६ अंक ५ पर्यंत (ऑगस्ट १९१३ ते १९२५) चालू होते. त्याच्या तपशीलासाठी 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' पाहा. "विस्तार वापरित स्थिति समाधानकारक नसताना तो इतकी वर्षे टिकून राहिला याचे कारण पुष्कळ अंशी दूरदृष्टीने विस्तारास जोडून काढलेले पुस्तकरूपी माल्य होय" (विशाखि वर्ष ३५ अंक १२ पृ. ३४८ - ३४९). यात ललित व गंभीर विनी दर्जाचे मूल्यवान लिखाण प्रसिद्ध झाले. त्यांची संपूर्ण वर्गीकृत सूची 'साहित्यसहकार' मासिकात (१९६७) क्रमशः प्रसिद्ध झाली आहे.

[ मुंमसं, फर्ग्यु, मसाप, बंग्रं, डेक्कॉ ]

वर्ष १ – अंक १ ते १२. जुलै १८६७ ते जून १८६८.

वर्ष २ – अंक १ जुलै १८६८ ते ४ ऑ ६८, + ५ एप्रिल १८६९ ते ९ ऑ ६९, (१० - १२) स न १८६९. अंक ४ व ५ यामध्ये पाच महिन्यांचा खंड पडला, म्हणून "वर्गणीच्या मुदतीपटीकडे ५ महिने पुस्तके दिली जातील."

वर्ष ३ ते ६ – + अंक प्रत्येकी १ ते १२ (जू ते मे). जून १८७० ते मे १८७४ (चार वर्षे)

वर्ष ७ ते ९ – + अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि). जानेवारी १८७५ ते डिसेंबर १८७७ (तीन वर्षे).

वर्ष १० – अंक १ ते ४, (५ - ७), ८ ते १०, (११ १२). जानेवारी ते डिसेंबर १८७८.

वर्ष ११ – अंक (१ - ३), (४ ६), ७ ते १०, (११ - १२) जानेवारी ते डिसेंबर १८७९.

वर्ष १२ – अंक १ ते ४, (५ - ७), ८, ९, (१० - १२). जानेवारी ते डिसेंबर १८८०.

वर्ष १३ – अंक १ ते ४, (५ - ७), (८ - ९), (१० - १२). जानेवारी ते डिसेंबर १८८१.

वर्ष १४ – अंक (१ - ३), ४, (५ - ७), ८, ९, (१० - १२). जानेवारी ते डिसेंबर १८८२.

वर्ष १५ – अंक १, (२ - ३), ४, (५ - ७), (८ - १०), (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १८८३.

वर्ष १६ – अंक १, (२ - ३), ४ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८८४.

वर्ष १७ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८८५.

वर्ष १८ – अंक १ ते ४, (५ - ६), (७ - ८), (९ - १०), (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १८८६.

वर्ष १९ – अंक (१ - २), (३ - ४), (५ - ६), (७ - ८), ९, (१० - १२). जानेवारी ते डिसेंबर १८८७.

वर्ष २० – अंक (१ - २), (३ - ४), (५ - ७), (८ - ९), (१० - १२). जानेवारी ते डिसेंबर १८८८.

वर्ष २१ – अंक १, (२ - ३), (४ - ५), ६, (७ - ८), (९ - १०), (११ - १२). जानेवारा ते डिसेंबर १८८९.

वर्ष २२ – अंक (१ - २), ३ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८९०.

वर्ष २३ व २४ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १८९१ ते डिसेंबर १८९२. (दोन वर्षे).

वर्ष २५ ते २८ – अंक प्रत्येकी (१ - २), (३ - ४), (५ - ६), (७ - ८), (९ - १०), (११ - १२). जानेवारी १८९३ ते डिसेंबर १८९६ (चार वर्षे). फक्त शेवटचे दोन अंक १८९६ चे सुटे.

वर्ष २९ व ३० – + अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १८९८ ते डिसेंबर १८९९ (दोन वर्षे). (१८९७ वर्ष गाळले – सूचना वर्ष २८ अंक १२ मलपृष्ठावर).

वर्ष ३१ – अंक १ ते ५, (६ - ७), ८, (९ - १०), (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९००.

वर्ष ३२ – अंक १, २, (३ - ४), ५ ते ७, (८ - ९), १० ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०१.

वर्ष ३३ – अंक १ ते ४, (५ - ६), ७, (८ - ९), १०, (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९०२.

वर्ष ३४ – अंक १, (२ - ३), ४, (५ - ६), ७, (८ - ९), १०, (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९०३.

वर्ष ३५ – अंक १, २, (३ - ४), ५, ६, (७ - ८), ९ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०४.

वर्ष ३६ ते ३८ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९०५ ते डिसेंबर १९०७ (तीन वर्षे).

वर्ष ३९ – अंक १ ते ५, (६ - ७), (८ - ९), १० ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९०८.

वर्ष ४० व ४१ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९०९ ते डिसेंबर १९१०. (दोन वर्षे).

वर्ष ४२ – अंक १ ते १०, (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९११. अंक (११ - १२) दरबार अंक १.

वर्ष ४३ – अंक (१ - २), ३ ते ८, (९ - १०), ११, १२. जानेवारी ते डिसेंबर १९१२. अंक (१ - २) दरबार अंक २.

वर्ष ४४ ते ५९ – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९१३ ते डिसेंबर १९२८. (सोळा वर्षे).

वर्ष ६० – अंक १, २, (३ - ४), ५ ते ८, (९ - १०), ११, १२. जानेवारी ते डिसेंबर १९२९.

वर्ष ६१ – अंक १, (२ - ३), (४ - ५), ६, (७ - ८), (९ - १०), (११ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९३०.

वर्ष ६२ – अंक १, २, (३-५), ६, ७, (८-९), १० ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३१.
वर्ष ६३ – अंक १, (२-३), (४-६), ७ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३२.
वर्ष ६४ – अंक १ ते ७, (८-१०), (११-१२). जानेवारी ते डिसेंबर १९३३.
वर्ष ६५ – अंक १, (२-३), (४-५), (६-९), १०, (११-१२). जानेवारी ते डिसेंबर १९३४.
वर्ष ६६ – अंक १, (२-३), (४-६) जानेवारी ते जून १९३५. वर्ष व अंक परिस्थितीशी जुळते करण्यासाठी मागासलेले सहा अंक न काढताच वर्ष पुरे केले – अंक (४-६) चे मलपृष्ठ.
वर्ष ६७ – अंक १, (२-३), (४-५), (६-१२). जानेवारी ते डिसेंबर १९३६. ६८ वे वर्षाचा नियमितपणा साधावा म्हणून ६७ वे वर्ष (प्रत्यक्षात) सहा अंकानीच पुरे केले. त्याची वर्गणी निम्मीच आकारली जाईल. (वर्ष ६८ – अंक (२-३) चे मलपृष्ठ २ पाहा.)
वर्ष ६८ – अंक १, (२-३), ४ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३७.

## विश्रांति

**मासिक** : संपादक – भीमराव धर्मराज पाल्ल. प्रकाशक – संपादक, कराची. वा. व. रु. १८४. फु. अ. ८२. अंकात ३२ पृष्ठे. ७·१ × ४·८. प्रथमांक – जुलै १९१४.

**उद्देश** – स्थानिक वाचकासाठी स्थानिक मासिक. स्वरूप – कविता, कथा, कादंबरी, मृत्युलेख, ज्ञानरंज इ. साहित्य

**ब्रीदवाक्य** –
कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।

[मम]

वर्ष १ – अंक १ जुलै १९१४, २, ३ ऑक्टोबर १९१४.

## विश्रांति

**मासिक** : संपादक – मोरेश्वर वासुदेव जे
प्रकाशक – पुरुषोत्तम वासुदेव जोशी, ६
आणि कंपनी, विलेपार्ले. मुद्रक – श्री सरा
मुद्रणालय, मुंबई. वा. व. रु. १८८. फु.
८२. अंकात २० पृष्ठे. ११ × ८·५. प्रथमां
फेब्रुवारी १९२३.

**उद्देश** – मनोरंजन करून ज्ञान देणारे.

[मुंब

वर्ष १ – अंक १ फेब्रुवारी १९२३.

## विश्वकर्मधर्मजीर्णोद्धार

**मासिक** : संपादक – विश्वब्रह्मकुलो
बाळशास्त्री रावजीशास्त्री क्षीरसागर. प्रकाशक
संपादक, पुणे. मुद्रक – व्यापारी छापखाना, पु
वा. व. रु. १८८. फु. अं. ८५. अंकात १
पृष्ठे. ८·८ × ५·६. प्रथमांक – कार्तिक श
१८२५.

**उद्देश** – स्वधर्मदृष्ट्या प्रापंचिक सौख्यप्राप्ती व पारमार्थिक ज्ञान देणे. स्वरूप – सती सप्तत्यादी प्रापंचिक सौख्य व मोक्षकारक स्वधर्माचा आणि स्वधर्मसंबंधी प्राचीन ग्रंथाच्या जीर्णोद्धा मराठी भाषांतरासह. पंचाल ब्राह्मणाचा स्वधर्म.

**ब्रीदवाक्य** –
सर्वेषां सुखबोधाय विदुषानां च तुष्टये ।
विश्वेश कर्मधर्माणां जीर्णोद्धारं करोम्यहम् ॥

**विशेष माहिती** – *मुद्रक* – प्रथमांक शिळा छापावर, नंतरचे अंक शिळाछापावर. कालिका प्रसाद छा. पुणे व श्रीकृष्ण लिथो प्रेस, मुंबई. यात तुका ब्रह्मानंद कृत 'वेदांतरहस्य' टीका.

[मुमम, मम]

वर्ष १ – अंक १ कार्तिक १८२५, ..., ८ ज्ये २६, ९ ते ११, १२ अश्विन १८२६.
वर्ष २ – अंक १ कार्तिक १८२६—.

## विश्व-प्रेम

**मासिक :** संपादक – श्रीकृष्ण रामनाथ देशपांडे. प्रकाशक – संपादक, आनंदाश्रम, रामनगर, पो. कान्यगाड (दक्षिण कानडा) मुद्रक – धर्मप्रकाश छा, मंगळूर. वा. व. रु. १८८. पृ. आ. ८३. आत २४ पृष्ठे. ८५ × ५ प्रथमांक – अक्टोबर १९३२. शेवटचा अंक – सप्टेंबर १९३५.

**उद्देश** – विश्वप्रेम आणि विश्वसेवा अशा सर्व प्राचीन व अर्वाचीन साक्षात्कारी पुरुषांचा असलेला अनन्य स्वानुभव, परमात्म्याचे विश्वरूप व सकल धर्मांचे ऐक्य प्रतिपादणारे मराठी आध्यात्मिक पारमार्थिक मासिक.

**ब्रीदवाक्य** –

सर्व खल्विदं ब्रह्म ।

**विशेष माहिती** – 'मेसेज' मधून श्रीराम दासांचे संदेश कळतात, पण मातृभाषाच जाणणारा साठी येथील महाराष्ट्रीयांच्या विशेष आग्रहामुळेच मराठीत निघत आहे. *संपादक* – वर्ष ३ अंक ५ हरि पंढरीनाथ मोहोळकर (प्रकाशक) स्वामी रामदास महाराजांच्या आज्ञेने मासिकाचे कार्य बंद केले जात आहे.

[ मुमग्र, ठामग्र, ठेरेसंग्रह ]

वर्ष १ ते ३ – अंक प्रत्येकी १ ते १२ (अ ते ब). अक्टोबर १९३२ ते सप्टेंबर १९३५. (तीन वर्षे). वर्ष ३ अंक ७ आनंदाश्रम चतुर्थ वार्षिक महोत्सवानिमित्त

## विश्वब्रह्मवृत्त

**मासिक :** संपादक – बाळशास्त्री रावजी शास्त्री क्षीरसागर प्रकाशक – संपादक, पुणे मुद्रक – कालिकाप्रसाद छा, पुणे वा. व. रु. १. आकार ३२ पृष्ठे. ७ २ × ४ ९ प्रथमांक – चैत्र श. १८३५. पुढे चालू

**उद्देश** – धार्मिक, शिल्पशास्त्रीय व सामाजिक वगैरे विषयांचे सचित्र मासिक (वर्ष ३० – अंक २.) *स्वरूप* – वैदिक धर्माची माहिती, जाती व समाजासंबंधी विवेचन, शास्त्रीय ग्रंथ (शिल्पशास्त्र इ.)

**ब्रीदवाक्य** –

(१) संसारमोहजालेषु कदाचिदिह मानुषे ।
ब्राह्मण्य लभते जन्तुस्तत्पुन परिपालय ॥

(२) (वर्ष २९) यावद् प्रियसे स्या दीक्षा ।

**विशेष माहिती** – *आकार* – वर्षे १२–९·३ × ६·५, वर्ष १४ – ८·४ × ५·४, वर्ष १८ अ (८ ९) ७·२ × ४·८. *वा. वर्गणी* – वर्ष १४ – रु. २, वर्ष २९ – रु. ३. *पृष्ठसंख्या* – वर्ष २९ – अनियमित ४ ते १२. *संपादक* – वर्ष २९ – पद्माकरशास्त्री क्षीरसागर (प्रकाशक) वर्ष ३८ (इ. १९५५ – ५६) निघाल्याची माहिती (दमढेरे) पुढे 'विश्वब्रह्मवृत्त' हे नाव सरकारी नोंदीत (रजिस्ट्रार ऑफ न्यूज पेपर्सचा रिपोर्ट) सन १९५८ त आढळते.

[ कालिकाप्रसाद छा. ]

वर्ष १ – अंक १ ते ९, (१० · ११), १२. चैत्र ते फाल्गुन १८३५.

वर्ष २ – अंक १, (२ ३), (४ - ५), (६ १२) चैत्र ते फाल्गुन १८३६.

वर्ष ३ – अंक १, (२ - ५), (६ १२) चैत्र ते फाल्गुन १८३७

वर्ष ४ – अंक + १, (२ ४), ५ ते १२. चैत्र ते फाल्गुन १८४०

वर्ष ५ व ६ – अंक प्रत्येकी १ ते १२. चैत्र १८४१ ते फाल्गुन १८४२ (दोन वर्षे).

वर्ष ७ – अंक (१ २), (३ ४), (५ - ६), (७ - ८), (९ - १०), (११ १२) चैत्र ते फाल्गुन १८४३.

वर्ष ८ व ९ – अंक प्रत्येकी १ ते १२ चैत्र १८४४ ते फाल्गुन १८४५ (दोन वर्षे). फक्त शेवटचा जोडअंक (११ १२)

वर्ष १० – अंक १ ते ४, ५ निघाला नाही, ६, ७, (८ - ९), (१० १२) चैत्र ते फाल्गुन १८४६.

वर्ष ११ ते १८ – अंक प्रत्येकी १ ते १२. चैत्र १८४७ ते फाल्गुन १८५४ (आठ वर्षे). अधूनमधून जोड अंक.

वर्ष १९ – अंक १ ते ४, (५-८), (९-१२). चैत्र ते फाल्गुन १८५५. अंक (५-८) सोबत 'शिल्पशिक्षणाचे महत्त्व' हे पुस्तक.

वर्ष २० ते २५ – अंक प्रत्येकी १ ते १२. चैत्र १८५६ ते फाल्गुन १८६१ (ए १९३४ ते मा १९४०) (सहा वर्षे). वर्ष २३ अंक (१-२) चैत्र १८५९ हीरक महोत्सव (?) अंक.

वर्ष २६ व २७ – + अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि). जानेवारी १९४१ ते डिसेंबर १९४२ (दोन वर्षे).

वर्ष २८ – अंक १ ते ३, (४-५) जानेवारी ते मे १९४३...

वर्ष २९ ते ३१ – + अंक प्रत्येकी १ ते १२ (अ ते स). अक्टोबर १९४६ ते सप्टेंबर १९४९. (तीन वर्षे) बरेच जोड अंक.

वर्ष ३३ – अंक ... (२-३) न-डि १९५०—.

## विश्वब्राह्मण समाजोन्नति

**मासिक** : संपादक – हरि गणेश पारखे. प्रकाशक – विठ्ठल धानू सागले, सोलापूर / वर्ष १६ अहमदनगर. वा. व. रु. २८८. फु. अं. ८४. अकात २४ पृष्ठे ८·३ × ५·४. प्रथमांक – श्रावण श. १८४३.

**उद्देश** – समाजाची उन्नती करणे. समाज बंधूंना सुशिक्षित करणे. त्यांच्या विचारांना चालना देणे. त्यांच्यात एकी निर्माण करणे. *स्वरूप* – सचित्र.

**ब्रीदवाक्य** –

सत्यमार्ग सांडू नये । असत्य पथें जाऊ नये ।
कदा अभिमान घेऊ नये । असत्याचा ॥
अपकीर्ति सांडावी । सत्कीर्ति वाढवावी ।
विवेके दृढ धरावी । वाट सत्याची ॥

वर्ष ८ – कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।

**विशेष माहिती** – वार्षिक वर्गणी – वर्ष ८ रु. १८४; वर्ष १६ रु. १८८, फु. अं. ८२.

[ पुमग्र, मग्रं .

वर्ष ८ – अंक..., ५ *मार्गशीर्ष* १८५०....

वर्ष ९ – अंक १ ते ४ ... (श्रावण ते कार्तिक १८५१) ....

वर्ष १६ – अंक १, (२-४), ५ ते ९, (१०-११), १२. श्रावण १८५८ ते आषाढ १८५९.

वर्ष १७ – अंक १ *श्रावण* १८५९ ते ३, ..., (११-१२) जुलै १९३८ (आषाढ १८६०).

## विश्व-रहस्य

**मासिक** : संपादक – सीताराम नाना चौधरी. प्रकाशक – संपादक, जळगाव. मुद्रक – धनंजय छा. *जळगाव. वा. व. रु. ३८४. फु. अं. ८५.* अंकात ५० पृष्ठे. ९·२ × ७·१. प्रथमांक – आगस्ट १९३५.

**उद्देश** – विश्वधर्म, विश्वप्रेम आणि विश्वसेवा यास वाहिलेले. *स्वरूप* – सचित्र. सर्व विषयावर लेख व कविता.

**ब्रीदवाक्य** –

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
ज्ञानं तेऽहं सविज्ञानम् ।

**विशेष माहिती** – पाच अंक निघाले असा उल्लेख सापडतो.

[ आइटे ]

वर्ष १ – अंक १ आगस्ट १९३५, २ सप्टेंबर १९३५, ...५ —.

## विश्ववाणी

**द्वैमासिक / मासिक** : संपादकमंडळ — ब. गो. गर्गे, नी. द. भट. प्रकाशक — ब. गो. गर्गे, नागपूर. मुद्रक — माधव प्रेस, नागपूर (१९३४ पा.) वा. व रु. २ फु. अ. ८६. अंकात ५६ पृष्ठे (मासिक). ९·१ × ६·२. प्रथमांक — सप्टेंबर १९३२.

**उद्देश** — व्यापक जागतिक प्रश्नावर चर्चा व उत्क्रान्तिशील उन्नतीचा पुरस्कार. *स्वरूप* — आंतरराष्ट्रीय प्रश्नावर चर्चा करणारे जागतिक महत्त्व असलेले, स्थायी स्वरूपाचे वाङ्मय. विश्व मंदिर (मासिक समालोचन), पूर्व आणि पश्चिम, साहित्यसत्कार इ. कथा, कविता, निबंध इ. संकीर्ण वाङ्मय.

**विशेष माहिती** — 'विश्ववाणी मंडळ', नागपूर या संस्थेचे. *संपादक* — वर्ष २ अंक १० — बा. रा. मोडक. *सहसंपादक* — वर्ष ४ — अ. बा. ओक, ना. बा. शास्त्री. *वर्षारंभ* — वर्ष ४ च्या पहिल्या अंकाची प्रकाशन तारीख नित्याप्रमाणे २० सप्टेंबर होती ती बदलून प्रकाशनाच्या सोयीसाठी १ अक्टोबर केली. *वा. वर्गणी* — वर्ष ८ रु. २८४ ('मुलांचे मासिक'च्या वर्गणीदाराव रु. १८८). फु अ. ८३.

[ ठामग्र, दनाग्रो, जग्र ]

द्वैमासिक

वर्ष १ — अंक १ ते ६. स, न १९३२, जा १९३३, मा, मे, जुलै १९३३.
वर्ष २ — अंक १ ते ४ — स, न १९३३, जा, मा १९३४—

मासिक

वर्ष २ — अंक १० जून १९३४, ११ जु, १२ आगस्ट १९३४.
वर्ष ३ — अंक १ ते १२. सप्टेंबर १९३४ ते आगस्ट १९३५.
वर्ष ४ — अंक + १ ते ८. अक्टोबर १९३५ ते मे १९३६—. अं १ वर्षारंभांक.

[२०]

## विश्वविहार

**मासिक** : संपादक — परशराम विठ्ठल तिरोडकर. प्रकाशक — विष्णु गंगाधर केतकर, पुणे विश्वविहार वाचनालयातर्फे, कुडाळ (सावंतवाडी) वा. व. नाही (५००० प्रती मोफत). अंकात १२ पृष्ठे ९·७ × ६·६. प्रथमांक — अक्टोबर १९४०.

**उद्देश** — विश्वविहार वाचनालयामार्फत प्रसिद्ध होत असलेले.

[ मग्र ]

वर्ष १ — अंक १ अक्टोबर १९४०—.

## विश्वविज्ञान

**पाक्षिक** : संपादक — त्र्यं. वा. जोशी. प्रकाशक — संपादक, कल्याण. मुद्रक निर्णयसागर छा. मुंबई वा. व रु. २. फु अ ८२८६. अंकात १६ पृष्ठे. ७·२ × ४·९. प्रथमांक — २१ जुलै १९०८ (यापूर्वी एक नमुना अंक).

**उद्देश** — देशहित व स्वावलंबन साधेल अशा ज्ञानाची प्रौढास प्राप्ती करून देणे. *स्वरूप* — मासिकाद्वारे शुद्ध व उद्योगप्रवण, शास्त्रीय विषय, उपयुक्त धंदे, कारागिरी, रसायनशास्त्र, यंत्रशास्त्र इ. धाई करणे, इलेक्ट्रोप्लेटिंग अशा सारखे विषय

**ब्रीदवाक्य** —

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥

**विशेष माहिती** — 'ग्राहक मिळत नाहीत' म्हणून बंद

[ मग्र, मुमग्र ]

वर्ष १ — अंक १ — २१ जुलै १९०८, २ — ७ आ, ३ — २१ आ, (४ ५) — ६ व २१ सप्टेंबर १९०८—.

## विश्ववृत्त

मासिक : संपादक — विष्णु गोविंद विजापूर-कर. प्रकाशक — संपादक, कोल्हापूर. मुद्रक — श्रीसमर्थप्रसाद छापखाना, कोल्हापूर. वा. व. रु. ६।८. पु अ. ८।२. अंकात प्रकरणवार १०० पृष्ठे ८·३ × ५·३. प्रथमांक — एप्रिल १९०६. शेवटचा अंक — मार्च १९०८ ( वर्ष २अंक ९).

उद्देश — प्रचलित विषयांवर लोकमत तयार करावे, व आपल्या लोकांना नैतिक व सांपत्तिक उत्कर्षाचा मार्ग स्पष्ट व्हावा मुख्यत्वे पदवीधरांनी लेख लिहावे हे धोरण. स्वरूप — प्रचलित व राजकीय विषयावर निबंध, चालू चळवळींची चर्चा ( मासिक स्फुटे ), चांगल्या इंग्रजी व मराठी मासिकांतील लेखांचा सारांश ( मासिक सार ), प्रवासवर्णन इ., ऐतिहासिक, शास्त्रीय, सामाजिक, वाङ्मयिक, शैक्षणिक, व्यापारीय, औद्योगिक वगैरे विषय. प्रत्येक लेखाला स्वतंत्र पृष्ठे, अनुक्रमणिका मलपृष्ठावर. वार्षिक सूची नाही.

ब्रीदवाक्य —

महतिः कार्यसाधिका।

विशेष माहिती — संपादक — वर्ष २ पासून विष्णु गोविंद विजापूरकर व वामन मल्हार जोशी. वर्षारंभ — वर्ष २ अंक १ मलपृष्ठ 'एप्रिल वर्षारंभ होता तो आता जुलई केला आहे.' वर्ष २ अंक ९ मधील 'वैदिक प्रार्थनांची तेज स्विता' या लेखाबद्दल राजद्रोहाच्या गुन्ह्याकरिता उभय संपादकांस तीन तीन वर्षे कारावासाची शिक्षा झाली व मासिक बंद पडले.

[ केसरी, जम्र ]

वर्ष १ — अंक १ ते १२ एप्रिल १९०६ ते मार्च १९०७ ( अंक १२ चे प्रकाशन जून अखेर )

वर्ष २ — अंक + १ जुलै १९०७ ते ९ मार्च १९०८.

## विश्वास

मासिक : संपादक — य. वा. उमराणीकर. प्रकाशक — पुणे ७·६ × ५·२. प्रथमांक — ऑक्टोबर १९४७.

[ कोल्हापूर ]

वर्ष १ — अंक १ ऑक्टोबर १९४७, २ नवंबर १९४७. अंक २ दीपावली विशेषांक किंमत ८८.

## विसावा

मासिक : संपादक — बा. द. सातोस्कर. प्रकाशक — श. बा. कुलकर्णी, मुंबई. वा. व. रु५. फु अं ८८. अंकात ६४ पृष्ठे ८ × ५·२. प्रथमांक — सप्टेंबर १९४७.

उद्देश — कथावाङ्मयाला वाहिलेले.

विशेष माहिती — वा. वर्गणी — वर्ष ३ रु. ८, फु. अं. ८।२. आकार — वर्ष २ अंक ११ चा १०·७ × ८·३. याशिवाय आणखी एक 'विसावा' नावाची पुष्पमाला ( पहिली ३ पुष्पे ) जानेवारी १९४४ त निघालेली आढळते. तिचा आकार ९·३ × ६·८. प्रकाशक श. बा. कुलकर्णी. दरमहा प्रकाशन. प्रत्येक पुष्पाची किंमत रु. ८८.

[ मुमग्र ]

वर्ष १ — अंक १ सप्टेंबर १९४७ ते ४ डिसेंबर १९४७ + ५ फेब्रुवारी १९४८ ते १२ सप्टेंबर १९४८.

वर्ष २ — अंक ( १ २ ), ३ ते ११. ऑक्टोबर १९४८ ते ऑगस्ट १९४९—. अंक ( १ - २ ) दिवाळी अंक.

वर्ष ३ — अंक + १ नवंबर १९४९ ते ४ फेब्रुवारी १९५०—. अंक १ दिवाळी विश्व भारती कथा अंक, अंक २ रहस्यकथा अंक, अंक ३ प्रेमकथा अंक, अंक ४ क्रांतिकथा अंक.

## विहंगम

**मासिक :** संपादक – ( मालक ) यादव मुकुंद पाठक, सहसंपादक – ( वर्ष २ ) दामोदर केशव पेंडसे. प्रकाशक – संपादक, नागपूर. मुद्रक – ( वर्ष २ ) मुळगी विहंगम कार्यालय, छपाई – सरस्वती मुद्रणालय, नागपूर. वा. व. रु. ३८६. फु. अं. ८६. अंकात ६०, ६४ पृष्ठे. ९·७ × ७·३. प्रथमांक – जुलै १९३३. शेवटचा अंक अक्टोबर १९३८ (तीन वर्षे सदंश अक्रमांक)

**उद्देश** – महाराष्ट्राच्या स्वतंत्र साहित्याचे प्रकाशन व प्रतिमासपत्र वाङ्मयाची इमजीत, हिंदीत व इतर भाषांत रूपांतरे करवून विश्व-साहित्यात महाराष्ट्रसाहित्याला दर्जा वाढविण्या-साठी प्रगतिपर चळवळ करणे, जागतिक साहित्याचा व कलाकृतींचा परिचय महाराष्ट्र - वाचकांस करून देणे, महाराष्ट्रातील साधारण जनसमूहास बहुश्रुत करणे. स्वरूप – (वर्ष ४ पासून) भारतीय साहित्य-परिषदेचे मराठी मुखपत्र. कला, निबंधमाला, करमणूक, सुधारक, काळ, गृहलक्ष्मी, बालोद्यान, महाराष्ट्र साहित्य, संदेश, पोस्टपंची, नीर-क्षीर, चचुप्रहार इ. सदरे. पहिली ३ वर्षे उत्कृष्ट कागद व छपाई. वर्ष ४ पासून भाषाभगिनींकडे विशेष लक्ष व त्यातून अनुवाद. ( भारतीय साहित्याच्या विशालतेचा परिचय आणि राष्ट्रीय जीवनास पोषक विचाराचे प्रवर्तन ).

ब्रीदवाक्य –

( १ ) ' सत्यम् शिवम् सुंदरम् ' ( वर्ष १ ते ३ )
( २ ) मद्देवा लक्ष्मीर्निहिताधिवाचि । ( वर्ष ४ पासून )

**विशेष माहिती** – अखिल महाराष्ट्रीयाचे उच्च दर्जाचे. वर्ष ४ पासून विहंगमाचा नवा अवतार ( भारतीय साहित्य परिषदेच्या महाराष्ट्र शाखेने चालविलेले भा. सा. परिषदेचे मराठी मुखपत्र विहंगम मासिक). प्रकाशक – वर्ष २ – वासुदेव प्रल्हाद नाईक, वर्ष ४ – सुविचार प्रकाशन, लि., नागपूर. *प्रबंधसंपादक* – अंक १९ पासून जगन्नाथ रामचंद्र जोशी. *वा. वर्गणी* – वर्ष २ पासून रु. ३, फु. अं. ८४. *संपादकीय सल्लागार* – वर्ष ४ पासून वामन मल्हार जोशी काकासाहेब कालेलकर, मा. वि. वरेरकर, चिंतामण विनायक जोशी, श्रीनिवास नारायण बनहट्टी. शेवटी प्रकाशकांनी प्रकाशकत्व सोडून मूळ मालक यादव मुकुंद पाठक यांजकडे उत्तराधिकार दिले. यात ' प्रमुख मराठी नियतकालिकांच्या ध्येयधोरणाचे विहंगमावलोकन ', ' नागपुरातील काही अस्तंगत मासिके ' इ. महत्त्वाचे लेख.

[ दग्रापो, ज्ञग्रं, मुमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. जुलै १९३३ ते जून १९३४. अंक ५ दीपावली अंक, अंक ७ जा १९३४ साहित्यसमेलनांक.

वर्ष २ – अंक १३ ते २०, ( २१ - २२ ), २३, २४. जुलै १९३४ ते जून १९३५. अंक १३ वर्षारंभांक, अंक १७ दुसरा दीपावली अंक.

वर्ष ३ – अंक २५ ते ३२, ( ३३ - ३४ ), ३५, ३६. जुलै १९३५ ते जून १९३६. अंक ( ३३ - ३४ ) भारतीय साहित्य परिषद.

वर्ष ४ – अंक + १ ते १२. नवंबर १९३६ ते अक्टोबर १९३७.

वर्ष ५ – अंक १ ते १०, ( ११ - १२ ). नवंबर १९३७ ते अक्टोबर १९३८. अंक १ वर्षारंभ विशेषांक, अंक ३ व ४ गुजरात अंक, अंक ९ बंकिम-बंग अंक.

## विहार

**मासिक :** प्रकाशक – दत्तात्रय केशव गद्रे, पुणे वा. व. रु. २. अंकात ४८ पृष्ठे. ७ २ × ४ ८. प्रथमांक – नवंबर १९१३.

**उद्देश** – जुन्याचा व नव्याचा हृदयंगम संयोग – उपयुक्त, मनोरंजक, बोधप्रद. *स्वरूप* – कविता, गोष्टी, विनोदी लेख, चालू कादंबरी, निबंध, अभिप्राय, पुस्तकपरीक्षणे, चरित्र, ऐतिहासिक आख्यायिका, किरातार्जुनीयाचे रूपांतर

ब्रीदवाक्य –

पुराणमित्येव न साधु सर्वं
न चापि काव्यं नवमित्यवद्यम् ।

विशेष माहिती – काही तरुण पदवीधरांच्या 'विहार–मंडळा'ने चालविलेले, 'महाराष्ट्रीय विश्वविद्यालयाचे पदवीधर तरुण उत्साही लेखक.' 'साहित्यसेवा व समाजसेवा एकदम बजावण्याचा संकल्प.' यात 'गुप्त संदेश' व 'हरवलेले पत्र' या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या.

[ पुमग्रं, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते १२. नव्हेंबर १९१३ ते अक्टोबर १९१४.

वर्ष २ – अंक १ नव्हेंबर १९१४ ते ११ सप्टेंबर १९१५—.

## वीणा

मासिक : संपादकमंडळ – श्री. म. वर्दे, स. ह. मोडक, च. वि. बावडेकर, वा. दा. गोखले. प्रकाशक – मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई. वा. व. रु. १. फु. अं. ८१. ८·३ × ५·५. प्रथमांक – एप्रिल १९३७.

उद्देश – मुंबई मराठी साहित्यसंघाचे (स्थापना २१-७-१९३५) मुखपत्र. स्वरूप – मराठी भाषा, मराठी पुस्तके, नियतकालिके, महत्त्वाचे लेख, मराठी बोलपट इत्यादींची सुसंगत माहिती. टीकालेख, मराठीच्या अभ्यासास उपयुक्त माहिती.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ ते ९. एप्रिल ते डिसेंबर १९३७.

वर्ष २ – अंक १, २, ( ३ - ४ ). जानेवारी ते एप्रिल १९३८—. अंक ( ३ - ४ ) महाराष्ट्र साहित्य संमेलनांक.

## वीरशैव

मासिक : संपादक – ( कर्ते ) मडिवाळाप्पा सगाप्पा देवमाले. प्रकाशक – सोलापूर. वा. व. रु. २. फु. अं. ८४. ८·४ × ५·३. प्रथमांक – जानेवारी १९०३.

ब्रीदवाक्य –

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥
अनित्यानि शरीराणि वै(? वि)भवो नैव शाश्वतः ।
नित्यं संनिहितो मृत्युः कर्तव्यो धर्मसंग्रहः ॥
धर्मार्थकाममोक्षाणां यस्यैकोऽपि न विद्यते ।
अजागलस्तनस्येव तस्य जन्म निरर्थकम् ॥

विशेष माहिती – वा. वर्गणी – वर्ष २ रु. १८३ मागाहून रु. २; फु. अं. ८२.

[ पुमग्रं, शांतस्वामी चाकूर ]

वर्ष १ – अंक १ ते ७,.... १२. जानेवारी ते डिसेंबर १९०३.

वर्ष २ – अंक १ ते ३, ( ४ - ५ ), ६ ... जानेवारी ते जून १९०४—.

## ( श्रीमद् )वीरशैव धर्मप्रकाश

मासिक : प्रकाशक – पारलिंग प्रभु अय्या, मासिक पुस्तकाचे हक्क संपादक, काशी. मुद्रक – प्रभेधरल छा. वा. व. रु. ( १८३ ) २. फु. अं. ८४. अंकात १६ पृष्ठे. ८·८ × ५·७. प्रथमांक – जानेवारी १९०८. ( पुस्तक अंक ).

उद्देश – पूर्वी अशी माहिती वर्तमानपत्रद्वारे प्रसिद्ध केली आहे. पण वर्तमानपत्रातील लेख संग्रहास राहात नाहीत, म्हणून मासिक पुस्तक. युगमानाने झालेले अनेकार्थ टाळून एकरूप शुद्धाचाराचे ज्ञान करून देणे. स्वरूप – सृष्टीची व लिंगायतांची उत्पत्ती, शास्त्रे, वेद, पुराणे, प्रचार रूढ्या, इतिहास आणि श्रुती, स्मृती, आगमद्वारे जे जे आचार, नीती, संस्कार (प्रायश्चित्ते), प्रतिपादन केलेले असतील ते सर्व शास्त्रोक्त रीतीने प्रसिद्ध केले जाणार. मूळ संस्कृत व मराठी भाषांतर.

ब्रीदवाक्य –

श्रीमद्धर्मविलासी विलसे सुशील ईशपदां जोडी ।
तोडी कुबंधनाते, अधर्माचे सदा यतत सोडी ॥

**विशेष माहिती** – प्रथमांकाच्या आरंभपृष्ठावर 'तारीख १५ सप्टेंबर सन १९०१ इसवी' असून वर्गणीच्या वर्गणीच्या रु. १८३ या आकड्यावर रु. २ हा आकडा छापलेली पावती चिठी मागाहून चिकटविलेली आहे. मलपृष्ठावर सरळ नोंदलेला तपशील येथे वर्णनात छापला आहे. मासिक छापून सव्वासहा वर्षे पडून राहिले ? यात ईशस्तवन – 'तत्त्वोत्पत्ति' मूळ संस्कृत व मराठी भाषांतर.

[ मग्रं, शासस्वामी चाकूर ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १९०८, २ फेब्रुवारी १९०८—.

## वीरशैव-धर्मरहस्य

**मासिक :** संपादक – शिवलिंग माऊ ओझर्डे. प्रकाशक – संपादक, देऊर ( जि. सातारा ). मुद्रक – सिद्धनाथ छा., वाई. वा. व. रु. १. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ८·८ X ५·७. प्रथमांक – चैत्र श. १८३६ ( मार्च ए १९१४ ).

**उद्देश** – वीरशैवसमाजाची सुधारणा. सदाचारासंबंधीचा आळस नाहीसा होऊन धर्मावरील श्रद्धा दृढतर होईल असा प्रयत्न करणे. *स्वरूप* – वीरशैवी धार्मिक व सामाजिक विषयांची चर्चा. साधुपुरुषांची चरित्रे व त्यांची प्रासादिक काव्ये.

**ब्रीदवाक्य** –

अशाश्वतासि वंदिता । व शाश्वतासि निंदिता ।
असे स्वतांच्च वागता । म्हणुनि ताप भोगिता ॥

**विशेष माहिती** – *आकार* – अंक १ – ८ X ५·१. *कालनिर्देश* – वर्ष १ अंक १ मलपृष्ठावर चैत्र शु ५ श. १८३६ असून, आरंभपृष्ठावर 'नमुन्याकरिता अंक जानेवारी १९१४' आहे; अंक ५ ( का ४ ? ) पासून सनात निर्देश.

[ मग्रं, शासस्वामी चाकूर ]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८३६, २ वै, ३ ज्ये + ...५ फे १९१५, ६ मा, ७ ए, ८ मे १९१५—.

## वीरशैवमतप्रकाश

**त्रैमासिक :** संपादक – मुरुघस्वामी बृहन्मठाध्यक्ष. प्रकाशक – रामदाळे. वा. व. रु. १. फु. अं. ८४. ७·१ X ४·१. प्रथमांक – जानेवारी १९०६.

**ब्रीदवाक्य** –

अपि पापशतं कृत्वा ज्ञानतोऽज्ञानतोऽपि वा ।
वीरशैवमतं प्राप्य शिव एव न संशयः ॥

– परमेश्वरागम

वर्ष १ – अंक १ जानेवारी १९०६ ते ४ ( ५ - ६ ) जून १९०६—.

## वीरशैव संजीवनी

**पाक्षिक :** संपादक – नारायण रामलिंग वामणगावकर. सहसंपादक – वि. तु. चौधरी. प्रकाशक – संपादक, उमरावती. मुद्रक – अरुण छापखाना. वा. व. रु. २·८०. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ९ ६ X ६·५. प्रथमांक – १ जानेवारी १९३६ ( जुने वर्ष चौथे ).

**उद्देश** – वीरशैवसमाजोन्नतिकारक विचारप्रसार. *स्वरूप* – वीरशैवांतील चळवळी, आदर्शभूत स्वामी, शास्त्री व भक्त यांची चरित्रे, समा-परिषदा यांचे वृत्त, व्रतोत्सवाविषयी माहिती, महाराष्ट्रवीरशैवपरिचयपट.

**ब्रीदवाक्य** –

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रा ये चान्यजातयः ।
लिंगधारणमात्रेण शिवा एव न संशयः ॥

– परमेश्वरागम प. १ ( ५६ )

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥

– भगवद्गीता अ. ९ ( ३२ )

**विशेष माहिती** – वर्ष १ वर जुने वर्ष चौथे ( बहुधा 'वीरशैव संजीविनी'चे; पाहा ) व पुढे त्या क्रमात वाढत्या जुन्या वर्षाचा उल्लेख.

सहसंपादक – वर्ष ३ अंक ९ – रा.शं. पुराणिक.
*पार्श्व पत्ने* – वर्ष ३ ह. ३. पृ. अं. ८२.
*पृष्ठसंख्या* – वर्ष २ पासून २४.

[ शास्त्रीस्वामी चाकूर ]

वर्ष १ – अंक १ ते २४. १ जानेवारी ते १५ डिसेंबर १९३६. अंक १२ (१५ जून) गाव उत्सगीर अंक.

वर्ष २ – अंक १ ( १जानेवारी १९३७) ते १४ ( १५ जुलै १९३७ )...अंक १ खास अंक.

वर्ष ३ – अंक ...९ (१५ जून १९३८) —.

## वीरशैव संजीविनी

**मासिक** : संपादक – एन्. आर. मामणगाव-कर. प्रकाशक – संपादक, अमरावती. मुद्रक – पांडुरंग छा. अमरावती. वा. व. रु. २-४. पृ. अं. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ८'३ × ५. प्रथमांक – अश्विन श. १८३१ ( अक्टोबर १९०९. )

**उद्देश** – भारतात अनेक पंथ असले तरी सर्वांचे जीवन्मुक्ती हे एकच साध्य. पण एकाली-पणामुळे द्वैत उत्पन्न झाले. सर्व पंथातील सुशिक्षि-तांनी पंथाना विश्वबंधुत्वाचे व्यापक स्वरूप दिल्यास हे द्वैत नष्ट होईल. अशाने हिंदुस्थानात संपत्ती वाढविणे व वैदिक धर्माचा जयजयकार होईल असे प्रतिपादन. स्वरूप – सचित्र. धार्मिक व तात्त्विक लेख, गोष्टी, सभा व संस्थांच्या हकीकती, मनोरंजन, स्फुटविचार, व्याख्याने, पत्रव्यवहार, इहवृत्त.

**ब्रीदवाक्य** –

(१)

ब्रह्मैवेदममृतं पुरस्ताद्ब्रह्म पश्चाद्ब्रह्म दक्षिणत-श्चोत्तरेण ।
अधश्चोर्ध्वंच प्रसृतं ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥१॥
– मुण्डकोपनिषद्

(२)

निरपूरस्य गृणं जगत् ( वर्ष १ अंक ११ पासून )

**विशेष माहिती** – वर्ष १ अंक ५ वर – ए मंथली मॅगेझीन ऑफ् रिलिजन, लिटरेचर ॲंड फिलॉसॉफी. *संपादक व प्रकाशक* – वर्ष १ अंक ११ वर महादेवस्वामी मामणगावकर. *भाषा* – वर्ष १ अंक ४ पासून मराठी व इंग्रजी. *आकार* – वर्ष १ अंक ११ – १३ × ८. *पृष्ठे* – लहान आकार ३२, मोठा आकार १६. *जाहीर* – प्लेगामुळे ३ महिने बंद म्हणून वर्षारंभ अक्टोबर होता तो दुसऱ्या वर्षाचा जानेवारी केला. *मुद्रक* – वर्ष १ अंक ११ – संजीविनी छा.

[ शास्त्रीस्वामी चाकूर ]

वर्ष १ – अंक १ अश्विन १८३१ ते ३, ४ पौ, ५ माघ, ..., ११ आ १८३२, १२ श्रा-भा १८३२.
वर्ष २–अंक+१ जाने १९११ (माघ १८३२), २ फे ३ मा १९११ (चैत्र १८३३)—.

## वीरशैवोत्कर्ष-विचारमाला

**मासिक** : संपादक – वीरभद्र शिवलिंगप्पा शेट्टी. प्रकाशक – कोल्हापूर. मुद्रक – विद्याविलास छा. वा. व. रु. २ ट. स.सह आगाऊ. अंकात १६ ते २४ पृष्ठे. प्रथमांक – डिसेंबर १९०७. ( पुष्प-क्रमांक )

**उद्देश** – ( दक्षिण-महाराष्ट्र ) वीरशैव समा-जोन्नति. स्वरूप – वीरशैव धर्म-समाज उद्योग व नीती वगैरे विषयावर लेख, चरित्रे, कविता, नाटके व वृत्तसार.

**ब्रीदवाक्य** –

विचारमूला आचारा जीवन्ति च फलन्ति च ।

[ शास्त्रीस्वामी चाकूर ]

वर्ष १ – अंक ... ३ फेब्रुवारी १९०८—.

## वेदांतज्ञानप्रकाश

**मासिक** : प्रकाशक – मुंबई. मुद्रक – विद्याप्रकाश छापखाना, मुंबई. वा. व. रु. २. फु. अं. ८२. अंकात २४ पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – अश्विन शुद्ध १० श. १८०७. शेवटचा अंक – फाल्गुन शुद्ध १ श. १८०७.

**उद्देश** – नूतनधर्मानप्रवर्तक व ख्रिस्ती धर्मोपदेशक यांचे एकपक्षी विचार ऐकून लोकांची धर्मश्रद्धा नाहीशी होत आहे. म्हणून वेद, शास्त्रे, पुराणे, स्मृती, इत्यादी ग्रंथाधारे वैदिक धर्माची श्रेष्ठता व सत्यता लोकांच्या दृष्टीस आणणे. स्वरूप – श्रीमद्भागवतादी ग्रंथांचे मराठी भाषेत सोप्या शब्दांनी क्रमशः भाषांतर, मते, उत्पत्ति, आचार, विचार, यज्ञ इत्यादिकांचे प्रयोजन व फलश्रुती याविषयी पुराणोक्त मनोरंजक गोष्टी.

**ब्रीदवाक्य** –

अकामः सर्वकामो वा मोक्षकाम उदारधीः ।
तीव्रेण भक्तियोगेन यजेत पुरुषं परम् ॥ १ ॥
– भागवत.

**विशेष माहिती** – वाग्विलासकर्त्यांनी योजना करून नमुन्याकरिता २ अंक काढले. ठरविलेली वर्गणीदारांची संख्या न भरल्यामुळे स्वतंत्र मासिक न काढता 'वेदान्तज्ञानसंबंधी बहुतेक विषय' 'वाग्विलासात'च देण्याचा ठराव करून त्याच्या पुस्तक २ अंक ८ - ९ मध्ये 'वेदान्तज्ञानप्रकाशा'च्या दोन अंकातील मजकूर छापण्यात आला. [पाहा 'वाग्विलास' मुंबई १८८३.]

वर्ष १ – अंक १ (नमुना) अक्टोबर १८८५, २ मार्च १८८६. फक्त दोन अंक.

## वेदार्थयत्न

**मासिक** : संपादक – (भाषांतरकर्ता) (शंकर पाडुरंग पंडित.) प्रकाशक – पत्रव्यवहाराचा पत्ता महादेव नारायण पंडित, 'म्यानेजर वेदार्थयत्न' मुंबई. मुद्रक – इंदुप्रकाश छापखाना; निर्णयसागर छा., मुंबई. वा. व. रु. ६. फु. अं. ४१०. अंकात ६४ पृष्ठे. ८'५ × ५'५. प्रथमांक – एप्रिल १८७६. शेवटचा अंक – मार्च १८८२. पुस्तकविभागणी मंडलवार, वर्षवार नाही. सलग-क्रमांक (मासिक भाग).

**उद्देश** : ऋग्वेदसंहिता पदांसहित व तिचे मराठी व इंग्रजी भाषांतर, संस्कृत व्याख्या आणि मराठी टीका. स्वरूप – एकंदर सहा भाग – संहिता, पदे, मराठी भाषांतर, इंग्रजी भाषांतर, अन्वय आणि टीका. रचना – पहिले दोन भाग डाव्या पृष्ठावर, दुसरे दोन दोन स्तंभांत उजव्या पृष्ठावर, डाव्या पृष्ठाच्या द्वितीयार्धात 'भाष्यार्थम्' अशा मथळ्याने अन्वय व उजव्या पृष्ठाच्या द्वितीयार्धात टीका (विस्तृत आणि माहितीपूर्ण.)

**विशेष माहिती** – 'ॲन ॲटेम्प्ट टु इंटरप्रीट दि वेदाज.' "(वेदार्थयत्न) मासिक ७२ अंक निघून बंद पडले" – केरळकोकिळ वर्ष २ अंक २, ऑगस्ट १९१२, श्रुतिबोध' वरील अभिप्राय पृ. ४५. पुस्तक ४ अंक १७ व पुस्तक ५ अंक १ या दोहोंसही एकच सलग क्रमांक ६४ व जुलै १८८१ हा कालनिर्देश दुबार पडलेला दिसतो. "'वेदार्थयत्न' कधीच नियमित निघालेला नाही." – विविधज्ञानविस्तार, वर्ष १८ अंक १२ डिसेंबर १८८६, पृ. २७८.

[मुमग्रं, डेक्कॉ]

पुस्तक १ अंक १ ते १४ (मासिक भाग १-१४). एप्रिल १८७६ ते मे १८७७.
पुस्तक २ – अंक १ ते १६ (मासिक भाग १५ ते ३०). जून १८७७ ते सप्टेंबर १८७८.
पुस्तक ३ – अंक १ ते १७ (मासिक भाग ३१ ते ४७). अक्टोबर १८७८ ते फेब्रुवारी १८८०.
पुस्तक ४ – अंक १ ते १७. (मासिक भाग ४८ ते ६४). मार्च १८८० ते जुलै १८८१.
पुस्तक ५ – अंक १ जुलै १८८१ ते ६ डिसें १८८१ (मासिक भाग ६४ ते ६९),

[ अंक ७ ते ९ (मासिक भाग ७० ते ७२) जा ते मार्च १८८२ ].

## वेदोक्त सद्धर्मविचार

**मासिक** : प्रकाशक – भिकाजी नारायण टोगरे, वेदोक्तधर्ममंडळीच्या आश्रयाने, मुंबई. वा. व. रु. ३. पु. अं. ८८. अंकात ३२ पृष्ठे. ९'५ × ६'३. प्रथमांक – मे १८७५.

**उद्देश** – मुमुक्षूंच्या कल्याणार्थ – श्रीविष्णुबुवा ब्रह्मचारीकृत 'वेदोक्तधर्मप्रकाश', 'गीता-व्याख्यान,' 'राजनीति' वगैरे ग्रंथांचे मासिक. **स्वरूप** – पहिल्याने विख्यात थेट श्रीविष्णुबुवा ब्रह्मचारीकृत जेवढे ग्रंथ आहेत तेवढे, नंतर *श्रीमच्छंकराचार्यकृत भाष्ये व त्याचे* मराठी भाषांतर. स्तोत्रे, वेदांतपर मराठी ग्रंथ. छापलेले विषय —'सुखदायक राज्यप्रकरणी निबंध', 'सहजस्थितीचा निबंध', गीता, भावार्थसिंधू, वेदोक्तधर्मप्रकाश.

[ मग्रं ]

**वर्ष १** – अंक १ मे १८७५ ते ३ जुलै १८७५—.

## वैदिक कर्मयोग

**मासिक** : संपादक – सदाशिवशास्त्री भिडे. प्रकाशक – ग. वि. केतकर, चिटणीस 'गीताधर्म-मंडळ,' पुणे. वा. व. रु. ३८३. अंकात प्रकरणवार ४८पृष्ठे. ७'३ × ४'८. प्रथमांक – आषाढ श. १८५१.

**उद्देश** – मथळ्यात खुलासा – अथवा उपनिषद्रत्नप्रकाश.

**ब्रीदवाक्य** –

आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः ।

[ मुमग्रं ]

**वर्ष १ ते ३** – अंक प्रत्येकी १ ते १२. आषाढ १८५१ ते ज्येष्ठ १८५४ ( तीन वर्षे ).

## वैदिकधर्म

**मासिक** : संपादक – बळवंतराव कमलाकर माक्तोडे; ( वर्ष १ अंक ६ पासून ) शंकर शास्त्री पदे. *प्रकाशक* – विनायक गणेश टोंगरे ( ग्वाल्हेर ), उज्जैन. *मुद्रक* – अलीजाह दरबार प्रेस, ग्वाल्हेर. वा. व. रु. १. पु. अं. ८२. अंकात २४ पृष्ठे. ८'४ × ५'४. प्रथमांक – पौष शुद्ध १ शके १८२१ (जानेवारी १९००). ( पुस्तक - अंक ).

**उद्देश** – धार्मिक विषयाचे मासिक पुस्तक. *स्वरूप* – वैदिकधर्मासंबंधी माहिती, सत्पुरुषांची चरित्रे, पुण्यस्थानांची वर्णने, पौराणिक गोष्टी, जयंत्या-उत्सवे यांची माहिती. धार्मिक वर्तमाने इ.

**ब्रीदवाक्य** –

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चित् शृणोति मे ।
धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते ॥

— भगवान व्यास.

**विशेष माहिती** – *प्रवर्तक* – कै. बळवंतराव कमलाकर माक्तोडे. अंक ७ पासून मलपृष्ठावर शक-सन व आरंभपृष्ठावर संपूर्ण शककालनिर्देश व मलपृष्ठावर 'कै. बळवंतराव माक्तोडे याचे स्मारक' असा मथळ्याच्या वर निर्देश. *संपादक* – अंक ( ११ - १२ ) 'मनीषिमार्गगमंडळ'. 'काही प्रती सरकाराने खरेदून मला प्रोत्साहन दिले'. *यात 'योगविज्ञान' ग्रंथ. " नव्या संपादकांनी* मासिकाचे 'स्वधर्म' असे नामांतर केले ( पाहा पुरवणी यादी ) व पुढे त्यांचा संबंध सुटला व ते मासिक बंद झाले. पुनः अक्टोबर १९०२ पासून 'वैदिक धर्म' या पूर्वीच्याच नावाने ते इंदूरला निघू लागले व जून १९०३ पर्यंत त्याचे कसेबसे तीनच अंक निघून ते कायमचे बंद झाले, " अशी माहिती कृ. गं. कवचाळे यांच्या '*मध्यभारतीय मराठी वाङ्मय*' पुस्तकाच्या पृ. ३२२ वर आढळते.

[ मुंमग्रं, पारखी शास्त्री ]

**वर्ष १** – अंक १ ते ७, ( ८ - १० ), ( ११ - १२ ). पौष १८२१ ते मार्गशीर्ष १८२२.

(पुढे इंदूरहून अक्टोबर १९०२ ते जून १९०३ च्या दरम्यान ३ अंक निघाले ?).

## वैदिकधर्म व महात्म्यांचे बोल

**मासिक :** संपादक — सदाशिव बापूजी कुलकर्णी. प्रकाशक — संपादक, मुंबई. वा. व. रु. १०१२. पु. अं. ८३. ८'५ X ५'३. प्रथमांक— आषाढ श. १८३७.

**स्वरूप** — वैदिक धर्मासंबंधी माहिती, सत्पुरुषांची चरित्रे, सत्पुरुषांचे बोल, पुण्यस्थानांची वर्णने, पौराणिक गोष्टी, जयंत्या, पुण्यतिथींची माहिती.

**ब्रीदवाक्य** —

श्रुतिस्मृत्युदितं धर्ममनुतिष्ठन् हि मानवः ।
इह कीर्तिमवाप्नोति प्रेत्यचानुत्तमं सुखम् ॥

वर्ष १ – अंक १ आषाढ १८३७—.

## वैद्यक

**धैमासिक :** संपादकमंडळ – नीलकंठ अनंत पुरंदरे (अध्यक्ष), वसंत रामजी खानोलकर (उपाध्यक्ष). प्रकाशक — आनंद श्रीधर परांजपे, गोवर्धनदास मेडिकल कॉलेज, मुंबई. वा. व. रु. ४. फु. अं. रु. १.८०. अंकात ९६ पृष्ठे. ९'७ X ६'५. प्रथमांक – अक्टोबर १९३५. (सलग अंकक्रमांक).

**स्वरूप** – शारीर, निदान, जंतुशास्त्र, रोगाची माहिती, गृहपरिचर्या, वैयक्तिक व सार्वजनिक आरोग्य, रुग्णपरिचर्या, बालसंगोपन, वर्तमान, नवे शोध, ग्रंथपरीक्षण, वैद्यकाचा इतिहास इ.

**ब्रीदवाक्य** –

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ –गीता.

**विशेष माहिती** – 'गोवर्धनदास सुंदरदास मेडिकल कॉलेजमधील मराठी अध्यापकांनी चालविलेले.'

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर - डिसेंबर १९३५, २ जा - मा १९३६, ३ ए - जू, ४ जुलै - सप्टेंबर १९३६.

वर्ष २ – अंक + ५ जा - मा १९३७ विशेष अंक पूर्व भाग, ६ ए - जू १९३७ विशेष अंक उत्तर भाग + (७ - ८) एप्रिल १९३९ मधुमेह विशेषांक चिकित्सा विभाग.

## वैद्यक पुना-पंच

**मासिक :** संपादक – वामन बाबाजी महाजन. प्रकाशक — संपादक, पुणे. मुद्रक – शारदा छापखाना, पुणे. वा. व. रु. ०६ आगाऊ. फु. अं. ०१. अंकात सलग १६ पृष्ठे. ८'३ X ५'४. प्रथमांक – जुलै १९०२.

**स्वरूप** – १ ग्रंथोक्त अनुभविक निदाने व चिकित्सा, २ वगैरे व जटिली औषधांची माहिती, ३ नित्याच्या खाण्याच्या पदार्थांचे गुणधर्म, ४ उपयुक्त वैद्यकीय माहिती, ५ सुभाषित श्लोक व अर्थ, ६ इष्टवृत्त व वर्तमानसार.

**ब्रीदवाक्य** –

अनेकवैद्यग्रंथेभ्यः
सारमुद्धृत्य यत्नतः ।
अस्य संग्रहणेनैव
प्रायो सौख्यमाप्नुयात् ॥–प्रपंचशास्त्र.

**विशेष माहिती**–*औषधी पेटी* व वैद्यक - पुना पंच यांची सांगड घालून पाच रुपये पेटीत निरंतर बिनव्याजी ठेवणाऱ्यास मासिक पुस्तक बिनवर्गणी मिळण्याची सोय *संपादक*– वर्ष १ अंक १० च्या मलपृष्ठ ३ वर महाजन यांच्या नावापुढे वैद्यक पुना पंच कर्ते असे प्रथम छापले. *वर्गणी* – पावक्या वर्षापासून ०९ करणार. *आवृत्ती* – वर्ष १ अंक २ मलपृष्ठ १ खाली अखेरीस 'आवृत्ती दुसरी सन १९०३' व

अंक ३ ते ६ मलपृष्ठावर पण 'आमूची दुपरी' असे छापले आहे. वर्ष २ अंक २ मलपृष्ठावर अखेरीस 'आमूची दुपरी (सन १९०७)' असे छापले आहे. पण वर्ष – ५ व्या वर्षाचा आरंभ 'जानेवारी १९०८ पासून' असे निवेदन. स्वतंत्र पुस्तके – वर्ष ३ अंक (४-५) = 'प्लेगसंबंधी उपयुक्त माहिती व औषधी उपायाचे प्राणरक्षक पुस्तक' व अंक (६-७) = 'ज्वरपुराण' असे स्वतंत्र पुस्तकाच्या रूपाने दिले.

[ मुमर्ग ]

वर्ष १ – अंक १ ते १२. मुंबई १९०२ ते जून १९०३.

वर्ष २ – अंक + १ ते ५, (६-७), ८ ते १२. ऑगस्ट १९०३ ते जुलै १९०४.

वर्ष ३ – अंक १ ते ३, (४-५), (६-७), ८ ते १२. ऑगस्ट १९०४ ते जुलै १९०५.

वर्ष ४ – अंक + १ ते ५, (६-७), ८, (९-१२). जानेवारी १९०६ ते डिसेंबर १९०६.

## वैद्यमित्र

मासिक : संपादक – रघुनाथ अनंतशास्त्री पटवर्धन. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – पुरंदरे कंपनी प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. र. १८४. फु. अ. ८२. अंकात ३२ पृष्ठे. ६·२ × ४·७. प्रथमांक – ऑक्टोबर १९२०.

उद्देश – वैद्यकविषयाचे सुबोध मासिक. स्वरूप – रोगविचार, दिनचर्या, सुगम औषधी उपाय, निघंटसंग्रह इ.

विशेष माहिती – "हे मासिक जनतेत आयुर्वेदज्ञानाचा प्रसार होण्याकरिता सर्व वाचनालयांना मोफत देण्याची व्यवस्था केली आहे."
–('महाराष्ट्र नियतकालिक दीपिका.)

[ मुमर्ग ]

वर्ष १ – अंक १ ते १२. ऑक्टोबर १९२० ते सप्टेंबर १९२१.

वर्ष २ – अंक १ ऑक्टोबर १९२१, २ नोव्हेंबर १९२१ —.

## वैश्य

मासिक : संपादक – शंभु अनंतशेट फेणरकर, पणजी. प्रकाशक – नवे गोवें. वा. व. रु. दहा-मारी ८१४. फु. अं. ८३. अंकात १६ पृष्ठे. ९·८ × ७·२. प्रथमांक – जानेवारी १९२१.

उद्देश – वैश्यज्ञातीच्या सर्वांगीण विकासाच व उन्नतीस वाहिलेले. स्वरूप – विशेषांक. एक दोन कविता, औद्योगिक व व्यापारविषयक लेख, शिक्षणविषयक लेख, गोष्टी, ज्ञातिबांधवांची चरित्रे, संस्थांचे इतिहास, ज्ञातीतील कर्तबगार लोकांचा परिचय, कूटप्रश्न, कोडी, प्रश्नोत्तर.

ध्येयवाक्य –
*भगिनी सुत मातुली करुनि ते दुर्दैव दिवेकडे*
व्यापारादि गमावुनी मग जगी जे जाहले बापुडे।
थाया त्या निजपूर्ववैभवस्मृती होवोनि आदर्शसा
गोमंती नववैश्य हा अवतरे थोडा अता आळशा॥

विशेष माहिती – "हा काळ हिंदु-संघटनेचा आहे. अर्थात त्यातील प्रत्येक जातीच्या संघटनेचा हा काळ आहे."

[ गोमंतक मडगाव ]

वर्ष १ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९२१.

## वैश्य मासिक

मासिक : संपादक – विश्वनाथ गोपाळ शेटये. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – तत्वविवेचक छापखाना, मुंबई. वा. व. रु. १८३. फु. अं. ८३. अंकात २४ पृष्ठे. ७·२ × ४·२. प्रथमांक – एप्रिल १९१० (चैत्र शु. १ श. १८३२).

उद्देश – कोंकणस्थ वैश्य ज्ञातीमध्ये सामाजिक, धार्मिक व नैतिक सुधारणा करणे.

ब्रीदवाक्य –

ज्ञानाविणे जे जे कळा । ते ते जाणावी अवकळा ।
—रामदास.

( वर्ष ३ ) गुन तेचि प्रगटावें । असाध्य तेचि साधावें । कानडेचि अभ्यासावें । निरंतर ॥

( वर्ष ४ ) वाणिज्ये वसते लक्ष्मीः ।

( वर्ष ८ ) सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचें । परंतु तेथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥

विशेष माहिती – *प्रकाशक* – वर्ष ३ एन. बी. गांधी. *नाव* – आठव्या वर्षी 'वैश्य-मासिक', *संपादक* – वर्ष ८ – महादेव विठोबा गांधी (प्रका.). *वा. वर्गणी* – वर्ष ८ – रु. १।८, फु. अं. ८३. *नवे स्वरूप* – (आठव्या वर्षी) नव्या स्वरूपात 'वैश्य-मासिक' भेटीस येत आहे. सातव्या वर्षाच्या अखेरीस मध्यंतरी मासिक बंद ठेवण्यात आले. १९१७ साली शेवटचा तिमाही जोड अंक काढून बंद पडले. लढाईमुळे कागदाचे भाव वाढले. *आकार* – वर्ष ८ – ८×५·६.

[ मुमग्रं, मग्रं ]

- वर्ष १ – अंक १ ते १२. एप्रिल १९१० ते मार्च १९११.
- वर्ष २ – अंक १ ते ४, (५-६), ७, (८-९), (१०-११), १२. एप्रिल १९११ ते मार्च १९१२.
- वर्ष ३ – अंक ..., २, (३-४), (५-६), (७-८), (९-१०), (११ १२). एप्रिल १९१२ ते मार्च १९१३.
- वर्ष ४ – अंक (१-२), (३-४), ५ ते १२. एप्रिल १९१३ ते मार्च १९१४.
- वर्ष ५ – अंक (१-२), ३ ते ६, (७-८), ९, (१०-११), १२. एप्रिल १९१४ ते मार्च १९१५.
- वर्ष ६ – अंक (१-३), (४-६), (७-९), (१०-१२). एप्रिल १९१५ ते मार्च १९१६.
- वर्ष ७ – अंक (१-३), (४-६), (७-९), (१०-१२). एप्रिल १९१६ ते मार्च १९१७.
- वर्ष ८ (नवे वर्ष १) – अंक + १ अक्टोबर १९१९..., ३ डि १९, ४ जा २० ते ६ मार्च १९२० —.

## वैश्ययुवक

मासिक : संपादक – विष्णु विठ्ठल डाकवे. प्रकाशक – संपादक, चिपळूण. मुद्रक – श्रीनिवास छा. चिपळूण. वा. व. रु. २. फु. अं. ८३. अंकात २८ पृष्ठे. ९.४ × ६·९. प्रथमांक – जानेवारी १९३४. (वर्ष पाचचे काही सलग अंकक्रमांक).

उद्देश – कोकणप्रांतीय वैश्य समाजाच्या उन्नतीसाठी वाहिलेले व्यापारी मासिक. स्वरूप – सचित्र. संकीर्ण, ललित वाङ्मय इत्यादी.

विशेष माहिती – संकीर्ण ललित वाङ्मय-विभागाचे चालक – वि. ल. बर्वे. प्रथम वंकनाक – विजयादशमी श. १८५५ (अक्टोबर १९३३), आकार ७·२ × ४·८.

[ मुंमग्रं ]

- वर्ष १ ते ४ – अंक प्रत्येकी १ ते १२. (जा ते डि). जानेवारी १९३४ ते डिसेंबर १९३७ (चार वर्षे). प्रतिवर्ष अंक १० अथवा ११, दिवाळी अंक, वर्ष २ अंक १ जा १९३५ परिषद खास अंक.
- वर्ष ५ – अंक १ जानेवारी १९३८ ते १० अक्टोबर १९३८ –. अंक १० दिवाळी अंक.

## वैश्यसेवक

मासिक : संपादक – वसंत मुकुंद कादे. प्रकाशक – संपादक, मुंबई. अंकात २० पृष्ठे. ६·८ × ४·५. प्रथमांक – एप्रिल १९२७ (चैत्र १८४९).

उद्देश – शनीच्या उपासनेसाठी.

ध्येयवाक्य –

कृष्णगोरक्षवाणिज्यं । वैश्यकर्म स्वभावजम् ॥

विशेष माहिती – प्रथमांकावर एप्रिल १९२७. त्याच्यापुढे दुसऱ्याच अंकावर व नंतर वैश्यमाळेतील मासनिर्देश आढळतो. संपादक – वर्ष २ विठ्ठल रामचंद्र पांढरे.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ एप्रिल १९२७, २ वैशाख १८४९ ते १२ फाल्गुन १८४९.

वर्ष २ – अंक १ चैत्र १८५० ते ३, ... ५, .. ,७, ८, (९ - १०), (११ - १२) माघ – फाल्गुन १८५०.

## वैष्णव

मासिक : संपादक – लक्ष्मीबाई विनायक होमकर. प्रकाशक – संपादक, सोलापूर. मुद्रक – हनुमान छा., सोलापूर. वा. व. रु. ३८८. पृ. अं. ८५. ९·४ × ७·४. प्रथमांक – अक्टोबर १९४९.

उद्देश – (नामदेव समाजोन्नति परिषद कार्यासाठी). स्वरूप – मराठी – हिंदी.

ध्येयवाक्य –

अधर्माची अवघी तोडी ।
दोषा(षां) ची लिहिली फाडी ।
सज्जना करवी गुढी ।
ब्र्याची उभवी ॥ – ज्ञानेश्वर.

[ पाटसकर संग्रह ]

१ – अंक १ अक्टोबर १९४९, २ नवंबर १९४९—.

## व्यवहारदर्पण

मासिक : संपादक – कृष्णाजी नारायण शास्त्री. प्रकाशक – मुंबई. वा. व रु. ३. मागा-हून रु. ४८८. पृ. अं. ८६. अंकात २४ पृष्ठे. ९·७ × ६·२. प्रथमांक – चैत्र शु. १८०२.

स्वरूप – वर्षा, कन्याशिक्षण, वैद्यक, शेतकी, राजनीती इ. विषयावर निबंध, प्राचीन कवींच्या नाटकादिकांचा भाषांतरे, पर्वांसंबंधी स्वरशिक्षण कादंबरी, प्राचीन हिंदू राजांची माहिती.

ध्येयवाक्य –

वक्तव्य व्यसनानीह यान्युक्तानि मनीषिभिः ।
मुख्यो भेदोहि तेषां तु पारिशे विदुषां मतः ॥
द्रोणद्रौणिकृपांही आजि करावी क्षमा न धोनावें।
भेद नसावा बुध हो भेदे स्वयश न करासि ओसावें॥

विशेष माहिती – यात रत्नावली (अथवा ऐक्यलक्षणा) कादंबरी व प्रभावति शृंगार आणि वज्रनाभसंहार नाटक.

वर्ष १ – अंक १ चैत्र १८०२, २ वैशाख १८०२—.

## व्यवहारोपयोगी हुन्नरसंग्रह

[ पाहा (व्यवहारोपयोगी) हुन्नरसंग्रह ]

## व्यापार–उद्योग

मासिक : प्रकाशक – ग. ल. सहस्रबुद्धे, पुणे. वा. व. रु. २. अंकात २४ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – अश्विन शु. १० श. १८२६ (१८ अक्टोबर १९०४).

उद्देश – व्यापार, व्यापारी शिक्षण, व्यापार-विषयक ज्ञान आणि वृत्त यास वाहिलेले.

विशेष माहिती – इंग्रजीत वर्णन – डिव्होटेड टु कॉमर्स, कमर्शिअल् एज्युकेशन, नॉलेज ॲंड न्यूज.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक... ... १० आषाढ १८२७ (आगस्ट १९०५)—.

## व्यापार-उद्योग

**मासिक** संपादक – अविनाश मोहाडीकर प्रकाशक – संपादक, मुंबई मुद्रक – पॉप्युलर प्रेस, मुंबई. वा व रु १० फु अ रु १ अकार ४०, ७२ पृष्ठे ९४ X ७२ प्रथमांक – अक्टोबर १९४७ पुढे चालू–वार्षिक १९६७

**उद्देश** – स्वदेशातील व परदेशातील व्यापार विषयक घडामोडींची जास्तीत जास्त माहिती व चिकित्सा व्यापारात व धंद्यात वावरणाऱ्या माणसापुढे व जगापुढे मांडणे – उद्योगधंद्याच्या वाढीला मदत करणे *स्वरूप* – हिंदुस्थानचे आर्थिक प्रश्न, परराष्ट्रीय घडामोडी, राष्ट्रीय प्रगतीच्या योजना, आधुनिक व सहकारी पद्धतीने शेतीची मशागत, महाराष्ट्रातील उद्योगधंद्यांचे परीक्षण, बँका, विमाव्यवसाय, ग्रामोद्योग, शेअर बाजार, व्यापारी बातम्या, सरकारी निवेदने, नियमने इ

**विशेष माहिती** – महाराष्ट्राचे व्यापारविषयक प्रमुख मासिक *व्यवस्थापक* – मोहाडीकर बंधु *सल्लागार* – द रा धारपुरे, रघुनाथ व्ही महाशब्दे *संपादक* – वर्ष २ अविनाश मोहाडीकर, अनंत य पाठक *वार्षिक वर्गणी* – वर्ष २ अंक ६ रु ६, फु अ ८८

[ मुमग्र, मप्र, काणेसंग्रह पुणे ]

**वर्ष १** – अंक १ ते ५, (६ ७), ८ ते १२ अक्टोबर १९४७ ते सप्टेंबर १९४८ अंक (६ ७) मार्च एप्रिल १९४८ गांधी विशेषांक

**वर्ष २** – अंक १ ते १२ अक्टोबर १९४८ ते सप्टेंबर १९४९ अंक २ नोव्हें १९४८ दिवाळी अंक, अंक ११ आॅगस्ट ४९ विमा विशेषांक

**वर्ष ३** – अंक (१ २), ३ ते ७ (८ ९), १० ते १२ अक्टोबर १९४९ ते सप्टेंबर १९५० अंक (१ २) दिवाळी अंक फोटोग्राफी विशेषांक अंक ३ इव्हाणूर विशेषांक अंक १० धारपुरे विशेषांक

**वर्ष ४** – अंक १ अक्टोबर १९५०, (२ ३) नोव्हें डिसें १९५०-- अंक १ व (२ ३) दोन्ही अंक विशेषांक (दिवाळी अंक)

## व्यापारी जगत्

**मासिक** संपादक – सी पी कोठारी प्रकाशक – संपादक, पुणे मुद्रक – हनुमान प्रेस, पुणे वा व रु २८८ फु अ ८४ अकार ३२ पृष्ठे ९३ X ६४ प्रथमांक – अक्टोबर १९३५ (विजयादशमी)

**उद्देश** – व्यापारोपयोगी विषयांवर लिहिलेले व्यापारोपयोगी सर्व प्रकारची माहिती इंग्रजीतून प्रसिद्ध होते सर्व गोष्टींचे ज्ञान महाराष्ट्र भाषेतून मिळावे म्हणून काढले महाराष्ट्रीयांनी व्यापाराची कास धरली पाहिजे याचे प्रतिपादन

**विशेष माहिती** – इंग्रजीत वर्णन 'दि वर्ल्ड ऑफ कॉमर्स' डिस्ट्रिब्युटेड टु कमर्शियल इन्फर्मेशन अॅन्ड अॅग्रिकल्चरल स्टॅटिस्टिक्स

[ मुमग्र ]

**वर्ष १** – अंक १ ते ३ अक्टोबर ते डिसेंबर १९३५ —

## व्यापारी [illegible]

**मासिक** संपादक – जी डी शर्मा सह संपादक – पी एन् कोठडिया प्रकाशक – पुणे वा व रु ३ फु अ ८६ अकार १८ पृष्ठे ९२ X ७२ प्रथमांक – फेब्रुवारी १९६० पुढे चालू १९६७

**उद्देश** – व्यापारी वर्गाशी संबंधित सर्व कायदेकानूंविषयी साधकबाधक चर्चा करून योग्य मार्ग दाखविणारे

[ मग्र ]

**वर्ष १** – अंक १ फेब्रुवारी १९६० ते ४ मे १९६० —

## व्यापारी शिंपी

**द्वैमासिक :** संपादक – दत्तात्रय बळवंत भुवकर. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु ३·४. फु अ. ८१४ अंकात २० पृष्ठे ९·७ × ७ ३. प्रथमांक – जानेवारी-फेब्रुवारी १९४९ पुढे चालू १९६५

**उद्देश** – व्यवसायाचे माहितीपत्रक

**विशेष माहिती** – दि पूना मर्चंट टेलर्स को ऑपरेटिव्ह असोसिएशनचा आश्रय. संचालक – मो ना पाटसकर. पुढे वर्ष ३ अंक ४ (जु आ १९५१) मलपृष्ठावर "सचित्र शिवण कला अर्थात व्यापारी शिंपी" प्रथमांकात श्री. श्रीपतराव काकडे याच्या शिवणक्लेसमधील नैमासिकाचा व अन्य कलाकार्याचा गौरवपूर्ण उल्लेख (पाहा 'शिवणकला' कोल्हापूर १९२३)

[ मुमय, मग्र ]

**वर्ष १** – अंक १ जा फे १९४९, २ मा ए, ३ मे जू, ४ जु आ, ५ स अ, ६ न डि १९४९. अंक ४ हिंदी स्वातंत्र्यदिन अंक

**वर्ष २** – अंक १, २, (३ ४), ५, ६. जानेवारी ते डिसेंबर १९५०.

## व्यायाम

**मासिक** · प्रकाशक –घाडो नारायण विद्वांस, बडोदे मुद्रक – श्रीराम विजय छा बडोदे वा. व रु १·८ फु अ ८३ अंकात २८, ३२ पृष्ठे. ९ × ६ २ प्रथमांक – ऑक्टोबर १९१५.

**उद्देश** – अशक्तांना सशक्त, व्याधिग्रस्तांनी रोगमुक्त व निरोगी व सशक्त असतील त्यांनी अधिक बलवान कसे व्हावे यासाठी. *स्वरूप* – सचित्र पर्णे विविध देशी विदेशी खेळ, व्यायाम पद्धती, आरोग्य, ब्रह्मचर्य, मेहनती, व्यायामविषयक चरित्रे इ

### ब्रीदवाक्य –

लाघवं कर्मसामर्थ्यं दीप्तोऽग्निर्मेदसः क्षयः ।
विभक्तघनगात्रत्वं व्यायामादुपजायते ॥ –वाग्भट

**विशेष माहिती** – *संचालक* – वर्ष २२ दत्तात्रेय चिंतामण मुजुमदार. *वा वर्गणी* – वर्ष ५ रु २·८८ फु अ. ८४, वर्ष ३५ रु ३·८८. *संपादक* – वर्ष १८ घाडो नारायण विद्वांस, वर्ष ३४ वा. धों. विद्वांस *सहसंपादक* – वर्ष २२ ना. द. मुजुमदार *विशेषांक* – वर्ष ३ अंक १ खास अंक, वर्ष १९ अंक ४ जिमखाना अंक, वर्ष २१ अंक १ दामोदर बळवंत भिडे अंक, वर्ष २२ अंक १ खास *ऑलिंपिक अंक, वर्ष २३ अंक ४ खास हिंद* विजय जिमखाना आणि शारीरिक शिक्षण परिषद अंक, अंक ५ खास मिरजकर अंक, वर्ष २४ अंक ३ खास माणिकराव अंक, वर्ष २६ अंक २ रौप्य महोत्सव खास अंक, वर्ष २८ अंक ११ श्रीमंत आबासाहेब मुजुमदार विशेषांक, वर्ष ३० अंक (६ ७) कै गु हरि माधव ऊर्फ तात्यासाहेब सहस्रबुद्धे विशेषांक, वर्ष ३१ अंक ११ श्री कृष्णाजी बळवंत महाबळ गुरुजी विशेषांक, वर्ष ३३ अंक ९ घाडो नारायण विद्वांस मृत्युलेख; वर्ष ३६ अंक १ सीमोल्लंघन विशेषांक

[ मुमग्र ]

**वर्ष १ ते २९** – अंक प्रत्येकी १ ते १२ (अ ते स) ऑक्टोबर १९१५ ते सप्टेंबर १९४४ (एकोणतीस वर्षे)

**वर्ष ३०** – अंक १ ते ५, (६ - ७), ८ ते १२ ऑक्टोबर १९४४ ते सप्टेंबर १९४५

**वर्ष ३१ ते ३३** – अंक प्रत्येकी १ ते १२ ऑक्टोबर १९४५ ते सप्टेंबर १९४८ (तीन वर्षे)

**वर्ष ३४** – अंक (१ २), ३ ते १२ ऑक्टोबर १९४८ ते सप्टेंबर १९४९

**वर्ष ३५** – अंक १ ते १० ऑक्टोबर १९४९ ते सप्टेंबर १९५०.

**वर्ष ३६** – अंक १ ते ३ —. ऑक्टोबर ते डिसेंबर १९५०.

## शरीर यंत्र

**मासिक :** प्रकाशक – डॉ. वासुदेव जगन्नाथ सामंत, सोलापूर. वा. व. रु १|८. अंकात ३२, ३६ पृष्ठे. ७·३ X ४·७. प्रथमांक – मे १९३७. शेवटचा अंक – जून १९३७.

**उद्देश** – निसर्गोपचाराचा शास्त्रीय विषय सुबोध, मनोरंजक व आकर्षक करणे. *स्वरूप* – प्रत्येक उपचारपद्धतीचा निसर्गोपचार पद्धतीशी तुलनात्मक अभ्यास जिज्ञासूंचे समाधान.

**ब्रीदवाक्य** –

रोग जाय दूधशाकरें । तरि निंब का पियावा ?

– श्री ज्ञानेश्वर

**विशेष माहिती** – चालक – डॉ. वासुदेव जगन्नाथ सामंत, १९४ नवी पेठ, सोलापूर. दोनच अंक निघाल्याचे संपादकांनी स्वतः सांगितले.

[ मुमग्र, डॉ. सामंत मुंबई ]

वर्ष १ – अंक १ मे १९३७, २ जून १९३७

## शारदा

**मासिक :** संपादक – केशव रघुनाथ काशीकर ( अंक २ ) प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – लॉ प्रिंटिंग प्रेस, अंक ३ पासून रघुवीर प्रेस, पुणे वा. व. रु. ४, सहामाही रु २, तिमाही रु. १. फु. अ. ८६, अंक ३ पासून ८१०. अंकात ६४ पृष्ठे ९.५ X ७.२. प्रथमांक – चैत्र श. १८४५ ( नमुन्याचा अंक मार्च १९२३. )

**उद्देश** – मराठी मासिके अल्पायू का होतात त्याची कारणे दूर करून वैशिष्ट्यपूर्ण वाङ्मय पुरविणे स्वरूप – सचित्र निःपक्ष पुस्तकपरीक्षण, निःपक्षपाती विवेचन, महिला मनोरंजन, विनोदी लेख, काव्यसुधा (राष्ट्रीय कविता), साहित्य संगीत कला, वीणाझंकार ( व्याख्याने वगैरे ), विविध विषय, चरित्रे, औद्योगिक व हुनरकलाविषयक माहिती, आमचा महाराष्ट्र, मधुकराचा गुंजारव, बोधप्रद उतारे.

**ब्रीदवाक्य** –

( अंक ४ पासून )

क्षमाशील, हतवीर्य, लोकहृदयी प्रेरावया चित्कला ।
राष्ट्रीयप्रतिमानिकाय, जगती व्हायास ही आजला ॥
प्रज्ञा, वैभव, कार्यशक्ति, समता, स्वातन्त्र्यभक्ती, मुदा ।
वर्षाया अभिजात वाङ्मयसुधा देईल ही शारदा ॥

**विशेष माहिती** – " इंग्रजीतील ' मॉडर्न रिव्ह्यू ' मासिकाचे धर्तीवर चालणारे. " पुणे भारतीय साहित्य मंदिराचे मुखपत्र. सचित्र मासिक पुस्तक. *वर्षनिर्देश* – पहिला अंक नमुन्याचा, दुसरा अंक वर्ष १ मास १ – अंक २; तिसऱ्या अंकापासून वर्ष १ – अंकक्रमांक : मलपृष्ठावर शक, आरंभपृष्ठावर सन नमुना अंकात मराठी नियतकालिकांच्या वस्तुस्थितीबद्दल विवेचन

[ मुमग्र, दवापो ]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८४५ ते ५ श्रावण १८४५ —.

## शारदा

**त्रैमासिक :** संपादकमंडळ – वर्ष ६ सौ. इंदिरा तेलंग, सौ. स. बाव प्रकाशक – म नी. वागळे, मुंबई, वा. व. रु १. ७·१ X ४·७. प्रथमांक – ( ऑक्टोबर १९३७ ).

**उद्देश** – नॉर्थ कॅनरा गौड सारस्वत ब्राह्मण संधानार्थ

**विशेष माहिती** – शेवटच्या वर्षात अंकांवरील वर्षनिर्देश वर्ष ७ व वर्ष ८ असा सरमिसळ आढळतो

[ मग्र ]

वर्ष २ – अंक १ दसरा अंक अक्टोबर १९३८, २ मकर सं जा १९३९, ३ रामनवमी मा ३९, ४ अ. श्रावण जुलै १९३९

वर्ष ३ – अंक १ विजयादशमी ऑ ३९, २ जा १९४०, ३ रामनवमी ए ४०, ४ आषाढ शुद्ध १९४०.
वर्ष ४ – अंक १ ऑक्टोबर १९४०, २ जा ४१, ३ ए, ४ ऑगस्ट १९४१ अंक २ महिला अंक
वर्ष ५ – अंक १ सप्टेंबर १९४१
वर्ष ६ – अंक + ? जा १९४४, ३ ए १९४४
वर्ष ७ – अंक , २ जा १९४५, ३ मे १९४५, ( वर्ष सातव्याचा ४ व वर्ष आठव्याचा १ एकत्र ) डिसेंबर १९४४ (११९४५)

## (श्री)शारदामंदिर अथवा निजामशाला-पत्रक

**मासिक** संपादक – रामचंद्र वासुदेव कुळकर्णी प्रकाशक – बाळापूर मुद्रक – न्याय सुधा छा नागपूर वा व रु २ फु अ ८२ अंकात २४ पृष्ठ ७९ × ८२ प्रथमांक – जुलै १९१९

**उद्देश** – शिक्षणविषयक हैद्राबाद संस्थानातील प्राथमिक शाळांच्या शिक्षकांसाठी शिक्षण विषयक चर्चा व वाङ्मयप्रकाशन स्वरूप – धार्मिक, औद्योगिक, नैतिक, ऐतिहासिक, शास्त्रीय इ विषयावर निबंध, उपयुक्त माहिती, नाना विषयांच्या शिक्षणावर चर्चा, कविता, पुस्तक परीक्षण, नेमणुका, बदल्या, परीक्षांचे प्रश्न व निकाल, पत्रव्यवहार, वृत्तसार

**ब्रीदवाक्य** –

पातु वो निकषग्रावा मतिहेम्न सरस्वती ।
प्राज्ञेतरपरिच्छेदं वचसैव करोति या ॥

**विशेष माहिती** – निजामसरकारच्या शिक्षाखात्याच्या आश्रयाने

[ ममग्र ]

वर्ष १ – अंक १ जुलै १९१९ ते ६ डिसेंबर १९१९ —

## शारदा विलास

**मासिक** संपादक – पंडित बंसन प्रकाशक – मुद्रक, औरंगाबाद मुद्रक – आलमगीर प्रेस वा व रु २८८ फु अ ८८ अंकात ५० ( वर्ष १ अंक ३ ) पृष्ठ ७६ × ५७, वर्ष १ अ ७–९ १ × ६ २ प्रथमांक – चैत्र श १८२०. ( वप – विलास )

**स्वरूप** – रियासत हैद्राबाद येथील नामांकित दरबारी पुरुषांची चरित्रे, ऐतिहासिक प्रकरणाय स्थळे, 'अंत पुरातील मन्मथदुर्विलास' कादंबरी, मुख नलाफ प्रकरणे, आख्यायिका, चुटके, सुभाषित

[ 'मुख नलाफ ( करण्याची ? ) प्रकरणे' = चतुर सभ्याने तोंड बंद करण्याबद्दलच्या गोष्टी ( फार्सी ) = बाता नलाफ ( विशेषण ) = बातावद, निरुत्तर ]

[ मुमप्र ]

वर्ष १ – अंक २ वै १८२० ते ६ मा १८२०, ( ७ ८ ) अधिक व निज अश्विन, ९ का ते १३ फाल्गुन १८२०
वर्ष २ – अंक १ चैत्र १८२१—

## शालापत्रक

( पाहा मराठी शालापत्रक )

## शाला–मंदिर

**मासिक** संपादक – जनार्दन शंकर मढेकर प्रकाशक – डी एम् जागल जोगल आणि क, पुणे वा व रु २ फु अ ८४ ८ २ × ६ ८ प्रथमांक – (एप्रिल १९४२) ( वप अंक, अंक १७ पासून सलग क्रमांक )

**उद्देश** – प्राथमिक अध्यापक व प्राथमिक शिक्षण यांच्या सर्वांगीण प्रगतीचा मार्ग चोखाळणे स्वरूप – आत व मलपृष्ठावर रंगीत चित्रे

विशेष माहिती – संचालक – दाजीसाहेब जोगळ. प्रकाशन समारंभ दि. ५ एप्रिल १९४२.

[ मग्रं ]

वर्ष २ – अंक १, ( २ - ३ ), ४ / १७ ते २४. एप्रिल १९४३ ते मार्च १९४४. अंक ५ पासून गणनानिर्देश सलग अंकक्रमाचा.

वर्ष ३ – अंक ( २५ - २६ ) एप्रिल-मे १९४४, ( २७ - २८ ), ( २९ - ३० ), ( ३१ - ३२ ) अक्टोबर - नवंबर १९४४—.

## शालावृत्त

मासिक : संपादक – सीताराम श्रीधर पारखी. प्रकाशक – नागपूर. मुद्रक – सी. पी. प्रिंटिंग वर्क्स. वा. व. रु. १८४. पु. अं. ८२८६. अंकात १६, २४ पृष्ठे. ६'५ × ४'१. प्रथमांक – (एप्रिल १९०७). शेवटचा अंक – मार्च १९०९ (?)

उद्देश – मध्यप्रांतातील शाळाखात्याचे डायरेक्टर यांच्या परवानगीने प्रसिद्ध होत असलेले. स्वरूप – शाळाखात्याचा रिपोर्ट, शाळाविज्ञान्याच्या हालचाली, शालावृत्त, बदल्या, प्रमोशन, स्कॉलरशिप परीक्षेचा निकाल, शंकानिरसन, कूटप्रश्न, शैक्षणिक निबंध, कविता इ.

विशेष माहिती – शेवटचा अंक – मार्च १९०९असा उल्लेख ( विहंगम एप्रिल १९३४ ).

[ पुमग्रं, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक..., ३ जून १९०७,..., ८ न, ९ डि, .... १२ मार्च १९०८.

वर्ष २ – अंक ..., २ मे १९०८, ३ जू, ४ जु..., ९ डिसेंबर १९०८—.

## शास्त्रीय जगत्

मासिक : संपादक – वी. व्ही. गोरे. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – गोरे छा. वा. व. रु. २८८. फु. अं. ८४. अंकात २८ पृष्ठे. ९'६ × ६'६. प्रथमांक – जानेवारी १९३९.

उद्देश – उद्योग धंदे, व्यापार, शेतकी व आधुनिक शास्त्रे यांचे.

ध्येयवाक्य –

उद्यमेन हि सिध्यन्ति कार्याणि न मनोरथैः ।
न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १९३९ ते ३ मार्च १९३९—.

## शिल्पकलाविज्ञान

मासिक : प्रकाशक – महादेव बल्लाळ नामजोशी, पुणे. मुद्रक – आर्यभूषण छा. पुणे. वा. व. रु. ५. फु. अं. ८८. अंकात प्रकरणवार ३२ पृष्ठे. ९'१ × ६'३. प्रथमांक – अक्टोबर १८८७. ( पुस्तक-अंक ).

उद्देश – देशातील उद्योगधंद्याची अवनती थांबविण्याकरिता जुने धंदे सावरणे, नव्या किफायतशीर धंद्यांची माहिती देणे, उणीवा व अडचणी दूर करण्याचा मार्ग दाखविणे अनुषंगिक ज्ञानाचा संपर्क करणे. स्वरूप – सचित्र, पर्णचित्रे. पायाभूत शास्त्रे, रसायन व शिल्प यांची मातृभाषेतून पद्धतशीर माहिती. कारखाने, व्यापारी पेठा, यंत्राबद्दल सविस्तर ज्ञान, अर्थशास्त्रीय विषय, वाणाहती विद्या, व्यापाऱ्याच्या व कारखानदाराच्या चर्चासमास उत्तेजनपर लेख, प्रश्नोत्तरे.

विशेष माहिती – मलपृष्ठावर मजकूर. प्रत्येक लेखाला स्वतंत्र पृष्ठांक. ग्रंथकर्त्याचे नाव फक्त मलपृष्ठावर, लेखावर नाही. माहिती मिळविण्याचे मार्ग – " १ पुस्तकावरून, २ धंद्यातील प्रवीण लोकांकडून ३ स्वतःच्या माहितीवरून. " यात ' हिंदुस्थानातील सांपत्तिक द्रव्ये, ' ' चित्रकला ', ' व्यापारी भूगोल ' अशा विषयावर लेख.

[ मंडलिकसंग्रह, पुमग्रं, मुंमग्रं ]

वर्ष १ व २ – अंक प्रत्येकी १ ते १२ ( अ ते ख ).

अक्टोबर १८८७ ते सप्टेंबर १८८९. (दोन वर्षे).
वर्ष ३ ते ५ – अंक प्रत्येकी १२. (त्यापैकी १० जोड अंक). अक्टोबर १८८९ ते सप्टेंबर १८९२. (तीन वर्षे)
वर्ष ६ – अंक १ अक्टोबर १८९२ ते ५, (६ - ७), ८, ९,....
वर्ष ७ – अंक + १ एप्रिल १८९४ ते ६ सप्टेंबर १८९४—.

## शिल्पकलासंग्रह

मासिक : संपादक—रघुनाथ विनायक धैर्यवान. प्रकाशक – पुणे. मुद्रक – कल्पोत्तिनर छा. पुणे. वा. व. रु. ३, मागाहून रु. ४. फु. अं. ०८. अंकात ४० पृष्ठे + देखावे. ८५ X ५.४. प्रथमांक – मे १८७७.

उद्देश – स्वदेशहितार्थ व चितारी, मेस्त्री आणि शिल्पी यांच्या उपयोगाकरिता. स्वरूप – रंगीत व रेखा पर्णचित्रे. मलपृष्ठ शिळामुद्रित. चित्रकला व एंजिनिअरिंग रेखाचित्रे इ. पदार्थाच्या चलनशक्तीची मूलतत्त्वे, व्यवहारोपयोगी रसायनशास्त्र, दुर्बिणी इत्यादी करणे, सुतारकाम, शिवणकला-नकशिदे, जाळ्या (सदरहू विषय खोपरतिर सागून शिवाय निरनिराळ्या कारखान्यासंबंधी उपयुक्त माहिती), चुटके, इ.

ब्रीदवाक्य –

कृपणस्य यथा द्रव्यं, स्वैरिण्याश्च मनोगतम् ।
गूढं तथा कलाशास्त्र आविष्कर्तुं मनोयम. ।

विशेष माहिती – 'निबंधमाला', चित्रशाळा १९२६ आवृत्ती पृ ४६३ टीपमध्ये जून १८७८ पर्यंत चालल्याचे दिले आहे. संपादक व्ही. ए. धैर्यवान, प्रकाशक धुरंधर, पुणे. (पण अंक ३ चा प्रकाशनकाल २८ एप्रिल १८७८ असा नोंदला आहे) आरंभी रचना चित्रकलेच्या साह्याने पाश्चात्यांची यंत्रे चोहोकडे प्रसिद्धीस येऊन त्यांचे व्यापार वाढले,. आपल्या देशातही कलेसंबंधी पुस्तके निघतील तर देशाचे हित होईल म्हणून हे पुस्तक काढण्याचे योजिले आहे. सदरहू पुस्तक मोफतपणाने काढणार होतो; परंतु अनाठाय लागला. पहिल्या अंकात अनुक्रमणीचे सुंदर रंगीत चित्र दिले आहे.

[ महाराष्ट्र‌परिषद, मुंबई ]

वर्ष १ – अंक १ मे १८७७ ते ६ अक्टोबर १८७७—.

## शिवणकला

त्रैमासिक / द्वैमासिक : संपादक – श्रीपत हरि काकडे ( लंडन डिप्लोमिस्ट ) सहसंपादक – केशव रामचंद्र कुलकर्णी. प्रकाशक – कोल्हापूर. वा. व. रु. १॥१२, द्वै. २॥४. फु अं. त्रै.रु. १, द्वै. रु. ॥१०. अंकात द्वै. ४० पृष्ठे. ९.५ X ६.४. प्रथमांक – अक्टोबर १९२३. शेवटचा अंक–आगस्ट १९३१.

उद्देश – वर्तमानकालीन पौर्वात्य व पाश्चात्य उच्च शिवणकला.पेशनप्रसारक. स्वरूप – सचित्र कर्तनकार्य, शिवणकाम, प्रचलित प्रकार, शिप्याचा क्षेत्रविस्तार, धंद्याची मरखी यांविषयी अनुभविक लेख, मनोरंजक व्यावहारिक गोष्टी.

ब्रीदवाक्य –

उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मी. ।

विशेष माहिती – वर्ष ८ अं. ५ मध्ये टीप – 'शिर्षाशास्त्र' पुस्तकाच्या आवृत्त्या काढावयाच्या असल्याने या नियतकालिकाकडे लक्ष देण्यास वेळ नाही म्हणून हे त्रै(द्वै.?)मासिक बंद ठेवणार आहो.

[ काकडे कोल्हापूर ]

त्रैमासिक
वर्ष १ ते ६ – अंक प्रत्येकी १ ते ४ ( अ, जा, ए, जु ). अक्टोबर १९२३ ते जुलै १९२९.
द्वैमासिक
वर्ष ७ व ८ – अंक प्रत्येकी १ ते ६ (अ, डि, फे, ए, ज, आ ). अक्टोबर १९२९ ते आगस्ट १९३१ ( दोन वर्षे ).

## शिवतत्त्वप्रकाश

**मासिक :** प्रकाशक – अनंत रामकृष्ण कशाळीकर ( सर्व हक्क स्वाधीन ), मुंबई. मुद्रक – इंडिअन प्रिंटिंग छा. मुंबई. वा. व. रु. ५ आगाऊ, वर्षाच्या अंती रु. ६. एकदर पुस्तकाची रु. १५. फु. अं. ८१०. अंकात ६०, ६४ पृष्ठे. ९·६ × ६·४. प्रथमांक – ज्येष्ठ शु. १८०२. ( पुस्तक - अंक ).

**उद्देश** – विद्वज्जनाच्या साह्याने शिवमहापुराणातील यथानुक्रमे सर्व कथांचे प्राकृत गद्यरूपाने भाषांतर. **स्वरूप** – मूळ संस्कृत श्लोकासह सार्थ शिवमहापुराण.

**विशेष माहिती** – सबंध ग्रंथ साडेतीन वर्षांत छापून होईल. दुसरा अंक सप्टेंबरअखेर निघून पुढे सरळपणाने अंक चालू राहतील, पुस्तकाचे दोन भाग करून रेशमी बांधणीची २ पुस्तके करून दिली जातील. वर्गणीदारांची नावे छापली जातील.

[ मुमग्रं, पुमग्रं ]

**वर्ष** – अंक १ ज्येष्ठ १८०२ . . . .

## शिवप्रसाद

**मासिक :** संपादक – विठ्ठल बाजीराव देशमुख. सहसंपादक – वर्ष २ आ. अ. मानकर. प्रकाशक – संपादक, पुणे. वा. व. रु. ५. फु. अं. ८८. अंकात ५६ पृष्ठे. ९·५×७·२. प्रथमांक – नोव्हेंबर १९४७.

**उद्देश** – अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदेचे मुखपत्र. मराठ्यांच्या हिताचे जतन. **स्वरूप** – मराठी–इंग्रजी. सामाजिक महत्त्वाचे समारंभ, सार्वजनिक व्यक्तींचे दर्शन, क्रीडा क्षेत्रातील हालचाली, संस्थाने आणि विविध क्षेत्रांतील सत्या, इतिहास व्यापार, इ. क्षेत्रांतील मराठ्यांच्या हालचालींचे दर्शन.

[ मग्रं ]

**वर्ष १** – अंक १ नवंबर १९४७, २ डिसेंबर १९४७. ( पहिले वर्ष दोनच महिन्यांचे ? ) अंक १ दिवाळी अंक.

**वर्ष २** – अंक १ जानेवारी १९४८, २ फेब्रुवारी १९४८ —.

## शिवाजी विजय

**मासिक :** प्रकाशक – एम्. एस्. देवमाले, सोलापूर. वा. व. रु. १. अंकात १६ पृष्ठे. ८·४×५·४. प्रथमांक – अश्विन शु. १८२८ ( सप्टेंबर १९०६ ).

**स्वरूप** – विविध लेख, शेतीवर भर.

**ब्रीदवाक्य –**

( १ ) मर्दे तवया सोडू नये । म्हणजे प्राप्त होतो जय । कार्य प्रसंग समय । ओळखावा ॥

– रामदास

( २ ) आरमपृष्ठ

तरुणजनांनी घ्यावे आणू स्ववेचि सुदया भारतिला। व्यर्थ न शिणवू माता जगुनी महिवरि उगाच भार तिला ॥ १ ॥

[ पुमग्रं, मुंमग्रं ]

**वर्ष १** – अंक १ अश्विन १८२८, २ का १८२८ ते ६ अधिक चैत्र १८२९, ७ चैत्र १८२९—.

## शिक्षक

**मासिक :** संपादकमंडळ – बाबूराव गणपत जगताप, मारुतराव गणाजी शेटे ( जगताप ). सहसंपादक – ( वर्ष ५ ) गणपत महादेव घुले. प्रकाशक – मा. ग. शेटे, पुणे. वा. व. रु. २. फु. अं. ८३. अंकात ६४ पृष्ठे. ७·९×५·१. प्रथमांक – मार्च १९२२. पुढे चालू १९६७.

**उद्देश** – मागासलेल्या वर्गाच्या शिक्षक परिषदेमार्फत प्रसिद्ध होणारे. **स्वरूप** – बहुजनसमाजात शिक्षणाचा प्रसार करण्यासाठी विद्यार्थ्यांना

करणे व या शिक्षणाचे, अनुभवजन्य विचारांना प्राधान्य, शंकानिरसन, होतकरू शिक्षकांच्या कविता, निबंध, स्थलवर्णने, इतिहाससंशोधन इ. नमुन्याच्या पाठांची टिपणटाचणे, प्रासंगिक विचार.

ब्रीदवाक्य –

(१) वर्ष १ – अंक १
सर्वद्रव्येषु विद्यैव द्रव्यमाहुरनुत्तमम् ।
अहार्यत्वादनर्घ्यत्वादक्षयत्वाच्च सर्वदा ॥
(२) वर्ष ४ – अंक २
जे जे काही उत्तम गुण । ते ते सद्गुरुचे लक्षण ॥
(३) वर्ष ८ – अंक ३ पासून
हा काळ पाहुन अनेकविधा पदार्थी ।
नाचे हसे पुसतसे खदिलास अर्थी ॥
जिज्ञासु हा सकळ विश्व शिकावयाला ।
तो धन्य तो सुकृति जो शिकवील याला ॥
(४) वर्ष १०
जिज्ञासु हा सकळ विश्व शिकावयाला ।
तो धन्य तो सुकृति जो शिकवील याला ॥

विशेष माहिती – *विशेषांक* – वर्ष ९ अंक ९ मे १९३१ अखिल आशिया शिक्षण [परिषद], वर्ष ११ अंक (११-१२) एप्रिल मे १९३३ अध्यापनाचा परिचय ग्रंथ, वर्ष १३ अंक (११-१२) ए-मे १९३५ 'माझी शाळा' ग्रंथ, वर्ष १५ अंक ९ हायस्कूल व मिडलस्कूल स्कॉलरशिप परीक्षेचे १९३१ ते १९३७ या सात वर्षांचे प्रश्न व नियम, अंक १० व (११-१२) 'अध्यापन प्रवेश' ग्रंथ वर्ष १६ अंक (११ १२) 'शाळा कशी चालवावी?' ग्रंथ, वर्ष १७ अंक (११ १२) "कृ मा. घाबर यांचे शिक्षण मासिकात प्रसिद्ध झालेले शिक्षण विषयक स्फुट लेख" ग्रंथ, वर्ष २० अंक ९ सर्वांचे प्राथमिक शिक्षण विशेषांक, वर्ष २२ अंक १० स्कॉलरशिप परीक्षेचे प्रश्न, अंक (११ १२) 'प्राथमिक शाळेत मराठी भाषा कशी शिकवावी?', वर्ष २३ अंक (१२ १) 'आपला स्वत चा अभ्यास', वर्ष २४ अंक १० स्कॉलरशिप परीक्षेचे प्रश्न, वर्ष २५ अंक १० स्कॉलरशिप परीक्षेचे प्रश्न, अंक (११-१२) सीनदेता अंक; वर्ष २६ अंक १० स्कॉलरशिप परीक्षेचे प्रश्न; अंक (११-१२) शैक्षणिक जनमत विशेषांक, वर्ष २७ अंक ८ जगात पद्यपद्धिपूर्वी खगाच्या अंक, वर्ष २९ अंक ५ स्कॉलरशिप परीक्षा (१९४९) प्रश्नपत्रिका

[ मुंबई ]

वर्ष १ – अंक १ मार्च १९२२ + २ मे ते ७, (८-९), (१०-११) जानेवारी-फेब्रुवारी १९२३. अंक १२ या विभागात नाही.
वर्ष २ व ३ – अंक प्रत्येकी १२. काही जोड अंक. + एप्रिल १९२३ ते मार्च १९२५.
वर्ष ४ – अंक + १, २, (३ ४), (५-६), ७, ८, (९-१०), ११, १२. जून १९२५ ते एप्रिल १९२६ (सत्ता मे ?).
वर्ष ५ ते १८ – अंक प्रत्येकी १२. काही जोड अंक. जून १९२६ ते मे १९४० (चौदा वर्षे).
वर्ष १९ – अंक १ ते ११, (वर्ष १९ चा १२ - वर्ष २० चा १). जून १९४० ते जून १९४१.
वर्ष २० – अंक (२-३), ४ ते ११, (वर्ष २० चा १२ - वर्ष २१ चा १). जुलै १९४१ ते जून १९४२.
वर्ष २१ – अंक २ ते १०, (११-१२). जुलै १९४२ ते मे १९४३.
वर्ष २२ – अंक १ ते १०, (११-१२). जून १९४३ ते मे १९४४.
वर्ष २३ – अंक १, २, (३-४), ५ ते १०, ११, (वर्ष २३ चा १२ - वर्ष २४ चा १). जून १९४४ ते जून १९४५.
वर्ष २४ – अंक २ ते १०, (११-१२). जुलै १९४५ ते मे १९४६.
वर्ष २५ ते २८ – अंक प्रत्येकी १२, काही जोड अंक जून १९४६ ते मे १९५० (चार वर्षे).
वर्ष २९ – अंक १ ते ५ — जून ते अक्टोबर १९५०—.

## शिक्षक–मित्र

**मासिक:** संपादक – गणेश विठ्ठल काटकर. प्रकाशक – संपादक, सोलापूर. वा. व. रु. १॥०१५. फु. अं. ८४. अंकात २४ पृष्ठे. ७·८ × ५·२. प्रथमांक – (एप्रिल १९१९).

**उद्देश** – प्राथमिक शाळांतील शिक्षकांकरिता.

**ब्रीदवाक्य** –

उपकारासाठीं बोलें हे उपाय ।
येणेंविण काय चाड आम्हां ।
बुडतां हे जन न देखवे डोळां ।
येतो कळवळा म्हणउनि ॥

[ मुंमग्र, शाग्रास मडगाव ]

**वर्ष २** – अंक १ एप्रिल १९२०, (२ - ३), ४ जु, (५ - ६), (७ - ८), (९ डि १९२० - १० जानेवारी १९२१) —.

## शिक्षकांचा कैवारी

**मासिक:** संपादक – सखाराम महिपती पाटील. प्रकाशक – संपादक, कराड (सातारा). मुद्रक – लोकमान्य छा. कराड. वा. व. रु. २. अंकात ३० पृष्ठे. ९·२ × ६·२. प्रथमांक – (जुलै १९३२).

**उद्देश** – प्राथमिक शिक्षक व स्कूलबोर्डे यांच्यासाठी. स्वरूप – शैक्षणिक लेख.

**विशेष माहिती** – महाराष्ट्रीय शिक्षकांचे आवडते. ऑक्टोबर १९३६ पासून 'अज्ञात-वासात'. वर्ष ६ चे काही अंक (अंक ३ व अंक ६) 'अलंकार' वर्ष २ बरोबर पुरवणी म्हणून दिले (पाहा 'अलंकार').

[ मग्रं ]

**वर्ष ३** – अंक ..., ८ फेब्रुवारी १९३५...

**वर्ष ४** – अंक १ जुलै १९३५,...(३ - ५) ऑ - न ३५, ...,८ फेब्रुवारी १९३६...

**वर्ष ५** – अंक ..., ४ (ऑक्टोबर १९३६) ऑगस्ट – सप्टेंबर असा मासनिर्देश ?

## शिक्षकांचे विचार

**मासिक :** प्रकाशक – सखाराम विनायक पुडले, पुणे. मुद्रक – जगद्धितेच्छु छापखाना, पुणे. वा. व. रु. १॥८ आगाऊ. फु. अं. ८४. अंकात प्रकरणवार २४ पृष्ठे. ८·७ × ५·५. प्रथमांक – जानेवारी १९०२ (निर्देश नोव्हेंबर १९०१). (पुस्तक-वर्ष).

**उद्देश** – ज्ञानवृद्धीकरिता महत्त्वाचे प्रयत्न करून ते पुढे मांडणे, त्यात येणाऱ्या शंका निवारण करणे व शिक्षकांच्या व्यवसायातील अडचणी दूर करणे. स्वरूप – वर्णोच्चारापासून काव्यश्रुती, गणित, ज्योतिष इ. सर्व प्रकारचे शास्त्रीय विषय; 'करणकौमुदी' ज्योतिषविषयक ग्रंथ, बालज्ञानवर्धक पुस्तकमाला, अंकगणित-विषयक शास्त्र वगैरे शिक्षणक्रमातील पुस्तकांचे रचनात्मक नमुने, शालापत्रकाचा आदर्श.

**विशेष माहिती** – *कालनिर्देश* – "पहिला अंक नवंबर १९०१ मध्ये छापावयास दिला. छापून जानेवारी १९०२ मध्ये प्रसिद्ध झाला. सबब पहिल्या अंकावर जानेवारी १९०२ पाहिजे. तोच वर्षारंभ समजावा." *उत्पादक* – केशव रावजी दाणी. व्यवस्थापकाचे काम त्यांच्याकडेच ठेविले. *वैशिष्ट्य* – शिवराम गणपत पवार यांचा 'करणकौमुदी' ग्रंथ अंक २ पासून सुरू. पुढे तो शक १८२९ मध्ये स्वतंत्र प्रसिद्ध झाला. त्याच्या प्रस्तावनेत या मासिकाचा उल्लेख आहे.

[ मुसम्र ]

**वर्ष १** – अंक १ अंकावर जानेवारी १९०२ (निर्देश नोव्हेंबर १९०१), २ फे, ३ मार्च १९०२ —.

## शिक्षण

**मासिक :** संपादकमंडळ – एम्. बी. हुमेन, जी. आर. कुलकर्णी, जी. एम्. सूर्यवंशी, एल. पी. शिराळे, वाय. बी. शिंदे, के. बी. यादव. प्रकाशक – सातारा जि. शिक्षक संघ, सातारा.

वाबमारे; वर्ष २१ नारायण बापुराव पुराणिक, अ. वा. तेरेदेसाई. *आकार* – वर्ष १४ अंक २ पासून ९·५ × ६·६. *वा. धर्मणी* – वर्ष १४ व १५ रु. २. *सहविचारिणी सभा*–स्थापना १८९०. प्र.रमी 'सहविचारिणी समापत्रिका' या नावाचे वार्षिक प्रकाशन तीन वर्षे १९१७, १९ - १८, १९१९. *हीरकमहोत्सव अंक* – मार्च १९५०,संपादक दत्तात्रेय गोविंद काळे व कृष्णाजी रामचंद्र संत, प्रकाशक – दीनानाथ तवकर. एक जाहिरात – " सहविचाराचे गेल्या वीस वर्षांचे अंक सभेच्या संग्रही ठेवण्यासाठी पाहिजे आहेत. "

[ माइसम, जमं, मसाप, मग्रं, मुंमग्रं, डेकॉ, दवापो ]

त्रैमासिक

**वर्षे १ ते ३** – अंक प्रत्येकी १ ते ४ ( आ, न, फे, मे ). आगस्ट १९२२ ते मे १९२५ ( तीन वर्षे ).

द्वैमासिक

**वर्ष ४** – अंक १ ते ६ ( आ, अ, डि, फे, ए, जू ). आगस्ट १९२५ ते जुलै (!) १९२६. अंक ४ श्रीसयाजीराव महाराज याच्या राज्यारोहणाच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त विशेष अंक.

**वर्ष ५** – अंक १ ते ४, ( ५ - ६ ). आगस्ट १९२६ ते जून १९२७. अंक ( ५ - ६ ) त्रिशतसांवत्सरिक शिवजयंती विशेषांक.

**वर्षे ६ ते १२** – अंक प्रत्येकी १ ते ६. आगस्ट १९२७ ते जून १९३४. ( सात वर्षे )

**वर्ष १३** – अंक १, ( २ - ३ ), ४ ते ६. आगस्ट १९३४ ते जून १९३५. अंक ( २ - ३ ) साहित्य संमेलन खास अंक.

**वर्ष १४** – अंक १ ते ६. आगस्ट १९३५ ते जून १९३६.

**वर्ष १५** – अंक ( १ - २ ), ३ ते ६. आगस्ट १९३६ ते जून १९३७. अंक ६ चंद्रशेखर अंक.

चैमासिक

**वर्ष १६** – अंक १ अक्टोबर १९३७, २ जा १९३८, ३ एप्रिल १९३८.....

वार्षिक

**वर्ष १७** – वार्षिक ' सहविचार वार्षिक अंक १९३८ - ३९. ' प्रकाशन दिनांक २५ आ १९३९.

त्रैमासिक

**वर्ष १८** – अंक १ अक्टोबर १९३९, २ फे १९४०, ३ मे १९४०. अंक ४ निघाला नाही. अंक १ दीपावली अंक.

**वर्ष १९** – अंक १ आगस्ट १९४०, २ न १९४०, ३ फे १९४१, ४ मे ४१. अंक १ सुवर्णमहोत्सव अंक.

**वर्ष २०** – अंक १ अक्टोबर १९४१, २ ए १९४२,...., ४ जुलै १९४२.

**वर्ष २१** – अंक १ अक्टोबर १९४२ दीपावली, २ जानेवारी १९४३ —.

## सह्याद्रि

**मासिक** : संपादक – धोंडो वासुदेव विद्वांस वर्ष ७ अंक २ ( फे १९४१ ) पासून दिनकर विनायक काळे. प्रकाशक – संपादक, केसरी मराठा संस्था, पुणे. मुद्रक – केसरी मराठा छा. पुणे. वा. व. रु. ३८८. फु. अं. ८६. अंकात ६४, ५६ पृष्ठे. ९·५ × ७·१. प्रथमांक – जानेवारी १९३५. पुढे चालू जून १९५७ पर्यंत व पुनः सुरू १९६४.

**उद्देश** – मध्यमवर्गास परवडेल, इतक्या किमतीत उच्च प्रतीचे ज्ञान विज्ञान देणे. राष्ट्रीय, राजकीय, सामाजिक हिताच्या विषयाचा संग्रह, ललित वाङ्मय, औद्योगिक व व्यापारी विषय, महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास, सद्यस्थिती व भविष्यकाल याच्या अनुरोधाने प्रतिपादन. स्वरूप – सचित्र–प्रसंगवशात कलात्मक चित्रे प्रत्येक अंकाव मल्पृष्ठावर व आत आर्टपेपरवरील रंगीत अथवा साधे चित्र, सचित्र अंतरंग. निबंध, चर्चा, परीक्षणे, संशोधन, लघुकथा, विनोद, समायण, कल्पित प्रसंग, कादंबरी, नाट्य, कविता, प्रवास, इ. 'वाचकांशी हितगुज' 'ताजा इतिहास' इ. सदरे.

ब्रीदवाक्य –

श्रीरामदासशिवगणचरणाजितधूलिपूसरितमौलिः ।
निश्चलधृतिररिसागरमद्गश्रीर्जयति जगति सह्याद्रिः॥

(– न. चि. केळकर)

विशेष माहिती – *संचालक* – नरसिंह चिंतामण केळकर. *आकार* – वर्षे ६–८·९ × ७, वर्षे ११ – ९·९ × ६·३; वर्षे १४ – १०·६ × ८·४. *वा वर्गणी* – वर्षे १४ रु. ४।८, फु. अं. ८८. मलपृष्ठावरही काही सदरे. दर सहा महिन्याची विषय लेखक सूची नियमाने त्या त्या सहामाहीच्या शेवटच्या अंकावरोबर. *विशेषांक* – वर्ष १ अंक ८ आ टिळक अंक, अंक १२ डि कॉंग्रेस अंक, वर्ष २ अंक १० अ शास्त्रीय अंक, वर्ष ४ अंक १ जा समाजवाद अंक, वर्ष ५ अंक ५ मे पराक्रमी महाराष्ट्र विशेषांक, अंक ११ न मायाभगिनी विशेषांक, वर्ष ६ अंक १ जा पटवर्धन (माधवराव) स्मृत्यंक, अंक २ फे कला विशेषांक, अंक ३ मा 'कावळा व हार्पा (केळकर), अंक ५ मे बाजीराव विशेषांक, अंक ११ न सुखी संसार विशेषांक, अंक १२ डि सुखी संसार पुरवणी अंक, वर्ष ७ अंक २ बाबासाहेब विद्वांस अंक, अंक ५ क्रिकेट अंक, अंक १० विशुद्ध प्रेमकथा अंक, वर्ष ८ अंक १ रानडे (न्यायमूर्ति) अंक, अंक ९ 'माझा जन्मभरचा उद्योग' (केळकर), वर्ष ९ अंक ४ शमराशा अंक, अंक ६ सावरकर अंक अंक ११ महाराष्ट्र रंगभूमि अंक, वर्ष १० अंक १ हिंदु महासभा अंक, अंक १० अखंड भारत अंक; वर्ष ११ अंक ५ हिंदवी स्वराज्य (शिवाजी) अंक, वर्ष १३ अंक १० डॉ. बेझंट अंक, अंक ११ दिवाळी, केळकर पुरवणी, वर्ष १४ अंक १० केळकर अंक, अंक ११ दिवाळी अंक; वर्ष १५ अंक ११ दिवाळी अंक, वर्ष १६ अंक ५ अभिनव भारत अंक, अंक ११ दिवाळी अंक.

[ केमरा,जय,न्कॉ, मुमग्रं ]

वर्ष १ ते १६ – अंक प्रत्येकी १ ते १२ (जा ते डि). जानेवारी १९३५ ते डिसेंबर १९५०.

## साईनाथप्रभा

**मासिक** : संपादक – लक्ष्मण बळवंत पेठकर (प्रका.) प्रकाशक – संपादक, दक्षिणा भिक्षा संस्था, शिर्डी (ता. कोपरगाव, जि. नगर), पुणे. वा. व. रु. ३. फु. अ. ८६. अंकात इंग्रजी ४२ + मराठी ५४ पृष्ठे.७·२ × ४·२. प्रथमांक – एप्रिल १९१६. (वर्ष किरण).

**उद्देश** – धार्मिक विषयाची चर्चा.

**स्वरूप** – इंग्रजी-मराठी.

**ब्रीदवाक्य** –

साईनाथ प्रभा ही प्रकटुनि हृदयी मावळो अंधकार।
मायेच्या संभ्रमाचे घनपटल उडो जे महा दुर्निवार ।
श्रींच्या दिव्यप्रभेचे किरण नवनवे भक्तवृंदात रंगी ।
फाकोनी, चित्प्रकाशे स्थिरवु जनमना सर्वदा आत्मरंगी ॥

विशेष माहिती – मथळ्यात खुलासा– 'अथवा धर्मरहस्य.' *आकार* – वर्ष १ अंक ३ पासून ९·६ × ६·६.

[ मुंमग्रं, दवापो ]

वर्ष १ – अंक १ एप्रिल १९१६, २ स १६, ३ फे १७, ४ मे १७ + ५ मे १९१८ ते १२ डिसेंबर १९१८.

वर्ष २ – अंक १ जानेवारी १९१९ ते ८, (९-१०) सप्टेंबर-अक्टोबर १९१९—.

## (श्री)साईलीला

**मासिक** : संपादक – लक्ष्मण गणेश महाजनी. प्रकाशक – रामचंद्र आत्माराम तर्खड, बांद्रे. मुद्रक – श्रीलक्ष्मीनारायण छापखाना, मुंबई. वा. व. रु. ३८६. फु. अ. ८५. अंकात ४२, ६६ (वर्ष १२) पृष्ठे. ७·८ × ५·२. प्रथमांक – चैत्र श. १८४५. पुढे चालू १९६७.

उद्देश – शिर्डीचे श्रीसाईमहाराज याच्या लीलांचा व बोधवचनाचा संग्रह करणे. स्वरूप – सचित्र, पर्णचित्रे.

ब्रीदवाक्य –

( १ ) नलिनीदलगतजलमतितरलम्।
तद्वज्जीवनमतिशयचपलम् ॥
क्षणमपि सज्जनसंगतिरेका ।
भवति भवार्णवतरणे नौका ॥
– शंकराचार्य.

( २ ) गोदावर्याः प्रवाहो विलसति यदुदक्पार्श्वतो योजनैकम् ।
प्रादुर्भूत्वा(?या)उत्तमभूत्यानिवाजनितमहे शीलधि-क्षेत्रधाम्नि ॥
सर्वज्ञातीयवृंदैर्विविधजनपदादागतैः स्तूयमानः ।
पूर्णब्रह्मैव साक्षाद्विजयति भुवन पावयन्साइनाथः॥

( ३ ) बाबा, बाबा, निशिदिनि मना बोल रे बोल बाबा ।
बाबानामी क्षितितरि असे दिव्य जादू अबाधा ।
या बालिश्य त्यज, शरण जा त्या न भूपा न बाबा ।
बा बाधा ना तुज यमगृही धावयाची जवाचा ॥

विशेष माहिती – *संपादक* – वर्ष ६ ल. ग. महाजनी, रा. अ. तर्खड; वर्ष ७ रा. अ. तर्खड; वर्ष १२ अंक १० सुंदरराव दी. नवलकर; वर्ष १३ अंक ७ रामचंद्र रामकृष्ण सामंत; वर्ष १५ अंक ४ रामचंद्र वासुदेव वैशास, वर्ष २० श्रीधर नारायण खारकर; वर्ष २१ यशवंत जनार्दन गाळवणकर. *वा. वर्गणी* – वर्ष १६ रु. ३॥८. फु. अं. ०४. सन १९४७ पासून त्रैमासिक (सरकारी नोंद). वर्ष १९ पासून कार्यारंभ जानेवारी केला.

[ मुंबई, मुंबई ]

वर्ष १ ते ३ – अंक प्रत्येकी १ ते १२. चैत्र १८४५ ते फाल्गुन १८४७. ( तीन वर्षे )

वर्ष ४ – अंक १ ते ३, (४ - ५), ६, (७ - १०), (११ - १२), १३. अधिक चैत्र ते फाल्गुन १८४८. ( तेरा अंक )

वर्ष ५ – अंक १, (२ - ३), (४ - ५), (६ - ८), (९ - १०), (११ - १२). चैत्र ते फाल्गुन १८४९.

वर्ष ६ – अंक (१ - २), ३, (४ - ५), (६ - ७), (८ - १०), (११ - १२). चैत्र ते फाल्गुन (?)

वर्ष ७ – अंक (१ - २), (३ - ४), (५ - ८), (९ - ११), १२.

वर्ष ८ – अंक (१ - २), ३ ते ५, श्रा, भ अ, का, १० मा १८५३, (११ - १२ पौ - माघ, १३ फाल्गुन १८५३ ( अधिक आषाढ धरून १३ अंक ).

वर्ष ९ – अंक १ ते ८, (९ - ११), १२. चैत्र ते फाल्गुन १८५४.

वर्ष १२ – अंक... ३ ज्ये, (४ - ५) आ - श्रा १८५७, (६ - ९), (१० - १२) पौष - फाल्गुन १८५७. अंक (६ - ९) कै. हरि सीताराम दीक्षित अंक.

वर्ष १३ – अंक (१ - ३), (४ - ६), (७ - १०), (११ - १३). चैत्र ते फाल्गुन १८५८ ( अधिक भाद्रपद धरून ).

वर्ष १४ – अंक (१ - ३) चैत्र - ज्येष्ठ १८५९....

वर्ष १५ ते १७ – अंक प्रत्येकी १ ते १२ (काही जोड अंक). चैत्र १८६० ते फाल्गुन १८६२ ( तीन वर्षे ).

वर्ष १८ – अंक (१ - ३) चैत्र - ज्येष्ठ १८६३, (४–६), (७ - १० पौष )...

वर्ष १९ – अंक (१ - ३) जानेवारी - मार्च १९४२, (४ - ६), (७ - ९)....

वर्ष २० – अंक (१ - ३) जानेवारी - मार्च १९४३...

वर्ष २१ – अंक (१ - ३) जानेवारी - मार्च १९४४, (४ - ६)....

वर्ष २२ – अंक (१ - ३) जानेवारी - मार्च १९४५, (४ - ६) —.

## साई वाक्सुधा

**मासिक** : प्रकाशक – श्रीधर लक्ष्मण प्रधान, सावोरी. मुद्रक – मनोरंजन छा. मुंबई. वा. व. रु. ४. फु. अं. ८८. अंकात ३६, ४८ पृष्ठे. ८·३ × ५·४. प्रथमांक – १६ जुलै १९२४.

**उद्देश** – सत्पुरुषांची चरित्रे लिहून पुण्यकर्म व लोकसेवा करणे. **स्वरूप** – श्रीसच्चिदानंद सद्गुरू योगीराज उपासनीबाबा महाराज यांची प्रवचने व सिद्धान्तवाक्ये.

**ब्रीदवाक्य** –

( १ ) जगाच्या कल्याणा । संतांच्या विभूती ।
देह कष्टवीती । उपकारे ॥

( २ ) भवरोगविनाशार्थ वैद्य एकः शिवः स्मृतः ।
ददाति गणनाशाख्यमौषध योगमिच्छताम् ॥

( ३ ) नमस्ते काश्यपायाथ काशीनाथाय ते नमः ।
हौंदीपायननिष्ठायामृतपाय नमो नमः ॥
अविद्यादावशमनं पूर्णयोगसुधातिदम् ।
योगीन्द्रं सद्गुरुं वन्दे सच्चिदानदविग्रहम् ॥

**विशेष माहिती** – आरमपृष्ठ – साई-वाक्सुधा अथवा सर्वशास्त्रसिद्धान्त.

[ मुंमम, मग्र ]

**वर्ष १ व २** – अंक प्रत्येकी १ ते १२. जुलै १९२४ ते जून १९२६ —.

## साधना

**मासिक** : संपादक – गणेश वासुदेव गोडसे. प्रकाशक – संपादक, सातारा. मुद्रक – चैतन्य मुद्रा-मंदिर, सातारा. वा. व. रु. १. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक – जानेवारी १९४१. शेवटचा अंक – डिसेंबर १९४३.

**उद्देश** – जनतेची शारीरिक, मानसिक, बौद्धिक, आत्मिक व नैतिक पातळी उंचावून तिची सर्व प्रकारे उन्नती साधणे. **स्वरूप** – विविध लेख, चरित्रे, गोष्टी, कविता, संपादकीय इ. संकीर्ण. प्रामुख्याने प्रगल्भ, मनास शास्त्रीय वळण देणारे, जीवनाच्या शुद्धीसाठी संयम, सदाचार, आणि सद्विचार यांना पोषक आणि अध्यात्म वृत्तीचे द्योतक लेख.

**विशेष माहिती** – सातारा येथील 'सत्प्र-वृत्तिवर्धक मंडळा'चे मासिक. प्रतिवर्षी बाराव्या अंकात लेखक–लेखाची सूची. पुरेशा ग्राहकांच्या अभावी चालकांनी बंद केले.

[ मग्राप ]

**वर्ष १ ते ३** – अंक प्रत्येकी १ ते १२. जानेवारी १९४१ ते डिसेंबर १९४३ (तीन वर्षे).

## साध्वी

**मासिक** : संपादक – ( सरकारी नोंद ) दामोदर गोविंदाचार्य कानडे. प्रकाशक – ( सरकारी नोंद ) बाळकृष्ण केरोबा देव्हारे, मुंबई. मुद्रक – देव्हारे प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. रु. ०१२. अंकात २४ पृष्ठे. ७·१ × ४.१. प्रथमांक – अक्टोबर १८८९. ( पुस्तक - अंक )

**उद्देश** – स्त्री विषयक संकीर्ण लेखांचा संग्रह. **स्वरूप** – शास्त्रोक्त स्त्रीधर्म, व्यवहारशिक्षण, बालसंरक्षण, स्त्री-वैद्यक इ. विषयांचे विवेचन. विषयानुरूप भाषा. मुलामुलींकरिता सोपे लेख.

[ मुंमम, मग्र ]

**वर्ष १** – अंक १ ते १२. अक्टोबर १८८९ ते सप्टेंबर १८९०.

## सारथी

**मासिक** : प्रकाशक – मुंबई. मुद्रक – गौरी-प्रसाद छापखाना, मुंबई. वा. व. आगाऊ रु. २८८. पु. अं. ०४. अंकात ३२ पृष्ठे. ८·३ × ५·२. प्रथमांक – चैत्र शुद्ध १ शके १८०८.

**विशेष माहिती** – सहीकर ( पत्रव्यवहाराचा

"चा) रघुनाथ गणेश जोगळेकर. जाहिरात – " इतकेच सागतो की आकार निबंधमालेचा–पृष्ठे ३२. विषय काय येणार हे या पुस्तकाच्या दिल्या अंशावरून समजेल."

[ मंडलिकसंग्रह ]

वर्ष १ – अंक १ चैत्र १८०८ —.

## सारथी

पाक्षिक : प्रकाशक – केशव सीताराम ठाकरे, मुंबई. वा. व. रु. १८६. पृ. अं. ८२. अंकात ६ पृष्ठे. ७'१ × ५'१ प्रथमांक – १६ अक्टोबर १९०७.

स्वरूप – सचित्र. सामाजिक, धार्मिक आणि ऐतिहासिक विषयावर चर्चा.

विशेष माहिती – आकार – अंक ४ - ७ × ५'२. सचित्र मासिक – अंक (४ - ६) वर 'सचित्र मासिक' असा निर्देश आढळतो. अंकावर जानेवारी १९०८ असा निर्देश आहे. पाक्षिकाच्या गणनेनेही हा मेळ बसतो.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ अंक १ - दि.१६ अक्टो १९०७, २ - १ नव्हें, ३ - १६ न १९०७, (४ - ५ - ६) डिसेंबर - जाने १९०८.

## सारस्वत

मासिक : प्रकाशक – मधुसूदन गोपाळ भांडारी, मुंबई. वा. व. रु. १. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ८ × ५'२. प्रथमांक – जानेवारी १९०९.

उद्देश – सारस्वत समितीकरिता. स्वजातीची उन्नती करणे.

ब्रीदवाक्य –

स्वर्गा अधर्म । आचरिजे स्वधर्म ।
स्वरूपाचे वर्म । जाणोनिया ॥

[ मुंमग्रं ]

वर्ष १ अंक १, जानेवारी १९०९ ते ४ एप्रिल १९०९ —.

## (श्री)सारस्वत

त्रैमासिक / द्वैमासिक (?) : संपादक – वासुदेव वामन ठाकूर. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. २. अंकात ७२ पृष्ठे. ८'९ × ६'२. प्रथमांक – मार्च १९१२. (खल्प अंकप्रमाणे)

उद्देश – गौडसारस्वत ब्राह्मण ज्ञाती-विषयक. स्वरूप – सचित्र, पर्णचित्रे.

विशेष माहिती – 'लोकमित्र' वर्ष २३ अंक २ आगस्ट १९१३ पृ. ८७, पुस्तकपरीक्षणात याचा 'श्री सारस्वत त्रैमासिक' असा उल्लेख केलेला आहे.

[ साराथ मडगाव, मुंबई ]

त्रैमासिक

वर्ष १ – अंक १ मार्च १९१२, २ जु, ३ ऑ, ४ जानेवारी १९१३.

द्वैमासिक (?)

वर्ष २ – अंक ५ एप्रिल १९१३, ६ जून १९१३.

## सारिका

मासिक : संपादक – सीताराम विठ्ठल तिरवडेकर. प्रकाशक – (एस्. तिरवडेकर मंडळी, कुडाळ), मुंबई. वा. व.रु. १. फु. अं. ८१८६. अंकात १६ पृष्ठे. ८'३ × ५'५. प्रथमांक – एप्रिल १९०९.

उद्देश – स्त्रियांकरता मासिक. स्वरूप – सचित्र. स्त्रीशिक्षण, व्यायाम, वैद्यशास्त्र, थोर स्त्रीपुरुषांची चरित्रे, प्रवास, स्थलवर्णने, धर्मशास्त्र, सामाजिक, व्यावहारिक, नीतीपर मनोरंजक लेख इ. विविध विषय.

श्रीदवाक्य –

सत्कर्मयोगे वय घालवावे ।
सर्वोमुखी मंगल बोलवावे ॥
यशो विभवि पातला नच वसत राष्ट्राग्रनी ।
म्हणोनि विटपी वसे पिक निमग्न मूकध्वनी ।
परेश घन ना वळे, शिखि करी न केकाध्वनी ।
रमोत समयी अशा रसिक सारिका गायनी ॥

विशेष माहिती – यात 'समुद्रकन्या' ही गोष्ट आली आहे.

[ पुमम, मग्रं ]

वर्ष १ – अंक १ एप्रिल १९०९, २, (३-४), (५-६), ७, (८-९) नवंबर-डिसेंबर १९०९ —.

## सार्थ श्रीचरक संहिता

[ पाहा (सार्थश्री) चरकसंहिता ]

## सार्वजनिक

मासिक – प्रकाशक – गावदेवी, मुंबई. मुद्रक – (वर्ष २) इंडियन प्रिं. प्रेस, मुंबई. धा. व. इ. ८×१२. फु. अं. ८१. अंदाज १२ पृष्ठे. ८·८×६·२. प्रथमांक – जानेवारी १८८९. (पुस्तक - अंक).

उद्देश – ऐक्यबोध, अमली पदार्थ न सेवण्याबद्दल बोध, पातिव्रत्यबोध, व्यभिचारनिषेध, गृहशिक्षण, आर्यधर्माची माहिती, प्रजादुःख सरकारपुढे मांडणे, जनवार्ता. स्वरूप – उपदेशपर निबंध, चरित्रे, ऐतिहासिक माहिती, चमत्कारिक चुटके व इतर सामाजिक विषय. सार्वजनिक मंडळीच्या पसंतीने. मनोरंजक कथावली. (वर्ष २) प्रमुख लेखाचे मथळे इंग्रजीत व मराठीत.

श्रीदवाक्य

(१) ओ३म् । सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सहवीर्य करवावहै । तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै । ओ३म् । शान्तिः शान्तिः शा

(२) यतो धर्मस्ततो जयः । धर्मं चर । धर्म नास्ति । न मातुः परदैवतम् । अहिंसा परमे गाई इत्यादी प्राण्यांची दया करा । एकीने सीक फॉर दि टू आर्यवेदिक रिलिजन. अ एव्हरी इंटॉक्सिकेटिंग् ड्रग्. (मलपृष्ठावर इत

(३) आरंभपृष्ठावर –
प्रीति स्वधर्मि ठेवुनि देशोन्नतिकार्यदक्षता वि
अनलस सतत ऐक्ये मिळना ठयन करुनि धरी

विशेष माहिती – इंग्रजी नाव – युनिव्हर्सल मॅगॅझीन'. उत्पादक – गणपत वि देसाई (देसाई आणि कंपनी, सार्वजनिक ऑ मुंबई, फायर इन्शुअरन्स एजंट व लाइफ इ अरन्स एजंट). श्रीदवाक्य – वर्ष १ क्रमांक वर्ष २ क्रमांक २ व ३. वर्ष २ – पृ. अं. ८×८ खुलासा –" मुख्य उत्पादक देसाई यांच्या तीस आराम नसल्यामुळे दीड वर्षपर्यंत मौन अ 'विभाती' घेणे भाग पडले. नंतर दुसऱ्या वर्ष (प्रथमनिर्देश) अंक ४ काढण्याऐवजी दु वर्षाचा (द्वितीयनिर्देश) वर्षारंभच नवंबर १८ मध्ये धरून नवी अंकमालिका काढली.

[ वंमुं

वर्ष १ – १ जानेवारी १८८९ ते १० अ बर १८८९...

वर्ष २ – अंक १ जानेवारी १८९०, २, (!) प्रदीर्घ कालखंडानंतर पुढे त्याच वर्षी नवा वर्षारंभ—

वर्ष २ – अंक + १ नवंबर १८९१, २ डि,३ ४ फे, ५ मा १८९२, ६ ए ते १२ अ बर १८९२.

वर्ष ३ – अंक १ नवंबर १८९२ ते १२ अ बर १८९३.

## सार्व-धर्म

मासिक : संपादकमंडळ – वा. दे. धु के. पी. भागवतकर. प्रकाशक – गो. सो. मु

(मुद्रक), नागपूर व कारंजा. मुद्रक – श्री नेंद्र छा., कारंजा. वा. व. रु. १८१२. फु. . ८२. अंकात १२ ते १६ पृष्ठे. ८'३ × '७. प्रथमांक – (श्रावण वीरसंवत २४६१ आगस्ट १९३४).

उद्देश – सद्धर्माच्या निश्चल्यापी तत्त्वाचा वार करून मानवी जगात विश्वबंधुत्वाचा प्रचार रणे. स्वरूप – निबंध, कथा, कविता, संदेश, ।मिनदन, पोच-अभिप्राय, समाचार इ. संकीर्ण.

ध्रीदवाक्य

आरंभपृष्ठ ) –

उपदेशसारश्रान्तानो सार्वरूपस्तु यः कृती ।
धर्मानुकुलयास्तैदं "सार्वधर्मः" प्रकाश्यते ॥ १ ॥
– सें० गुरुपीठाधीशः

(मलपृष्ठ ४ ) –

संधारज्ञादलेर्ष कुशल हितरूप 'सार्वधर्म' पुरा ।
प्रकटत विलसे भूवरि सद्धर्मा सानुरोधग्राम्रगिरा ॥१॥

विशेष माहिती – माहिती वर्ष ३ अंक ४ ची. दीपसंचमी = कार्तिक शु. ५. २४६३ हा आकडा वीरसंवत किंवा वीरनिर्वाण शकाचा. इंग्रजी तारीख वर दिली आहे. नावापूर्वीची विशेषणे -- 'श्री से. (सैतवाल) जैनसमाज हित-वर्धक मण्डळाचे मासिक मुखपत्र.' चालकाग्रणी – श्री. बळवंतराव वि. गिह्ळकर, नागपूर. आर्थिक अडचणीमुळे बंद करावे लागले.

[ वादेधुमाळे कारजा ]

वर्ष ३ – अंक... ४ दीपसंचमी २४६३ (दि. १९ नवंबर १९३६) दिवाळीचा खास महिलांक.

## ( श्री )सांवतामाळी

त्रैमासिक : संपादक – जगन्नाथ विठ्ठल गीते. प्रकाशक – धोंडीबा पाडूजी क्षत्तर, मुंबई. वा. व. रु. १. अंकात ४० पृष्ठे. ७'२ × ४'९. प्रथमांक – कार्तिक शु. १ श. १८४०.

उद्देश – माळी शिक्षण परिषदेच्या विद्यमाने प्रसिद्ध होणारे.

ध्रीदवाक्य –

नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ॥
घडो ज्ञपवाची करीं अल्पसेवा ।
तपालागि देई सदा सौख्यठेवा ।
असे मागणे हेचि आजी तुम्हाला ।
नमस्कार श्रीसांवता माळियाला ॥

विशेष माहिती – वर्ष १ अंक २ वर माघ संवत १९७३ छापले आहे ते इतर माहितीशी जमत नाही. संवत १९७५ पाहिजे. वर्ष २ चा वर्षारंभ चैत्र श. १८४१ पासून धरलेला दिसतो.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ कार्तिक १८४०, २ माघ १८४० (माघ संवत १९७३ !).
वर्ष २ – अंक ... ३ अश्विन १८४१—.

## साहित्य

द्वैमासिक : संपादक – वा. रा. ढवळे. प्रकाशक – र. दि. देसाई, नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई. वा. व. रु. ५. फु. अं. ८१२. अंकात सुमारे ७६ पृष्ठे. ९'८ × ६'६. प्रथमांक (पुष्प) – जानेवारी १९४७/द्वैमासिक – आगस्ट १९४७. पुढे चालू.

उद्देश – मुंबई मराठी साहित्य संघाच्या (स्थापना २१ - ७ - १९३५) विद्यमाने. "वाङ्मयीन व्यासपीठावरून झालेली भाषणे संपूर्ण प्रसिद्ध करणे व इतर भारतीय भाषातील कलापूर्ण ललित साहित्य मराठीत आणणे." स्वरूप – शब्दचित्र, पर्णचित्रे, कविता, लेख, वाङ्मयचर्चा, वाङ्मयीन भाषणे इ.

विशेष माहिती – मुंबई मराठी साहित्य संघाचे या पूर्वीचे प्रकाशन 'वीणा' मासिक (पाहा 'वीणा') एप्रिल १९३७ ते एप्रिल १९३८. 'साहित्य' पुष्पे या स्वरूपात दोन स्वतंत्र पुष्पे व नतर द्वैमासिक. प्रकाशक –

द्वैमासिक वर्ष १ अ. ना. भालेराव, मुं. म. सा. संघ.

[ मसाप, मुंमग्रं ]

## साहित्य पुष्पे

वर्ष १ – अंक १ जानेवारी १९४७, पृ. १८९, रु. २-८-०; २ एप्रिल १९४७ 'नाट्य-महोत्सव साहित्य प्रकाशन' नाट्यविषयक विविधलेखसंग्रह, पृ. १४४, रु. २.

मासिक

वर्ष १ – अंक १ आगस्ट १९४७, २ अ, ३ डि, ४ फे १९४८, ५ ए, ६ जून १९४८. आगस्ट १९४७ ते जून १९४८. अंक ३ दिवाळी अंक.

वर्ष २ – अंक १ आगस्ट १९४८, २ अ, ३ डि,... ५ मे १९४९, ६ जुलै १९४९. आगस्ट १९४८ ते जुलै १९४९. अंक २ दिवाळी अंक, अंक ३ नाट्यमहोत्सव अंक.

वर्ष ३ – अंक १ अक्टोबर १९४९, ..., ३ फे १९५०, ४ मे, ५ जु - आ, ६ नवंबर १९५०. अक्टोबर १९४९ ते नवंबर १९५० अंक १ दिवाळी अंक, अंक ४ महाराष्ट्र साहित्य संमेलन विशेषांक, अंक ६ दिवाळी अंक.

## साहित्यसंग्रह

मासिक : प्रकाशक – दामोदर सावळाराम आणि मंडळी, मुंबई, यांच्याकरता जगनाथ लक्ष्मण जोशी. मुद्रक – इंदुप्रकाश इलेक्ट्रिक प्रि.प्रेस, मुंबई. वा. व. रु. २. पु. अं. ८३. अंकात ७२ पृष्ठे. ९·६ × ७·४. प्रथमांक – जानेवारी १९३८.

उद्देश – रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूजच्या धर्तीवर – संपादक, मुद्रक, प्रकाशक, वाचनालये, साहित्यिक, संशोधक व अभ्यासू इत्यादिकांना आवश्यक ज्ञानासाठी साह्य करणे. स्वरूप – विविध विषयांवरील लेख, ठिकठिकाणच्या संशोधनाची मोगवारा, नियतकालिकांची संकलित माहिती, पुस्तकाचा परामर्श, दुर्मिळ ग्रंथांचे पुनर्मुद्रण. 'माझी छाति मल्ली', 'साहित्य सत्कार', 'जगाचा वृत्त' इ. सदरे. अर्वाचीन मराठी कवितांचे नवनीत.

*विशेष माहिती* – ग्रंथसंपादक व प्रकाशक मंडळींच्या नियमाने प्रसिद्ध होत यात गोविंद बळवंत मार्कंडेलिखित 'मराठी साहित्यिकांची नामसूचि' पृ. २४१–२५५. 'कर्मयोगी गीता' (रंगनाथस्वामीकृत विस्तृत टीका) क्रमशः

[ मुंमग्रं, मग्रं, जग्रं

वर्ष १ – अंक १, (२ - ३), ४ ते ८ (९ - १२). जानेवारी ते डिसेंबर १९३८ पृ.६९२ + ४८. अंक ४ एप्रिल वार्षिक महाराष्ट्र साहित्य संमेलन मुंबई खास अंक.

## साहित्य सहकार

मासिक : प्रकाशक – नारायण माल्वेर्ड सर्वेदे, साहित्य सहकार संघ लि. करिता, मुंबई. मुद्रक – फेमस प्रिंटर्स, मुंबई. वा. व. रु. १८८. पु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ७·८ × ६·२. प्रथमांक – १५ जुलै १९५०. पुढे चालू १९६७.

उद्देश – साहित्य सहकार संघ लिमिटेड (स्थापना १ ऑक्टोबर १९४९) व महाराष्ट्र ग्रंथालय संघ (स्थापना ११ सप्टेंबर १९४९) यांच्या नियमाने. स्वरूप – लेखकांचा परिचय, नवे साहित्य, मागील महिन्यात प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांची वर्णनात्मक यादी, महाराष्ट्र ग्रंथालयसंघवार्ता, ग्रंथालयविषयक लेख, साहित्यवार्ता. महाराष्ट्रीय ग्रंथालय चळवळीचा पुरस्कार.

विशेष माहिती – वर्ष १ अंक १ पासून प्रकाशनाची तारीख प्रतिमास पंधरावी होती ती अंक (६ - ७) डि - जानेवारी पासून पहिली करण्यात आली.

[ ठेवों, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ जुलै १९५० ते ५, (६ - ७) डिसेंबर जानेवारी १९५१.

## सिद्धपदार्थशास्त्र

त्रैमासिक : संपादक — नारायण व्यंकाजी शेत. प्रकाशक — मुंबई. वा. व. रु. ५, मागाहून रु. ६॥८. अंकात सु. १५० पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक — एप्रिल १८७८.

उद्देश — शास्त्रीय विषयावरील ग्रंथ स्वभाषेत असावे, अभ्यासाने पुष्कळ लोकांस त्याची माहिती व्हावी. स्वरूप — सचित्र, स्पष्टीकरणार्थ आकृतीसह. पुस्तकात येणाऱ्या विषयाचा अनुक्रम — प्रकरणे — १ पदार्थविज्ञानशास्त्र, २ ज्योतिषशास्त्र, ३ भूगर्भशास्त्र, ४ प्राणिधर्मशास्त्र आणि ५. वनस्पतिविद्या.

विशेष माहिती — संपादक — नारायण व्यंकाजी शेत, गणिताचे व संस्कृताचे असिस्टंट प्रोफेसर, फ्री जनरल असेंब्लीज इन्स्टिट्यूशन, मुंबई. पुस्तके मागविण्याचा पत्ता — विविधज्ञानविस्तार ऑफिस किंवा ग्रंथकर्ता.

[ मुंमसं ]

वर्ष १ — अंक १ एप्रिल १८७८. शास्त्रमालेतील प्रथम प्रकरण 'पदार्थविज्ञानशास्त्र' यातील प्रथम विषय ' पदार्थांची घटना ', त्यावरील पुस्तक.

## सिद्धान्त—हृदय

मासिक : संपादक — एल्. बी. ठाकूर. प्रकाशक — संपादक, पुणे. मुद्रक — आनंद छा. पुणे. वा. व. रु. २॥८. फु. अं. ॥४. अंकात ३२ पृष्ठे. ८·४ × ५·४. प्रथमांक — जानेवारी १९२८.

उद्देश — संसार सुखमय कसा होईल, स्वधर्म म्हणजे काय व अधर्म म्हणजे काय, त्याची फोड करणे. स्वरूप — स्वधर्म, ज्ञानविज्ञान, मस्ती, भौतिकशास्त्रविषय, शिल्पकला इ. विषयावरील व आरोग्यविषयक वगैरे लेख, कविता, गोष्टी, मराठी क्वचित हिंदी भाषेतील लेख ( लेखकास सूचना ).

ध्येयवाक्य —

सत् वरा सुज्ञ हो। करा सुखाचा सेवा।
ईश्वरी धर्म हा। निश्चय मनि ठेवा॥

[ दवापो, मुमग्रं, रानिडेरे ]

वर्ष १ — अंक १ जानेवारी १९२८, २,..., ४, ५, ६ जून १९२८ —.

## सिद्धार्थ

पाक्षिक : संपादक — वि. मा. दैरकर. प्रकाशक — संपादक, नागपूर. वा. व. रु. ७. ९·६ × ७·१. प्रथमांक — (सप्टेंबर १९४७ ).

उद्देश — 'शेड्यूल्ड् कास्ट्स् फेडरेशन'च्या ध्येयाचा व पुरोगामी वाङ्मयाचा पुरस्कार करणारे निर्भीड पाक्षिक.

[ यावास मटणाव ]

वर्ष १ — अंक...९ जानेवारी १९४८ विशेषांक.

## सिन्धु दीप

मासिक : संपादक — पा. तु. कादळगावकर. प्रकाशक — माधव गोविंद बोले, मुंबई. वा. व. रु. १॥१२. फु. अं. ॥२. अंकात ९·६ × ६·६. प्रथमांक — ( सप्टेंबर १९३६ ).

स्वरूप — विनोदी शिक्षणाने महाराष्ट्राचे मनरंजन करणारे [ ज्ञानमंदिर वर्ष २ अंक २४ डिसेंबर १९३६, पृ. ८३ ]

वर्ष १ — अंक..., ( ३ - ४ ) नोव्हेंबर-डिसेंबर १९३६ —.

## सीमंतिनी

मासिक : संपादक — ( कर्त्री ) सौ. कृष्णाबाई माळवदकर. प्रकाशक — संपादक, पुणे. मुद्रक — संजीविनी छापखाना, पुणे. वा. व. रु. २॥४. फु. अं. ॥४. अंकात २४ पृष्ठे. ८ × ५·१. प्रथमांक — श्रावण शु. १८१७.

उद्देश — कुलीन स्त्रिया व मुलामुलींकरिता. कुटुंबात लागणाऱ्या गोष्टींचे ज्ञान देऊन अधिक

वाचण्याची गोडी लावणे. स्वरूप – सचित्र, गोष्टी, चरित्रे, कहाण्या, उखाणे, गाणी, शिवणकाम, स्वयंपाक, रांगोळी, बाळमेवा, अनाथ विधवांसाठी घरबसल्या धंदे.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ श्रावण १८१७, २ मा,..., ४ कार्तिक १८१७.

## सुधाकर

**मासिक** : संपादक – दामोदर कृष्ण केतकर. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. ०१२. अंकात १६ पृष्ठे. ६.६ × ४.७. प्रथमांक – कार्तिक शु. ७ श.१८३६. पुढे चालू ( १९१८ ? ) ( वर्ष – पुष्प ).

**उद्देश** – कै. पितामह काशीनाथ सखाराम केतकर यांच्या स्मरणार्थ. धार्मिक आणि नैतिकदृष्ट्या अनुकरणीय, प्रागतिक सुविचारास परिपोषक आणि सामाजिकदृष्ट्या मननीय साहित्य प्रकाशणे. स्वरूप – कविता, गोष्टी, लेख इ.

**ब्रीदवाक्य** –

( १ )
नक्षत्राणि बहूनि सन्ति परितः पूर्णोदयान्यम्बरे ।
किं तैः शान्तिमुपैति दीर्घतिमिरं किं वार्धिरुज्जृंमते ।
किं स्यादार्तचकोरपारणविधिर्भ्रान्तः सुधादीधिते ।
तन्नून भुवनैकतापशमनः श्लाघ्यस्तवैवोदयः ॥
( २ )
' सुधाकर ' सुधारणा करिल वाङ्मयामाजी ।

**विशेष माहिती** – अंकात प्रत्येक पृष्ठाच्या शीर्षभागी ' सुधाकर नूतन पुस्तकमाला ' असा नियतकालिकाचा नामोल्लेख आढळतो. पुढे १ सप्टेंबर १९१८ तारखेच्या ' दादा काँग्रेस खास अंका'ची नोंद आढळते. पुढे चालू होते ?

[ मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ कार्तिक १८३६, ते ५ फा १८३६, (६ - ७) चैत्र - वैशाख १८३७—.

## सुबोध

**मासिक** ; संपादक – सावळाराम घनश्याम कंटक. प्रकाशक – चारुदत्त रामचंद्र देसाई, बेळगाव, मुरगाव हार्बर ( गोवा ). मुद्रक – तरुण-भारत छा. बेळगाव. वा. व. रु. ३. फु. अं.०४. अंकात ४८ पृष्ठे. ८.५ × ५.४. प्रथमांक – ( माला १९२८ ), मासिक नवंबर १९३१.

**स्वरूप** – संकीर्ण विषय.

**विशेष माहिती** – ' सुबोध ' मासिकाचे पूर्वस्वरूप ' सुबोध वाङ्मय प्रसारक माला ' ही कुचकडे येथे निघाली. या पुस्तकमालेतून *' आर्य स्त्री '* कादंबरी, एक कथा संग्रह व इतर दोन पुस्तके १९२८ ते १९३० पर्यंत प्रसिद्ध झाली. पुढे मालेचे मासिकात रूपांतर [ *'गोमंतकीय नियतकालिके'*, १९६५, पृ. ५९ ]. वर्ष २ अंक ९ व ( १० - ११ ) यामध्ये *'गोमंतकातील* ( मराठी ) नियतकालिके अल्पजीवी का ? ' ही लेखमाला.

[ गोहिंभ मुंबई, मडगाव, आकुडे.

[वर्ष १ – अंक ' सुबोधवाङ्मयप्रसारक माला '.

मासिक

वर्ष २ – अंक १ ते ६, (७ - ८), ९, ( १० - ११ ), १२. नवंबर १९३१ ते अक्टोबर १९३२.

वर्ष ३ – अंक + १ ते ४, (५ - ६), ७ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९३३. ( शेवटच्या अंकाचे प्रकाशन, १८ जून १९३४ ). अंक १२ कोरडहट्टकर विशेषांक.

## सुबोध इंदु

**मासिक** : अंकात १६ पृष्ठे. ९.२ × ६.४. प्रथमांक – मार्च १९०३.

**उद्देश** – मनोरंजन. स्वरूप – नाटक, कथा, कादंबरी इ. 'गणपत विजय नाटक' उर्फ विजयानंद सरस्वती नाटक, 'प्रेमसुंदरी ' कादंबरी.

[ आकडे ]

वर्ष १ – अंक १ मार्च १९०३.

## सुबोधमाला

**मासिक** : संपादक – काशीराव बापूजी देशमुख. प्रकाशक – संपादक, अमरावती, वर्धा. मुद्रक – विद्यासागर छा. अमरावती. वा. व. रु. १८८. फु. अं. ८३. ७·२×४.८. प्रथमांक – जानेवारी १९१६. ( वर्ष ६ – सर- पुष्प, सलग अंकक्रमांक ६१ पासून ७२ पर्यंत ).

**उद्देश** – बहुजनसमाज सज्ञान व शहाणा बनविण्यासाठी. वर्ष २ वर – मराठा शिक्षण परिषदेच्या विद्यमाने प्रसिद्ध होणारे.

**ब्रीदवाक्य** –

सत्य सकळांचा दाता भगवान ।
सर्व करी पूर्ण मनोरथ ॥
तुका म्हणे येथें पाहिजे जातीचे ।
येरा गबाळ्याचे काम नाही ॥

( वर्ष ५ )

नोच्चार्यो विफ्लोऽपि दूपणपदं दूष्यस्तु कामो लघु. ।

**विशेष माहिती** – *शिवशक* – वर्ष ६ व ७ यावर राज्याभिषेकशकाचा निर्देश. *संपादक* – वर्ष ५ बळवंत भास्कर देशमुख; वर्ष ६ नीलकंठ सदाशिव देशमुख ( प्रकाशक ), वर्धा. *प्रकाशक* – वर्ष ५ के. बी. देशमुख. *वार्षिक वर्गणी* – वर्ष ५ रु. २, वर्ष ७ रु ३. आकार – वर्ष ५ अंक ३–८·४ ×५·४. मुद्रक – वर्ष ६ अनंत वैभव छा. वर्धा.

[ आकडे ]

वर्ष १ – अंक १, २, ( ३ - ४ ), ( ५ - ६ ), ( ७ - ८ ), ( ९ - १० ), ११, १२. जानेवारी ते डिसेंबर १९१६.

वर्ष २ – अंक १, ( २ - ३ ), ४, ( ५ - ६ ), ७ ते ९, ( १० - ११ ), १२. जानेवारी ते डिसेंबर १९१७.

वर्ष ३ – अंक १ जानेवारी १९१८, ( २ - ३ ), ४ ते ११ नवंबर १९१८ .....

वर्ष ४ – अंक १, २, ( ३ - ४ ), ५ ते १०, ( ११ - १२ ). जानेवारी ते डिसेंबर १९१९.

वर्ष ५ – अंक १ जानेवारी १९२० ते ४, ( ५ - ६ ), ७ व ते ९ सप्टेंबर १९२०...

वर्ष ६ – अंक + ६१ ते ६८, ( ६९ – ७० ), ( ७१ - ७२ ). अक्टोबर १९२१ ते सप्टेंबर १९२२.

वर्ष ७ – अंक + १ मार्च १९२३, २ ए(?), + ३ मे १९२५ ते १२ फेब्रुवारी मार्च (?) १९२६.

## सुभाष्य - चंद्रिका

**मासिक** : संपादक – ( सरकारी नोंद ) पांडुरंग बळवंत देवस्. प्रकाशक – संपादक, सातारा. मुद्रक – सत्यमित्र छा. सातारा. वा. व. रु. ८१३. मागाहून रु. १८१०. फु. अं. ८२, ६·७ × ४·५. प्रथमांक – जानेवारी १८८७.

**स्वरूप** – उपयुक्त व मनोरंजक. चुटके, सुभाष्ये, कविता, नाटक, आख्यायिका, लोकवृत्त.

**ब्रीदवाक्य** –

महा वज्र गमे नरा नृप गमे काम स्वयं स्त्रीजना ।
गोळ्या आत नृपा खळा प्रभु शिशू मातापित्याच्या मना ।

कथा मृत्यु अशक्त पामरजना सतासि तत्त्वामृत ।
श्रीगोपाळन यादवा हरि दिसे रंगात रामान्वित ॥

**विशेष माहिती** – “ अक्टोबर १८८७ पासून ‘ सुभाष्यचंद्रिका ’ ‘ महाराष्ट्र कोकिल ’ ( सातारा ) या मासिकामध्ये सामील केली. ” पाहा ‘ महाराष्ट्र कोकिल ’ सातारा १८८७.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ जानेवारी १८८७ ते ( ९ सप्टेंबर ? )

## सुमन

**मासिक** : संपादक – वासुदेव कृष्ण भावे. प्रकाशक – दामोदर पांडुरंग आगाशे, अम्बिाग. मुद्रक – सद्बोधप्रकाश छापखाना, अम्बिाग. शा. व. स. १८१२. फु. अ. ८३. अंकात ३२ पृष्ठे. ७·२ X ४·९. प्रथमांक – जानेवारी १९२३. (क्वचित सलग अंकक्रमांक)

**उद्देश** – मुलामुलींकरिता सचित्र मासिक. स्वरूप – सचित्र.

**ब्रीदवाक्य** –

जैसे जयासि पाहिजे ।
तैसे तयासि देइजे ॥ – श्रीसमर्थ

**विशेष माहिती** – वर्ष ३ – संपादक उच्चतम ध्येयाच्या पूर्ततेसाठी दुसरीकडे (अमळनेर) गेले. वर्ष ३ अंक ७ ते १२ यावर ३१ ते ३६ असे सलग अंकक्रमांक. वर्ष ४ व ५ याचे संपादक रा. म. चिटणीस. " श्री. भावे यांनी अमळनेरास ' बाल वसंत ' नावाचे मासिक सुमारे तीन वर्षे चालविले व पुढे श्री. नरहर अनंत देशपांडे व नंतर छापखान्याचे मालक श्री. खरवंडीकर हे त्याचे संपादक झाले." – 'मराठी पत्रकार परिषद जळगाव स्मृति-पुष्प,' पृ. ८९ (पाहा – 'बाल–वसंत' मासिक, ह्या सूचीचा वर्णन विभाग, पृ. १७८).

[ मुमग्रं ]

वर्ष १ ते ४ अंक प्रत्येकी १ ते १२. वर्ष २ व ३ बरेच जोड अंक. जानेवारी १९२३ ते डिसेंबर १९२६. (चार वर्षे). वर्ष ४ अंक ४ ए १९२६ वसंत–अंक.
वर्ष ५ – अंक १ जानेवारी १९२७, २, (३ - ६) मार्च - जून १९२७—.

समन

वर्ष २ – ७·२ X ४·८. प्रथमांक – जुलै १९४९.

**उद्देश** – मुलामुलींकरिता. स्वरूप – सचित्र.

[ राजारामदास नागपूर ]

वर्ष १ – अंक १ ते १०, (११ - १२). जुलै १९४९ ते जून १९५०. अंक ४ अ दिवाळी अंक.
वर्ष २ – अंक १ जुलै १९५०, २ आगस्ट—.

## सुमार्गदर्शक

**मासिक** : प्रकाशक – परशुराम भिकाजी माटये, रत्नागिरी. मुद्रक – जगन्मित्र (शिळा छा.) रत्नागिरी. शा. व. स. २८८. फु. अ. ८५,८६. अंकात १६ पृष्ठे. ८·३ X ६·६. प्रथमांक – सप्टेंबर १८६८.

**उद्देश** – सर्वांस वाचण्याकरिता मनोरंजक व आल्हादकारक. स्वरूप – निबंध, भाषा, प्रश्न, कोड्या, गोष्टी इ. विविध विषय.
वर्ष १ – अंक १ सप्टेंबर १८६८.

## सुमित्र

**मासिक** : प्रकाशक – रामचंद्र गोपाळ चिटणीस, स्टू. लि. आणि सा. सोसायटी. मुंबई. मुद्रक – गणपत कृष्णाजी, मुंबई. फु. अ. ८१. अंकात २० सलग पृष्ठे. ६·६ X ४, प्रथमांक – आगस्ट १८५५. (पुस्तक - अंक)

**उद्देश** – स्टूडन्ट्स लिटररी ॲण्ड सायंटिफिक सोसायटीच्या शाळातर्फे 'मराठी मुलींचे मासिक.' स्वरूप – स्त्रियांच्या अंत करणास उपदेश होऊन त्यांची वर्तणूक सुधारेल अशा प्रकारचे निरंतर विषय लिहिले जातील. —

स्टुडंट्स् लिटररी ॲण्ड सायंटिफिक सोसायटीचा १८५७ – ५८ चा अहवाल. [ अवतरण : वा. ल. कुलकर्णी – 'मराठी ज्ञानप्रसारक', पृ. २७ टीप ]

[ मॅग्लिफ्फर्ड ]

वर्ष १ – अंक १ ते १२. आगस्ट १८५५ ते जुलै १८५६.

वर्ष २ – अंक १ आगस्ट १८५६ ते १० मे १८५७—.

## सुवर्ण

**मासिक** : संपादक – नारायण रामचंद्र मोरे. प्रकाशक – संपादक, मुंबई. वा. व. रु. १८८. फु. अं. ८२. अंकात ६४, ८० पृष्ठे. ८·३ × ६·१. प्रथमांक – जून १९३४.

**उद्देश** – विविध कलावर विशेष भर देऊन मनोरंजनाबरोबर लोकशिक्षण देणे. **स्वरूप** – सचित्र. तीन चार आर्ट पेपरवरील चित्रे. सर्वांगी वाङ्मय.

**विशेष माहिती** – मध्यंतरी सुमारे एक वर्ष गाळल्यामुळे तिसऱ्या वर्षाचा आरंभ जून १९३७ त केलेला दिसतो. *पा. वर्णनी* – वर्ष ३ अंक ४ रु. १, फु. अं. ८१८३.

[ मग्रं ]

वर्ष १ – अंक १ जून १९३४ ते ८ जानेवारी १९३५.... अंक ५ दिवाळी अंक.

वर्ष २ – अंक ... ( ४ - ५ ) स · अ ३५, ६ न ते १० मा १९३६, अंक ११ एप्रिल १९३६.... अंक ( ४ - ५ ) दिवाळी अंक. [मध्यंतरी नोव्हेंबर १९३६ दिवाळी अंक फक्त ?]

वर्ष ३ – अंक + १ जून १९३७, + २ न ३७, + ३ मा १९३८, ४ ए (?), + ५ जु, ६ आ, ७ स, ८ अ. अंक ८ दिवाळी अंक.

## सुवर्णकार जगत्

**मासिक** : संपादक – के. जे. पाटरे. प्रकाशक – नागपूर. अंकात ८९ पृष्ठे. ९·७ × ७·४. प्रथमांक – नोव्हेंबर १९४८.

**स्वरूप** – सचित्र.

वर्ष १ – अंक १ नोव्हेंबर १९४८ दिवाळी अंक कि. ८१४.

## सुवर्णमाला

**मासिक / द्वैमासिक** : संपादक – एकनाथ गणेश माडारे. प्रकाशक – तुकाराम गणपत आणि कंपनी, मुंबई. मुद्रक – तत्त्वविवेचक छापखाना, मुंबई. वा. व. रु. १ आगाऊ. ट. ख. ८३. फु. अं. ८६. अंकात ४८ ( वर्ष २ ) पृष्ठे. ८·२ × ५·३. प्रथमांक – ( कार्तिक श. १८२२ ). शेवटचा अंक अश्विन १८२५. ( पुस्तक–अंक ).

**स्वरूप** – सामाजिक, प्रासादिक, नैतिक व ऐतिहासिक विषयावर उपयुक्त लेख. स्त्रियांकरिता बोधपर गोष्टी, रूपके, कविता इ.

**ब्रीदवाक्य** –

जगद्गुरुजनशीला कविकृतलीला सरस्वती जयतु
सरसा सालंकारा सुपदन्यासा सुवर्णमयमूर्तिः ॥

– काव्यचंद्रिका

**विशेष माहिती** – "सुवर्णमाला हे तारमास्तराच्या सुप्रसिद्ध संपाचे अशत: स्मारक आहे." (संदर्भ – 'सुवर्णमाला' पुस्तक २ अंक २ मल पृष्ठ २ ). 'द्वैमासिक बद्दल' 'द्विमासिक पुस्तक' असा निर्देश. प्रकाशक – गणपतराव तुकाराम आणि कंपनी असेही नाव आढळते. वर्ष २ अंक ६ – "हा अंक जसा दुसऱ्या वर्षाच्या अखेरीचा होय तसा तो एकंदर सुवर्णमालेच्याही अखेरीचा होय," असे छापून बंद केले.

वर्ष ४ – ९ अक : २८ विक्रमोर्वशी, २९ भगवद्गीता, ३० सक्रान्ति–भगवद्गीता अ. ७ ते १२, ३१ श्रीशिवपुराण, ३२ शालि. शकाचे १२ महिने, ३३ रामायण अरण्य काड, ३४ आषाढी एकादशी भगवद्गीता अ. १३ - १८, ३५ उपाहरण, ३६ गणेशमाहात्म्य रामोपाख्यान. अश्विन १८३४ ते भाद्रपद १८३५.

मासिक

वर्ष ५ – अक ३७ विजयादशमी कादबरी (१), ३८ दीपावली सुभद्राहरण, ३९ दत्तजयती कादबरी (२), ४० संक्राती श्रीसमर्थ चरित्र, ४१ महाशिवरात्र शिवपुराण, ४२ श्रीशिवचरित्र, ४३ रामायण, ४४ प्रल्हादचरित्र, ४५ श्रीशिवचरित्र (२), ४६ श्रीशिवचरित्र (३), ४७ श्रीशिवचरित्र (४), ४८ श्रीशिवचरित्र (५). अक्टोबर १९१३ ते सप्टबर १९१४.

वर्ष ६ – अक.. ५३ फे १९१५ ऐति० पुरुष मा. २, ५४ मा रेसिस अँड् ट्राइब्स इन इडिया, ..., ( ५८ - ५९ ) आगस्ट १९१५ हिस्टॉरिकल पर्सनेजिस पार्ट श्री—.

## सुविचारमाला

**मासिक** : सपादक – पाडुरग दामोदर पैठणकर प्रकाशक – सपादक, राजुरी ( पुणे ). मुद्रक – जगद्धितेच्छु छा. पुणे. वा. व. रु. २८६. फु. अं. ८५. अकात ५०, ६० पृष्ठे. ७.२ × ४.२. प्रथमाक – जुलै १९०३. ( पुस्तक - अक )

**स्वरूप** – कादबरी, कविता, गोष्टी इ. ( नाटकाशिवाय ). धर्म इतिहासादी सकीर्ण विषय.

**ब्रीदवाक्य –**

अनेकसशयोच्छेदि परोक्षार्थस्य दर्शकम् ।
सर्वस्य लोचनं शास्त्र यस्य नास्त्यन्ध एव सः ॥

[ मुमग्र ]

वर्ष १ – अक १ जुलै १९०३, ..., ३ सप्टबर १९०३ —.

## सुविचारसमागम

**मासिक** : सपादक – ( श्री. मोती बुलासा, बी. ए. ). प्रकाशक – भाऊ गोविंद सापकर, पुणे. मुद्रक – ज्ञानचक्षु छापखाना, पुणे. वा. व. पुण्यात व लायब्रऱ्याना रु. २८८; इतराना रु. ३. फु. अं. ८५. अंकात प्रकरणवार ४० पृष्ठे. ८.५ × ५.४. प्रथमाक – मे, १८९८. (पुस्तक - अक)

**उद्देश** – मनोरजनाच्या द्वारे का होईना उच्च मनोवृत्ती सपादन करण्याकडे लोकाची मनोवृत्ती व्हावी व सोप्या भाषेच्या योगाने वाङ्मय व शास्त्रे अशा गहन विषयाकडे त्याचे मन वळवावे. *स्वरूप* – आबालवृद्ध स्त्रीपुरुषास वाचण्याजोगे मनोरजक व उपदेशपर वाङ्मय व शास्त्रीय विषयावर सोप्या भाषेत निबध, कविता, नाटके, कादबऱ्या, गोष्टी, इतिहास, चरित्रे, स्थलवर्णने, नवीन पुस्तकावर टीका इ., सचित्र चरित्रे.

**विशेष माहिती** – ' ए मंथली जर्नल फॉर लेडीज अँड जटलमेन '. *उत्पादक आणि सपादक* – प्रा. मोती बुलासा. प्रकाशन – वर्ष २ अंक ६ पासून मुखपृष्ठावर शेवटी ' तयार ता. १० जानेवारी १९००, ' अशा स्वरूपाची नोंद सुरू. वर्षारभ – वर्ष ३ अंक १ पासून जानेवारी जाहीर केला. यात प्रा. मोती बुलासा यत्चे ' मराठी भाषेची सद्य स्थिती ' व ' आमच्या नाटक मंडळ्या ' आणि के. व्ही. लक्ष्मणराव याचा ' पचवटीस्थलनिर्णय परीक्षण ' इत्यादी लेख प्रसिद्ध झाले.

[ मुमग्र, पुमम, जग्र ]

वर्ष १ – अक १ ते १२. मे १८९८ ते एप्रिल १८९९.

वर्ष २ – अक १ ते १२ मे १८९९ ते एप्रिल १९०० (प्रकाशन १२ आगस्ट १९००)

वर्ष ३ – अक + १ जानेवारी १९०१, २, ३ मा ( प्रकाशन ३१ मार्च ), ४ ए ( प्र. २० मे ), ५ मे ( प्र. २० अक्टोबर १९०१ ) —.

## सुशील

**मासिक** : संपादक – ( सरकारी नोंद ) बळवंत अनंत शेटणीस ( म्यानेजर ). प्रकाशक – वेंगुर्ले. मुद्रक – शिळामुद्रित. वा. व. रु. ८८. अंकात १६ पृष्ठे. ७·१ × ४·२. प्रथमांक – अक्टोबर १८९२. ( पुस्तक - अंक )

**स्वरूप** – *कथा, नीतिपर लेख, निबंध,* कविता, चुटके, चरित्रे, नाटके.

**ब्रीदवाक्य** –

वन्हिस्तस्य जलायते जलनिधिः कुल्यायते तत्क्षणात् ।
मेरुः स्वल्पशिलायते मृगपतेः सद्य. कुरंगायते ॥
व्यालो माल्यगुणायते विषरसः पीयूषवर्षायते ।
यस्याङ्गेऽखिललोकवल्लभतमं 'शीलं' समुन्मीलति ॥

**विशेष माहिती** – संपादकाचा पत्ता – खवाडी, मुंबई. यात *' राणीचे ग्रंथालय '* हा य लेख.

[ पणजी ]

वर्ष १ – अंक १ अक्टोबर १८९२, ते ४ जा ९३, ५, ( ६ - ९ ), १०, ११ *आगस्ट* १८९३...

वर्ष २ – अंक + १ आगस्ट १८९४, ( २ - ४ ), ५ ते १२ जुलै १८९५.

## सुषमा

**मासिक** : संपादक – कुंडलराय मोहेकर मालक ). प्रकाशक – संपादक, नागपूर. मुद्रक – ोहूण प्रि. प्रेस, नागपूर. वा. व. रु. ६. . अं. *८८, ८१०.* ८·१ × ५·५. प्रथमांक – ागस्ट १९४८. पुढे चालू १९६७. ( सहा हिन्याचा ' खंड ' व अंक, वा भाग )

**उद्देश** – पुढे जावे, अधिक पुढे जावे, ही ाकांक्षा – नव्या भारताचे अभिनव मासिक. भारतीय संस्कृती, जीवन आणि संस्कृती यांच्या ासाठी. स्वरूप – सर्वांगीण, विचारधारा, ..., गांधीवाणी, दौरा ( प्रकाशित निवडक विचार ), आदेश, तटस्थाचे तरंग, जीवन, कला, साहित्य विषयावर लेख.

**ब्रीदवाक्य** –

सत्यं शिवं सुंदरम् ।.

**विशेष माहिती** – *परामर्शसमिति* – य. खु. देशपांडे, यशवंत शास्त्री, ब.गो. गर्गे. *आकार – खंड २–९·१ × ६·१; सल्लागार मंडळ – खंड* ४–वा. ना. देशपांडे, यशवंत शास्त्री. *संचालक* – खंड ४ कुंडलराय मोहेकर. *वा. वर्गणी* – खंड ४ 'द्वयवार्षिक' रु. ११, 'त्रयवार्षिक' रु. १५.

[ मुंमग्र, नागपूर युनि. *ला.*, जग्रं ]

खंड १ – अंक १ आगस्ट १९४८, २ स, ..., ४ ( अक्टोबर ? ) नवंबर १९४८ ...

खंड २ – अंक १ ते ६. जानेवारी १९४९ ते जून १९४९. अंक २ ' बापू स्मृति '.

खंड ३ – अंक १ ते ३, ( ४ - ५ ), ६. जुलै ते डिसेंबर १९४९.

खंड ४ – अंक १ ते ६. जानेवारी ते जून १९५०.

खंड ५ – अंक + १ आगस्ट १९५० ते ३, ( ४ - ५ ) नवंबर - डिसेंबर ( १९५० )—. अंक ( ४ - ५ ) दिवाळी अंक.

## सुज्ञानामृत

*मासिक : प्रकाशक – नारायण रघुनाथ मंत्री* ( ज्ञानसागरकर्ते ), कोल्हापूर. मुद्रक – (१) बोधसुधाकर, (२)महाराष्ट्रमित्र, सातारा. वा. व. रु. २ मागाहून रु. ३. फु. अं. ८५. अंकात २० पृष्ठे. ८·५ × ६. प्रथमांक – एप्रिल १८७४.

**उद्देश** – उपयुक्त विषयाचे मासिक पुस्तक. कुलस्त्रिया व गृहस्थ यांकरिता. *स्वरूप* – रसायनशास्त्र, पाकशास्त्र, वैद्यशास्त्र, ज्योतिषशास्त्र, शेतकीसंबंधी माहिती, करवीर क्षेत्राचे वर्णन, कल्पित कथा, नाटक, निबंध, चमत्कारिक समुद्र, कविता, पुस्तकपरीक्षण इ.

ब्रीदवाक्य –

चंद्रिकाबुधि मथुनी सुज्ञानामृत काढिले बहू सुरस ।
जन हो देवासमसे सेवावाया न असे विषय विरस ॥
[ वेंगुर्ले, मुंमम ]

वर्ष १ व २ – अंक प्रत्येकी १ ते १२. एप्रिल १८७४ ते मार्च १८७६. ( दोन वर्षे )

## सूर्यकांत

**मासिक** : संपादकमंडळ – न. का. बावडेकर, श्री. शं. दिघे, ज. नी. कर्वे. प्रकाशक – शंकर त्र्यंबक आवटे, पुणे. वा. व. रु. ४. फु. अं. ८६. अंकात ७२ पृष्ठे. ९.२ × ६.३. प्रथमांक – जुलै १९३२ (?). शेवटचा अंक – वर्ष १ अंक (९ - १२) १९३४ - ३५ (?).

**स्वरूप** – सचित्र, मलपृष्ठावर तीनरंगी चित्र. कौटुंबिक मासिक. विद्वानविदुषींचे लेख, संकीर्ण वाङ्मय. १० पृष्ठे बालविभाग. कविता, लघुकथा, प्रवासवर्णने, विनोदी लेख, कोडी, ज्योतिषी ठवाटे यांचे मासिक भविष्य.

ब्रीदवाक्य –

प्रभवति शुचिर्बिम्बग्राहे मणिर्न मृदा चयः ।

**विशेष माहिती** – " प्रो. चाफेकर यांच्या देखरेखीखाली निघणारे अभिनव मासिक. " [ जाहिरात, हुदलीकरांचा बालबोध ( ३ ) वर्ष १ अंक ७ जुलै १९३२ मलपृष्ठ ४. ] " मासिक बंद केले. "

[ माहसमं ]

वर्ष १ – अंक १ जुलै १९३२ ते ३, (४ - ५), ६, (७ - ८) जा - फे १९३३, ९(९ - १२). अंक (७ - ८) प्रतिमासाधन चौकशी अहवाल; अंक (९ - १२) मोर विशेषांक ' मोरसस्थान वार्षिक १९३४. '

## सृष्टिज्ञान

**मासिक** : संपादक – फळकर भाऊ नगरकर. मुद्रक – इंडियन प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. रु. १ आगाऊ. टपालहशील ८६. फु. अं. ८२. अंकात १६ पृष्ठे. ८.४ × ५.४. प्रथमांक – जानेवारी १८८५. ( पुस्तक - अंक ).

**स्वरूप** – सचित्र. प्रामुख्याने शास्त्रीय व बोधपर, नीतिपर, ज्ञानपर स्फुट विषय. थोर पुरुषांची चरित्रे. भारतवर्षीय ज्योतिषी.

ब्रीदवाक्य –

ज्ञान म्हणजे जाणणे । अज्ञान म्हणजे नेणणे ।
विपरीत ज्ञान म्हणजे देखणे । एकाचे एक ॥
– रामदास ( दासबोध ).

**विशेष माहिती** – मुद्रक – पुस्तक १ अंक ९ पासून माजगाव प्रिंटिंग प्रेस. ' टाइम्स ऑफ इंडिया कॅलेंडर ' च्या धर्तीवर १८८५ चे ' सृष्टिज्ञान पंचांग ' काढण्याची योजना आजारामुळे सोडावी लागली. द्वितीयावृत्ती – पहिल्या अंकाची द्वितीयावृत्ती काढली. " ' सृष्टिज्ञान ' मासिकाचा ' ज्ञानदीप ' मासिकात अंतर्भाव होणार म्हणून कित्येक दिवस प्रसिद्ध होत होते ... वेगळे नतर काढले " — विविधज्ञान विस्तार वर्ष १७ अंक १, जानेवारी १८८५.

[ मुंमम ]

वर्ष १ – अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १८८५.

वर्ष २ – अंक ( १ - २ ) जानेवारी - फेब्रुवारी १८८६ —.

## सृष्टिज्ञान

**मासिक** : संपादकमंडळ – १ वि. ना. माजेकर, २ गो. रा. परांजपे, ३ प्र. रा. आवटी, ४ श्री. ल. आजरेकर, ५ स. बा. हुदलीकर, ६ दि. धो. कर्वे, ७ श. बा. सहस्रबुद्धे. प्रकाशक – श. ब. सहस्रबुद्धे, पुणे. मुद्रक – बालोद्यान छा. पुणे. वा. व. रु. ३, गोवा व परदेश रु. ४. फु. अं. ८४. अंकात ३२ पृष्ठे. ७.२ × ४.८ प्रथमांक – जानेवारी १९२८. पुढे चालू १९६७. ( वर्ष–अंक, सन्या अंकक्रमांक )

उद्देश – शास्त्रीय विषयाला वाहिलेले. शास्त्रीय विषयांची आधुनिक संशोधनासह सोप्या मार्फत माहिती देणे. मराठी मार्फत सुलभ व शास्त्र बोध शास्त्रीय वाङ्मय निर्माण करून त्याचा प्रसार करणे. *स्वरूप* – सचित्र, पर्णचित्रे, शास्त्रीय विषयांची रंगीत चित्रे. शास्त्रीय चित्रांनी सुशोभित मलपृष्ठे. *विशेष प्रकारचे ध्येय, विवेचनपद्धती* आणि विषयमर्यादा यांनी कोणत्याही प्रचलित मराठी मासिकाहून भिन्न. रसायन-शास्त्र, भूस्तर-शास्त्र, वैद्यक, ज्योतिष, पदार्थ-विज्ञान, प्राणि व वनस्पति शास्त्र व सलग्न विषय, शास्त्रज्ञांची चरित्रे. वर्ज्य विषय नाहीत. सदरे–रासायनिक गप्पा, ज्ञानाचे कण, प्रश्नोत्तरे, विविध शास्त्रीय माहिती, वैज्ञानिविश्वात (१९४८), संशोधन स्फुटे (१९५०), पत्रव्यवहार.

ब्रीदवाक्य –

[प्रारब्धस्यान्तगमन द्वितीय बुद्धिलक्षणम्।]

विशेष माहिती – पृष्ठे – पहिली दोन वर्षे दहा सहा अंकांना (भाग १ व भाग २) सलग पृष्ठांक. पुढे वर्षाचे सलग पृष्ठांक. वर्ष १ अंक ७ पासून ४८. वर्ष १५–३२. वर्ष १७ अनियमित, वर्ष १८–१६, वर्ष २१–४८. मुद्रक – वर्ष १ अंक ४ लक्ष्मीनारायण छा. मुंबई, अंक ७ साहित्य सेवक छा. पुणे, वर्ष ५ अंक ५९ आर्यभूषण छा. पुणे. *प्रकाशक* – (आर्थिक जबाबदारी) वर्ष १ अंक ४ लक्ष्मीनारायण छा. मुंबई, अंक ७ गणेश महादेव आणि कंपनी, पुणे, वर्ष ५ अंक ५९ पासून आर्यभूषण छा. पुणे. *का. वर्गणी* – वर्ष २९ रु. ५. *सूचि* – प्रथम भागवार व वर्षवार सूचि, चित्रांची यादी व महिनेवार अनुक्रमणिका देत. मध्यंतरी वर्ष १७ ते २० कागदाच्या टंचाईमुळे थोडा संक्षेप केलेला आढळतो. नंतर पुन्हा सविस्तर सुरू केली. प्रसंगोपात्त एकदोन शुद्धिपत्रे (वर्ष ८ व वर्ष २३ पृ ३५६ समोर). *संपादक मंडळ* – वर्ष ७ माजेकर (क्र. १) निधन पावले. वर्ष ८ - सहस्रबुद्धे (क्र. ७) निवृत्त. माजेकरांच्या जागी ८ डॉ. कृ. श्री. म्हसकर – एकूण संख्या ६. वर्ष १० - आजरेकर (क्र.४) निवृत्त. त्यांच्या जागी ९ प्रा. शं. आ. पराडेकर–एकूण संख्या ६. वर्ष ११ – हुदलीकर (क्र. ५) निवृत्त. आणि दोन नवे - १०. डॉ. बि. ना. गोखले, ११ प्रा. क. वा. केळकर – एकूण संख्या ७. वर्ष २१ - आजरेकर (क्र. ३), म्हसकर (क्र. ८), पराडेकर (क्र. ९) निवृत्त आणि पाच नवे - १२ डॉ. मो. वा. चिपळूणकर, १३ डॉ. गो. रा. केळकर, १४ प्रा. ना. ह. फडके, १५ डॉ. न्य. श. महाबळे, १६ डॉ. श्री. द. लिमये. "पहिले वीस वर्षांत प्रा. गो. रा. परांजपे व डॉ. दि. धों. कर्वे यांनीच सर्व खटपट केली आहे. पुढे एक वर्ष (वर्ष २१) डॉ. लिमये व यंदाच्या वर्षी (वर्ष २२) डॉ. मो. वा. चिपळूणकर यांनी संपादनाची जबाबदारी अंगावर घेऊन साह्य केले." वर्ष १८ पासून मुद्रक - प्रकाशकाच्या निर्देशाच्या-बरोबर संपादक – प्रि. गो. रा. परांजपे असा स्वतंत्र निर्देश सुरू. *संपादकीय पत्ता* – रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स, मुंबई, वर्ष १९ पासून – प्रा. गो. रा. परांजपे, सुदर्शन, पुणे.

"सृष्टिज्ञान केवळ मुलांचे नाही. प्रौढांनाही मनोरंजक वाटून त्यांना मानसिक उल्हास वाटावा *अशी त्याची रचना आहे. गूढ शास्त्रीय विषया*-शिवाय नेहमीच्या प्रचारातल्या हजारो गोष्टींचा त्यात समावेश आहे." नवनिर्मितीस उत्तेजन – वर्ष १२चा मुख्य उपक्रम परिभाषा संकलित करण्याचा. उत्तम ठरलेल्या निबंधास दर महिन्यास बक्षीस देण्याची संपादकांची योजना. वर्ष २२ – सृष्टि-ज्ञानाची चढाओढ.सृष्टिज्ञानासाठी लेखन करणारास बक्षीस.*भेटी* –वर्ष ६ पुणे येथील महाराष्ट्र शास्त्रीय परिभाषा मंडळाने प्रसिद्ध केलेले 'विश्वाची रचना आणि उत्क्रान्ति' हे पुस्तक त्या मंडळाकडून वाचकास नवीन वर्षाची भेट. वर्ष ८ बडोदे *महाराष्ट्र साहित्य संमेलनातील शास्त्रीय विभागाचे* अध्यक्ष प्रा. गोपाळ रामचंद्र परांजपे यांचे भाषण 'मराठी शास्त्रीय वाङ्मय' ही पुस्तिका अंक ८५ बरोबर. *विशेष पुरवण्या* – (चालू अंकाबरोबर स्वतंत्र पृष्ठे) वर्ष १२ - पारिभाषिक शब्दसंग्रह (पदार्थविज्ञान) – प्रा. गो रा. परांजपे, वर्ष १३ – पारिभाषिक शब्दसंग्रह (रसायन शास्त्र) – डॉ. दि. धों. कर्वे, वर्ष १४ व १५ पारिभाषिक

शब्दसंग्रह ( वनस्पति शास्त्र ) – प्रा. श्री. आ. परांडेकर. *प्रकाशित वाङ्मय*–या मासिकातून गो. कृ. मराठेलिखित ' आधुनिक शास्त्रसंसार ' अशी लेखमाला प्रकाशित झाली. त्याशिवाय शास्त्रीय निबंधमाला भाग १ ( १९३८ ) व भाग २ ( १९४० ) ही दोन खंडिशानातील संकलित निबंधाची पुस्तके विद्यापीठाच्या विनंती-वरून पाठ्य-पुस्तके म्हणून तयार करून दिली.

[ मुंमग्र, जमं ]

वर्ष १ ते ४ – अंक प्रत्येकी १२ ( सलग अंक-क्रमांक १ ते ४८ ). जानेवारी १९२८ ते डिसेंबर १९३१ ( चार वर्षे ).

वर्ष ५ – अंक ४९ ते ५८, ( ५९ – ६० ). जानेवारी ते डिसेंबर १९३२.

वर्ष ६ – अंक ( ६१ - ६३ ), ६४ ते ७२. जानेवारी ते डिसेंबर १९३३. जोड अंकातील प्रत्येक अंकाचे आरंभ पृष्ठ स्वतंत्र. भेट पुस्तक–' विश्वाची रचना आणि उत्क्रांति. '

वर्ष ७ ते १६ – अंक प्रत्येकी १२ ( सलग अंक क्रमांक ७३ ते १९२ ). जानेवारी १९३४ ते डिसेंबर १९४३ ( दहा वर्षे ). वर्ष ८ ची भेट व वर्ष १२ ते १५ च्या पुरवण्या वगैरे विशेष माहितीत पाहा.

वर्ष १७ – अंक १९३ ते १९८, ( १९९ - २०० ), २०१, ( २०२ - २०३ ), २०४. जानेवारी ते डिसेंबर १९४४.

वर्षे १८ ते २० – अंक प्रत्येकी १२ ( सलग अंकक्रमांक २०५ ते २४० ). फक्त २०५ व २०६ वगळून सारे दुमाही जोड अंक. जानेवारी १९४५ ते डिसेंबर १९४७ ( तीन वर्षे ).

वर्षे २१ ते २३ – अंक प्रत्येकी १२ ( सलग अंकक्रमांक २४१ ते २७६ ). जानेवारी १९४८ ते डिसेंबर १९५० ( तीन वर्षे ).

## सेवक

त्रैमासिक : संपादक – द. ह. अग्निहोत्री. प्रकाशक – संपादक, नॉर्मल स्कूल फॉर मेल्स, अमरावती. मुद्रक – सरस्वती मुद्रणालय, अमरावती. वा. व. द. २. पृ. अं. ८१०. अंदाज ३२ पृष्ठे. ८'९ X ६'७. प्रथमांक – डिसेंबर १९४५, पुढे चालू १९६०.

उद्देश – शिक्षणविषयक, शिक्षकाच्या अडचणी, पालकांच्या अपेक्षा, बालकाच्या गरजा व शिक्षण-शाळांपुढील ध्येय व मार्ग यांची माहिती देणे. महायुद्धोत्तर विद्यालयातील पुनर्घटनेचे स्वरूप दर्शविणे. स्वरूप – नवे प्रयोग, नव्या विचार-प्रणाली, नव्या शिक्षणपद्धती, राष्ट्राच्या गरजाप्रमाणे पाठ्यविषयातील बदल, शिक्षणाचे ध्येय व साधने यांची चर्चा व मार्गदर्शन.

ब्रीदवाक्य –

जरि असेल रसज्ञपणा पुरा ।
जरि परोपकृतीच मनोहरा ।
जरि असे चतुरत्व तरी मुला ।
शिक्षविण्याक्षम छंद नसे भला ॥

.– रे. ना. वा. टिळक

विशेष माहिती – प्रांतिक विद्या-खात्याच्या आश्रयाने निघालेले. ठरलेल्या प्रकाशन तारखा : १५ जुलै, ऑक्टोबर, जानेवारी, मार्च. संपादक – वर्ष १ अंक ४ पु. वि. वैरागकर.

[ नॉर्मल स्कूल फॉर मेल्स, अमरावती, मुंमग्रं ]

वर्ष १ – अंक १ डिसेंबर १९४५, २ मा १९४६, ३ जुलै, ४ डिसेंबर १९४६. अंक १ मध्ये बालविभाग

वर्ष २ – १ मार्च १९४७, २ ऑ १९४७, ३ जा १९४८, ४ एप्रिल १९४८.

वर्ष ३ – अंक १ आगस्ट १९४८ ( = जु-ऑक्टोबर १९४८ ), २ डि ४८, ३ मा १९४९ अंक १ समाज-शिक्षण विशेषांक ( पुनर्मुद्रण मे १९४९ ).

वर्ष ४ – अंक १ आगस्ट १९४९, २ अ, ३ डिसेंबर १९४९...

वर्ष ५ – अंक १ मार्च १९५०, २ आ, ३ नवंबर १९५०—.

## सेवक

मासिक : संपादक — सुंदर बळवंत दीवाण. प्रकाशक — संपादक, ग्रामसेवामंडळाकरिता, वर्धा. वा. व. रु. ३. फु. अं. ८५. अंकात ४८ पृष्ठे. ७·२ X ४·८. प्रथमांक जानेवारी १९४८. (सलग अंकक्रमांक).

उद्देश — विनोबांच्या नाट् विचाराशी आणि कार्याशी परिचय राद् इच्छिणाऱ्यांचे जिव्हाळ्याचे साधन. स्वरूप — नई तालीम, समग्र ग्रामसेवा, आरोग्य, आदी सर्व जीवनोपयोगी विषय, धर्माचे आणि धर्मग्रंथाचे अध्ययन. देव, देश, भाषा, संस्कृती इ. चे साहित्य.

विशेष माहिती — लोकनागरीत छापलेले. "'ग्रामसेवावृत्त' १९४२च्या स्वातंत्र्य चळवळीत भस्म झाले ते आता फिनिक्स पक्षाप्रमाणे सेवक नावाने पुन्हा जिवंत होत आहे." (पाहा मागे 'ग्रामसेवावृत्त').

[ मुंमग्रं, विश्रलिमये ]

वर्ष १ — अंक १ ते १२. जानेवारी ते डिसेंबर १९४८. पृ. २ + ८ + ५९२.

वर्ष २ — अंक १३ ते २४. जानेवारी ते डिसेंबर १९४९. पृ. ५७८.

वर्ष ३ — अंक २५ जानेवारी १९५०.—.

## सेवा

मासिक : संपादक — बा. ग. माकोडे. सहसंपादक — चिंतामण हेटे. प्रकाशक — संपादक, वर्धा. वा. व. रु. ३. फु. अं. ८४. अंकात १६ पृष्ठे. प्रथमांक — नवंबर १९५०.

उद्देश — सुरेश मराठी साहित्य मंडळाचे. स्वरूप — विविध विषय.

[ कोल्हटेसंग्रह ]

वर्ष १ — अंक १ नवंबर १९५०.

## सैतवाळ - जागृति

मासिक : संपादक — हिराराव जिनदास चवडे. प्रकाशक — संपादक, वर्धा. मुद्रक — जैन सुधाकर प्रे., वर्धा. वा. व. रु. १८४. अंकात १६ पृष्ठे. ८·४ X ५·४. प्रथमांक — जानेवारी १९२५. (सन, शक, वीरनिर्वाणसंवत)

उद्देश — जैनधर्मविषयक जागृती व संस्थांची माहिती. स्वरूप — मराठी, हिंदी.

ब्रीदवाक्य —

देशकालखलाः सि वैश्रला धीरेव बाधिका ।
भवहितोऽन धर्मे स्यादवधान हि मुक्तये ॥

— वादीमसिंहसूरि.

[ मुंमग्रं ]

वर्ष १ — अंक... (८-९) आगस्ट व सप्टेंबर प्रकाशन दि. ३०-९-१९२५—.

## सोवती

पाक्षिक / मासिक : संपादक — दा. श्री. देवकुळे. प्रकाशक — कृ. ना. सापळे, मुंबई. मुद्रक — रामकृष्ण छापखाना, मुंबई. वा.व. रु.१. फु. अं. ८१. अंकात १४—२० पृष्ठे. ९·७ X ७·३, ७·२ X ४·८. प्रथमांक — अश्विन शु. १० श. १८६३.

उद्देश — प्रौढ व बाल साक्षरताप्रसार कार्यास वाहून घेतलेले. स्वरूप — सोपी भाषा, मोठ्या टाइपात जीवनातील प्रसंग, लहान लहान वाक्ये— कविता, गोष्टी, कथा इ., प्रौढ मानसशास्त्र, कामगारविषयक लेख इ.

ब्रीदवाक्य —

'राष्ट्राचे जीवन साक्षरता आहे.'

विशेष माहिती — प्रथम पाक्षिक ! "नवे सरकारपुरस्कृत 'साक्षरता-दीप' (पाहा पुरवणी यादी) निघाल्यामुळे आम्ही आमचे मासिक केले, पृ. २० राहतील." 'पौर्णिमेला प्रसिद्ध होते.' या माहितीप्रमाणे पहिले चार अंक

पाक्षिकाचे व अंक पाचपासून मासिकाचे असा मेळ घालविता येईल.

[ मग्रं ]

पाक्षिक

वर्ष १ – अंक १ अश्विन १८६३, ( २ ते ४ ),

मासिक

वर्ष १ – अंक ५ डिसेंबर १९४१ ( मार्गशीर्ष १८६३ ), ६ पौ, ७ माघ, ( ८ - ९ ) चैत्र १८६४ —.

## सौभाग्यसंभार

मासिक : संपादक – सौ. सरूबाई ( वा सरुबाई ? ). प्रकाशक – अनंत विष्णु जोशी, कोल्हापूर. मुद्रक – जैनेंद्र छा. था. व. रु. १. फु. अं. ८२. ७·८ × ५·१. प्रथमांक – जून १९०१.

उद्देश – स्त्रियांसाठी व स्त्रियांचे. स्वरूप – कविता, स्त्रीसुधारणा व शिक्षणविषयक लेख, चर्चा इ.

ब्रीदवाक्य –

ननु वक्तृविशेषनिःस्पृहा गुणगृह्या वचने विपश्चितः ।
— भारवी.

विशेष माहिती – मथळ्यात खुलासा ' किंवा हळदकुंकू '. संपादिकेचा पत्ता–मु. गोवा पणजी. वर्ष २ रु. १८८, फु. अं. रु. ८३. प्रकाशक – वर्ष २ गोविंद विनायक आपटे, वाई. याच नावाच्या मासिकाबद्दल हा अन्य उल्लेख – " फोंडे येथे १९१० साली ' हळदकुंकू ' हे मासिक पुस्तक रामचंद्र पांडुरंग वैद्य यांनी सुरू केले. मासिकाच्या संपादिका सौ. सरूबाई वैद्य होत्या. सुरवातीचे काही अंक खानापूर येथे छापून निघत. नंतर गोव्यातच... सन १९१२ साली कायमचे बंद करण्यात आले." (' गोमंतकीय नियतकालिके ' पृ. ३३ - ३४.)

[ पुमग्रं, मडगाव ]

वर्ष १ – अंक १ जून १९०१ ते ४ स, ( ५ - ६ - ७ - ८ ), ( ९ - १० ) फेब्रु-मार्च १९०२....

वर्ष २ – अंक + ...२सप्टेंबर १९०५, + ३ न १९०५, ४ डिसेंबर —.

## स्त्रियांची मैत्रीण

पाक्षिक | मासिक : संपादक – मिस् ए. ए. अॅबट. प्रकाशक – संपादक, पुणे. मुद्रक – आर्यभूषण छा. वा. व. रु. ८१२. अंकात १२ – १६ पृष्ठे. ९·६ × ६·६. प्रथमांक – ( जानेवारी १८८८ ? ). ( पुस्तक - अंक )

उद्देश – " ख्रिस्ती व ख्रिस्तीतर स्त्रियांकरिता मेथॉडिस्ट् मिशनच्या युरोपियन स्त्रियांनी काढले." स्वरूप – ख्रिस्ती मताचे. स्त्रियांना विविध विषयांची माहिती देऊन धार्मिक वृत्तींचा विकास करणारे लेख.

विशेष माहिती – *आरंभकाल* – अज्ञात. पाक्षिकाचा कालनिर्देश पाहता आरंभ सप्टेंबर १८९३ असावा; परंतु नंतरच्या मासिकाचा कालनिर्देश पाहता तो ( जानेवारी ) १८८८ येतो. वर्णन वर्ष ५१ - ५३ चे. इंग्रजी मथळा – ' दि विमेन्स फ्रेंड. ' मलपृष्ठ चारवर मुद्रा ( शिक्का ) – ऑल इंडिया लिटरेचर कमिटी, डब्ल्यू. एफ्. एम्. एस्. मध्ये पृथ्वीगोलावर क्रॉस. वर्षांचे अंक काही विसंगत आढळतात. आरंभी पाक्षिक असल्याचे दिसते. पुढे मासिक होऊन अखेरीस क्रमगणना व वर्षारंभ देखील बदलला. " आरंभापासून मासिकाचे चालकत्व युरोपिअन स्त्रियांकडेच. १९२७ - १९२८ च्या सुमारास संपादिका – श्री. सौ. चंद्राबाई पॉल. "

[ जाधवसंग्रह ]

[ उपलब्ध अंकांवरील कालनिर्देशात विलक्षण विसंगती आढळते आणि नक्की क्रम ठरविणे कठीण होते ]

पाक्षिक

वर्ष २ – अंक ..., ३ नोव्हेंबर १८९४, ४ डि, ५ डि, ६ जा १८९५, ७ जा,

## न्यायचक्षु

मासिक पत्र : काल – १८८९.

—(स्वीकार) 'सार्वी' वर्ष १ अंक ३ डि १८८९ मलपृष्ठ २.

## न्यायदर्पण

मासिक : संपादकमंडळ–केशव लक्ष्मण ओरघेकर, नारायण केशव वावळे. प्रकाशक – वर्धा. मुद्रक – ज्ञानचक्षु, पुणे. ९·३ X ६·२. काल – ( आरंभ १९१४ – १९१५ ).

उद्देश – मे. ज्युडिशिअल कमिशनरसाहेब मध्यप्रदेश यांच्या कोर्टातील दिवाणी व फौजदारी निवाडे.

विशेष माहिती – संपूर्ण नाव – " न्यायदर्पण ऑर दि मिरर ऑफ जस्टिस. " पहिल्या वर्षाचे बारा अंक (सुमारे १९१५ पूर्वी निघाले).

—( उल्लेख ) 'वकील' नागपूर [ झुंझवाले नागपूर ]

## न्यायप्रभा

मासिक : प्रकाशक – यादगीर. काल – फसली १३३७ ( इ. स. १९२७ – २८ ).

— (उल्लेख) 'न्याय' औरंगाबाद, इ. स. १९२८.

## पंचालमय प्रबोधिनी

त्रैमासिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४६.

—( उल्लेख ) 'विश्वब्रह्मवृत्त', वर्ष २९ अंक ३ डि १९४६.

## पंडित

मासिक : प्रकाशक – काशी. काल – १८९६ पूर्वी. [ बहुधा संस्कृतप्रचुर असावे. ]

—( उल्लेख ) शं. बा. दीक्षितकृत 'भारतीय ज्योतिःशास्त्र,' पृ. ३०८.

## पंडिताश्रम

मासिक : प्रकाशक – उज्जनी. काल – १९२३ पूर्वी.

विशेष माहिती – 'उज्जनीचे 'पंडिताश्रम' मासिक बंद पडले'.

—( लेखात उल्लेख ) 'सहविचार' वर्ष २ अंक १ आगस्ट १९२३ – श्री. भास्कर रामचंद्र भालेराव यांचा 'उत्तर हिंदुस्थानातील मराठी साहित्य व साहित्यभक्त' हा लेख, पृ. १९.

## पंढरी मित्र

पाक्षिक : प्रकाशक – पंढरपूर. काल – सप्टंबर १९२७.

—( पोच ) 'धंदेशिक्षण' त्रैमासिक, वर्ष १ अंक ३ सप्टंबर १९२७, पृ. ९२.

## पतितपावन

त्रैमासिक (माला ?) : संपादक – रा. भा. लवंदे. प्रकाशक – रायबंदर, गोवा. काल – श. १८५३.

—( पोच ) 'दासबोध' वर्ष ५ अंक ५ ज्येष्ठ श. १८५३ मलपृष्ठ ३.

## पत्रिका+

मासिक : प्रकाशक – लोणखेडे (शहादे,

खानदेश ). प्रथमांक – फेब्रुवारी १९०९.

उद्देश – ज्योतिष-विषयक. स्वरूप – नारद-संहिता आर्ष ग्रंथाचे भाषांतर. ज्योतिषशास्त्राचे उपयुक्त लेख, भविष्ये, वर्तमानपत्रातील उतारे, मूकप्रश्न.

विशेष माहिती – " मूकप्रश्न सोडविणारास ग्रंथ व रोखीची बक्षिसे. वर्गणीदारास प्रत्येक महिन्याचे भाग्यफल बक्षीस. अंक १, २ व ३ याची द्वितीया-वृत्ती काढून आली. प्रसार बंगाल, ब्रह्मदेश, मद्रास, पंजाब, सिंध, पूर्व आफ्रिकेपर्यंत आहे. " – लोकमित्र.

— ( पोच ) ' फलज्योतिषादर्श ' वर्ष ३ अंक ७ एप्रिल १९०९; ( जाहिरात ) ' लोकमित्र ' वर्ष १९ अंक २ ऑगस्ट १९०९, मलपृष्ठ ५; ( उल्लेख ) ' ज्योतिर्विजय ' वर्ष २ अंक १ चैत्र श. १८३६ ( १९१४ ) यातील लेख ' आमची पंचांगे ', पृ. २.

## पद्मशाली

मासिक : प्रकाशक – सोलापूर. काल – १९४६ – १९५०.

स्वरूप – तेलगू, मराठी.

— सरकारी यादी १९४६ - ४७ ते १९४९ - ५०.

## पांचाल-मय-प्रबोधिनी

त्रैमासिक : प्रकाशक – मुंबई. प्रथमांक – ( १९३३ ).

—( पोच ) ' आयुर्वेद ' वर्ष २० अंक २ वैशाख श. १८५५ पृ. ५३.

## पाठारे क्षत्रिय पत्रिका

मासिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४८.

— रजिस्ट्रार रिपोर्ट १९५८.

## पाशुपत

मासिक : संपादक ( ? ) – वामन महादेव पाठक. प्रकाशक – काशी.

— ( लेखात उल्लेख ) ' ग्रहविचार ' वर्ष २ अंक १ ऑगस्ट १९२३, श्री. भास्कर रामचंद्र भालेराव यांचा ' उत्तर हिंदुस्थानातील मराठी साहित्य व साहित्यभक्त ' हा लेख, पृ. १९.

## पिशाच्च

पाक्षिक : संपादक – रं. ए. रत्नाकर. प्रकाशक – अकोला ( वऱ्हाड ). वा. व. रु. २, गावात रु. १८८. पृ. अं. ८१. प्रथमांक – आषाढ वद्य ३० श. १८४९ ( १९२७ ).

विशेष माहिती – दर अमावास्या-पौर्णिमेला निघतो.

— ( जाहिरात ) ' दासबोध ' वर्ष १ अंक ८ भाद्रपद श. १८४९, मलपृष्ठ ३.

## पुरातन वैद्यक ग्रंथसंग्रह

मासिक : संपादक – ( एडिटर व ट्रॅन्स्लेटर ) अण्णा मोरेश्वर कुंटे, बी. ए., एम्. डी. प्रकाशक – मुंबई. वा. व. रु. ५ आगाऊ, मागाहून रु. ६. प्रथमांक – सप्टेंबर १८७६.

विशेष माहिती – ' चरक ' ची पुनरावृत्ती. संपादकाचे ' दंभहारक 'कृत वर्णन – ' तिसरे किताबी संपादक. '

— ( संपादकीय अभिप्राय ) ' दंभहारक ' वर्ष ५ अंक ४ ऑक्टोबर १८७६ पृ. १२१ – १२४.

## पुष्पपराग

मासिक : प्रकाशक – नागपूर. जानेवारी १८९३.

— ( दाते ). ( जाहिरात ) ' नीरक्षीरन्याय ' १८९३; ( मासिक म्हणून उल्लेख ) ' मार्गी. भरी ' वर्ष ४ अंक ९ जानेवारी १९३४ मध्ये जाहिरातमेल्याक.

## पुष्पांजलि

पाक्षिक : प्रकाशक – इचलकरंजी. प्रथमांक – १ श. १८४३.

उद्देश – " नामदेव वरून सधारणे. " स्वरूप –" छोटेखानी सुंदर निबंधक उतारे. "

— ( पोच ) 'नामदेव ' वर्ष १० अंक ५ श्रावण श. १८४३, पृष्ठ ६७ – ६८.

## पूना म्युनिसिपल गॅझेट

पाक्षिक : प्रकाशक – पुणे. काल – १९४९-१९५१.

— सरकारी यादी १९४९ – ५०, १९५०-५१.

## पूर्णकलेंदुशेखर

मासिक : प्रकाशक – खानापूर ( बेळगाव ). प्रथमांक – एप्रिल १८९५.

स्वरूप – *प्राच्य व पाश्चिमात्य देशातील नानाविध कलाकौशल्ये व चातुर्य, वाग्मीता, वगैरे हरहुन्नर याचा संग्रह.*

विशेष माहिती – " एप्रिल १८९५ पासून *निघत आहे.* "

— (दाते ). ( *जाहिरात* ) ' *खानदेश मित्र* '.

## पोस्ट ऑफिस

मासिक : प्रकाशक – गोविंद वासुदेव भावे, ५६४, बुधवार पुणे. पो. ब. क्र. १८८ ( पोस्ट-मनांस क्र. १ ). प्रथमांक – नमुना अंक १९२३.

स्वरूप – प्रचलित विषयांची चर्चा, पोस्टल युनियनच्या कामगिरीची माहिती, पोस्ट खात्यातील नोकरांचे हक्क, अडचणी, गाऱ्हाणी इत्यादी विविध विषय.

—( पोच ) ' मराठी-शिक्षक ' वर्ष १३ अंक ८ - ९ ) नोव्हेंबर - डिसेंबर १९२३, पृ. २९९.

## प्रकाश*

पाक्षिक . प्रकाशक – कोल्हापूर. काल – १९४९–५०.

— सरकारी यादी १९४९ - ५०.

## प्रकाश*

त्रैमासिक : संपादक – गजानन कृष्ण पाटणकर. प्रकाशक – मुंबई. मुद्रक – इंदुप्रकाश छापखाना, मुंबई. प्रथमांक – आगस्ट १९३२.

उद्देश – मराठा विद्यार्थीवर्ग या संस्थेच्या विद्यमाने. राजकारणाव्यतिरिक्त इतर मार्गांनी सामाजिक सुधारणा. स्वरूप – धाडस युवक.

— ( पोच अभिप्राय ) ' विजयी नामदेव ' वर्ष १ अंक ८ कार्तिक श. १८५४ ( नवंबर १९३२. )

## प्रकाशक

*मासिक* : संपादकमंडळ – रे. टी. वुइल्यम्स. नंतर ( क्रमाने ) कॅनन टेलर, कॅनन विंग, रे. दि. र. आठवले, ( १९३१ ) रे. ए. टी. सोनवणे. प्रकाशक – एस. पी. जी. मिशन, अहमदनगर. काल – १८७८.

उद्देश – कॅथॉलिक सिद्धांताची ख्रिस्ती लोकास ओळख करून देणे.

विशेष माहिती – मूळचे नाव 'प्रकाश !', मध्यंतरी 'प्रकाशता', नंतर 'प्रकाशक'.

— मा. कृ. उजगरे, "मराठी ख्रिस्ती वाङ्मयाचा इतिहास" १९३१, पृ. ३६.

## प्रगति आणि जिनविजय

पाक्षिक : संपादक – बाबगोंडा दादा पाटील, वकील, सांगली. काल – श. १८४५ (१९२३).
उद्देश – दक्षिण महाराष्ट्र जैनसभेचे मुखपत्र.

—(पोच) 'नामदेव' वर्ष १२ अंक २ वैशाख १८४५, पृष्ठ १८.

## प्रगति आणि जिनविजय

दाशाह्निक : प्रकाशक – बेळगाव. काल – १९४६ – १९४८. (पाक्षिकाचे दाशाह्निक होऊन स्थलांतर झाल्याचे दिसते.)

—सरकारी यादी १९४६ – ४७, १९४७ – ४८.

## प्रणवीर

मासिक : काल – १९२८ – १९२९.

—[ कॉंग्रेस अंक (१ डिसेंबर १९२८) ची पोच ] 'यशवंत' वर्ष १ अंक २ जानेवारी १९२९, पृ. १५२.

## प्रणाम

पाक्षिक : प्रकाशक – अजगाव (सावंतवाडी). काल – १९५० – ५१.

— सरकारी यादी १९५० – ५१.

## प्रबोध

मासिक : काल – १९३२.
उद्देश – शिंपी समाजाचे.
विशेष माहिती – १० नवंबर १९३२ चे पूर्वी शिंपी समाजाच्या एकीकरणावर लेख.
—(उल्लेख) 'विजयी नामदेव' वर्ष १ अंक ९ मार्गशीर्ष श. १८५४ (डिसेंबर १९३२) पृ. ३० वरील समावृत्त.

## प्रभा

वार्षिक : संपादक – र. मा. धानकुटकर. प्रकाशक – मुंबई. प्रथमांक – १४ एप्रिल १९४९.
— 'दलितांची वृत्तपत्रे' परिशिष्ट ५ क्रम ४८.

## प्रभावना

मासिक : प्रकाशक – सोलापूर. काल – १९२६.
— (महावीर अंकाचे परीक्षण) 'लोकमित्र' वर्ष ३६ अंक ३ सप्टेंबर १९२६, पृ. १०४.

## प्रभुतरुण

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९३५.
विशेष माहिती – " 'प्रभुतरुण' मासिक व 'प्रभुतरुण' पाक्षिक एकाच समाजाची; परंतु धोरणात व उपयुक्ततेत फरक ! मासिक विविध माहिती व चळवळी याची हकीकत नियमितपणे देते." – (उल्लेख) गो. गो. अधिकारी, "साहित्य समालोचन १९३५" पृ. ३६.

## प्रभुतरुण

मासिक : प्रकाशक – मुंबई. काल-(१९३५), १९४६ – १९५१.

— (उल्लेख) गो. गो. अधिकारी, "साहित्य-संमेलन १९३५" पृ. ३६; सरकारी याद्या १९४६ – ४७ ते १९५० – ५१.

## प्रभु प्रताप

मासिक : काल – फेब्रुवारी १९२५.
"'प्रभुप्रताप' या प्रभु मासिकाचा फेब्रुवारीचा अंक पोचला." – (पोच) 'उन्नति प्रबोधक' ने. वर्ष १ अंक २ फेब्रुवारी १९२५, पृ. २६.

## प्रसाधन

मासिक : प्रकाशक – जळगाव. प्रथमांक – (जून १९४८).

— वर्ष १९ अंक ३ ऑगस्ट १९६६ वरून अनुमान.

## बहिष्कृत भारत

मासिक : संपादक – गणेश अक्काजी गवई. प्रकाशक – अमरावती. काल – १९२०.

— 'दलितांची वृत्तपत्रे' परिशिष्ट ५ क्रम ११.

## बहिष्कृत भारत

पाक्षिक पत्र : वा. व. रु. ३. ट. ह. सह. काल – श. १८४९ ( १९२७ ).

उद्देश – समाजात जागृती करून डोळ्यात अंजन घालणे.

— ( पोच व अभिप्राय ) 'विधायक' पाक्षिक वर्ष २ अंक १ वैशाख शुद्ध ७ श. १८४९, पृ. ६.

## बहिष्कृत मित्र

मासिक : संपादक – पाटील व पोतनकर. काल – १९२७.

— 'दलितांची वृत्तपत्रे' परिशिष्ट ५ क्रम १६.

## बक्षीस

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९५० –५१.

— सरकारी याद्या १९५० – ५१.

## बॉम्बे पोलिस

त्रैमासिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४९.

स्वरूप – इंग्रजी, गुजराती, मराठी.

— रजिस्ट्रार रिपोर्ट १९५८.

## बारई - सन्मित्र बंधू

मासिक : संपादक – कृ. गो. बोरकर. प्रकाशक – वर्धा. काल – श. १८५३.

उद्देश – बारई जातीच्या उन्नतीकरता.

— ( दाते ); ( पोच व अभिप्राय ) 'वागीश्वरी' वर्ष २ अंक १२ ( अधिक भाद्रपद श. १८५३ ) पृ. ८१३; ( वर्ष १ अंक ७ - ८ ची पोच ) 'समाजसेवक' ( वर्धा ) वर्ष १ अंक ३ मार्गशीर्ष श. १८५३, मलपृष्ठ.

## बालक *

मासिक : प्रकाशक – बेळगाव. वा. व रु. ८६. काल – १९२६ – २७.

उद्देश – मुलांमुलींचा हितचिंतक मित्र, दरमहा भेटतो. स्वरूप – मतिज्ञानवर्धक सोपे धडे, परीक्षेचे सुलभ प्रश्न, इत्यादी विषय यावयाचे, दक्षिणे देतो.

विशेष माहिती – पत्ता-दत्तात्रय रामचंद्र कुलकर्णी ( बी. टी. ), प्रो. " बालबोध मिशन " बेळगाव.

—(जाहिरात) ' लोकमित्र ' वर्ष ३६ अंक ४ ऑक्टोबर १९२६, मलपृष्ठ ३.

## बालविचार

मासिक : संपादिका – श्रीमंत सौ. शकुंतलाबाई शिंदे, सरदार रास्तेवाडा, पुणे. काळ – श. १८४९

उद्देश – फक्त मुलामुलींकरता. स्वरूप – सुंदर छपाई.

विशेष माहिती – पहिल्या लेखिकेचे बरेच लेख.

—( साभार स्वीकार ) ' आत्मबोध ' वर्ष ४ अंक १० पौष श. १८४९, मलपृष्ठ २.

## बालविहार

मासिक : संपादकमंडळ – सं. वि. गायकवाड, बा. ना. शिंदे. बा. व. क. २०८. अंकात ३२ पृष्ठे. क्राउन अष्टपत्री. काळ – १९४८.

स्वरूप – मराठी, हिंदी.

विशेष माहिती – पत्ता – मूलोद्योगशिबिर, मु. पो. निंबगाव जाळी ( अहमदनगर ).

—( पोच ) ' प्रगति ' वर्ष १ अंक ९ सप्टेंबर १९४८, पृ. ३.

## बालसन्मित्र

पाक्षिक : संपादक – पाळूजी नारायण मिसाळ. प्रकाशक – मालवण ( रत्नागिरी ). बा. व. क. १८६. काळ – १९३५ – १९५१.

—( पोच ) ' शालापत्रक ' मे १९३६ पृ. २३९; सरकारी यादी १९४६–७; १९५०–५१.

## बालोद्यति

मासिक : मुद्रक – श्रीसिद्धिविनायक प्रेस. बा. व. क. ८८. अंकात २४ पृष्ठे. ७"×४"२. प्रथमांक – चैत्र श. १८२० ( मार्च १८९८ ).

स्वरूप – नाना शिल्पकला, उद्योगधंदे, व्यापार इत्यादिक. रसायनशास्त्र व यंत्रशास्त्र यांच्या उपयोग सांगणारे.

—( जाहिरात ) सा. ' काळ ' दि. २३ मार्च १८९८.

## बाळशिक्षक

मासिक पुरवणी : संपादक – डॉ. फेअरबँक्स. प्रथमांक – सप्टेंबर १८९२.

उद्देश – केवळ मराठी जाणणाऱ्या रविवारच्या शाळांतील शिक्षकांच्या उपयोगी. साप्ताहिक ज्ञानोदयाची मासिक पुरवणी. ख्रिस्ती मताचे.

विशेष माहिती – ऑगस्ट १८९३ पासून साप्ताहिक स्वरूपात.

—अमेरिकन मराठी मिशनचा अहवाल १८९३, पृ. ३७.

## बोध

मासिक : प्रकाशक – दक्षिण हैद्राबाद. प्रथमांक – १ अश्विन श. १८४१. ( पुस्तक-अंक ).

—(पहिल्या अंकाची पोच) 'कीर्तन' वर्ष १ अंक २ कार्तिक श. १८४१ ( नवंबर १९१९ ), ( दुसऱ्या अंकाची पोच ) ' कीर्तन ' डिसेंबर १९१९.

## ब्राह्मण अथवा ब्रह्मवादी

मासिक : प्रकाशक – देवरुखे (रत्नागिरी). वा. व. रु. ०८ आणाऊ ट. ह. सह. प्रथमांक – १ चैत्र श. १८२७ (१९०५).

उद्देश : सनातन हिंदुधर्म प्रचाराकरिता. स्वरूप – केवळ धार्मिक विषयांचे व विविध विषययुक्त मासिक पुस्तक.

विशेष माहिती – ५०० सह्या मिळताच येत्या चैत्रापासून प्रगट होईल.

— (जाहिरात) 'सन्यासी' वर्ष २ अंक २ डिसेंबर १९०४ (मार्गशीर्ष श. १८२६) मलपृष्ठ २; आणि 'संन्यासी' वर्ष २ अंक ४ फेब्रुवारी १९०५ (माघ श. १८२६) मलपृष्ठ २.

## ब्राह्मण-ब्राह्मणेतर

पाक्षिक : वा. व. रु. १।८, व्ही. पी. रु. २. फु. अं. ०१०३ (नमुना). प्रथमांक – १ आगस्ट १९२६.

उद्देश – वाढत्या वादाची नि:पक्षपाती चर्चा, अनिष्ट वादाला सात्त्विक वळण देणे.

—पत्ता – मॅनेजर ब्राह्मण-ब्राह्मणेतर द्वारा सजीवन कार्यालय, दादर, मुंबई न. १४.

— (जाहिरात) 'उद्यम' वर्ष ८ अंक ३ मार्च १९२६.

## भक्तिरहस्य

मासिक : संपादक – रामचंद्र बळवंत खाडेकर. प्रकाशक – पंढरपूर. वा. व. रु. २. काल – (१९०८?)

स्वरूप – भक्तिमार्गासंबंधी माहिती, देवळे, साधुसंताचे जन्मोत्सव, सप्ताह, पुण्यतिथी वगैरे माहिती, आरत्या इ.

— (पोच) 'समालोचक' वर्ष २ अंक २ आषाढ संवत १९६४ (जुलै-आगस्ट १९०८) पृ. ४८.

## भविष्य पत्रिका

मासिक : प्रकाशक – वाळवे. काल – १९२७.

— (पोच) 'धंदेशिक्षण' त्रैमासिक वर्ष १ अंक ३ सप्टेंबर १९२७, पृ. ९.

## भागवत

? मासिक : काल – १९०४.

विशेष माहिती – "मोडक यांचे 'भागवत', भावे यांचा 'महाराष्ट्र कवि' व वेलणकर यांचा 'काव्य संग्रह' इतके स्नेही मंडळींनी मिळून घेतल्यास काव्यपरिशीलनाचे कार्य वाढण्यास मदत होईल." – (उल्लेख) 'ग्रंथमाला', सारसंग्रह, आगस्ट १९०४.

## भाग्यश्री

पाक्षिक (अनियमित) : प्रकाशक – मुंबई. काल – १९५० – ५१.

— सरकारी यादी १९५० - ५१.

## भारतभूषण

पाक्षिक : प्रकाशक – श्रीक्षेत्र काशी. वा. व. रु. २. काल – १९०३.

विशेष माहिती – "वर्गणी मराठी कंपनीच्या रु. १० च्या शेअरचा हक्क मिळतो व शेकडा ४ टक्के व्याज सुरू होते. अर्धी वर्गणी पत्राकडे व अर्धी व्यापारी माडवलात जमा होते, व नियमित शर्तींवर परतही दिली जाते. एक हजार वर्गणीदाराच्या सह्या

येताच कंपनी सुरू होईल. बनारस येथील कोण-ताही माल मागवावा. आगाऊ मुदत चैत्र शु. १. मागाहून प्रवेश फी म्हणून एक रुपया जास्त. पत्ता – भारत-भूषण, बनारस सिटी. ”

—( जाहिरात ) ‘ बालबोध ’ वर्ष २२ अंक १२ मार्च १९०३, रंगीत मलपृष्ठ ७.

## भारतवृत्त

पाक्षिक ( अनियमित ) : प्रकाशक – इस्लामपूर ( सातारा ). वा. व. रु. १, परगावी रु. १८८. काल – १९२६–२७, १९४६–१९५१.

उद्देश – लोकशिक्षणाचे ध्येय. स्वरूप – हिंदुस्थानविषयक सामाजिक, धार्मिक व औद्योगिक वाङ्मय. प्रचलित गोष्टींची चर्चा. ज्ञान व मनोरंजन याचा समन्वय.

पत्ता – मॅनेजर, इस्लामपूर ( सातारा ).

—(जाहिरात) ‘दासबोध’ मासिक, वर्ष १ एकत्र बांधलेले पुस्तक ( माघ १८४८ – पौष १८४९ ); सरकारी यादी १९४६–४७ ते १९५०–५१.

## भारतसुधा

द्वैमासिक : संपादक – शेषाद्री गोविंद कानडे. काल – श. १८५२.

—( साभार स्वीकार ) ‘ दासबोध ’ वर्ष ४ अंक ११ मार्गशीर्ष श. १८५२, मलपृष्ठ ३.

## भारतामृत

मासिक : काल – १९०२.

विशेष माहिती – “बंद पडून संपूर्ण पुस्तके देण्याची चालकांची योजना ”.

—( उल्लेख ) ‘ ग्रंथमाला ’ वर्ष ८ अंक १२ मार्च १९०२, शालअखेर, पृ. ७.

## भारतीय प्रवासी

पाक्षिक : प्रकाशक – पुणे. काल १९४८–४९.

— सरकारी यादी १९४८–४९.

## भावसार

मासिक : प्रकाशक – जळगाव. काल – १९४६–१९४८.

— सरकारी यादी १९४६ - ४७, १९४७-४८.

## भावसार प्रकाश

मासिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४८–१९५१.

—सरकारी यादी १९४८–४९ ते १९५०-५१.

## भावसार मासिक

मासिक : संपादकमंडळ – ( जाहिरातीवर सही करणार ) बड्डू गणपत चव्हाण भावसार, धाकू लकडू भावसार. वा. व. रु. १८८. काल – १ डिसेंबर १९३५.

“ डिसेंबर १९३५ पासून सुरू होणार ”.

—( जाहिरात दिनांक ९ ११ ३५ ) ‘ नामदेव ’ वर्ष २३ अंक ९ नवंबर १९३५, मलपृष्ठ ३.

## भूत

पाक्षिक : संपादक – आनंद बाळकृष्ण रागणेकर. काल – १८९२ - १८९४.

स्वरूप – सचित्र पाक्षिक.

विशेष माहिती — सुरू अंदाजे १८९२ ते १८९४ याचे दरम्यान. "पुढे अपरिहार्य अडचणीमुळे आमचे त्या वेळचे सन्मित्र व सहाध्यायक आनंद रामचंद्र धराधर यांचे स्वाधीन केले. काही वर्षे उत्तम चालवून मौलिक संपादन केले."

— (उल्लेख) 'मुंबई वैभव' १८९४; (आत्मकथनात उल्लेख) 'गर्जती मराठा' वर्ष १ अंक १ नोव्हेंबर १९२६ पृ. २.

## भूत

मासिक : प्रकाशक — मुंबई. का. व. ह. ८१२ द. ह. सह. फु. शं. (नकला) ८१८२. प्रथमांक — जानेवारी १९०३.

स्वरूप — पोट धरून हसविणारा मजकूर.

विशेष माहिती — मराठीतील पहिलेच सचित्र मासिक पत्र. जानेवारीपासून वर्ष सुरू. पत्ता — फाटक वझे आणि कंपनी, बुकसेलर, ठाकुरद्वार, मुंबई.

—(जाहिरात) 'बालबोध' वर्ष २३ अंक २ मे १९०३, रंगीत मलपृष्ठ ७; 'करमणूक' वर्ष १३ अंक २४ (२५ एप्रिल १९०३), पृ. १९६.

## मक्षी (?)

मासिक : प्रकाशक — मुंबई. काल — १९४८-५१.

— सरकारी यादी १९४८ ४९ ते १९५० — ५१.

## मदतगार

पाक्षिक : प्रकाशक — पुणे. काल १९४९-५०.

— सरकारी यादी १९४९-५०.

## मधुमक्षिका +

मासिक : संपादक — रामचंद्र दत्तात्रय कुलकर्णी आजरेकर.

विशेष माहिती — सुमारे तीन वर्षे चालविले. नंतर पाक्षिकात रूपांतर — [संपादकाचे चिरंजीव श्री. दत्तात्रय रामचंद्र आजरेकर (दादा गुरुजी) यांचे पत्र, दि. १८ जून १९६८].

## मनोविहार

मासिक : संपादक — काडे ('कल्पतरु' साप्ताहिकाचे संपादक). प्रकाशक — सोलापूर. काल — (१८८५ — १९००).

—(उल्लेख) 'सोलापूर समाचार'चा ज्युबिली अंक दि. १४ जानेवारी १९३६, 'साहित्य विहार' लेख, पृ. ९८.

## मवास्सेर

मासिक : काल — १८९४.

विशेष माहिती — मवास्सेर = मुबारिक. "हे मासिक पत्र मे. लॉर्ड हार्दीन असतात. इस्लाम लोकांच्या उपयोगाचे. शास्त्रातील वचने प्रमाणासाठी देवनागरी प्रथम हिंदू व मराठी अर्थ देतात...पत्राचा उद्देश केवळ त्याच कामासाठी आहे."

— (वृत्त) 'ज्ञानोदय' २ ऑगस्ट १८९४.

## मराठा दीनबंधू

पाक्षिक : संपादक — कि. पा. वनखेडे. प्रकाशक — नागपूर. काल — १९०२.

— 'दलितांची वृत्तपत्रे' परिशिष्ट ५ क्रम ५.

## मराठा समाचार

पाक्षिक : प्रकाशक – अकोला ( वऱ्हाड ). वा. व. रु. २. काल – १९२४–१९२५.

उद्देश – मागासलेल्या जातींच्या उन्नतीसाठी.

विशेष माहिती – वऱ्हाडात प्रथमच. आतापर्यंत ८ अंक प्रसिद्ध झाले.

—( पोच ) 'तत्त्वज्ञानमंदिर' वर्ष ६ अंक ३ जानेवारी १९२५, पृ. १३५९.

## मराठी म्हणी रत्नकोश

मासिक : संपादक – ( नारायण नरसिंह फडणीस ). प्रकाशक – जळगाव. फु. अं.८१८३. काल – १९३५.

विशेष माहिती – मासिक म्हणून चालू केलेले होते. परंतु आश्रय नाही म्हणून बंद करावे लागले. शेवटी म्हणींच्या संग्रहाचे १० भाग काढावे लागत आहेत. ( दोन हजार म्हणींचा पहिला भाग १९३५ त काढला ).

—( उल्लेख – ' काव्यरत्नावलीचे दप्तर ' ) ' काव्यरत्नावली ' वर्ष ४२ अंक ४ एप्रिल १९३५, मलपृष्ठ २.

## महानुभाव*

मासिक :

उद्देश – महानुभाव संप्रदायाचे मुखपत्र.

—(उल्लेख) 'जळगाव मराठी पत्रकार परिषद, स्मृतिपुष्प ' मार्च १९६५, पृ. ९२.

## महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्सचे मासिक मुखपत्र+

मासिक : संपादक – एच्. व्ही. देशपांडे, सेक्रेटरी म. चे. ऑफ् कॉमर्स मुंबई. प्रकाशक – संपादक, मुंबई. मुद्रक – न्यू भारत प्रि. प्रेस, मुंबई. वा. व. रु. १०४. फु. अं ८२. अंकात १६ पृष्ठे. ८½×४. प्रथमांक–अक्टोबर १९३४. शेवटचा अंक – ( वर्ष १६ अंक १२ ) सप्टेंबर १९५०.

उद्देश – वर्णन विभाग, पृ. २३० वर पाहा.

विशेष माहिती – ( वर्णन विभाग पृ. २३० पाहा ). *आकार* – वर्ष ६–८×५.३. मुद्रक – वर्ष २ पासून पॉप्युलर प्रि. प्रेस, मुंबई; फेब्रुवारी १९३९ पासून उन्नतिप्रकाश प्रिंटिंग प्रेस, मुंबई. संपादक – फेब्रुवारी १९३५ पासून द. वि. केळकर.

[ क्वेरी मुंबई ]

वर्ष १ ते १६ – अंक प्रत्येकी १ ते १२ ( अ ते स ) काही जोड अंक. ऑक्टोबर १९३४ ते सप्टेंबर १९५०. ( सोळा वर्ष ).

## महाराष्ट्र रिव्ह्यू (?)

मासिक : प्रकाशक – जळगाव. काल – सुमारे जून १९०७.

विशेष माहिती – "वर्णनकारांनी लक्षात ठेवावे की 'समालोचक' हुबळीत निघते. ते जळगावच्या ' महाराष्ट्र रिव्ह्यू 'हून भिन्न आहे. '– त्र्यं. गु. काळे, 'समालोचका 'चे संपादक, संवत १९६३ ज्येष्ठ.

— (उल्लेख) ' समालोचक ' वर्ष १ अंक १ ज्येष्ठ संवत् १९६३, मलपृष्ठ ४ वर टीप.

## माता

मासिक : संपादक – दिनू उमर. प्रकाशक – अहमदनगर. वा. व. रु. ०३. फु. अं. ०८३. अंकात ४, ६ पृष्ठे. प्रथमांक – मार्च १८००.

उद्देश – ख्रिस्ती मताचे. स्वरूप – शब्दाय

दिवशी वाचण्याजोगे विषय, शास्त्रासंबंधी व धर्मासंबंधी माहिती.

—(उल्लेख) ज्ञानोदय दि. २७ सप्टेंबर १८७७ (सात अंक आले).

## मारवाडी

मासिक : संपादक – किसनलाल बलदवा. प्रकाशक – अहमदनगर. काल – १९०९.

उद्देश – ज्ञातीच्या सुधारणेसाठी.

—(अभिप्राय) 'मराठामित्र' वर्ष १ अंक ९ सप्टेंबर १९०९ पृ. २०५.

## मालवण पत्रिका

पाक्षिक : (अनियमित). संपादक व प्रकाशक – गणेश सूर्याजी वाडिवडेकर. प्रकाशक – सावंतवाडी. वा. व. रु. १८८. काल – १९२४, १९५०–१९५१.

उद्देश – राजकीय, सामाजिक, प्रगतिपर व स्थानिक विषय.

—'गेले चार-पाच महिने निघते'–(पोच) 'समाजसेवक' वर्ष ५ अंक २ सप्टेंबर १९२४ पृ. ५७; सरकारी यादी १९५०–५१.

## माळी मित्र

मासिक : संपादक – पाटील नारायण काजळे. प्रकाशक – डोंगरी (मुंबई). वा. व. रु. १८५. काल – १९१२–१३.

उद्देश – माळी समाजोन्नतीला वाहिलेले.

—(स्वीकार, अभिप्राय) 'मराठामित्र' वर्ष ४ अंक ९ सप्टेंबर १९१२ पृ. ३०७; [वर्ष १ अंक ४ श्रावण श. १८३५ (आगस्ट १९१३) ची नोंद अन्यत्र आढळते].

## माळी वैभव

(?) मासिक : संपादकमंडळ – कृ. तु. गिरमे, पां. ल. बोराटे. मुद्रक – दीनबंधु छापखाना, (पुणे ?). क्राउन अष्टपत्री. प्रथमांक – (? जुलै १९४७).

[मुंमग्रं]

वर्ष १ – अंक...५ नवंबर १९४७ महात्मा फुले विशेषांक.

## मुलांचा खाऊ

मासिक : प्रकाशक – अहमदनगर. प्रथमांक – (मे १८९२).

उद्देश – "मानसिक आरोग्य देऊन मानसिक रुची वाढविणारा." स्वरूप – हा खाऊ मुलांना पचेल असा काळजीपूर्वक बनविला जाईल. यात *दुर्वासनेचा यत्किंचित अणुरेणुही न जाऊ देण्याची* खबरदारी घेतली जाईल.

—(दाते); (जाहिरात) 'लोकमित्र' सहीकर 'तुकाराम' (?) कर्ते, "मे १८९२ मध्ये निघणार."; (माहिती) 'तरुणकार' वर्ष २ – आगस्ट १८९२ मध्ये मासिक निघाल्याचा उल्लेख.

## मुस्लिम

मासिक : प्रकाशक – कऱ्हाड. वा. व. रु. ४. 'अरविंदा' एवढा आकार ९·७ × ७·५. काल – १९२२.

स्वरूप – स्वराज्य, खिलाफत, असहकार इ. विषयावर निर्भीड, साधोपांग चर्चा करणारे पहिलेच मासिक. कऱ्हाड येथील तरुण राष्ट्रीय मुस्लिमांचे मराठीतील मासिक पुस्तक.

—(जाहिरात) केसरी, ११ एप्रिल १९२२.

## मेथॉडिस्ट संदेश

मासिक : संपादक – रे. सुदामराव विश्रामजी दिवाळे, प्रकाशक – मुंबई ?

उद्देश – 'राजकीय, सामाजिक व धार्मिक' (संदर्भ २).

—(१) रे. दिवाळे–'माझी अल्पशी प्रभुसेवा' १९५९ – "इ. स. १९२१ मध्ये ... माझ्या संपादनाखाली निघू लागले ... सुमारे दोन वर्षे चालले. नंतर लोकांचे सहकार्य न मिळाल्यामुळे बंद पडले"; (२) भा. कृ. उजगरे – 'मराठी खिस्ती वाङ्मयाचा इतिहास, १९३१', पृ. ३९.

## (दि) मेसेज

पाक्षिक : संपादक – बी. चक्रनारायण. प्रकाशक – पुणे. मुद्रक – चित्रशाळा प्रेस, पुणे. अंकात १० पृष्ठे. १०·८ × ८·८. काल – ? १९२६ – १९२८.

उद्देश – खिस्ती मताचे, राजकीय, सामाजिक आणि धार्मिक विषयावर चर्चा करणारे. स्वरूप – इंग्रजी–मराठी.

विशेष माहिती – ए फॉर्टनाइट्ली जर्नल डीलिंग विथ पोलिटिकल, सोशल अँड रिलिजस मॅटर्स. प्रकाशन दर महिन्याच्या ५ व २० या तारखांना. माहिती वर्ष २ व ४ ची.

[ बाधवसग्रह ]

वर्ष २ – अंक ... (१९ - २०) दिनाक ५ व २० आगस्ट १९२७ ...

वर्ष ४ – अंक ... ८ (? ४) दिनाक २० डिसेंबर १९२८ —.

## मोटर

पाक्षिक : प्रकाशक – पुणे. काल – १९४६–१९४८.

— सरकारी यादी १९४६–४७, १९४७-४८.

## म्युनिसिपल कामगार

पाक्षिक : प्रकाशक – पुणे. काल – १९५० - १९५१.

— सरकारी यादी १९४९–५०, १९५० - ५१.

## यशस्वी सहायक

पाक्षिक : प्रकाशक – पुणे. काल – १९४९ - १९५०.

— सरकारी यादी १९४९ - ५०.

## योगमाला

मासिक : संपादक – 'कुंडली विज्ञान' कर्ते विष्णु गोपाळ नवाथे. प्रकाशक – महाड ? काल – १९१३ – १९२१ चे दरम्यान.

—(उल्लेख) वा. द. सातोस्कर, 'मराठी मासिकांची बखर' – लेखमाला, लेखांक ११ 'अमृत' डिसेंबर १९५९ पृ. २२१.

## रंजनमाला

द्वैमासिक : प्रकाशक – कोल्हापूर. वा. व. रु. १·४ (वर्षातील सहा पुष्पांची). काल – १९२७.

उद्देश – शीण ल्यास नेऊन ज्ञानदानाबरोबर रंजन. कोल्हापूर भारत कविमंडळाची नवी माला.

— (पोच, अभिप्राय) 'श्रीदासबोध' वर्ष १ अंक १२ पौष श. १८४९; (पोच) 'सद्विचार' वर्ष ६ अंक ३ डिसेंबर १९२७.

## रत्नमाला

**मासिक :** प्रकाशक – मुंबई प्रथमांक – अक्टोबर १९१७ पूर्वी.

**विशेष माहिती** – " अंक पहिला नवीन मासिक पुस्तक मुंबईस निघते. अभिप्राय इतक्यात देता येत नाही. "

— (पोच) " श्रीसरस्वतीमंदिर " वर्ष ७ अंक ४ आश्विन श १८२९ (अक्टोबर १९१७) पृ १२

## रत्नाकर*

**पाक्षिक** प्रकाशक – रत्नागिरी काल – १९५० – १९५१

— सरकारी यादी १९५० – ५१.

## रागिणी

**पुष्पे (माला) :** संपादक – रत्नप्रभा रणदिवे (वर्ष २ अंक ४ पर्यंत) प्रकाशक – शांताराम नारायण खापले, मुंबई फु अ पुष्प चार ८६ ते ८१२ १० ३ × ८·२ प्रथमांक – (? दिवाळी १९४३) (पुष्पे क्रमवार)

**विशेष माहिती** – नामवंत साहित्यिकांचे दिग्दर्शन लाभलेली पुष्पमाला म्हणून वानगीदाखल नोंदली आहे वर्ष २ अंक २ व ३ यांचा क्रम व काल ग्राहकाने काळजीपूर्वक लिहून ठेवलेल्या पैवस्ती वरून (= पोच तारखेवरून) अनुमानिला आहे प्रकाशकांनी आपल्यावर कोणतेही बंधन घालून घेतलेले नसले, तथापि उद्देश हुमाही (वर्षाचे सहा अंक) प्रसिद्ध करण्याचा दिसतो वर्षारंभ दिवाळी धरून वर्षांक दिले आहेत संपादकांचा सल्ला – " ज्योत्स्नेचे भूतपूर्व संपादक श्री वा रा ढवळे यांचा 'रागिणी'च्या संपादन कार्यात आम्हाला यापुढे जरूर तो सल्ला मिळणार असल्यामुळे रागिणीचा वाङ्मयीन दर्जा उच्च रातील याबद्दल आम्हास संपूर्ण विश्वास वाटतो. " – पुष्प ५ मधील प्रकाशकीय निवेदन.

[ मुमग्र ]

वर्ष १ – अंक दिवाळी पुष्प (? १९४३), २, ३, ४, ५ (फक्त पुष्पक्रमांक, कालनिर्देश नाही)

वर्ष २ – अंक (१) दिवाळी १९४४, २, ३, ४, ५ मार्च १९४५, ६ मे १९४५, ७ जु ४५, ८ अक्टोबर १९४५ (अंक २ व ३ यावर क्रमांक व काल नाही अंक ४ वर फक्त क्रमांक)

वर्ष ३ – अंक (१) दिवाळी १९४५—.

## राजमार्ग

**मासिक :** प्रथमांक – ८ अक्टोबर १८८५ पूर्वी

**उद्देश** – ख्रिस्ती मताचे

**विशेष माहिती** – मराठी पत्रव्यवहाराचा पत्ता – सुमंत विष्णू करमरकर ('पवित्रता प्रचारक मंडळी') प्रथम दोन तीन अंक निघून बंद पडले नंतर पुनरुज्जीवन होऊन एप्रिल १८८६ पासून पुन्हा निघू लागले दरमहा पहिल्या तारखेस प्रसिद्ध होते

— (पोच) 'ज्ञानोदय' दि ८ अक्टोबर १८८५, (उल्लेख) 'ज्ञानोदय' दि १४ जानेवारी व २९ एप्रिल १८८६, पृ २६७

## राजमार्ग

**मासिक पुस्तक** संपादक – (सहीवार) दत्तात्रय कृष्ण दामले प्रकाशक – एलिचपूर (वऱ्हाड) मुद्रक – सर्वकाम प्रेस, एलिचपूर छावणी वा व रु ०८६ ट ह सह आगाऊ अकात २४ पृष्ठे काल – (१८९९ !)

**उद्देश** – चारी पुरुषार्थ ज्या मार्गाने साधतील तोच राजमार्ग

—'जळगाव मराठी पत्रकार परिषद स्मृतिपुष्प, १९६५, पृ. ९२.

## वंजारीसमाचार

मासिक : संपादक – शंकर गबाजी फेकाणे. काल – १९२१-१९२२.

उद्देश – धार्मिक, आरोग्यविषयक, राजकीय सुधारणेचा ऊहापोह.

—(पोच) 'नामदेव' वर्ष १० अंक ३ श्रावण श. १८४३, पृ. ६७.

## वणी जनपदसभापत्रिका

मासिक : प्रकाशक – वणी (यवतमाळ). काल – १९४८.

उद्देश – जनपदसभेचे.

—रजिस्ट्रार रिपोर्ट १९५८.

## वाग्देवी

मासिक : प्रथमांक –(जून १९०७).

—(सहाव्या अंकाची – नवंबर १९०७ – पोच) 'समालोचक' वर्ष १ अंक ७ संवत १९६४ मार्गशीर्ष (डिसेंबर १९०७), पृ. १६८.

## वारकरी

पाक्षिक वर्तमानपत्र : प्रकाशक – पंढरपूर. काल – १९२५.

—(जाहिरात) 'लोकमित्र' वर्ष ३५ अंक ६ डिसेंबर १९२५, मलपृष्ठ २.

## वारांगना

मासिक : संपादक – खानदेशातील इतिहास-संशोधक द. ग. काळे. प्रकाशक – कु. चंपावती व कु.हंपेच्या (वेश्यासमाजातील सुशिक्षित भगिनी). काल – (१९३५ - ३६).

उद्देश – वेश्यावर्गाची उन्नती व त्या वर्गामध्ये शिक्षणप्रसार याकरिता पहिलाच प्रयत्न.

—(उल्लेख) 'जळगाव मराठी पत्रकार परिषद स्मृतिपुष्प' मार्च १९६५, पृ. ९०.

## विकास*

मासिक : संपादक – वा. कृ. मावे. अमळनेर. वा. व. रु. १॥२. काल – मार्च १९२८.

उद्देश – विद्यार्थ्यांना उपयुक्त मासिक – 'स्मृतिपुष्प'. स्वरूप – कविता, गुरुदक्षिणा हा लेख, व इतर रंजक साहित्य – 'काव्यरत्नावली.'

विशेष माहिती – (१) 'काव्यरत्नावली' – "मुलांकरिता 'सुमन' (१९२३) मासिक काढून काही काळ 'बालवसंत' (१९२७) चे संचालक बनून आता माव्यांनी 'विकासा'स सुरुवात केली आहे." (२) 'स्मृतिपुष्प'– "(मासिक) सुमारे तीन चार वर्षे चालले. श्री. मावे यांनी 'नागरिक' साप्ताहिक देखील काढले. पण छापखाना बंद पडल्याने दोन्ही बंद पडली."

—१ (पोच) 'काव्यरत्नावली' मार्च १९२८, पृ. २९; २ (उल्लेख) 'जळगाव मराठी पत्रकार परिषद, स्मृतिपुष्प' १९६५, पृ. ८९.

## विकास

मासिक : प्रकाशक – उमरावती. काल – (१९३४?).

—"नागपुरात निघणाऱ्या मासिकाशी बरोबरी करू शकणार नाही" गो. गो. अधिकारी यांचा

छेद – " १९३४ तील साहित्य समालोचन, " 'महाराष्ट्रशारदा' वर्ष १ अंक १ जानेवारी १९३५, पृ. ५९; गो. गो. अधिकारी – " साहित्य समालोचन १९३५ ", पृ. ३५.

## विचार दर्पण

मासिक : प्रकाशक – मुंबई. मुद्रक – एल्. एम्. डिसोझा यांचा छापखाना. बा. व. रु. १८४. फु. अं. ८३. प्रथमांक – ( जानेवारी १८६० ).

उद्देश – क्षत्री विद्यार्थ्यांच्या सभेचे. क्षत्री ज्ञातीची सुधारणा. स्वरूप – इंग्रजी व मराठी.

— पहिले मुद्रित शतीपत्र – ' मराठी ग्रंथ मुद्रित ' १९६१ क्र. ५१३, पृ. ८८-८९.

## विचार लहरी

पाक्षिक : मुद्रक – ज्ञानप्रकाश छापखाना. बा. व. रु. १८८. फु. अं. ८२. अंकात ८ पृष्ठे. काल – १८५२.

उद्देश – " मुख्यत्वेकरून ख्रिस्ती मताच्या खंडनाची साहित्ये घेतली जातील. "

—( उल्लेख ) ' ज्ञानोदय ' दि. २ ऑगस्ट १८५२.

## विचारी

दशाहिक : प्रकाशक – धारवार. काल – १९४६–१९४८.

स्वरूप – मराठी–कन्नड–इंग्रजी.

—सरकारी यादी १९४६–४७, १९४७–४८.

## विटाळ विध्वंसक

मासिक : संपादक – गोपाळ बाबा वालंगकर. प्रकाशक – पुणे. काल – १८८८.

—'दलितांची वृत्तपत्रे' परिशिष्ट ५ क्रम ३.

## विद्याप्रसार*

पाक्षिक : संपादक – रामचंद्र पांडुरंग वैद्य; काही काळ दत्तात्रय व्यंकटेश पै. प्रकाशक – संस्थेचे चिटणीस–सीताराम विश्वंभर केरकर, फोंडे, गो. बा. व. रु. १. काल १९१५–१९२१.

स्वरूप – शिक्षणविषयक व समाजविषयक लेख. आरंभी आकार मोठा, पुढे लहान.

विशेष माहिती – ' लीग द प्रोपागाद द इंस्त्रुसाव ' या शिक्षणप्रचारक संस्थेचे मुखपत्र. ' प्राची प्रभा ' मासिकाची पाक्षिक पुरवणी. पाच वर्षे चालून १९२१ साली बंद पडले.

—' गोमंतकीय नियतकालिके ' पृ. ४३.

## विद्याभिलाषी

मासिक : प्रकाशक – हडी, ता. मालवण ( रत्नागिरी ). बा. व. रु. १०९. अंकात ४० पृष्ठे. डेमी १२ पत्री. काल – १८९७.

विशेष माहिती – पत्ता – मॅनेजर, ग्रंथप्रसारक विद्याभिलाषी मंडळी. एप्रिल १८९७ त सुरू होणार. १५ फेब्रुवारीच्या आत ग्राहकांच्या पाठविणारास १ रु. ची निळी काळी शाई बक्षीस. मासिक नापसंत पडल्यास वर्गणीचा पैसा परत देऊत.

—( जाहिरात ) 'मराठी शालापत्रक' वर्ष ८ अंक ३ मार्च १८९७ मलपृष्ठ २.

## विनोद

पाक्षिक : प्रकाशक – बेळगाव, बा. व. रु. ०१० द. ह. छह. काल – १९०९–१९१०.

स्वरूप – चटकदार. थाट बोधपर गोष्टी,

मनोरंजक कादंबऱ्या, हास्यकारक चुटके, कूटप्रश्न, बातम्या, वगैरे इ.

—प्रत्येक मंगळवारी प्रसिद्ध होते.

—( जाहिरात ) 'लोकमित्र' वर्ष १९ अंक ५ नवंबर १९०९ मलपृष्ठ २; ( जाहिरात ) 'वीरशैव संजीविनी' वर्ष १ अंक १ अश्विन श. १८३१, मलपृष्ठ २.

## विवाह

**पाक्षिक :** प्रकाशक – इंदूर. वा. व. रु. ८१२ नागपुरात; इतर ठिकाणी १८२. काळ – १९३७ - १९३८.

**उद्देश** – नागपूर 'हिंदु विवाहमंडळ संस्थेचे'. निघालेल्याच्या सामाजिक प्रश्नाला वाहिलेले.

— पत्ता – दा. दि. परांजपे, बी. ए., हिंदुविवाह मंडळ, १४ नंदलालपुरा, इंदूर शहर.

—( जाहिरात ) 'माळव साहित्य' मासिक वर्ष १ अंक ४ दि. १५ डिसेंबर १९३७, मलपृष्ठ तीन जवळ.

## विविधकलाविस्तार

**मासिक :** प्रकाशक – बडोदे. प्रथमांक – मार्च १८८५ पूर्वी. ( पुस्तक - अंक ).

**उद्देश** – कलाकौशल्याचे विवेचन. स्वरूप – प्रत्येक विषयास निराळा पृष्ठानुक्रम. एकेका विषयाला फक्त एखाद दुसरेच पान !

— (नवीन पुस्तके, पहिल्या अंकाची पोच ) 'विविधज्ञान-विस्तार' वर्ष १७ अंक ३ मार्च १८८५, मलपृष्ठ ३.

## विविधग्रंथसंग्रह+

**मासिक :** मुद्रक – एज्युकेशन सोसायटीचा छापखाना, मुंबई. पृ. सं. ८२ (फक्त वर्गणीदाराकरिता ).

**विशेष माहिती** – ( वर्ष २ अंक ५ मे १८८७, मलपृष्ठ ४ वरील विस्तृत निवेदन ) – "पुढील अंकापासून कृष्णभट्ट पाठकलिकृत कथाकल्पतरु व महिपतिकृत कथासारामृत छापण्याचे योजिले आहे." अंकातील स्वतंत्र विनतीपत्र पृ. ३ – "सन १८८८ च्या ज्यानुआरीपासून प्रत्येक अंकात ४० पृष्ठे यावी व त्यांतून काही अधिक विषय, उपयुक्त विषयावर निबंध, वेचे, कविता वगैरेही यावी असा विचार आहे."

## विविधज्ञानसंग्रह

**मासिक :** प्रकाशक – सोलापूर. काळ – ( १८८५ –१९०० ).

— 'सोलापूर समाचार' चा ज्युबिली अंक, १४ जानेवारी १९३६, 'साहित्य विस्तार' पृ. ९८.

## विवेक

**मासिक :** प्रकाशक – विजापूर. वा. व. रु. २॥८. काळ – मे, जून १९२१.

**स्वरूप** – विद्यार्थ्यांच्या उन्नतिपर लेख, कविता इ.

—( स्वीकार सत्कार ) 'लोकमित्र' वर्ष २१ अंक ३ सप्टेंबर १९२१; 'मधुकर' वर्ष ९ ( १९२१ ).

## विवेकवादी

**द्विमासिक पुस्तक :** संपादक – ( सही. कर ) विठ्ठल गणेश प्रधान. प्रकाशक – नागपूर. वा. व. रु. २॥८ ट. ह. सह; आगाऊ रु. २.

अंकात ४८ पृष्ठे. ९·६ × ६·५. प्रथमांक — श्रीकृष्ण जन्माष्टमी = ९ आगस्ट १९१७.

स्वरूप — प्रचलित विषयावर संपादकीय व इतरांचे विवेकवादी लेख.

विशेष माहिती — प्रथम दोन अंकांचे भाग — क्रमशः ( १ ) विवेकवाद, ( २ ) मोकळ्या मनाचा धर्म. प्रत्येकाची पृष्ठे निराळी. स्वतंत्र बांधण्याचे सोयीकरता. संपादकाचा पत्ता — क्रॅडॉक टाऊन, नागपूर.

—( जाहिरात दि. २२ मे १९१७ ची ) 'भारत सेवक' पुणे वर्ष २ अंक ५ मे १९१७ पृ. २३४.

## विवेचक

त्रैमासिक : काल - १९०१.

उद्देश — इंडियन ख्रिश्चन असोसिएशनचे.

विशेष माहिती—"असोसिएशनने १८९८त ल्हानसे जाहीरातपत्रक सुरू केले. १८९९ त सभासदांसाठी मासिक पत्र झाले. १९०० त त्रैमासिक इंग्रजी व मराठी भारात मोठ्या आकाराचे पत्र निघाले व १९०१ त ते 'विवेचक' या नामाने दोन महिन्यातून एकदा असे निघू लागले."

— ( वर्णन ), 'ज्ञानोदय' ८ आगस्ट १९०१.

## विशाल भारत

पाक्षिक : वा. व. रु. ३-८६. काल — १९५० - १९५१.

उद्देश — राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय घडामोडींचे तर्कशुद्ध विवेचन करणारे. स्वरूप — लघुकथा, कविता, साहित्यचर्चा व इतर खुसखुशीत साहित्य.

— ( जाहिरात ) 'सुषमा' खंड ४ भाग ३ मार्च १९५०, पृ. १४८.

## विश्वकर्मा विजय

मासिक : संपादक व प्रकाशक — पु. बा. कुळकर्णी, मुंबई. प्रकाशन — मुंबई. मुद्रक — बॉम्बे सेंट्रल प्रेस. वा. व. रु. ५, आजीव सभासद वर्गणी रु. १००. पृ. अं. ८८. अंकात ४४ ते ४८ पृष्ठे. प्रथमांक — २० अक्टोबर १९५०. पुढे चालू १९५२.

उद्देश — कला व जीवन यांच्या सर्वांगीण उन्नतीस वाहिलेले. स्वरूप - कथा, कविता, समाजहितपर लेख, निबंध, शिक्षणविषयक चर्चा. विश्वकर्मा कुलदीपक चरित्रमाला, चरित्र-परिचय, स्त्रीजीवनविषयक लेख, लघुकथा, कारागीर वर्गासंबधीचे लेख, समाजोन्नती व समाज-विषयक चळवळी, विविध विषयावरील निबंध, साहित्यसमाचार, संस्थापरिचय, पत्रव्यवहार, विश्वकर्मा पंचाळ समाजातील विविध हालचाली.

— १९५१ - १९५२ च्या मिळालेल्या अंकांवरून माहिती.

[ दमडेरे संग्रह, मुंबई ]

## विसावे शतक

मासिक : प्रकाशक — फडणीस मंडळी, जळगाव. मुद्रक — निर्णयसागर छा. मुंबई. वा. व. रु. १-८४. अंकात १६ पृष्ठे. सुपररॉयल १६ पत्री. काल — १९०२.

स्वरूप — चरित्रे, राजकीय व सामाजिक चर्चा, व्याख्याने, नवीन निघालेल्या कल्पना.

— काही अंक निघाले.

— ( उल्लेख ) साल अखेर, 'काव्य रत्नावली' वर्ष १६ डिसेंबर १९०४; ( जाहिरात ) 'कलाशिक्षण' वर्ष १ अंक ४ नवंबर १९०२, मलपृष्ठ २.

## विज्ञापक

मासिक : काल — १९२७–२८.

—(पौष) 'श्रीदासबोध' वर्ष १ अंक १२ पौष श. १८४९.

## वीरपत्नी

मासिक : संपादक – बाळाजी के. रघुनाथ. प्रकाशक – मुंबई. काल – १८८१.

—'अर्वाचीन मराठी वाङ्मय' – ग. र. दंडवते, पृ. ५४.

## वीरशैव

पाक्षिक : संपादक – राम शंभू पुराणिक. प्रकाशक – दारव्हा. काल – १९२३.

— एकूण तीन अंक निघाले असा संदर्भ मिळतो.

— (उल्लेख) 'ज्ञानप्रसाद' वर्ष ६ अंक ३ मार्च १९६७, पृ. १४ - १५.

## वीरशैव केसरी

पाक्षिक : (चालक) – रामलिंग स्वामी महाराज करमाळेकर, स्वामीमहाराज पराडकर, बामणगावकर. प्रकाशक – पुणे. प्रथमांक – आगस्ट १९२९ (नागपंचमी श. १८५१).

—(उल्लेख व गौरव) 'शिक्षण प्रकाश' वर्ष १० अंक १ नवंबर १९२९, पृ. ४ व १३.

## वेददर्शन

मासिक : संपादक – गणेशशास्त्री पाठक. प्रकाशक – पारोळे. मुद्रक – मुंबई. काळ – १९२१.

—शतपथ ब्राह्मणाचे १४ कांड प्रसिद्ध झाले.

—'जळगाव मराठी पत्रकार परिषद स्मृति-पुष्प' १९६५, पृ. ९०.

## वेदांतसमूह

मासिक : संपादक – वासुदेव शिवराम जोशी. प्रकाशक – पुणे. काल – १८७८.

—'अर्वाचीन मराठी वाङ्मय' – ग. रं. दंडवते, पृष्ठ ५४.

## वैद्यक मांत्रिकार्णव (व?)

मासिक : प्रकाशक – सोलापूर. काल – १८८५ - १९००.

—(उल्लेख) 'सोलापूर समाचार' चा ज्युबिली अंक, १४ जानेवारी १९३६, 'साहित्य-विस्तार' पृ. ९८.

## वैद्यक-संग्रह

मासिक : काल – जुलै १८७८ पूर्वी.

—(उल्लेख) चिपळूणकरकृत 'निबंधमाला' निबंध ४९, परिच्छेद १ – चित्रशाळा आवृत्ती १९२६, पृ. ४६२.

## वैभव

पाक्षिक : (अनियमित). प्रकाशक – मुंबई. काल – १९४७ - १९५१.

— सरकारी यादी १९४७ - ४८ ते १९५०–५१.

## वैभव

मासिक : संपादक – द. चि. केळकर, सेक्रेटरी,

महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स, मुंबई. प्रकाशक – सेक्रेटरी, म. चें. ऑफ कॉमर्स, मुंबई. मुद्रक – अत्रे प्रिंटिंग प्रेस, मुंबई. वा. व. रु. ५. फु.अं. ८८. अंकात पृष्ठे ३२. रॉयल अष्टपत्री. प्रथमांक – ( वर्ष १७ ) अक्टोबर १९५०. पुढे चालू १९६७.

**उद्देश** – परस्पर विचार-विनिमय, व्यापार-उद्योगविषयक माहिती पुरविणे, सबंधित कायदे-कानूंची माहिती देणे इ. स्वरूप – मराठी व प्रसंगवशात् इंग्रजी.

**विशेष माहिती** – महाराष्ट्र चेंबर ऑफ् कॉमर्सच्या ' मासिक मुखपत्रा ' चे ( पाहा वर्णन-विभाग पृ. २३० ) नवे स्वरूप व नवे नाव ' वैभव '. वर्षगणना 'मासिक मुखपत्रा'चीच पुढे चालू ठेविली.

[ कचेरी मुंबई ]

**वर्ष १७**– अंक १ आक्टोबर १९५० ते ३ डिसेंबर १९५०...

## वैश्य पत्रिका

**मासिक :** प्रकाशक – मुंबई. काल – १९४६-१९५१.

—सरकारी यादी १९४६ - ४७ ते १९५०-५१.

## व्यापार-उदीम*

**मासिक :** संपादक – ( धनुर्धारी = रामचंद्र विनायक टिकेकर ). प्रकाशक – सोलापूर. काल – ( १८८५ - १९०४ ? )

—' सोलापूर समाचार ' चा ज्युबिली अंक, १४ जानेवारी १९३६, ' साहित्य विस्तार ' पृ. ९८; रा. गो. कानडे – ' मराठी नियतकालिकांचा इतिहास ' पृ. १६६; याच नावाच्या एका मासिकाची जाहिरात ' ज्ञानोदय ' दि. १ डिसेंबर १९०४ च्या अंकात आहे. वा. व. रु. २. पत्ता – व्यवस्थापक, बंगला नं. १९९, स्टेशन नजीक, पुणे.

## व्यापारी महाराष्ट्र

**मासिक :** प्रकाशक – पुणे. काल – १९३८.

**उद्देश** – व्यापार व उद्योग याचे.

— रजिस्ट्रार रिपोर्ट १९५८.

## व्यापारी महाराष्ट्र

**पाक्षिक :** वा. व. रु. ६. ट. ख. सह. काल – १९४६ - १९५१.

**उद्देश** – व्यापारी, कारखानदार यांना लागणारी माहिती देणारे.

— पत्ता – ३४, बुधवार, पुणे २.

— ( जाहिरात ) ' सुषमा ' खंड ४ भाग ३ मार्च १९५०, पृष्ठ ११६; सरकारी यादी १९४६ - ४७ ते १९५० - ५१.

## शब्दकूटतज्ज्ञ

**पाक्षिक :** प्रकाशक – ठाणे. काल – १९४९-१९५०.

— सरकारी यादी १९४९ - ५०.

## शशिकला

**मासिक पुस्तक :** प्रकाशक – ( मुंबई ). काल – १८८५.

— ( नवीन पुस्तके ) ' विविधज्ञानविस्तार ' वर्ष १७ अंक ११ नवंबर १८८५ मलपृष्ठ ३.

## शांतिदूत

पाक्षिक : संपादक – रे. पिताजी जे. एस. मिराडा. प्रकाशक – रमेदी चर्च, वसई ( ठाणे ). मुद्रक – न्यू भारत प्रिं.प्रेस, मुंबई. वा. व. रु. ३८८. फु. अं. ८२. अंकात ८ पृष्ठे. १३'४ X ८'८. प्रथमांक – २५ डिसेंबर १९४८.

उद्देश – रोमन कॅथॉलिक पंथाचे पहिलेच मराठी नियतकालिक. मुख्यत्वे धार्मिक. स्वरूप – धार्मिक विषयांशिवाय संकीर्ण वाङ्मय, नाटके, खिस्त पुराणातील उतारे, राजकीय बातम्या, महारमार्गीची शिकवण, उद्योगधंद्यांची माहिती.

— गोमंतकीय कॅथॉलिक समाज मराठीला आचवला होता.'

[ जाधवसंग्रह ]

वर्ष १ – अंक १ दि. २५ डिसेंबर १९४८ ते ७ दि. २५ मार्च १९४९ —.

## शांतिनिकेतन

त्रैमासिक : प्रकाशक – ना. ब. चव्हाण, पुणे. वा. व. रु. ३८८. फु. अं. रु. १. काल – १९२४ – १९२५. ( किरण–कला ).

उद्देश – कविरत्न रवीन्द्रनाथ टागोर यांच्या नवजीवनवादी वाङ्मयाचा मराठीत प्रसार करणारे. स्वरूप – टागोरांच्या लेखांचा मराठी अनुवाद, प्रथम महर्षी देवेंद्रनाथ टागोर यांचे चरित्र, ' रवींद्रांचा ऐक्य मार्ग ' निबंध, ' वाचक हृदय प्रार्थना ' काव्य, ' शान्तिनिकेतनमालेतील ' दहा व ' रवींद्रकिरणविहारा ' तील चार विषय व ' मत्तवाणी ' यांचा अनुवाद – निमा भाग आपटे ( वा. गो. ) यांनीच केलेले अनुवाद.

—आत्मिक उन्नतीचा मार्गदर्शक असा चवथा अंक, धगमापात्रोविद वा. गो आपटे यांच्या नेतृत्वाखाली प्रसिद्ध झाला.

—( पोच ) ' समाजसेवक ' वर्ष ४ अंक ७ फेब्रुवारी १९२४, पृ. २९९ व वर्ष ६ अंक (२-३) सप्टेंबर - अक्टोबर १९२५, पृ. ९२, (जाहिरात) ' अरुणमाला ' वर्ष १ अंक ३ सप्टेंबर १९२४ मलपृष्ठ ३; ( अभिप्राय ) ' मराठी शिक्षक ' वर्ष १३ अंक ११ फेब्रुवारी १९२४, पृ. ३६१.

## शास्त्र व कला

मासिक : संपादक – ( कर्ते ) शिवराम गोविंद फाळके. काल – १८९९.

—( पोच ) ' बालांकुर ' बडोदे वर्ष ६ अंक १२ जुलै १८९९.

## शिपाई

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४८ - १९५१.

— सरकारी यादी १९४८ - ४९ ते १९५०–५१.

## शिवाजी

पाक्षिक : प्रकाशक – शंकर त्र्यंबक भावठे, पुणे. मुद्रक – शिवाजी मुद्रामंदिर, पुणे शहर. वा. व. रु. २८८ आगाऊ. प्रथमांक – (१ वर्षप्रतिपदा) श. १८४३ ( एप्रिल १९२१ ).

उद्देश – भागवद्धर्मी राष्ट्रीय मराठ्यांचे पाक्षिक.

— वर्षप्रतिपदेपासून सुरू होणार.

— ( जाहिरात ) ' केसरी ' २५ जानेवारी १९२१.

## शिक्षक मित्र*

मासिक : प्रथमांक – मार्गशीर्ष श. १८११ पूर्वी. ( पुस्तक-अंक ).

— (पुस्तक १ अंक २ ची पोच) 'केरळ-कोकिळ' वर्ष ३ अंक २ मार्गशीर्ष श. १८११ (१८८९).

## शेत, शेतकी आणि शेतकरी

पाक्षिक : संपादक – धनुर्धारी ( = रामचंद्र विनायक टिकेकर.) प्रकाशक – सोलापूर. काल – (१८८५ - १९००).

— 'सोलापूर समाचार' चा ज्युबिली अंक १४ जानेवारी १९३६, 'साहित्य-विस्तार' पृ. ९८; रा. गो. कानडे–'मराठी नियतकालिकांचा इतिहास' पृ. १६६. याच नावाच्या (अन्य) पाक्षिकाच्या दोन अंकांची पोच 'ज्ञानोदय' दि. २० अक्टोबर १९०४ मध्ये आहे. त्याची वार्षिक वर्गणी ट. ह. सह रु. १८८ व पत्ता – बंगला न. १९९, रेल्वे स्टेशनानजिक पुणे.

## शेतकी

त्रैमासिक : संपादक–काशीनाथ महादेव थत्ते. प्रकाशक – पुणे. काल – १८७६.

— ग. र. दंडवते – 'अर्वाचीन मराठी वाङ्मय', पृ ५४.

## श्रीमती

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४९ - १९५१.

— सरकारी यादी १९४९ – १९५०, १९५० – ५१.

## संगीत नाट्यमालिका

मासिक : संपादक – (सरकारी नोंद) पारलिंग प्रभुअय्या. प्रकाशक – दत्तो बाबाजी जोशी, शार्दी. मुद्रक – प्रबोधरत्न प्रेस. फु. अं. ८२. अंकात २४ पृष्ठे. रॉयल अष्टपत्री. काल – १८८८.

— यात 'संगीत वासंतिक नाटका' चा काही भाग प्रसिद्ध झाला.

— (दाते, सरकारी यादीवरून).

## संगीतामृतप्रवाह

मासिक : संपादक – पं. विष्णु दिगंबर पलुस्कर. प्रकाशक – लाहोर. काल – (१९०१ –१९२०).

उद्देश – गांधर्व महाविद्यालयाचे.

— (संपादकीय) 'संगीतकलाविहार' वर्ष २ अंक १ डिसेंबर १९४८ पृ. १.

## संग्राम

पाक्षिक : संपादक – व्ही. एम्. शेटे, वकील प्रकाशक – मोमिनाबाद. काल – १९४२.

— 'ज्ञानप्रसाद' वर्ष ६ अंक ३ मार्च १९६७, पृ. १४ - १५.

## सचित्र विवेक

मासिक : प्रकाशक – विजापूर. वा. व. रु. २८८. काल – (मार्च १९२१).

— "बक्षीस पुस्तकासह मार्च महिन्याचा अंक एप्रिल २० पासून रवाना होईल."

— (जाहिरात) 'केसरी', १२ एप्रिल १९२१, पृ. १.

## सच्छास्त्रप्रदीपक

मासिक : संपादक – विल्यम सी. अर्व्हिन, (रजेच्या वेळी – ए. इ. स्टॉरी, शंकर बळवंत

कुलकर्णी). प्रकाशक – संपादक, खानापूर ( बेळगाव, म्हैसूर ? ). मुद्रक – बेळगाव समाचार प्रेस. वा. व. रु. १. अंकात ८ पृष्ठे. ८·२ × ५·५. प्रथमांक – (जून १९०७). पुढे चालू १९६३.

स्वरुप – ख्रिस्ती मताचे.

विशेष माहिती – माहिती वर्ष ३३ अंक १, २ ( अक्टोबर, नवंबर १९५१ ) व वर्ष ४४ अंक १२ ( अक्टोबर १९६३ शेवटचा ) यावरून. वर्ष ३१ पासून संपादक – आर. सी. इ. ॲट्‌किन्सन, बेळगाव.

[ आचवसंग्रह ]

वर्ष १ ते ३० – जून १९०७ ते १९३७ पर्यंत एकतीस वर्षे चालून संपादकाच्या म्हातारपणामुळे व दुसरा कोणी चालविण्यास न मिळाल्यामुळे बंद पडले. अकरा वर्षांनतर पुनरुज्जीवन १९४९.

वर्ष ३१ ते ४४ – १९४९ पासून (ते १९६३ अक्टोबर ) नव्या संपादकांनी १४ वर्षे चालविले.

## संजय*

मासिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४९.

स्वरूप – वाङ्मयीन व सांस्कृतिक.

— रजिस्ट्रार रिपोर्ट १९५८.

## संजीवन*

मासिक : प्रकाशक – नागपूर. वा. व. रु. ३८६. अंकात ३२ पृष्ठे. प्रथमांक –( मकरसंक्रमण १४ जानेवारी १९२१ ).

स्वरूप – (नागपूर) प्रांतातील थोर पुरुषांची चरित्रे, धार्मिक, सामाजिक, गोरक्षण व इतर प्रचलित विषयांवर लेख, प्राचीन व अर्वाचीन पद्धतींच्या कविता.

— ( जाहिरात ) ' केसरी ' ४ जानेवारी १९२१, पृ. १.

## संजीवनी प्रकाश*

मासिक : प्रकाशक – वेंगुर्ले. काल – १९४६ - १९५०.

— सरकारी यादी १९४६ – ४७ ते १९४९–५०.

## सत्यप्रकाश*

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. वा. व. रु. ८४ आगाऊ, ८८ मागाहून. फु. अं. ८८३. अंकात ४ पृष्ठे. अष्टपत्री ( ? ). प्रथमांक – पहिला आठवडा, सप्टंबर १८७७.

उद्देश – ( इस्राएली पंथाचे ? )

विशेष माहिती – " हे पत्र येथील (मुंबई) बेनी इस्राएल लोकांपैकी कित्येक सुशिक्षित काढतात. पहिल्या पृष्ठावर शिरोभागी इब्री लिपीत ' ओरेअमेथ ' असून खाली मराठी त्याच अर्थाचे ' सत्यप्रकाश ' हे नाव आहे. " मॅनेजर, हाईम शामोएल केहीमकर, ९२ रास्ता पेठ, पुणे.

—( १ ) उल्लेख ' ज्ञानोदय ' २० सप्टंबर १८७७ व जून १८७९. ( २ ) जोशी, लेले – ' वृत्तपत्रांचा इतिहास ' भाग १ परिशिष्ट, पृ. ५५७.

## सत्यवादी

पाक्षिक : संपादक – ( सहीकर्ते ) रेव्हरंड बाबा पदमनजी. प्रकाशक – ग्रांट रोड, मुंबई. वा.व. रु. १. अंकात ८ पृष्ठे.'ज्ञानोदया'एवढी. प्रथमांक – १५ फेब्रुवारी १८८२.

उद्देश – " हे ख्रिस्ती व इतर लोकांसाठी काढले आहे. " स्वरूप – " निवळ धर्ममतांची मरवी विशेष येथे आणार नाही, "

—यात ' पश्चिम महाराष्ट्र देशातील ख्रिस्ती मंडळी ' हा निबंध.

—( जाहिरात ) ' ज्ञानोदय' २६ जानेवारी १८८२; (पोच) ' ज्ञानोदय ' १६ मार्च १८८२.

## सत्यव्रत

मासिक पत्रक : प्रकाशक – 'खानदेशमित्र'-कर्वे, प्रकाशे ( खानदेश ). फु. अं. ८३ ट. स. देऊन पुकट. प्रथमांक – ( १ आगस्ट १८९२ ).

—" आगस्ट १८९२ पासून निघेल. "

—(जाहिरात) ' खरा प्रकार ' वर्ष २ अंक ९ डिसेंबर १८९१ ( प्रकाशन जुलै १८९२ ).

## सद्धर्म

मासिक : संपादक – हिराखाव जिनदास चवडे. प्रकाशक – नागपूर. मुद्रक – जैन साहित्य प्रेस, नागपूर. वा. व. रु. ३ ८८. अंकात ३२ पृष्ठे डेमी अष्टपत्री. प्रथमांक – विजयादशमी श. १८५८ ( अक्टोबर १९३६ ).

उद्देश – समाजसुधारणा. स्वरूप – सचित्र. आर्टपेपरचे मलपृष्ठ. सामाजिक व शैक्षणिक लेख.

—फक्त एकच अंक निघाला.

—संपादकाच्या आजारामुळे अल्पजीवी. [ लिहून आलेली माहिती. ]

## सद्विचार

(साप्ताहिक) / मासिक : प्रकाशक – ग्वाल्हेर.

— ग्वाल्हेरच्या ' सदसद्विचारिणी सभेचे ' सुमारे ८ - १० वर्षे चालले.

—( लेखात उल्लेख ) ' सहविचार ' वर्ष २ अंक १ आगस्ट १९२३, श्री. भास्कर रामचंद्र भालेराव यांचा ' उत्तर हिंदुस्थानातील मराठी साहित्य व साहित्यभक्त ' हा लेख, पृ. १९.

## संध्या

मासिक : संपादक – एम्. एम्. पचवाघ. प्रकाशक – कॅलेंडर प्रेसचे प्रकाशन, मुंबई. वा. व. रु. १ ८८. फु. अं. ८२. काल – १९४० –४१.

स्वरूप – सचित्र. मराठी.

—(जाहिरात) 'ज्योत्स्ना' आगस्ट १९४०, पृ. ३०.

## सन्मार्गप्रकाश

मासिक : प्रकाशक – मुंबई. अंकात १६ पृष्ठे. काल – जुलै १८६९.

स्वरूप – अर्धा भाग मराठी व अर्धा भाग गुजराथी.

—( पोच नवीन पुस्तके ) ' विविधज्ञान-विस्तार' वर्ष २ अंक ८ जुलै १८६९, मलपृष्ठ २.

## सन्मित्र

मासिक : प्रकाशक – बँबे ख्रिश्चन फ्रेंडली युनिअन, मुंबई. मुद्रक – व्हिक्टोरिया प्रिंटिंग प्रेस, मुंबई. प्रथमांक – जानेवारी १८९४.

—( वृत्त ) ' ज्ञानोदय ' ७ डिसेंबर १८९३, (पोच दुसरा अंक) ज्ञानोदय ८ फेब्रुवारी १८९४, ( प्रेसचा उल्लेख ) ज्ञानोदय ५ जुलै १८९४.

## संपदा*

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९५०.

— सरकारी यादी १९५०–५१.

## संभाषिणी

मासिक : काल – जुलै १९०७.

— ( पोच ) 'समालोचक' वर्ष १ अंक ७ मार्गशीर्ष संवत १९६४ ( डिसेंबर १९०७ ), पृ. १६८.

## समाचार

पाक्षिक : प्रकाशक – मिरज. काल – १९५०.

— सरकारी यादी १९५० – ५१

## समाजपत्रिका

पाक्षिक : प्रकाशक – अहमदाबाद. काल – १९४६–१९५०.

— सरकारी यादी १९४६–४७ ते १९४९ – ५०.

## समाजबंधु

मासिक पत्रक : संपादक – डॉ. देवराम गोविंदजी ठाकूर, परळ, मुंबई. प्रकाशक – मुंबई. प्रथमांक – चैत्र शु. १ श १८४९.

उद्देश – जातीजातींमधील बखेडे कमी करून सलोख्याचा प्रयत्न करणे.

—अंदाजाप्रमाणे ग्राहक मिळाल्यास पाक्षिक करणार.

— ( पोच व अभिप्राय ) 'विधायक मासिक' वर्ष १ अंक १२ एप्रिल १९२७ पृ. ६.

## समाजादर्श*

मासिक : संपादक – रामकृष्ण मारुतिराव भागवत. प्रकाशक – अहमदनगर. वा. व. रु. २॥८. अंकात ८० पृष्ठे. प्रथमांक – जुलै १९१६.

स्वरूप – सचित्र. समाजातील अडचणींचे व दोषांचे दर्शन, शिवाय मनोरंजक कादंबऱ्या.

— ( पोच व अभिप्राय ) 'धर्मजागृति' वर्ष ४ अंक २ नवबर १९१६, मलपृष्ठ २.

## समालोचन

मासिक : काल – १९०४–१९०५.

—" गेल्या सालात नवीन मासिक पुस्तकाचा उदय झाल्याचे माहीत नाही. 'रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यूज' प्रमाणे एक 'समालोचन' नावाचे मासिक पुस्तक निघणार होते. "

— ( उल्लेख ) सालअखेर 'ग्रंथमाला' वर्ष ११ अंक १२ मार्च १९०५, पृ. १.

## सम्यक्त्ववर्धक

मासिक : संपादक – शेठ हिराचंद नेमचंद. प्रकाशक – सोलापूर. प्रथमांक – अक्टोबर १९२३.

विशेष माहिती – शेठ हिराचंदांना आपली मते ' ( जैन )बोधका 'तून प्रसिद्ध करावयास योग्य वाव मिळत नाही असे दिसताच त्यांनी सन १९२३ अक्टोबरमध्ये हे मासिक आपल्या धोरणानुसार दोशी हिराचंद मुलचंद ( काका ) यांच्या नावाने सुरू केले. 'जैनबोधका' ला उत्तर देण्याकरता हे दुसरे प्रतिस्पर्धी मासिकच शेठ हिराचंदांनी काढले. – दी. बा. पगुडकर, " दानवीर शेठ हिराचंद नेमचंद " १९६७, पृ १७२.

## सर्जे गोंवा

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४९-१९५१.

स्वरूप – इंग्रजी–कोंकणी.

—सरकारी यादी १९४९ - ५०; १९५०- ५१.

## सल्लागार

पाक्षिक : प्रकाशक — पुणे. काल १९४९ - १९५१.

—सरकारी यादी १९४८ - ५०, १९५० - ५१.

## सहकारी

पाक्षिक : प्रकाशक — रावळगाव. काल — १९५० ५१.

—सरकारी यादी १९५० - ५१.

## सह्याद्रि विमाजगत्

मासिक : प्रकाशक — नासिक. काल — १९४८ - १९५१.

— सरकारी यादी १९४८-४९ ते १९५०-५१.

## सांगली गजानन मिलचा समाचार

मासिक : प्रकाशक — सांगली. काल — १९३९.

—(सामार पोच) 'समर्थ', मुंबई, वर्ष २ अंक १ जानेवारी १९३९, पृ.५४.

## सार्थी

पाक्षिक : प्रकाशक — सावंतवाडी. काल — १९४८ — ४९.

— सरकारी यादी १९४८ — ४९.

## सारथी*

मासिक : संपादक — घोल्प. प्रकाशक — मुंबई. काल — १९२८.

—"दलितांची कृतघ्ने" परिशिष्ट ५नम १९.

## सारस्वत*

मासिक : प्रकाशक — काशी. वा. व. रु. १. काल — १९१०.

उद्देश — सारस्वत ब्राह्मणाच्या संबंधाने माहिती व चर्चा. स्वरूप — मुख्यत्वे हिंदी, जोडीला गुजराथी व मराठी.

— मुंबईतील एजन्ट — जेतली अबाशंकर जगन्नाथजी शर्मा.

—(पोच) 'विविधज्ञानविस्तार' पुस्तक ४१ अंक ३ मार्च १९१० मलपृष्ठ २.

## सार्थ श्रीमद्भागवत

मासिक : प्रकाशक — शेट दामोदर सावळा-राम यंदे, मुंबई. वा. व. रु. ५. वर्षास ८०० पृष्ठे. काल — १९२६.

उद्देश — धार्मिक लोकांसाठी. स्वरूप — श्रीमद्भागवत (मूळ), त्याचा अन्वय, पदच्छेद, टीका व सरळ अर्थ.

—(पोच व अभिप्राय) "अरुणमाला" वर्ष २ अंक ७ मार्च १९२६ पृ.६७.

## साष्टी समाचार

पाक्षिक पत्र : संपादक — द. गो. काळे. प्रकाशक — चिंतामण सदाशिव मराठे, विलेपार्ले. वा. व. रु. १८०. फु. अ. ८१. प्रथमांक — १ आगस्ट १९२५.

स्वरूप — जिल्ह्यातील चळवळीची माहिती; जिल्ह्याचा इतिहास वगैरेविषयक लेख.

—लोकमान्यांच्या पुण्यतिथीपासून, बलवंत सभातर्फे दरमहा १ व १५ तारखेस प्रकाशन. वर्ष १ अंक ६ (१५ अक्टोबर १९२५) मध्ये साष्टीचा इतिहास.

—(जाहिरात) 'काव्यरत्नावली' वर्ष ३३ अंक ६ डिसेंबर १९२५ मलपृष्ठ २.

## साहित्य०

पाक्षिक : संपादक – गोपाळ गोविंद अधिकारी, चिटणीस शारदा मंडळ, पुणे. प्रकाशक – पुणे. प्रथमांक – १७ मे १९२५.

उद्देश – शारदामंडळ पुणे या संस्थेचे. काव्यशाहित्यचर्चाविषयक पाक्षिक.

— नमुना अंकाचे प्रकाशन पहिल्या शारदोपासक संमेलनाच्या प्रसंगी झाले.

— (पोच) "तत्त्वज्ञानमंदिर" वर्ष ६ अंक ४ एप्रिल १९२५ पृ. ५०-५१.

## साक्षरता दीप

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४७–१९५१.

— सरकारी यादी १९४७–४८ ते १९५० – ५१.

## सिद्धार्थ+

पाक्षिक : संपादक – चंद्रकांत गायकवाड. प्रकाशक – मुंबई. प्रथमांक – १४ एप्रिल १९४९.

— 'दलितांची वृत्तपत्रे', परिशिष्ट ५ क्रम ४९.

## सिंहनाद

पाक्षिक (?) : संपादक – ब्रिगेडिअर जयकुमार मकनजी. प्रकाशक – शामराव माल्पेकर, भायखळा, मुंबई. मुद्रक – भाग्य प्रिंटिंग, मुंबई ४. वा. व. रु. २·७५. कि. अं. १२ पैसे. आकार १२ पृष्ठे. १०·९ × ८. प्रथमांक – (जानेवारी १८८९).

उद्देश – पश्चिम भारत टेरिटरीकरिता मुक्ति सेनेचे अधिकृत मराठी मासिक पत्र. खिस्ती मताचे.

विशेष माहिती – इंग्रजी मथळा – दि सिंहनाद. दि वॉरक्राय. ऑफिशिअल ऑर्गन ऑफ दि साल्व्हेशन आर्मि इन वेस्टर्न इंडिया टेरिटरी. संस्थापक – विल्यम बूथ. मालक – साल्व्हेशन आर्मि, लंडन, इंग्लंड. माहिती – वर्ष ७८ अंक १० ऑक्टोबर १९६६ वरून. याच नावाचे मासिक (इ. १८८२ चे) रजिस्ट्रारच्या १९५८ च्या रिपोर्टात व सरकारी यादीत (१९४९-५०) नमूद आहे.

[ आचव संग्रह ]

## सुंदरी

मासिक : काल – जुलै १९०७.

— (सामार स्वीकार) 'ज्ञानमित्र' वर्ष १ अंक ८ जुलै १९०७.

## सुबोध सिंधू

मासिक ? : प्रकाशक – पाडवा (?). काल – श. १८१६ (१८९४-१८९५).

— (उल्लेख) 'आर्यधर्मदर्पण' वर्ष २ अंक १ माघ श. १८१६ मलपृष्ठ २ समोर जाहिरातीची पृष्ठे ६–७ ह्यावर 'दर्पणावर अभिप्राय देणारे' म्हणून या नियतकालिकाचा उल्लेख.

## सुबोधिनी

मासिक : संपादक – सौ. गोदूबाई शिंदे. प्रकाशक – निपाणी. काल – १९१३ (?)

विशेष माहिती – (जाहिरात) 'मराठा विजय' निपाणी १९१३ या मासिकात (दाते).

## सुवार्ता

मासिक : संपादक – रे. वि. आ. सत्राळकर. प्रकाशक – कोल्हापूर. काल – १९३९.

उद्देश : चर्च कौन्सिलचे मुख-पत्र.

— 'ज्ञानोदय' पुणे, (संपादक सुर्यवंशी) वर्ष १ अंक ६ जानेवारी १९३९, पृ. ६.

## सुविचार

मासिक पत्र : काल – १८८९.
— (स्वीकार) 'शाश्वी' वर्ष १ अंक ३ डिसेंबर १८८९ मलपृष्ठ २.

## सुवृत्तप्रसार

मासिक : प्रकाशक – अकोला (वऱ्हाड). वा. व. रु. २·५०. फु.अं.२५ पैसे. अंकात १६ पृष्ठे. ९·७ X ७·३. प्रथमांक – (जानेवारी, १९२९).
उद्देश : ख्रिस्ती मताचे.
विशेष माहिती – माहिती वर्ष ३८ अंक १० अक्टोबर १९६६वरून.– १९५८च्या रजिस्ट्रारच्या रिपोर्टात याच नावाच्या नासिकच्या मासिकाची १९१६ तील आरंभ म्हणून नोंद आहे.
[ जाधवसंग्रह ]

## सुज्ञमित्र

मासिक (?) : संपादक – मनीराम बालचंद्र परदेसी. प्रकाशक – विजापूर. वा. व. रु. २·८८. काल – १९२१.
उद्देश – देशसेवा साधण्याचा उदात्त हेतू. स्वरूप – जाडू वगैरे.
– "जुलै १९२१पासून तीन्ही अंक पावले."
— (पोच) 'लोकमित्र' वर्ष ३१ अंक ३ सप्टेंबर १९२१, पृ १०४; (पोच) 'केसरी' १९ नोव्हेंबर १९२१, पृ. ७.

## सेवक*

द्वाराहिक : प्रकाशक – रत्नागिरी. काल – १९५०-१९५१.
— सरकारी यादी १९५०–५१.

## सेवा संजीवन

मासिक : संपादक – (चालक) लक्ष्मण शिवराम चौधरी, सीताराम नाना चौधरी प्रकाशक – जळगाव. काल – १९१८–१९.
—'जळगाव मराठी पत्रकार परिषद स्मृतिपुष्प' मार्च १९६५ पृ. ८९.

## सोमवंशीय मित्र

पाक्षिक : संपादक – शि. जा. कांबळे. प्रकाशक – पुणे. काल – १९०९.
—'दलितांची वृत्तपत्रे' परिशिष्ट ५ क्रम ६.

## सोव्हिएट-मित्र

पाक्षिक : प्रकाशक – मुंबई. काल – १९४८–१९५०.
– सरकारी यादी १९४८-४९,१९५०-५१.

## स्वधर्म*

मासिक : प्रकाशक – उज्जैन (?). काल– (१९००–१९०१).
विशेष माहिती – 'वैदिकधर्म'चे नामांतर (पाहा). " 'वैदिकधर्म' मासिकाचे मांडोख्या-नंतरचे संपादक शंकर दाजीशास्त्री पदे. यांनी त्याचे नामांतर 'स्वधर्म' त केले व धोरणातही थोडा बदल केला. 'स्वधर्म'चे सहा महिन्यात जेमतेम ३ अंक निघाल्यावर पदे यांना सर्वच सोडावा लागला. नंतर काही दिवस मासिक बंद राहून पुन्हा अक्टोबर १९०२ पासून 'वैदिक धर्म' या पूर्वीच्याच नावाने उज्जयिनीच्या ऐवजी इंदुरहून नव्या (अज्ञात) संपादकाकडून नव्या जोमाने चालू करण्यात आले. नियमित नव्हते. जून १९०३ पर्यंत कसेबसे तीनच अंक निघाले. शेवटी कायमचे बंद पडले." – कृ. गं. कवचाळे 'मध्यभारतीय मराठी वाङ्मय १८६१ –१९३६', १९३९ पृ. ३२२ २३.

## हॉस्पिटल असिस्टंट

मासिक : काल – १९०७.
— (साभार स्वीकार) 'ज्ञानमित्र' वर्ष १ अंक ९ जुलै १९०७.

